रघुवीरदासविरचित

# अध्यात्मरामकथा

भाग पहिला,

अनुक्रमणिका.

## ३ अरण्यकांड, स. १०

## ४ किष्किंधाकांड, स. ९

श्री



# अध्यात्मरामकथा



## अध्याय १ ला, मंगलाचरण

ॐ नमः श्रीरामचंद्राय ॥ मंगळमूर्ति **श्रीगणराज** । साधितो सकळिकांचें काज । तयास परम प्रेमें आज । हा मी येथें वंदितों ॥ १ ॥ मग प्रार्थितों ऐशिया परी । कीं या लेखन-कार्यावरी । दृष्टि कृपेची ठेवोनि बरी । निर्विघ्न ऐसें करावें ॥ २ ॥ मग श्रीसरस्वतीतें नमन । करून मागतों हें वरदान । कीं या ग्रंथाचें लेखन । करितां बळ दे मतीचें ॥ ३ ॥ यापरी वंदून उभय मूर्ती । साधून मंगलाचरणपूर्ती । मग मी सकल कल्याण-कर्ती । गुरुमाता ती वंदितों ॥ ४ ॥ जियेनें मस्तकीं ठेवितां हस्त । संसारभयाचा होऊन अस्त । परमानंदेंचि जग समस्त । दाटून जाय जनांतें ॥ ५ ॥ यावरी आपुली उपासना- । मूर्ति आवडी आणून मना । त्याचि पूर्ण आनंदघना । वंदूनि होतों बळी मी ॥ ६ ॥ अहो या उपासनेचें बळ । सर्वेचि जिंकून घे कळिकाळ । आणि चिरशांतीचें स्थळ । जोडूनि दे-तें निश्चयें ॥ ७ ॥ मग जे पूर्वील संतजन । पावले सर्वात्मतेचें स्थान । त्यांतेंहि प्रेमें आदरें नमन । करितों हा मी ये स्थळीं ॥ ८ ॥ ज्यांहीं निजात्मसौख्यासाठीं । जोडिला

श्रीमान श्रीजगजेठी । आणि मार्गीहि करून पाठीं । ठेविला आणिकांनिमित्तें ॥ ९ ॥ तैसेच भजती जे श्रीरामा। धरून उपासनेच्या क्रमा। आणि जयांतें उदंड प्रेमा। श्रवणीं श्रीरामकथेच्या ॥ १० ॥ त्यांतेंहि वंदूनि हा मी आतां। ध्यातों आणीक श्रीरघुनाथा। मग ही अध्यात्मरामकथा। कथितों सद्भक्तजनांतें ॥ ११ ॥ सुंदर **अध्यात्मरामायण**। नाना अध्यात्म भाव पूर्ण। जयांत ज्ञानभक्तीची खूण। दाविली आहे सुबोध ॥ १२ ॥ निर्गुण परमात्मानुसंधान। कराया भक्तीचें साधन। येणें विस्तारें केलें कथन। श्रीरामभक्तांकारणें ॥ १३ ॥ राघवीं जोडोनि शुद्ध प्रेम। हरावें सकळ संसारश्रम। तयास ऐसा उपाय सुगम। अन्यथा कोठें असेना *॥ १४ ॥ मातेंहि वाटलें श्रीरामकृपा। आपण संपादावी बापा। आणि समस्त संसारतापा- । पासून वेगें सुटावें ॥ १५ ॥ म्हणोनि कांहीं सुगम पथ। धरावा ऐसा मनोरथ। अंतरीं उदित होतांचि तेथ। करुणा आली प्रभूला ॥ १६ ॥ मग भेटून श्रीगुरुरायें। मजसि निवेदिलें जें स्वयें। कीं या चरित्रपठणोपायें। सर्वाभीष्टातें पाविजे ॥ १७ ॥ मग विश्वासें ती गुरुवाणी। सुदृढ होवोनि अंतःकरणीं। मीं या अध्यात्मरामायणीं। चित्त देवोनी बैसलों ॥ १८ ॥ प्रेमें करावें ग्रंथपठण। अंतरीं ध्यावा सीतारमण। जनींचे अनेक दोषगुण। चित्तीं येऊं न देतां ॥ १९ ॥ तेधवां श्रीरामकृपागुणें। रंगून जाइजे अंतःकरणें। आणि आयासावांचूनि तेणें। थोर आनंद लाहिजे ॥ २० ॥ यापरी अध्यात्मरामायण। मजसि होतां सौख्यकारण। वाटलें कीं ही

आनंदखाण । सकळिकांतेंही असावी ॥ २१ ॥ संस्कृत भाषेचे जाणते । पठणीं घेतील या सौख्यातें । परी जे अज्ञचि राहिले तीतें । त्यांतें लाभ हा केउता ॥ २२ ॥ ठायींठायींचे पंडित । प्रसंगीं जनांस करिती श्रुत । परी जो आनंद एकान्तात । मननशीलांहीं लाहिजे ॥ २३ ॥ एकान्त मननानंद-सरी। वाटलें श्रवण हें कैसें करी । म्हणोनि कथा ही व्हावी घरीं । सर्वांस वाचावयातें ॥ २४ ॥ मग पुढती ऐसेंचि मत । अंतरासाजी होऊनि स्थित । ग्रंथ हा महाराष्ट्र भाषेआंत । योजिलें आणावयाचें ॥ २५ ॥ पाहतां विशद ज्ञानविचार । एकचि नटला श्रीरघुवीर । मग हें श्रीराम-कथासार । प्राप्त कोणातें असेना ? ॥ २६ ॥ हाचि परमात्मा, हाचि जीव । हाचि जडादि लेइला भाव । तेथ म्हणाया केउता वाव । हा देव हा भक्त म्हणून ॥ २७ ॥ सर्वचि रघुवीराच्या मूर्ती । क्रीडती, करिती स्वानंद-पूर्ती । म्हणोनि पांहतां संसार-आर्ती । कोणास कैंची असेल * ॥ २८ ॥ सद्गुरुनाथें हें पूर्ण मत । मजासि एकदां केलें विदित । तयीं मीं तेंचि स्वात्महित । सेवुनी नित्य रहावें ॥ २९ ॥ परी या चित्ताचा जो स्वभाव । आवडी गावा देवाधिदेव । तो हा स्वयेंचि घेऊनि धाव । काजास ऐशा निघाला ॥ ३० ॥ बा हे प्रकृतीचे त्रिगुण । तैसे तैसेच वर्तती जाण । तेथ या निग्रहाचें ठाण । कांहींच राहूं शकेना ॥ ३१ ॥ ऐसें **श्रीकृष्ण-जीचें** गीत । आहे सकळिकांतें श्रुत । त्याचेंच फळ बा हें निश्चित । अध्यात्मरामकथा हीं ॥ ३२ ॥ म्हणोनि सत्वादि गुण जे तीन । ते हे आपुल्याचि योगेंकरून । सक-

ळहि कर्माचें साधन । स्वयेंचि सिद्धी आणती ॥ ३३ ॥ तेणेंच घडालिया कर्माप्रती । 'माझें' म्हणावयाची रीती । ज्ञानियांलागीं अमान्य होती । बोध ऐसाचि तयांचा ॥ ३४ ॥ या रिती विचार घेऊं जातां । अहंकार हा होऊनि रिता । सर्वत्र एक श्रीराम कर्ता । हाचि तत्वार्थ पाविजे ॥ ३५ ॥ म्हणोनि किमर्थ हें लेखन । प्रश्नचि न रुचे मजलागून । सर्वांतरांत रघुनंदन । ठाण मांडूनी बैसला ॥ ३६ ॥ सकळ करणें जगदीशाचें । कवित्वचि काय मनुष्याचें । ऐशा अप्रमाण बोलण्याचें । काय ध्यावें ? ॥ ३७ ॥ ऐसें स्वामी **श्रीरामदास** । स्थित जे माझिया गुरुपदास । ते हें सांगती सकळिकांस । दासबोधाच्या समासीं ॥ ३८ ॥ त्याचि अर्थास अनुसरून । जाणिजे माझें हें लेखन । म्हणोनि गुणकर्माचें स्थान । एक श्रीराम निश्चयें ॥ ३९ ॥ अथवा आणीक आहे परी । इया लेखनाचे परिहारीं । कीं वक्त्यातें बळ तें चतुरीं । श्रोतींच जाणा दिधलें ॥ ४० ॥ म्हणोनि तुम्हीच रामप्रेमी । मजासि ऐशिया लाविता कामीं । कीं यायोगें अध्यात्मरामीं । रंगून जावें जनांहीं ॥ ४१ ॥ तुमचें प्रेमसर्वस्व एक । सीतापती जो रघुनायक । म्हणोनि तयाचें तें प्रत्येक । तुमचिया चित्तातें वेधितें ॥ ४२ ॥ यास्तव श्रीरामदासींच मज- । करवीं करविलें आपुलें काज । अखंड श्रीराम आत्मराज । आवडी सेवावयातें ॥ ४३ ॥ मग तयांचीच जी ही कृती । ती हीं तयांस कैशी रुचती । किंवा न रुचे, ऐशा रीती । चिंता कोणें करावी ? ॥ ४४ ॥ अहो जे रघुवीराचे दास । पावन करिती सर्व जगास ।

कोणेहि कर्मामाजी तयांस । सायास कैंचे समर्थां* ॥ ४५ ॥ म्हणोनि राघवें सांगितली । आणि तयाच्या दासें लिहिली । अथवा दासांहीं बोलविली । निमित्त कोणा करूनी ॥ ४६ ॥ ऐसें अध्यात्मरामचरित । करून कोणेक निमित्तभूत । आज या महाराष्ट्रभाषेआंत । पातलें आहे पहा जी ॥ ४७ ॥ ग्रंथ ते बहुत होती लोकीं । दृष्टि जयांची रघुनायकीं । आणि अध्यात्माचीहि निकी । वाट दाविली जयांहीं ॥ ४८ ॥ परी या ग्रंथाची बोधरीती । आणिकांपासून वेगळी होती । कीं येथ कथेचियाच संगतीं । अध्यात्म आहे जोडिलें ॥ ४९ ॥ वेगळी एकली अवतारकथा । किंवा अध्यात्मचि सर्वथा । येथ या सांडूनि दोन्ही पथा । एकत्र केलें तयांतें ॥ ५० ॥ तेणें जैसें शर्करापुट । औषधावरती देइजे नीट । तैसेंच होऊन, सुगम वाट । जाहली सामान्य जनांतें ॥ ५१ ॥ ययांत रघुवीराचें प्रेम । जें कां अमृतरसोपम । आणीक उपासनेचाहि क्रम । संपूर्ण आहे दाविला ॥ ५२ ॥ पदार्थमात्रीं जी आसक्ति । रोधिली जियेनें श्रीरामभक्ति । तियेस निवटावयाची युक्ति । तीही येथें दाविली ॥ ५३ ॥ सर्वांठायीं श्रीरघुवीर । दाटला, हाहि ज्ञानविचार । ग्रंथामाजी या सविस्तर । सांगून आहे ठेविला ॥ ५४ ॥ ग्रंथ हा पूर्वील ऋषिजनांचा । निमित्तमात्रचि मी शब्दाचा । अथवा रसज्ञ जो अर्थाचा । त्यास हा विस्तार वाउगा ॥५५॥ ग्रंथाचें करूं जावें स्तवन । परी न तयाचें प्रयोजन । येथें सांडूनिया अनुमान । श्रोतीं प्रत्यय पहावा ॥ ५६ ॥ ऐसा प्रत्ययज्ञानप्रचुर । ग्रंथ हा सद्भक्त-चित्तहर । साधकें जोडो-

नियां सत्वर । सदैव मननीं धरावा ॥ ५७ ॥ ठायींठायींचे भक्तजन । जयांचें रामभक्तींत मन । त्यांहीं अध्यात्मरामभजन । परम प्रेमें करावें ॥ ५८ ॥ आणि सर्वत्र श्रीरघुवीर-। कथेचा माजून राहो भर । तैसीच अध्यात्मविद्या थोर । दाटून जावो जगीं या ॥ ५९ ॥ रघुवीरदासांच्या अंतरीं । वाटे ऐसीच होवो परी । आस ही स्वयेंचि श्रीरघुवीरीं । स्वेच्छया सिद्धीस नेइजे ॥ ६० ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । **रघुवीरदासें** प्राकृतीं ॥ ६१ ॥ श्रीराम ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

---

## अध्याय २ रा, ग्रंथमहिमा

श्रीराम ॥ जेथ नचले कांहीं प्रमाण । दूरचि राहताती त्रिगुण । जें कां शुद्ध निर्मल ज्ञान । परात्मरूप चैतन्य ॥ १ ॥ जेथून वाणी आणि मन । दुर्बळपणें येती परतून । ऐसा उदार राघव चिद्घन । प्रथमारंभीं वंदितों ॥ २ ॥ पुढती कथा सांगतों मधुर । श्री-राम-अध्यात्म-बोधसार । श्रवणें भाविकांचें अंतर । आत्मारामीं रमावें ॥ ३ ॥ प्रसिद्ध **नारद** महामुनी । भ्रमण जयाचें त्रिभुवनीं । तेणें ये मृत्युलोकीं येउनी । लोकव्यवहार पाहिला ॥ ४ ॥ तंव हे लोक सकळिक । अखंड दुःखें भोगिती अनेक । ऐसें चित्र देखूनि क्षणएक । उद्वेग चित्तीं वाटला ॥ ५ ॥ मग ऐसें आणिलें मना । जावोनि भेटावें कम-

लासना । चारी वेद ज्याचिया वदना । ज्ञानतेजें शोभविती ॥ ६ ॥ मग तो ब्रह्मलोकीं पातला । सभास्थानास प्रवेशला । तंव तेथ प्रकाश फांकला । बालसूर्याचे सारिखा ॥ ७ ॥ ऐसें तेज सुमनोहर । ऋषि स्तविती अर्थमधुर । देवी शोभते अंकावर । सर्वज्ञानखनी जी ॥ ८ ॥ ऐसा धाता चतुर्मुख । भक्तकाम पुरविता देख । आसनीं पाहोनि थोर हारिख । मुनीलागीं वाटला ॥ ९ ॥ प्रेमें हृदय आलें भरून । जावोनि साष्टांग करी वंदन । तंव ते मुनीस पुढें देखोन । ब्रह्मदेव संतोषले ॥ १० ॥ मग ऐसें बोलती मुनीस । बा तूं भगवद्भक्त सरस । आजि काय आणिलें मनास । तें निःशंक सांगिजे ॥ ११ ॥ ऐकोनि ऐसें विधीचें वचन । सुखावलें मुनीचें मन । म्हणे एक मात विचारून । ध्यावया आहें पातलों ॥ १२ ॥ अरिष्ट एक उद्भवलें । तेणें जन आकंठ गिळिले । तयातें पाहिजेचि हो निरसिलें । दयार्द्र चित्तेंकरोनी ॥ १३ ॥ देवा! पहा जी हें कलियुग । महाभयंकर जैशी आग । तैसें येणें सर्व जग । जाळूं घातलें निःशेष ॥ १४ ॥ पुण्यमार्ग लोकीं त्यजिला । अनाचारास ऊत आला । साच वर्तणुकीचा जाहला । दुष्काळ चोहींकडे ॥ १५ ॥ परास दूषणें लावावीं । आपुली बढाई वाढवावी । नाना साधनें तीं धुंडावीं । द्रव्यप्राप्तीकारणें ॥ १६ ॥ परस्त्रीची चाड मना । सर्वेचि छळावें दुर्बल जनां । स्वसुखाची करावी जतना । हेचि आवडी वाढली ॥ १७ ॥ कैंचा देव ऐसें बोलती । नास्तिकपणीं अति प्रीती । पशुबुद्धीनें नित्य वर्तती । देहसुखाकारणें ॥ १८ ॥ कोणी न मानिती वडिलांसी ।

प्रेमें पूजिती स्त्रियांसी । लोभ ठेवूनि रतिसुखासी । विकून घेती आपणां ॥ १९ ॥ स्वयें होवोनि द्विजवर । मूढपणें सोडिती आचार । अन्यास वंचायाचा विचार । एकचि मनीं दाटला ॥ २० ॥ ब्राह्मण गिळिले लोभग्रहें । वेदार्थ विकिती निर्वाहें । चित्त कैसें महा-मोहें । केलें व्यास कळेना ॥ २१ ॥ उदंड विद्या शिकावी । आणि द्रव्याकारणें वेंचावी । परी तिळही दोष जीवीं । कोणेकाला गमेना ॥२२॥ क्षत्रिय आणि वैश्य तेही । स्वकर्म-त्यागी जाहले पाहीं । शूद्रवृत्तीसी लवलाहीं । सादर झाले सेवाया * ॥ २३ ॥ सांडोनि आत्मारामसुख । विषयकर्दमीं घालिती मुख । कासाविसी पावोनि देख । उपरति कोणी धरीना ॥ २४ ॥ वर्णाश्रमास परतें केलें । एकंकारास सरसावले । सात्त्विक तामस एक केले । भेद कैंचा म्हणोनी ॥ २५ ॥ देव नाहींच म्हणती । ब्रह्मानंदास पाषाण गणिती । आणिक धावधावोनि खाणिती । प्रस्तर विषयसुखाचे ॥ २६ ॥ स्त्रियांचीहि हीच गती । पतीची सेवा टाकूनि देती । लज्जा मर्यादा दुर्गुण अती । ऐसेचि केले निश्चय ॥ २७ ॥ परंपरागत चालीरीती । समाजबंधनें आणि नीती । सांडोनि स्वैर-पणेंचि वर्तती । यमदंड सहाया ॥ २८ ॥ ऐसा घोर अनर्थ मातला । कलियुगें घाला घातला । सर्वनाशाचा प्रसंग आला । मृत्युलोकीं पहा हो ॥ २९ ॥ सर्व लोक आक्रं-दती । मायाभ्रमें शीण पावती । येणें व्याकुळ होय मती । चैन कांहीं पडेना ॥ ३० ॥ तरी कासयानें हें टळेल । जनांसी मंगळ मेघ वळेल । चिरंतन आनंद फळेल । अखंड

सर्व जनांतें ॥ ३१ ॥ मार्ग तरी ऐसा असावा । जो कवणेंहि आचरावा । मूढमतिहि सद्गति पावावा । अल्पायासें करोनी ॥ ३२ ॥ देवा सर्वज्ञ कीं आपण । जाणतां सर्व अर्थाची खूण । तरी शोधोन मूळ कारण । सुगमोपाय दाविजे ॥ ३३ ॥ ऐकोनि नारदाचें वचन । संतोषें बोले कमलासन । परहिताच्या या प्रश्नेंकरून । मज आनंद वाटतो ॥ ३४ ॥ तरी उपाय ऐकें नारदा । पूर्वीं देवी पार्वती एकदां । ऐसाचि खेद पावून, सदा-। शिवास गेली पुसाया ॥ ३५ ॥ ते वेळीं शंकरें निरूपिलें । तें अध्यात्मरामायण बोलिलें । ऐकोनि समाधान लाभलें । गिरिजेलागीं निश्चित ॥ ३६ ॥ जगन्माता देवी आपण । अखंड चालवी तयाचें श्रवण । मनन निदिध्यासहि जाण । करोनि आराम पावते ॥ ३७ ॥ मुने, ऐसें हें थोर पुराण । जनांच्या भाग्योदयें करून । लोकीं पावेल प्रसिद्धपण । तरी मंगळ सर्वांचि ॥ ३८ ॥ तयाच्या अध्ययनें करून । जनांस लाभेल स्वानंदधन । होईल पातकाचें निरसन । हें तों काय म्हणावें? ॥ ३९ ॥ तंवचि पापाचा बडिवार । आढळेल या भूलोकावर । अध्यात्मरामायण जोंवर । नाहीं प्रसिद्धि पावलें ॥ ४० ॥ कलियुगाचें प्रचंड बळ । चालेल तोंवरीच केवळ । अध्यात्मरामायण भूमितळ । शोभवूं आलें नसे जैं ॥ ४१ ॥ यमदूतांचाही संचार । तोंवरीच होईल घरोघर । जंव अध्यात्मरामायण विस्तार । लोकीं नाहीं पावलें ॥ ४२ ॥ नाना शास्त्रांचीं नाना मतें । तंवचि करितील कलहातें । अध्यात्मरामायण उदयातें । नाहीं जंव पातलें ॥ ४३ ॥ रामचरि-

तांची गुप्त खूण । पंडितालाहि अगम्य जाण । जोंवरी अध्यात्मरामायण । लोकीं नाहीं ठाउकें ॥ ४४ ॥ बापा, ऐसें दुर्लभ पुराण । याचें करितां अर्थश्रवण । महालाभ होइजेल जाण । वर्णू न शकें तयातें ॥ ४५ ॥ होवोनि पातकाचा नास । भक्तिभाव येईल उदयास । अंगीं परमात्मयाचा वास । घडेल बापा प्रत्यक्ष ॥ ४६ ॥ आदरभाव ठेवोनि मनीं । जो प्रवर्तेल श्रवण-मननीं । तो परमात्मपदाचा धनी । अवश्यमेव होइजे ॥ ४७ ॥ एकाग्र करावें मनन । अर्थी लावावें अनुसंधान । तेणें अश्वमेधादि पुण्यधन । सांडोनि पार जाइजे ॥ ४८ ॥ जरी हें पातलें कानावरी । अंतरीं नसतांहि आस्था खरी । तरीहि येईल लाभावरी । निःसंशयें नारदा ॥ ४९ ॥ भावें करितां नमस्कार । तरी पूजिले जाण सुरवर । आणि ग्रंथदानेंहि निर्भर । सुख पाविजे जनांहीं ॥ ५० ॥ वेदशास्त्रांचें अध्ययन । काय बापुडें भक्तिहीन । त्याहून थोर महिमान । ग्रंथ हा भावें वाचितां ॥ ५१ ॥ एकादशीचें उपोषण । करोनि अध्यात्मरामायण । भक्तजनांत करितां पठण । आनंद होय उदंड ॥ ५२ ॥ ऐसिया आनंदाची सरी । गायत्रीपुरश्चरण न करी । याचिये पठणीं एकाक्षरीं । पुरश्चरण जोडतें ॥ ५३ ॥ श्रीरामनवमीचा आनंददिन । पाळावा आवडी धरून । उपवासव्रत आदरून । रात्रौ भजन करावें ॥ ५४ ॥ चित्त एकाग्र ठेवावें । अर्थालागीं मनन करावें । कोटिपुण्यास पात्र व्हावें । ऐसें माहात्म्य ये ग्रंथीं ॥ ५५ ॥ नाना तीर्थक्षेत्रांप्रती । जावोनि देहतुळा करिती । ग्रहणकाल आणि साधिती । कर्मनिष्ठ द्विजासी

॥ ५६ ॥ तेथ सुवर्णाचें दान करावें । आणि स्वर्गाशेस मनीं धरावें । हें कायसें अमंगळ आघवें । श्रवणलाभासी तोलितां ॥ ५७ ॥ याकारणें चित्त देऊन । केलें जें ग्रंथाचें मनन । तें ऐशिया पुण्यकर्माहून । कोटिगुणाचि निश्चयें ॥ ५८ ॥ नाद लागला श्रवणाचा । सहजें गाऊं लागली वाचा । तो आनंद वर्णिलें साचा । ऐसा नाहीं त्रिलोकीं * ॥ ५९ ॥ विषयसुखाचे जे किंकर । स्वर्गवासी विलासी सुर । त्यांचिया चित्तासि धाक थोर । इया निष्काम भक्ताचा ॥ ६० ॥ म्हणोनि नित्यपठणाचा नेम । धरून वर्तेल जो निष्काम । त्याचें कांहींहि अल्प कर्म । महाफळासी पाविजे ॥ ६१ ॥ त्यांतही विशेषें **श्रीरामहृदय** । करोनि संकल्पांचा जय । नित्यनेमें वाचीत जाय । अद्भुत पावित्र्य तयाचें ॥ ६२ ॥ पुढारां रामदूतप्रतिमा । अंतरीं भक्ति सर्वोत्तमा । त्रिवार पठणाचिया नेमा । धरून रामीं रमावें ॥ ६३ ॥ शब्द न बोलावा जनांसी । प्रेम पाळावें मानसीं । येणेंकरूनि सर्वसुखासी । निःसंशयें पाविजे ॥ ६४ ॥ ऐकें आणिकही गुण । श्रीरामहृदयाचें पठण । तुळस-पिंपळ ऐसें ठिकाण । पाहोनि तेथें करावें ॥ ६५ ॥ अर्थीं ठेवावी आवडी । पुण्यसागरीं घ्यावी उडी । पापें पळती देशधडी । ऐसा लाभ ये पंथीं ॥६६॥ आणि **श्रीरामगीतेची** थोरवी । शंकरेंचि जाणावी आघवी । अंशेंचि जाणते उमा देवी । मी तों अत्यल्प जाणतों ॥ ६७ ॥ त्याचाहि अंश सांगतों तुला । दोष ऐसा न अवलोकिला । जयाचा नाहींच नाश केला । श्रीरामगीताबळानें ॥६८

उदंड पाहतांहि विचार । श्रीरामगीतेऐसें सार । शांति-पवित्रता देणार। नाहींच कांहीं जगीं या ॥ ६९ ॥ व्यर्थ कासया हिंडावें । रामगीतामृतचि प्यावें । जेणें मरणातेंहि मारावें । बोलला राम स्वयें जें ॥ ७० ॥ पूर्वीं जमदग्नि-मुनीचा सुत । कार्तवीर्य-वधास उद्यत । होऊन धनुर्विद्येनिमित्त । शंकरापाशीं राहिला ॥ ७१ ॥ तेथ तेणें देखिली सती । राम-गीतेचें पठण करिती । तेणेंचि आवडी वाटोनि चित्तीं । तोही श्रवणीं लागला ॥ ७२ ॥ श्रद्धेनें अभ्यास फळला । आनंदभावास कीं पोंचला । परमात्मपदास प्राप्त झाला । जन्म-मरणातें वारुनी ॥ ७३ ॥ इया कारणें बा नारदा । गीता ही सर्वसौख्यप्रदा । हेचि चिंतावी हृदयीं सदा । अनुभव ऐसा हा माझा ॥ ७४ ॥ दुष्ट दान स्वीकारिलें । राजस तामस अन्न सेविलें । कीं निंदादि दोषही घडले । वाणीकरवीं प्रसंगें ॥ ७५ ॥ आणि निष्कृति व्हायालागुनी । आस उपजलीसे मनीं । तरी या गीतेच्याचि पठनीं । प्रवृत्त व्हावें भल्यानें ॥ ७६ ॥ शालग्राम पुढें ठेवावा । पवित्र वृक्ष संनिध व्हावा । आणिक आत्मज्ञ यति असावा । पठणकाळीं पुढारां ॥ ७७ ॥ गृहस्थाश्रमींचीं नाना कर्मे । चाल-वितांहि नित्यनेमें । श्रीरामगीता पठणक्रमें । नित्यानंदातें पाविजे ॥ ७८ ॥ किंवा एका-दशीचें व्रत । घेवोन राहावें नियत । श्रीरामगीतेशीं लावून चित्त । एकाग्र अर्थ पहावा ॥ ७९ ॥ अर्थांतर हृदयीं घेतां । निजात्मलाभाचि हो तत्त्वतां । देवदेवाचें ऐश्वर्य येतां । विलंब नाहीं तयातें ॥ ८० ॥ कासया दानें कासया ध्यानें । कासया तीर्थादिकांचीं

स्नानें । रामगीतेच्या अध्ययनानें । सकळ मंगळ जोडिजे* ॥ ८१ ॥ नारदा काय सांगूं उदंड । श्रुति-स्मृति-पुराणोक्त फल-बंड । येथ सारेंचि पडतें थंड । रामगीतार्थ सेवतां ॥ ८२ ॥ ऐसिये परी हें नारदातें । अध्यात्मरामायण-वर्म निरुतें । निरूपिलें त्रिजगत्तातें । कमलासनें यथार्थ ॥ ८३ ॥ तें हें चिंतावें सुजनीं । लागावें श्रीरामभजनीं । आणि व्हावें चिरसौख्य-धनी । हेचि आवडी एकली ॥ ८४ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८५ ॥ श्रीराम ॥







# बालकांड

## अध्याय ३ रा, श्रीरामहृदय

श्रीराम ॥ आतां वंदितों श्रीराघवेश । हाचि कीं माझा श्रीगणेश । मायाश्रयें नाना देहवेष । हाचि आहे लेयिला ॥ १ ॥ विश्वाची करून उत्पत्ती । नेई लयासही मागुती । हाचि माझा श्रीसीतापती । मायामात्रें करोनी ॥ २ ॥ कीं जें नाहीं तयासी कारण- । श्री-राम, म्हणणें अप्रमाण । कोणास मानवे हें भाषण । ज्ञानदृष्टीनें पाहतां ॥ ३ ॥ परी या विश्वाचें मिथ्यापण । ज्यांहीं अनुभविलें परिपूर्ण । तेचि ऐसें निरूपण । मानितील निज-बोधें ॥ ४ ॥ एरीं या विश्वाची सत्ता । मिथ्याच परी कल्पिली असतां । त्यांच्या भावा-नुसारें पाहतां । श्रीरामें विश्व निर्मिलें ॥ ५ ॥ परी 'सूर्य प्रकाश देतो । मागुती अंधकार करितो' । ऐसें जनीं बोलतांही तो । राहेचि सर्वां अकर्ता ॥ ६ ॥ तैसें, मायेनें गुंडाळले । लोक म्हणती 'विश्व केलें'। परी तें नाहीं कीं स्पर्शलें । आत्मारामा केवला ॥ ७ ॥ ऐसा येथील नवलाव । कोणें वर्णावी त्याची माव । अचिंत्य-मूर्त श्रीराघव । बुद्धीलागीं कळेना ॥ ८ ॥ परी अंतरींचा अनुभव । जाणती स्वयेंचि सारे जीव । जो जो लाभे आनंदभाव । तें तें रामस्वरूप ॥ ९ ॥ श्रीराम हाचि मूर्त आनंद । म्हणोनि घ्यावा भजनछंद । तेणें

सर्वांचि नित्यानंद । मतिमंदेंही वरावा* ॥ १० ॥ ऐसा श्रीराम सीतापती । तयास माझी असो प्रणती । येणेंचि कथा ही श्रोतयांपुढती । सांगतां धीर मतीतें ॥ ११ ॥ जेधवां अधर्मा येईल भर । आणि दुर्जनांचाही प्रसार । तई मी घेवोनी अवतार । पाळीन साधुजनांतें ॥ १२ ॥ ऐसें याचें नियत व्रत । म्हणोनि अवतरला जगतांत । आणि निवटूनि खळ समस्त । सुखी केलें महीतें ॥ १३ ॥ देवांचे हेतु पूर्ण केले । ऋषींचें अंतर तोषविलें । आणि चरित्र हें ठेविलें । गावया भक्तजनांतें ॥ १४ ॥ आपुल्या कीर्तीचा विस्तार । भक्तजनार्थ या भूवर । ठेवून पापाचा संहार- । करितें साधन दाविलें ॥ १५ ॥ ऐसा ऐश्वर्याचा पुतळा । श्रीराम माझा घनसांवळा । म्हणोनि त्याच्या चरित्रलीळा । प्रेमें गाऊं वांछितों* ॥१६॥ चित्त एकाग्र ठेवोनि जाण । करितां याचें श्रवणपठण । हेंचि **अध्यात्म-रामायण** । श्रीरामरूपीं पोंचवी ॥ १७ ॥ म्हणोनि संसाराचें गोवें । येणेंचि सर्वां दूर करावें । उदंड पुण्यास सांठवावें । श्रवणमात्रें करोनी ॥ १८ ॥ श्रीसदाशिव-वदनांतून । गंगाचि हे उगम पावून । श्रीराम-सागरीं गेली मिळोन । लोकोद्धाराकारणें ॥ १९ ॥ असो हा ऐसा बहु विस्तार । आतां सांगिजेल कथासार । कैलासाधिपति **श्रीशंकर** । ध्यानीं बैसले एकदां ॥ २० ॥ एकांताचें स्थान भलें । भव्य तेजें विकसून ठेलें । आणि सिंहासन शोभलें । मध्यस्थानीं प्रशस्त ॥ २१ ॥ तंव अंबिकेनें सत्वर । येऊनि घातला नमस्कार । आणि प्रश्न केला जो सुंदर । सकळ लोकहिताचा ॥ २२ ॥ म्हणे हे महेश्वर प्राणपते ।

सकळ सामर्थ्य आपणांतें । आणि जाणोनि सर्वात्मतेतें । नित्यानंदांत राहतां ॥ २३ ॥ ऐशिया पतीची मी कांता । आणि आत्मज्ञानरहिता । ऐसें कायसें, म्हणोनि आतां । गोष्ट विचारूं पासलें ॥ २४ ॥ तेंचि आजि निरूपावी । गोप्य सर्वथा न म्हणावी । आपुली दासी जाणून जीवीं । स्वानुभवासी नेइजे ॥ २५ ॥ वैराग्य भक्ति आणि ज्ञान । यांचें कायसें महिमान । निश्चयात्मक तेंचि बोलून । कीजे संशयावेगळें ॥ २६ ॥ आम्ही स्त्रिया ज्या बुद्धिहीन । त्यांतेंहि सुलभ व्हावें ज्ञान । ऐसाचि बोध मजलागून । केला पाहिजे दयाळा ॥ २७ ॥ आणीकही एक कथा । मजला निरूपावी समर्था । श्रीरामरूपाचिया गूढार्था । स्पष्ट करोनी दाविजे ॥ २८ ॥ पाहतां भक्ति हेंचि सार । श्रीरामचंद्रींच ठेविजे भार । तेंणेंचि भवबंधाचा संहार । निःसंशयें होइजे* ॥२९॥ परंतु अंतःकरणावरी । बुद्धि संशय उत्पन्न करी । म्हणोनि तयास निवारी । ऐसी युक्ति पाहिजे ॥ ३० ॥ देवा, म्हणती हा रघुवीर । सर्व देवाधिदेव थोर । शुद्ध निर्गुण निरंतर । मायातीत सदैव ॥ ३१ ॥ आणि ऐसेंचि श्रद्धाबळ । धरून राहिले केवळ । ते पावले मोक्षफळ । ऐसे सिद्ध उदंड ॥ ३२ ॥ परी म्हणती कीं, राघवेश । परब्रह्मचि असो सावकाश । परंतु होवोनि अविद्यावश । स्वस्वरूपा विसरला ॥ ३३ ॥ मागुती होतांचि श्रीगुरुबोध । जाहला स्वस्वरूपीं सावध । नातरी तयास शोकसंबंध । वनांत कैंचा घडावा ॥ ३४ ॥ यालागीं म्हणावें अज्ञान । परी जो सामान्य जीवासमान । तयास देइजेल कैसा मान । लोकीं देवासारिखा ॥ ३५ ॥

म्हणोनि हा अज्ञान जीव । अथवा म्हणूं देवाधिदेव । ऐसिये विकल्पाचा उद्भव । होवोनि शीण देतसे ॥ ३६ ॥ ऐसें वचन पार्वतीचें । ऐकोनि शिव तोषले साचे । बुद्धि कुशाग्र पाहून, तियेचे । संशयनिरासीं लागले ॥ ३७ ॥ बोलले, देवी तूं चतुर । भक्तिभावासी अति तत्पर । म्हणोनि श्रीराम परात्पर । जाणावयातें इच्छिसी ॥ ३८ ॥ ये विषयीं जो प्रश्न करी । ऐसा पुरुष दुर्लभ भारी । या कारणें मी आजवरी । मौन सेवूनि राहिलों ॥ ३९ ॥ परी आज तुवां आदरें । पुसिलें तत्त्व कायसें खरें । म्हणोनि सिद्धान्त-उत्तरें । संशय सर्व निवारूं ॥ ४० ॥ देवी, खचित हा रघूत्तम । परमात्मा श्रीपुरुषोत्तम । अनादि अद्वय परम । मायाकारण एकला ॥ ४१ ॥ मायाबळेंचि हा आपण । हें दृश्य सर्व करी निर्माण । आणखी राहे निःसंग पूर्ण । गगनाऐसा वेगळा ॥ ४२ ॥ सर्वांचे अंतरीं राहिला । परी स्वरूपें आहे लोपला । सृष्टिसंभार उभारिला । तेणें मायानिमित्तें ॥ ४३ ॥ चुंबकाची संगति जैशी । लोहास भ्रमवीतसे अपैशी । त्यापरी सर्व जगद्राशी । याच्या सत्ते चालतो ॥ ४४ ॥ ऐशी शुद्ध परमात्मस्थिती । परी मूढ तीतें नोळखती । अज्ञानयोगें चित्तवृत्ती । मलिन झाल्याकारणें ॥ ४५ ॥ आपुलेंचि तें अज्ञान । परमात्मयावरी आरोपून । म्हणती श्रीराम आम्हांसमान । जीवचि एक निश्चयें *॥ ४६ ॥ श्रीराम तयांच्या अंतरीं । बसतांहि तयांस होय दुरी । जेविं गळींची गळसरी । बालिकेलागीं नेणवे * ॥ ४७ ॥ परी जैसा का अंधकार । पाहूं न शके हो दिनकर । तेविं सीतापति रघुवीर ।

अविद्यालेशा नातळे ॥ ४८ ॥ जेविं निजांगीं करितां भ्रमण । नयनाचि फिरूं लागती जाण । मग वाटे कीं सांडोनि ठाण । पृथ्वीच फिरूं लागली ॥ ४९ ॥ तेविं देहेंद्रियीं जें केलें । तें परमात्मयास लाविलें । ये रिती मूढीं निर्माण केलें । अविद्याभूत स्वयेंचि ॥ ५० ॥ परंतु जैसा सहस्रकिरण । प्रकाशेंचि भरिला पूर्ण । म्हणून रात्रादिवसाचें प्रमाण । तयास स्पर्शूं शकेना ॥ ५१ ॥ तैसा आनंद आत्माराम । ज्ञानघन परंधाम । तयास केंचें अविद्यातम । स्पर्श करूं शकेल ॥ ५२ ॥ ज्ञान-अज्ञान दोहों पक्षीं । जो एकलाचि असे साक्षी । मायाश्रयें विश्वास रक्षी । तेथ अविद्या कायसी ॥ ५३ ॥ आणखी देवी, एक पुढती । एकदां राम-सीता-मारुती । तिघांत जाहली तत्त्वनिश्चिती । सांगतों सार तयाचें ॥ ५४ ॥ रामें करोनि महा रण । भूमीस पाडिला रावण । वरी लोकत्रयांत जाण । कीर्ति केली उदंड ॥ ५५ ॥ मागुती पावले अयोध्येंत । सीता-लक्ष्मणांसमवेत । संगें प्रियभक्त हनुमंत । तोहि प्रेमें पावला ॥ ५६ ॥ मग वसिष्ठादि मुनिजन । थोर आनंदें सिद्ध हो-ऊन । राम-राज्याभिषेकालागुन । करिते झाले सत्वरी ॥ ५७ ॥ पुढें एकदां श्रीरघुवीर । बैसले सिंहासनावर । भक्त हनुमंत जोडोनि कर । सन्मुख उभा राहिला ॥ ५८ ॥ जेणें महाकार्य केलें । आणि चित्तीं फळ न इच्छिलें । तेणें हृदय पवित्र झालें । आत्मज्ञाना वराया ॥ ५९ ॥ ऐसा विचार आणोनि चित्तीं । श्रीराम बोलले सीतेप्रती । देवी, महा-भक्त हा मारुती । निजखूण यासि सांगिजे ॥ ६० ॥ आज्ञेस शिरसा वंदून । आणि अंतरीं

संतोषून । तत्त्वनिश्चयाचें वचन । सीता देवी बोलली ॥ ६१ ॥ बापा, राम हेचि परब्रह्म । सच्चिदानंद अद्वय-धाम । जेथ हें दृश्य पावे विराम । ऐसे सद्रूप केवल ॥६२॥ आनंदघन आणि शांत । विकार आणि मल रहित। सर्व-भूत-हृदयस्थित। शुद्ध ज्ञानपूर्ण जे ॥ ६३ ॥ सीता मी जाण प्रकृती । जी हें सृष्टिकार्य करिती । श्रीरामसंगेंचि ऐशी शक्ती । माझिये ठायीं असे ही ॥ ६४ ॥ म्हणोनि श्रीरामसत्तेवरी । मीचि हें सर्व निर्माण करीं । परी अज्ञान जयांचे अंतरीं । ते हें वर्म नेणती ॥ ६५ ॥ अयोध्या नामें एक नगर । तेथ रघूचा वंश थोर । पाहोनि घेतला अवतार । रामें, ऐसें बोलती ॥ ६६ ॥ रामेंचि विश्वामित्र-मख । सिद्धीस पावविला निःशंख । ताटका आदिक राक्षस देख । तेणेंचि भूमी पाडिले ॥ ६७ ॥ पुढती अहिल्येचा उद्धार । मग भंगिलें शिवचाप दुर्धर । करोनि माझें स्वयंवर । संतुष्ट केलें विदेहा ॥ ६८ ॥ त्यावरी मार्गी जैं भार्गव । दावूं आला युद्धगौरव । तईं तत्काळ पराभव । रामें केला तयाचा ॥ ६९ ॥ मग अयोध्येंत करोनि वास। पुढें निघाले दंडकारण्यास । उद्धरोनि विराध-राक्षस । मार्ग पुढती धरियेला ॥ ७० ॥ मागुती मारीचाचें हनन । मग रावणें कपट करून । नेलें मजलागीं पळवून । स्वात्मनाशाचे कारणें ॥ ७१ ॥ पुढें जटायू-उद्धरण । आणि कबंधाचें जन्ममरण । म्हणती रामेंचि केलें हरण । परी अकर्ता श्रीराम ॥ ७२ ॥ यावरी शबरीचा आश्रम । पाहोन घेतला पूजाक्रम । आणखी सुग्रीव-समागम । तोहि केला राघवें

॥ ७३ ॥ पुढती वालीचा उद्धार । मग मज शोधूनिया सत्वर । उल्लंघिलें जें समुद्रतीर। हनुमंताच्या निमित्तें ॥७४॥ मग लंकेलागीं वेष्टण। करोनी वेढिला रावण । आणि जाणोनि दुष्टाचरण । पंचत्त्वासी मेळाविला ॥ ७५ ॥ शेवटीं तयाचें राज्य धन । बिभीषणास सर्व अर्पून । येणें केलें पुष्पकांतून । आनंदानें अयोध्ये ॥ ७६ ॥ मग राज्यपदावरी । आपणास अभिषेक करी । ऐसें ऐसें नानापरी । रामचारित्र बोलती ॥७७॥ परी हें मींचि घडाविलें जाण । श्रीराम केवल निर्गुण । लोकीं आरोपिले गुण । ते ते मूढपणानें ॥ ७८ ॥ नसे हा जात किंवा येत । अथवा हर्ष-शोक करीत । प्रेम-तिरस्काराची मात । यातें स्पर्शूं शकेना * ॥७९॥ राम कवणही कर्म न करी । आनंदरूप सर्वां अंतरीं । चलनादिक टाकोनि दुरी । सर्वां ठायीं संचला * ॥८०॥ कालांतरानें पावेल क्षय। ऐसें नाहीं तयास भय । मायाबळें तो गुणमय । झाला ऐसें भासतें ॥८१॥ येणें रीती देवी सीता। तत्त्वार्थ सांगतां हनुमंता । **श्रीराम हृदय** तत्त्वतां । स्वयेंचि बोलूं लागले ॥ ८२ ॥ आत्मा कोण अनात्मा कोण । कैसें परमात्मयाचें लक्षण । मारुते याचें निरूपण । मींचि विवरून सांगतों ॥ ८३ ॥ पहा कीं एक **महाकाश** । जें व्यापूनि असे ब्रह्मांडास । आणि तयाचा जो अल्प अंश । पदार्थाकारीं भासतो ॥ ८४ ॥ मग तो जलसंचयादिकांत । होवोनि असे मर्यादित । तयास **समर्याद** नांव येत । तें हें **आकाश** दुसरें ॥ ८५ ॥ आणखी तेणेंचि जळें । भीतरीं प्रतिबिंबित केलें । तयास **प्रतिबिंबाकाश** बोलिलें। ऐसे

तीन प्रकार ॥ ८६ ॥ ऐसाचि आत्माहि त्रिविध । विचारें जाणिजे सुबोध । चित्त ठेवोनिया सावध । श्रवण मात्र करावें ॥ ८७ ॥ महाकाशाचिये परी । व्यापूनि असे जो सर्वांतरीं । **परात्मा** तोचि अवधारीं । पूर्ण चैतन्यरूप जो ॥ ८८ ॥ मग आपणास सीमा कल्पित । आणि बुद्धीचा आकार घेत । जीवरूपें जो कां भासत । **आत्मा** नांव तयाचें ॥ ८९ ॥ आतां प्रतिबिंबिताकाश जैसें। स्वरूपतः मूळींच नसे । नाममात्रेंचि बोलिजत असे । तैसा **अनात्मा** जाणिजे ॥ ९० ॥ बुद्धीचे ठायीं जो आभास । **अहंकार** हें नांव जयास । तोचि अनात्मा ऐशा पदास । पात्र असे सर्वथा ॥ ९१ ॥ मारुते, इया तिहींच्या माझारीं । आभासयुक्त बुद्धीवरी । कर्तृत्व सर्व अहंकारीं । आत्मा तयावेगळा ॥ ९२ ॥ तो केवळ साक्षी असे । म्हणोनि जीवत्वासि पात्र नसे । परी जनांहीं भ्रांतिवशें । तैसें व्यर्थ कल्पिलें ॥ ९३ ॥ परंतु आभास मिथ्याच केवळ । तयास कैंचें सत्ताबळ । अविद्येचाच निखळ । पूर्णत्वें जो घडियेला ॥ ९४ ॥ 'अविद्या' म्हणजेच नाहीं । म्हणोनि अहंता मिथ्या पाहीं । निरास पावे लवलाहीं । विवेकदृष्ट्या पाहतां ॥ ९५ ॥ परमात्मरूप हें अखंडित । जीवत्व तेथ विकल्पें भासत । विकल्प सांडोनि जो पाहत । तयास ऐक्य संचलें ॥ ९६ ॥ पाहतां तत्त्वमस्यादि विचार । आभासात्मक अहंकार । परात्मरूपीं मिळोन साचार । ऐक्यानुभवा लाहिजे ॥ ९७ ॥ यापरी महावाक्येंकरून । जीवा-परमात्म्या होतां मेळन । अविद्या आपुल्या परिवारेंकरून । स्वयेंचि पावे विनाश ॥

९८ ॥ हाचि माझा तत्त्वनिश्चय । अंगीं ठसतां नाहीं भवभय । येणेंचि मृत्यूचा पराजय । केला असे मद्भक्तीं ॥ ९९ ॥ सांडोनि माझिये भक्तीतें । धुंडाळितां नाना मतें । आणि झटतां जन्मशतें । मोक्षलाभ घडेना ॥ १०० ॥ हेंचि माझें हृदय देखें । मींचि निरूपिलें स्वमुखें । मद्भक्त तोचि परम हरिखें । सांठवील निजांतरीं ॥ १०१ ॥ उपदेशूनि मग येणें रीती । शिव बोलिले पार्वतीप्रती । हेचि शुद्ध तत्त्वनिश्चिती । गुह्यांतील गुह्य हें ॥ १०२ ॥ सर्व वेदान्ताचें सार । रामें येथ गोविलें साचार । भावें शोधितां पैलपार । पाविजे दुःखनिधीचा ॥ १०३ ॥ अनंत जन्मींचीं पातकें । चित्तास मलिन करिती निकें । तीं सर्व याचिया पठणपावकें । जळोनि जातील निःशेषें ॥ १०४ ॥ श्रीरामाचाचि ऐसा वर । म्हणोनि विश्वासें भाविक नर । येथ लावोत आपुलें अंतर । नाना साधनें त्यजूनि ॥ १०५ ॥ येणेंपरी हें **श्रीरामहृदय** । अंतरीं ठेवावें अक्षय । ऐसें करितां सर्वत्र जय । आणि आनंद दाटेल ॥ १०६ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०७ ॥ श्रीराम ॥ ॥ ७ ॥

---

## अध्याय ४ था, अवतारकारण

श्रीराम ॥ महादेवाचें वचन । येणेंपरी श्रवण करून । अंतरीं बहुत संतोषून । देवी

डोलूं लागली ॥ १ ॥ म्हणे जी, मी भाग्यवती । म्हणोनि ऐशा गूढार्थाप्रती। पात्र जाहलें कीं संप्रती । कृपा उदंड प्रभूची ॥ २ ॥ देवा, आपुलाचि अनुग्रह । म्हणोनि जाहलें निः-संदेह । नातरी ऐसा महामोह । आणीक कोण निवारी ॥ ३ ॥ तरी आतां जी भगवंत । ऐसें मधुर तत्त्वामृत । पुढतीहि करावें श्रुत । ऐसी इच्छा वाढली ॥ ४ ॥ श्रीरामचंद्रकथा-सार । देवें निरूपिलें जें सुंदर । तेंचि आतां सविस्तर । निवेदन करावें ॥ ५ ॥ ऐसी प्रार्थना होतां श्रवण । शंकर करिती निरूपण । श्रीरामचरित्राची खूण। गूढाहूनि गूढ जी ॥ ६ ॥ देवी, हें श्रीरामचरित । नाना अध्यात्म-तत्त्व-भरित । श्रवणें तापत्रयास वारित । आत्मा-नंदा देउनी ॥ ७ ॥ आणि जीवांस जन्ममरण । द्यावया जें असे कारण । नामें स्वरूप-विस्मरण । निरास करी तयाचा ॥ ८ ॥ म्हणोनि होवोनि सावधान । ऐक सर्व वृन्तात-कथन । अवताराचें प्रयोजन । तेंचि एथें सांगतों ॥ ९ ॥ उदंड मातले दुर्जन । तयांत प्रामुख्यें दशानन । तेणें आपुल्या बळेंकरून । त्रिभुवनातें गांजिलें ॥ १० ॥ तेणें भूदेवी कष्टली । आणि ब्रह्मचास शरण गेली । सकळहि वार्ता निवेदिली । त्राहि देवा म्हणोनि ॥ ११ ॥ तंव विधीनें पाहिला विचार । मग कार्य जाणोनि थोर । क्षीरसागरीं पावला सत्वर । विष्णु-दर्शनाकारणें ॥ १२ ॥ तेथें स्तविलें वारंवार । जैसें वेदपुराणींचें सार । प्रेमभरें आला गहिंवर । नयनीं अश्रु उदेले ॥ १३ ॥ तंव सहस्र सूर्यांसारखी । प्रभा फांकली एक निकी । ऐशी प्राचीचिये मुखी । दिव्य मूर्ति प्रगटली ॥ १४ ॥ तेथील तेज

अत्यद्भुत । पाहतां नयनतेज हारपत । परी कांहीं कष्टोनि बहुत । अवलोकिलें विधीनें ॥ १५ ॥ जैसा मणी कीं इंद्रनील । तैसी अंगकांति उज्ज्वल । आणखी जैसें प्रफुल्ल कमळ । तैसे नयन साजिरे ॥ १६ ॥ मुखीं शोभतसे स्मित । अंगीं अलंकार समस्त । किरीट कुंडलें हारादिकांत । कौस्तुभ-तेज आगळें ॥ १७ ॥ शंखशक्रादि आयुधें । हस्तीं शोभतीं चतुर्विधें । वनमालाहि कंठामधें । शोभायमान जाहली ॥ १८ ॥ लक्ष्मी बैसली अंकावर । भोंवतीं ठाकले मुनिवर । स्तवन कारिती अति मधुर । हृदयीं भावें दाटुनी । ॥ १९ ॥ ऐसी मूर्ति सुमनोहर । पाहोनि विधींसी हर्षभर । येऊनि मग तो बुद्ध्यनुसार । स्तवनीं सिद्ध जाहला ॥ २० ॥ देवाधिदेवा, माझी प्रणती । असो आपुलिया चरणांप्रती । यातेंचि साधुजन चिंतिती । कर्मपाशातें तोडाया ॥ २१ ॥ तत्वदृष्टीनें पाहूं जातां । मी वेगळा नसेंचि तत्त्वतां । म्हणोनि येथ वंदनापुरता । देहीं आत्मता भावितों ॥ २२ ॥ देवा आपुली गुणमाया । विश्वास नेऊन विलया । मागुती निर्मून रक्षाया । तुमच्या सत्ते प्रवर्ते ॥ २३ ॥ म्हणोनि कर्तृत्व मायेचें । तुम्हांस स्पर्शलें नाहींच साचें । आपण आत्मानुभवाचे । आनंदांत निमग्न ॥ २४ ॥ देवा, आपुल्या यशोगायनीं । जीवास जेतुली समाधानी । तैशी दानीं कीं अध्ययनीं । निःसंशय मिळेना ॥ २५ ॥ म्हणोनि आपुलीं पदकमळें । जीं कां महापुण्याचीं फळें । तीं मीं देखिलीं नयनयुगुळें । धन्य धन्य जगीं मी ॥ २६ ॥ व्हावया निश्चित आत्मज्ञान । योगी आणि मुनिजन । अखंड करीत राहिले ध्यान । ऐसें

माहात्म्य जयांचें ॥ २७ ॥ लाहोनियां वक्षःस्थळाशी । लक्ष्मी स्पर्धा करी अहर्निशीं । पायीं वाहिल्या तुलसीमालेशीं । सपत्नीचेच सारिखी ॥२८ ॥ म्हणोनि आपुले पायींच एक । भक्ति आमुची जडो अधिक । हाचि सर्व संसारदुःख- । वारणाचा उपावो ॥२९॥ ऐसिया परी विधाता । देखितां पुढें स्तवन करितां । देव संतोष पावूनि तत्त्वतां । वरदानार्थ सज्जले ॥ ३० ॥ मग विधाता हर्षभरित । होवोनि बोले अत्यंत विनत । देवा, भूवरी पौलस्त्य-सुत । घोर रावण मातला ॥ ३१ ॥ माझाचि तेणें घेतला वर । आणि विश्व पीडिलें अनिवार । राक्षसांचा हा राक्षस-वर । आम्हांलागीं नाटोपे ॥ ३२ ॥ तयाचा मानवाकरवीं नाश । ऐसाचि विधीचा निर्देश । म्हणोनि घेवोनि मनुष्यवेश । उद्धरा जी या कंटका ॥ ३३ ॥ तंव देवें केलें उत्तर । कश्यपासि माझा असे वर । तयाकारणें भूमीवर । येणें असे आमुतें ॥ ३४ ॥ म्यांचि यावें उदरांत । ऐसें तयाचें मनोगत । तोचि आजि असे वर्तत । दशरथरूपें भूवरी ॥ ३५ ॥ म्हणोनि तयाचिया येथ । कौसल्येचिया उदरा आंत । निजांशें मी आविर्भूत । होणार आहे निश्चयें ॥ ३६ ॥ माझी योगमाया सीता । होईल जनकाची दुहिता ! ऐशा प्रकारें सकळ चिंता । अंगें आम्ही निवारूं ॥ ३७ ॥ ऐसें देवोनि आश्वासन । देव पावले अंतर्धान । मग तो सांगतसे वर्तमान । धाता देवगणासी ॥३८॥ म्हणे हो रघूचे कुळांतरी । मनुष्यवेषें अवतरेल श्रीहरी । तुम्ही आपुलिया अंशां-वरी । वानरांमाजी वसावें ॥ ३९ ॥ येणेंपरी बोलोनि वचन । भू-देवांस समजावून ।

ब्रह्मदेव कमलासन । स्वस्थानातें पातला ॥ ४० ॥ देवही आपुल्या अंशीं । जावोनि राहिले वानरवंशीं । इतस्ततः नाना देशीं । विष्णुसेवेच्या कारणें ॥ ४१ ॥ ऐसें अवतार-निरूपण । प्रेमें करीत जावें पठण । येणें उपायें श्रीरामचरण । अवश्यमेव जोडावे ॥ ४२ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ४३ ॥ श्रीराम ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय ५ वा, श्रीरामजन्म.

श्रीराम ॥ श्रीमान राजा **दशरथ** । अयोध्येसी राज्य करीत । पराक्रमी स्वधर्मरत । नीतिमार्गाचा रक्षिता ॥ १ ॥ उदंड संपत्ति आणि कीर्ति । परी पोटीं नाहीं संतति । तेणें न लाहे सुखविश्रांति । नित्य उद्विग्न मानसीं ॥ २ ॥ मग कुलगुरु जे वसिष्ठमुनी । तयांस बोलावून सदनीं । विनयें पायीं नमस्कारुनी । प्रश्न केला नृपानें ॥ ३ ॥ भगवन् कासयें होतील सुत । जे नाना गुणांहीं मंडित । त्यांवांचोन राज्यादि समस्त । मजला दुःखचि भासतें ॥ ४ ॥ तंव बोलले श्रीवसिष्ठ । तुजसी होतील पुत्र श्रेष्ठ । तेजस्वी आणि सत्त्वनिष्ठ । उपाय ऐसा करीं गा ॥ ५ ॥ पुत्रकाम नामें एक यजन । करावें ऋष्यशृंगास घेऊन । वरी आम्हीहि मुनिजन । कर्म सिद्धीतें पोंचवूं ॥ ६ ॥ तें ऐकोनि वसिष्ठवचन ।

आनंदलें राजयाचें मन । मग आणावया पाठवी जन । ऋष्यशृंग ऋषीतें ॥ ७ ॥ मग तेणें-शीं समवेत । यज्ञकर्मास आरंभित । मनीं ठेविली श्रद्धा बहुत । कर्म सांग व्हावया ॥८॥ तंव यज्ञकर्म चालतां । तेजोरूप यज्ञपावक, हातां । पायस घेवोनि तत्त्वतां । स्वयें प्रकट जाहला ॥ ९ ॥ मग, हें पुत्रीय पायस जाण । देवीं केलेंसें निर्माण । येणें प्रत्यक्ष लक्ष्मी-रमण । पुत्र होईल तुजलागीं ॥ १० ॥ ऐसे शब्द उच्चारून । पायस पुढती ठेवून । पावक पावला अंतर्धान । आनंद झाला नृपातें ॥ ११ ॥ मग वंदिलें वसिष्ठातें । आणखी ऋष्यशृंगातें । मग तें पायस निजस्त्रियांतें । अर्पण केलें तयानें ॥ १२ ॥ कौसल्या आण-खी कैकयी । अर्ध अर्ध तें घेती जयीं । तंव अकस्मात तये ठायीं । सुमित्रा राणी पाव-ली ॥ १३ ॥ मग दोघींहीं आपुला । भाग आणखी दुभागिला । मग देऊन सुमित्रेला । मागुती केला सेवन ॥ १४ ॥ तंव त्या पायसाचे बळें । तिघींतेंही गर्भ राहिले । दिवसें-दिवस शोभूं लागले । मुखचंद्र स्त्रियांचे ॥ १५ ॥ पुढें नव मासाचे अन्तीं । प्रसूत झाली कौसल्या सती । नवमीचिये शुभ मुहूर्तीं । चैत्र शुक्ल पक्षांत ॥ १६ ॥ सूर्य पातला मेषे-वर । पुनर्वसु नक्षत्र सुंदर । उच्चस्थळीं पंचग्रह इतर । ऐसा योग जेधवां ॥ १७ ॥ तैं आकाशांतूनि नानापरी । पुष्पें वर्षिलीं सुरवरीं । ऐसिये आनंदांत श्रीहरी । आविर्भूत जा-हले ॥ १८ ॥ जैसें नील कमल सुंदर । तैसी अंगकांति मनोहर । कासे सुवर्ण पीतांबर । चतुर्भुज श्रीमूर्ति ॥ १९ ॥ रम्य आरक्त नेत्रकमलें । कर्णीं विराजती कुंडलें । मस्तका-

वरी केश कुरळे । शोभे किरीट भास्वर ॥ २० ॥ शंख चक्र गदा करीं । आणि वन-
माला स्कंधावरी । अंगीं सहस्र सूर्यांपरी । दिव्य तेज झळाळे ॥ २१ ॥ हृदयीं कृपा-
भाव विलसे । तोचि जणूं चंद्रमा असे । मग मुखींचें स्मित होतसे । त्या चंद्राचें चांदणें
॥२२ ॥ दाटली करुणा हाचि रस । तेणें विकसलें नेत्रसारस । वरी मानालंकार सुरस ।
शोभविती मुखकमळा ॥ २३ ॥ ऐसी मूर्ति पाहोनि उदित । कौसल्या जाहली विस्मित ।
आनंदाश्रु लोटले नयनांत । कंठ सद्गद जाहला ॥ २४ ॥ मग तैशीच म्हणे श्रीपते । ही
मी तुजला नमन करितें । आनंदाचें थोर भरतें । चरणीं तुझिया वंदितां ॥ २५ ॥ तूं
परमात्मा अच्युत । वृद्धिक्षयालागीं नातळत । सर्वव्यापी म्हणोनि अनंत । पुरुषोत्तम देव
तूं ॥२६॥ वाणीलागीं अगोचर । बुद्धयादिकांस नलगे पार । सद्रूप आणि ज्ञानैकसार ।
ऐसें वेदीं वर्णिलें ॥ २७ ॥ तूंचि मायाबळें करून । सत्वादि गुणांतें स्वीकारून । जग-
तास करिसी प्रगट लीन । वरी निर्लेप राहसी ॥ २८ ॥ स्वयें नसे आणि भासे । म्हणोनि
बोलती 'माया' ऐसें । तियें निर्मिलें तें कायसें । न पवे साचपणातें ॥ २९ ॥ ऐसे बि-
चारें पाहतां । देवा तूं करोनि अकर्ता । दाता भोक्ता हेहि वार्ता । नाममात्र केवळ ॥
३० ॥ तूं सर्व-भूत-अंतर्वासी । असोनि भूतांतें नाकळसी । 'अप्राण अमनः शुद्ध' ऐसी
श्रुति तूंतें वर्णिते ॥ ३१ ॥ अज्ञानाच्या अंधकारें । तुज न जाणती पामरें । परी पाहतां
सूक्ष्म विचारें । स्पष्ट येसी कीं अनुभवा ॥ ३२ ॥ देवा तुझिया उदरांत । ब्रह्मांडें असती

अणुरेणुवत । त्या तूंतें मी प्रसवत । ऐसें लोकां दाविशी ॥ ३३ ॥ म्हणोनि वाटे पुरुषोत्तमा । तुझाचि हा होय महिमा । कीं ईश्वरास भक्तिप्रेमा- । अधीन व्हाव लागतें ॥३४॥ तरी आतां ऐक श्रीपते । मी पायीं लागोन विनवितें । चित्त जें संसारीं धावतें । त्यास बंदींत घालिजे ॥ ३५ ॥ मायेचें पडोनि आवरण । पतिपुत्रादि आप्तगण । हेचि सौख्याचे कारण । ऐसी भावना जाहली ॥ ३६ ॥ म्हणोनि देवा, निरंतर । चित्तीं राहो हें रूप रुचिर । जेणें मायामोह दुस्तर । नष्ट होईल निश्चयें ॥ ३७ ॥ असो, आतां हें अद्भुत । रूप करा जी अंतर्हित । मृदुल बाल-आकार त्वरित । दाखवीं बा या लोचना ॥ ३८ ॥ प्रेमें देईन आलिंगन । वरिवरी घेईन मी चुंबन । मधुर बोबडे बोल ऐकून । थोर आनंद करीन * ॥ ३९ ॥ ऐसीच आवडी जीवीं । कीं बालमूर्तिच उपासावी । आणि भवभीति निरसावी । याचि भक्तिबळानें ॥ ४० ॥ ऐसी करूनि विनवणी । लक्ष्मीपतीचिये चरणीं । उगी राहतां कौसल्या राणी । देव बोलूं लागले ॥ ४१ ॥ जैसें जें तुझें मनोगत । घडेल तैसेंचि निश्चित । येविषयीं संदेहरहित । व्हावें तुवां अंबिके ॥ ४२ ॥ पूर्वीं मज विनवी विधाता । भूभार करा जी खालता । म्हणोनि अवतरलोंसें आतां । मानवदेह धरोनी ॥ ॥ ४३ ॥ पूर्वीं दशरथें आणि तुवां । हृदयीं धरोनि शुद्ध भावा । मज आराधिलें जें तेधवां । म्हणून पोटीं पावलों ॥ ४४ ॥ येणें रूपें माझें दर्शन । लाभलें तें याचि तपेंकरून । भवभयास करी निरसन । तें हें एरां दुर्लभ ॥ ४५ ॥ आतां येथील निरूपण । जो करील

श्रवणपठण । तयास देहान्तीं माझें स्मरण । घडेल जाण निश्चयें ॥ ४६ ॥ यापरी श्री-
राम बोलले । मग सवेंचि बालत्व पावले । आणखी रोदन आरंभिलें । बालभावानुसारें
॥ ४७ ॥ वर्ण अंगींचा श्यामल । अवयव अत्यंत कोमल । नयनें सुंदर विशाल । चित्त
ओढिती जनांचें ॥ ४८ ॥ लोकपालांचा जो पालक । तो स्वयें जाहला बालक । दावी
नानापरी कौतुक । आपुल्या भक्तजनांतें * ॥ ४९ ॥ असो, स्त्री जाहली प्रसूत । वार्ता
रायासि होतां श्रुत । आनंदसागरामाजी पोहत । वसिष्ठासवें तो धावला ॥ ५० ॥ पाहतां
श्रीराममुखकमळ । गळाले आनंदाश्रु पुष्कळ । मग तेणेंचि अतिशयें केवळ । समाहित
जाहला ॥ ५१ ॥ कैकयी जाहली प्रसूत । तिचे पोटीं आला भरत । आणि सुमित्राहि
प्रसवत । सुंदर पुत्रद्वयातें ॥ ५२ ॥ तैं ब्राह्मणांस सुवर्णदानें । मग नृपें केलीं आनंदानें ।
आणि अन्यांचींहि मनें । इष्टें देऊन तोषविलीं ॥ ५३ ॥ ऐसा सर्वांनंदास कारण । म्ह-
णोनि म्हणती अवघे जण । 'श्रीराम' ऐसीच नामखूण । यासि सार्थ होतसे ॥ ५४ ॥
आणि ज्ञानदृष्टीचे मुनिगण । याचि ठायीं होती रममाण । म्हणोनि वसिष्ठेंहि जाण । राम
नाम योजिलें ॥ ५५ ॥ जनांचें धारण पोषण । तयास बोलिजेत भरण । कैकेयीसुतास
हेंचि कारण । भरत नांव द्यावया ॥ ५६ ॥ नाना लक्षणीं मंडित । म्हणोनि लक्ष्मण नांव
युक्त । आणि शत्रूचा प्राण घेत । त्यास शत्रुघ्न बोलिलें ॥ ५७ ॥ श्रीरामासवें लक्ष्मण ।
आणि भरताशीं शत्रुघन । पायस-भागानुसारें मिळोन । संगती क्रीडूं लागले ॥ ५८ ॥

नानापरी मधुर लीला । दावून जननीजनकांला । रामें उदंड आनंद केला । लक्ष्मणाचे समेत ॥ ५९ ॥ सुवर्णाचें पिंपळपान । आलावरी लटके छान । ओंवती मोतीं तेणेंकरून । दावी फार झळाळी ॥ ६० ॥ गळां शोभे वाघनख । तयास जडिलीं रत्नें सुरेख । दोहों कर्णींचे डूल देख । सुवर्णतेजें झगमगती ॥ ६१ ॥ बाहुभूषणें दंडावर । पायीं रुणझुणती घुंगुर । कटिसूत्रादि अलंकार । सर्व अंगीं शोभती ॥ ६२ ॥ मुखीं अल्प हास्य केलें । तेणें दंतभाग चमकले । ऐसें बालक चिमुकलें । जन पाहती तटस्थ *॥ ६३ ॥ अंगणीं धांवती वासरें । पाहोनि मागें लागे त्वरें । ऐसें खेळतां हृदय भरें । महदानंदें तेधवां ॥ ६४ ॥ कधीं भोजनाचे अवसरीं । राजा बैसोनि पाटावरी । आळवूं लागे नानापरी । ये ये राम म्हणोनी ॥ ६५ ॥ रामें बालकाच्या स्वैरभावें । तियाकडे न फिरावें । मग तयें कौसल्येस म्हणावें । ऊठ, आणी तयातें ॥ ६६ ॥ मग तियेनें वेगें उठावें । रामेंहि पलायन करावें । म्हणोनि एरीस न जाववे । रामचंद्राचे संनिधीं ॥ ६७ ॥ मग रामेंचि परतावें । ग्रास घेतलेंसें करावें । सवेंचि दूर निघोन जावें । अंग मळवायाकारणें ॥ ६८ ॥ नाना वायनें प्रतिमासीं । कौसल्या देई ब्राह्मणांसी । नूतन अलंकार ते दिवशीं । राघवाअंगीं लेववी ॥ ६९ ॥ श्रीराम अत्यंतचि अवखळ । संभाळणीं विसंबूं न दे पळ । तेणें कामकाजें पुष्कळ । राहोन जात घरींचीं ॥ ७० ॥ एकदां रघुनाथें तिजपाशीं । जावोनि म्हणितलें अंब मजशीं । क्षुधा लागली अतिशयेसीं । कांहीं खावया देइजे ॥ ७१ ॥ परी

कार्यांत गुंतलेपणीं । नाहीं पावलें तियेचे श्रवणीं । मग रामें कोपोनि झणीं । भांडें ताडिलें दुधाचें ॥ ७२ ॥ तंव तें भूमीस पसरलें । एके सेवकें अवलोकिलें । मग मातेला विदित केलें । शासन व्हावें म्हणोनी ॥ ७३ ॥ तें पाहतांचि माता धावली । रामें चपळता चालविली । मागुती हस्तास गवसली । स्वारी माउलियेचे ॥ ७४ ॥ ऐसा ऐसा नानापरी । जगच्चालक क्रीडा करी । जेणें भाविकांचे अंतरीं । भक्तिप्रेम दुणावे ॥ ७५ ॥ पुढें लोटतां कालांतर । वसिष्ठें घेवोनि चारी कुमर । उपनयन करोनी सत्वर । शास्त्राभ्यासीं लाविले ॥ ७६ ॥ धनुर्वेद सांगोपांग । तिहीं अभ्यासिला चांग । अन्य विद्याकलाप्रसंग । सर्वही ध्यानीं घेतले ॥ ७७ ॥ राम आणिक लक्षुमण । घेऊनि आपुले धनुष्यबाण । अश्वारूढ होऊनि जाण । नित्य जाती वनातें ॥ ७८ ॥ तेथ धनुर्विद्येचिये कौशलें । श्वापदें मारितीं विपुलें । मग परतोनि सांज वेळे । वृत्त कथिती पितयातें ॥ ७९ ॥ नित्य प्रातःकाळीं उठावें । स्नानादिक आचरावें । मातापितयास वंदूनि जावें । पौरकार्यै पहाया ॥ ८० ॥ मागुती बंधूंस प्रेमभावें । पंक्तीस घेऊनिया जेवावें । उपरांत शास्त्ररहस्य शोधावें । वसिष्ठांचे शासनीं ॥ ८१ ॥ यापरी परमात्मा श्रीरघुवीर । घेऊन मायामानवशरीर । मनुष्यलोकाचे अनुसार । सर्व करीत राहिला ॥ ८२ ॥ पाहतां स्वरूपज्ञानविचार । परमात्मा नित्य निर्विकार । कांहींच कर्म न करी साचार । मायातीत श्रीराम ॥ ८३ ॥ म्हणोनि जो करुनि अकर्ता । आणखी भोगून अभोक्ता । तयास शोधून घ्यावें तत्त्वतां । हेंचि

सार जन्माचें * ॥ ८४ ॥ मग श्रीरामस्वरूपाची खूण । अखंड अंतरीं बाणवून । एकें आत्मानंदेंचि करून । विश्व सर्व हें भरावें ॥ ८५ ॥ ऐसी सुजनांचिये कर्णीं । संतांची नित्य विनवणी । तीच म्यांही आपुले वाणी । येथ गाऊन दाविली ॥ ८६ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८७ ॥ श्रीराम ॥ ५ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

---

## अध्याय ६ वा, ताटिकाहनन.

श्रीराम ॥ यावरी एकदां मुनि कौशिक । तेजें तुळितां जैसा पावक । तेणें ऐकिलें जगन्नायक । प्रगटलाहे अयोध्ये ॥ १ ॥ मग ध्यावया त्याचें दर्शन । कौशिकें अयोध्येस येऊन । दशरथाचें सभाभुवन । केलें पावन एकदां ॥ २ ॥ तईं तो पाहतां तपोधन । आनंदें आणि विनयें करून । दशरथें दिधलें उत्थापन । आणि पायांसी वंदिलें ॥ ३ ॥ मग स्वासनीं बैसवूनी । नृप बोलिला ऐसें वचनीं । आजि या आगमनें करोनी । पावन केलें जी आमुतें ॥ ४ ॥ आपणांसारिखे पुण्यजन । जातील तेथ आनंद घन । स्वयेंचि राहे तसे येऊन । नाहीं संशय ये विषयीं ॥ ५ ॥ म्हणोनि आजि हे महामुने । सांगिजे आपुल्या कृपावचनें । किमर्थ ऐसिया आगमनें । पावन केलेंत आमुतें ॥ ६ ॥ तंव तो कौशिक

मुनिश्रेष्ठ । आदरें जाहला सुसंतुष्ट । मग आपुले मनींचें इष्ट । ऐसें बोलला नृपातें ॥ ७ ॥ बा, म्यां उचित काळ म्हणून । आरंभिलें देवादिकांचें यजन । परी तेथ दैत्यादि दुर्जन । नाना विघ्नें आणिती ॥ ८ ॥ मारीच सबाहु दोघे खर । आणखी तयांचे अनुचर । पीडा करितात वारंवार । त्यांस वारणें अवश्य ॥ ९ ॥ म्हणोनि तुवां हे आपुले कुमर । लक्ष्मण आणि श्रीरघुवीर । मजसवें पाठवावें सत्वर । येणें कल्याण पावसी ॥ १० ॥ ऐसें ऐकतां राजा दशरथ । पडिला चिंतेच्या सागरांत । मग श्रीवसिष्ठ मुनींप्रत । पुसाया गेला त्वरेनें ॥ ११ ॥ म्हणे गुरो जी काय करावें । रामास केउतें पाठवावें । नाना कष्ट ते साहोनि जीवें । संपादिले म्यां पुत्र हे ॥ १२ ॥ देवासारिखे माझे सुत । त्यांत श्रीरामीं आवडी बहुत । म्हणोनि त्यांस धाडितां जीवित । घटेल माझें निश्चयें ॥ १३ ॥ आणि न मानितां मुनिवचन । कौशिक होईल क्रोधायमान । आणि शापील मजलागून । तोड कांहीं सुचेना ॥ १४ ॥ यालागीं साधेल माझें हित । ऐसा उपाय आतां त्वरित । स्वामी मजसी करा विदित । ऐसें विनवी तयांतें ॥ १५ ॥ तयीं स्वर्गींची गुप्त कथा । वसिष्ठ सांगून नृपनाथा । मोह निरस्त केला सर्वथा । देवकार्यार्थ साधण्या ॥ १६ ॥ कीं हा श्रीराम नोहे मानव । परमात्मा श्रीदेवाधिदेव । भूभार नष्ट करायास्तव । येथ अवतीर्ण जाहला ॥ १७ ॥ पूर्वीं कश्यप प्रजापती । आणि त्याची स्त्री अदिती । तोचि तुम्ही झालांत संप्रती । दशरथ आणि कौसल्या ॥ १८ ॥ तुम्हीं कष्ट साहून नाना । केली जी हरीची आराधना । तेणें

तोषूनियां वरदाना । श्रीपति सिद्ध झाले ॥ १९ ॥ मग तुम्हीं उभयतांहीं । इच्छा दाविली कीं लवलाहीं । तूंचि बा आमुचा पुत्र पाहीं । व्हावें ऐसें वाटतें ॥ २० ॥ म्हणोनि तोचि हा लक्ष्मीपती । श्रीराम जाहलासे संप्रती । लक्ष्मणरूपें तयाचे संगतीं । शेष हा आला नृपाळा ॥ २१ ॥ सीता ही होवोनि योगमाया । नांदते सदनीं जनकाचिया । तियेचा रामाशीं योग कराया । मुनि कौशिक पातला ॥ २२ ॥ म्हणोनि संतुष्ट ठेवी मन । कौशिकालागीं सत्कारून । आपुले उभयही नंदन । त्याचिया संगें पाठवी ॥ २३ ॥ ऐसें **देवगुह्य** ऐकतां । वाटली रायातें धन्यता । मग आनंदभरें स्वतां । हाक मारी मुलांतें ॥ २४ ॥ तंव ती ऐकतांचि दोघे सुत । धांवोनि सन्मुख उभे ठाकत । राजा मुखचंद्र अवलोकित । नेत्रपातेंही चळेना ॥ २५ ॥ चित्त उदंड संतोषलें । मग आवडी हृदयीं धरिलें । आणि सवेंचि हातीं दिधलें । प्रेमें कौशिकमुनीच्या ॥ २६ ॥ मग तोषून कौशिकमुनी । रायास आशीर्वाद देउनी । रामलक्ष्मणांसमेत वनां । तेथूनि जाता जाहला ॥ २७ ॥ मग मार्गींच एके वेळीं । रामलक्ष्मणांस घेवोनि जवळीं । केले बळियांचेहि बळी । दोन विद्या त्यां देउनी ॥ २८ ॥ एके विद्येचें नांव **बला** । आणि दुसरी ती **अतिबला** । जयांच्या अभ्यासें क्षुधादिकांला । सुखेंचि साहूं येतसे ॥ २९ ॥ पुढें मुनि आणि कुमार । गंगा उतरोनि गेले पार । तंव **ताटिकेचें** वन अपार । तेथ लागलें तयांतें ॥ ३० ॥ मग कौशिक म्हणे श्रीरामास । येथेंचि ताटिकेचा वास । असेल कोठें ती आसपास । पुढती येईल

येथवां ॥ ३१ ॥ यास्तव राहोनि बा सावध। पाहतांचि करीं तियेचा वध । तियेनें नाना जीव निर्वेध । केले गङ्ग स्वभावें ॥ ३२ ॥ हां जी म्हणोनिया तत्कालें । राघवें धनुष्य सज्ज केलें । शब्दें गगन घुमूं लागलें । ताटिका तेणें क्षोभली ॥ ३३ ॥ मग तो शब्द कैंचा म्हणोन । पहाया धावली गर्जोन । आणि कुमार अवलोकून । धावूनि आली सवेंचि ॥ ॥ ३४ ॥ तंव एकचि सोडोनि शर । रामें वक्षाचि केलें चूर । तंव ती पडोनि धरणीवर । रुधिर ओकूं लागली ॥ ३५ ॥ प्राण गेलिया कोणी सुंदरी । प्रगटली तियेचे शरीरीं । जी त्या योनींत आजवरी । शाप भोगीत राहिली ॥ ३६ ॥ शापमुक्त ती होतां सती । रामलक्ष्मणां पाहोनि पुढती । वंदन करूनि चरणांप्रती । ऊर्ध्व मार्गें चालली ॥ ३७ ॥ पाहोनि ऐसा चमत्कार । कौशिक संतुष्ट झाला फार । रामास आलिंगुनी सत्वर । नावेक स्तब्ध राहिला ॥ ३८ ॥ मग मनीं आणोनि विचार । अर्पिले सर्व अस्त्रसंभार । मंत्रही तयांचे सविस्तर । सांगूनि तैसे ठेविले ॥ ३९ ॥ येणेंपरी श्रीरामसखा । सामान्य जनांचे सारिखा । वर्तोनि आपुले भक्तांस देखा । सौख्यानंदें भरीतसे* ॥ ४० ॥ तें भक्तीचें सुख-सौरस । लाभो सदैव भाविकांस । ऐसीच माझिये मनीं आस । स्थिर होवूनि बैसली ॥ ४१ ॥ म्हणोनि गीर्वाणभाषा-पेटी- । माजी गुंतल्या अध्यात्म-गोष्टी । त्या आजि मी या प्राकृतांसाठीं । प्राकृतांमाजी गायिल्या ॥ ४२ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ४३ ॥ श्रीराम ॥ ६ ॥

## अध्याय ७ वा, अहिल्योद्धार.

श्रीराम ॥ करूनि ताटिकेचा वध । पुढें चालतां मुनि आणि कुमर । तेथ **कामाश्रम** नामें सुंदर । रम्य स्थान पातलें ॥ १ ॥ भोंवतीं वनदेवीचें सौरस । अंतरीं मुनिजनांचा निवास । मग वाटलें ऐसिया स्थानास । काळ कांहीं क्रमावा ॥ २ ॥ मग तिघांहीं तये वेळीं । एक रात्र तेथें क्रमिली । आणि पुढती प्रभात झाली । देखोन मार्गीं लागले ॥ ३ ॥ मग जें कौशिकाचें धाम । नाम जयाचें **सिद्धाश्रम** । तेथ पावते झाले विश्राम । मार्गं कांहींक चालतां ॥ ४ ॥ तईं रामलक्ष्मणांस पाहोन । आश्रमांतील अन्य मुनिजन । कवणाचे हे देवनंदन । म्हणोनि आले पुसाया ॥ ५ ॥ मग तयांची नामखूण । विश्वामित्र सांगे आपण । तयीं प्रेमा उदंड जाण । वाटूं लागला तयांतें ॥ ६ ॥ मग ते आश्रमींचे जन । वन्य उपचार मेळवून । करिती श्रीरामाचें पूजन । प्रेमानंदेंकरूनि ॥ ७ ॥ यावरी श्रीरामचंद्र वीर । कौशिकास म्हणे जी मुनिवर । यज्ञविधान चालवावें सत्वर । विलंब आतां किमर्थ ॥ ८ ॥ कोठें असतात ते राक्षस । द्यावें सांगून जी आम्हांस । क्षणमात्रेंचि सकळिकांस । भूमीस पाडूं पहा कीं ॥ ९ ॥ तंव तें मुनीनें मान्य केलें । आणि यज्ञास आरंभिलें । तोंचि अस्थि घेवोनि धावले । **मारीच** आणि **सुबाहु** ॥ १० ॥ पुढती होवोनि ते उभयतां । रुधिर-वर्षाव करूं लागतां । रामें धनुष्य घेऊनि स्वतां । शर सोडिले

त्वरेनें ॥ ११ ॥ एकें बाणें मारीच वेधिला । शतयोजनें भोवंडिला । सर्वांचि सागरीं भिरकाविला । ऐसें अद्भुत कीं केलें ॥ १२ ॥ दुजिया बाणासि अग्निबळ । रामें प्रेरिलें होतें विपुळ । तेणें सुबाहूलागीं तात्काळ । वधून भूमीस पाडिलें ॥ १३ ॥ उरले तयांचे जे अनुचर । तयांस लक्ष्मणें केलें ठार । तयीं ते स्वर्गींचे तोषून सुर । पुष्पें वर्षिती उदंड ॥ १४ ॥ कौशिक मुनिही संतोषला । मग अंकीं बैसवी श्रीरामाला । आणि देऊन आलिंगनाला । बाष्प गाळीत लोचनीं ॥ १५ ॥ मग तया आश्रमाचे आंत । दशरथाचे ते दोघे सुत । वनप्रदेश-सौख्य सेवीत । तीन दिवस राहिले ॥ १६ ॥ वनींचीं फळें पक्व मधुर । सेवूनि संतुष्ट व्हावें फार । मग नाना शास्त्रविचार । मुनिजनांसंगें करावे ॥ १७ ॥ चतुर्थ दिवशीं श्रीकौशिकें । श्रीरामास बोलावून कौतुकें । म्हणितलें आम्हांसवें निकें । विदेहनगरीं चलावें ॥ १८ ॥ तेथ महात्मा राजा जनक । तेणें आरंभिला यज्ञ एक । तया समारंभाचें कौतुक । थोर होईल त्या स्थळीं ॥ १९ ॥ आणखी चाप जें महाभलें । शंकरें तेथ असे ठेविलें । तयास अवलोकितां आपुलें । चित्तही फार रिझेल ॥ २० ॥ ऐसें सांगून तयांचे साहित । जाणें मुनीनें केलें निश्चित । आणि शिष्यांस संगें घेत । मार्गीं चालूं लागले ॥ २१ ॥ तंव श्रीगंगेचें तीर आलें । संनिध गौतमस्थान लागलें । भोंवतीं पुष्पें फळें लगटले । वृक्ष शोभती जयाच्या ॥ २२ ॥ वनप्रदेश अत्यंत रुचिर । स्वभावेंचि वेधी अंतर । परी त्या सर्वचि प्रदेशभर । पक्षीहि कोणी दिसेना ॥ २३ ॥ तंव तें पाहून श्रीरघुवीर । म्हणे हें काय

जी मुनिवर । स्थान हें ऐसें सुमनोहर । निर्जन केविं असावें ॥ २४ ॥ मग मुनि सकळ वृत्तांत । सांगावयास आरंभीत । म्हणे बा पूर्वीं या आश्रमांत । गौतम होते राहिले ॥ २५ ॥ तयांस ब्रह्मदेवें आपुली । कन्या अहिल्या ही अर्पिली । जियेची अद्भुत ख्याति झाली । त्रैलोक्य-सुंदरी म्हणोनी ॥ २६ ॥ मग त्या अहिल्येशीं समवेत । मुनि तो असतां काळ क्रमीत । देवेंद्राचिया मूढ मनांत । दुष्ट वासना उदेली ॥ २७ ॥ कीं, ही त्रैलोक्यरूप· वती । असावी आपणासि एकान्तीं । मग ती वासना धरून चित्तीं । संधी पाहत राहिला ॥ २८ ॥ मग एकदां गौतममुनी । नाहीं पाहूनि आश्रमस्थानीं । येरें तयाचा वेष घेउनी । प्रवेश केला ते स्थानीं ॥ २९ ॥ मग श्रम पाडून अहिल्येस । एकान्त केला सावकाश । पुढती गौतम-आगमनास । शंकोनि वेगें ऊठिला ॥ ३० ॥ तंव तो दारींच गौतम मुनी । तेणें देखिला जैसा नयनीं । तैं तो दचकूनि दीनवदनीं । तैसाच उभा ठाकला ॥ ३१ ॥ तोंचि विचारी मुनि गौतम । रे तूं कोण महा अधम । आणि माझिये वेषीं काम । केउतें तुझें पापिया ॥ ३२ ॥ सत्याचि सांगिजे लवलाहीं । नातरी क्षण न लागतांही । शापून भस्म करीन पाहीं । नीचा तूंतें निश्चयें ॥ ३३ ॥ तंव तो कांपूं लागला सुर । धाकें हृदय जाहलें चूर । मग साष्टांग नमस्कार । घालून विनवूं लागला ॥ ३४ ॥ म्हणे जी सांगतों हें साचार । मी स्वर्गवासी देववर । कामें केलों ऐसा लाचार । देवें क्षमा करावी ॥ ३५ ॥ म्यां महापाप कर्म केलें । परी पायीं लागोनि विनविलें । म्हणोनि पाहिजे क्षमा केलें ।

दयाळा बापा मुनींद्रा ॥ ३६ ॥ ऐसे ऐकतां तयाचे बोल । मुनि अधिक जाहला लाल । म्हणे तूं नष्ट आणि चांडाळ । योनिलंपट कीटक ॥ ३७ ॥ ऐशिया तुझिये अंगीं क्षतें । सहस्र पडतील रे निश्चितें । यापरी शापून देवेंद्रातें । मुनी भीतरीं प्रवेशला ॥ ३८ ॥ तंव तेथ थरथरा कांपत । देहस्थितीस न जाणत । अधोवदनें, जोडोनि हात । उभी अहल्या पाहिली ॥ ३९ ॥ मग तो तिजलागीं बोलला । मूढे, तूं होय आतां शिला । सांडूनि आहार-निद्रादिकांला । कष्ट साहत रहा गे ॥ ४० ॥ पर्जन्य, वारा आणि ऊन । आतां सारेंचि करावें सहन । आणि अंतरीं एकाग्र चिंतन । श्रीराघवाचें धरावें ॥ ४१ ॥ आ-टोनि न जावें जीवित । म्हणोनि योजितों ऐशी मात । कोणेकाचाही या वनांत । निवास होऊं नयेचि ॥ ४२ ॥ ऐशिया परी कित्येक काळ । कष्ट तूं घेशील जैं पुष्कळ । तयींचि तुझें हें पाप सकळ । क्षय पावेल जाणिजे ॥ ४३ ॥ मग जैं श्रीराम मिथिलापुरीला । जातां स्पर्शील तुझी शिला । तयींच शापांतून तुजला । सुटका होईल निश्चयें ॥ ४४ ॥ मग त्वां पावोन पूर्व भान । पूजावा श्रीरघुनंदन । मग तयाचें प्रेम जोडून । सेवेस यावें माझिया ॥ ४५ ॥ ऐसें स्त्रियेसी बोलला । मग सांडूनि आश्रमाला । हिमालयाच्या एकांताला । निघून गेला मुनि तो ॥ ४६ ॥ कौशिक म्हणती बा, ये रीती । कष्ट साहोनि अहिल्या सती । तुझिया यांचि स्वरूपाप्रती । चिंतीत आहे राहिली ॥ ४७ ॥ पायींची धुळी आंगीं पडावी । हीच आस ठेवोनि जीवीं । राहिली, ती तुवां उद्धरावी । गौतम-

भार्या ही श्रीरामा ॥ ४८ ॥ ऐसें बोलोनि कौशिक मुनी । राघवास निजहस्तीं धरोनी । दाखवितां, ती पायें स्पर्शुनी । पावन केली राघवें ॥ ४९ ॥ मग ते तापसीस पाहून । रामें आदरें केलें वंदन । आपुलें श्रीराम नामाभिधान । ऐकविलेंही तियेला ॥ ५० ॥ मग ती पावतां पूर्व स्मृती । अहिल्या उठोनि पाहे पुढती । तंव ती रामाची सुंदर मूर्ती । तेजें पूर्ण विकसली ॥ ५१ ॥ अंगकांति शोभे श्यामल । नयन शोभती जैसें कमल । मुखचंद्र अत्यंत उज्ज्वल । भव्य गंभीर सुंदर ॥ ५२ ॥ कासे कासिला पीतांबर । चतुर्भुजशोभा मनोहर । शंख चक्र आणि गदा धर । मधुर स्मित मुखींचें * ॥ ५३ ॥ मूर्ति ऐसी तेजोघन । पाहतांचि जी दिपवी नयन । लक्ष्मणासमवेत उभी पाहोन । चकिताचि झाली क्षणमात्रें ॥ ५४ ॥ मग हाच जाणोनि रमाकांत । प्रेमें दाटली अंतरांत । सर्वेंचि आसवेंही नयनांत । उभीं राहिली तियेच्या ॥ ५५ ॥ मग प्रेमोपचार घेऊन । करी ती श्रीमूर्तीचें पूजन । मग त्या भक्त्यानंदें करोन । समाधीलागीं पावली ॥ ५६ ॥ पुढती होऊन सावधान । सारूनि सर्व पूजाविधान । श्रीरामचरणीं साष्टांग वंदन । घालूनि उभी राहिली ॥ ५७ ॥ श्रीमूर्तीशीं सन्मुख होऊन । प्रेमें करूं लागली स्तवन । अंगीं रोमांच उभे ठाकून । कंठ सद्गद जाहला ॥ ५८ ॥ देवा ! जगन्निवासा, जगत्पते । आजि मी पावलें धन्यते । पादपद्मींच्या रजःकणांतें । स्पर्शूनि बापा ये वेळीं ॥ ५९ ॥ अहा या भाग्याचें वर्णन । कोण हो करील कविजन । साक्षात हा श्रीरघुनंदन । माझि-

या पुढती ठाकला ॥ ६० ॥ याच्याचि पादस्पर्शे करोन । आपलें पातक बोळवून । श्री-
गंगा ही करिते पावन । शिवादि देवादिकांतें ॥ ६१ ॥ देवा, केउती ही तुझी लीला।
कीं मनुष्यदेहहि तुवां धरिला । आणि साचसा दावून जगाला । स्वरूपीं केलें मोहित
॥ ६२ ॥ देवा तूं तंव चैतन्यघन । तेणें व्यापलास सर्वां भरून । परी मिथिलेस करीत
गमन । ऐसें लोकीं दाविशी ॥ ६३ ॥ म्हणून हाचि धनुर्धर । कमलनेत्र राजा रघुवीर ।
मी उपासीन निरंतर । निश्चळ चित्त करोनि * ॥ ६४ ॥ वेद शोधिती जयाचे चरण ।
आणि शिवही करीत स्मरण । तोचि श्रीराम नारायण । अखंड चित्तीं स्मरावा ॥ ६५ ॥
जयाच्या गाऊनि अवतारकृती । नारदादिकही मुनि नाचती । आणि देवी श्रीसरस्वती ।
तीहि गाळीत आसवें ॥ ६६ ॥ ऐसा परमात्मा श्रीराम । पुराणपुरुष परंधाम । स्वयं-
ज्योति श्रीपुरुषोत्तम । आदि-अंत-रहित ॥ ६७ ॥ हाचि भक्त-करुणाकर । कराया भक्तां-
चा उद्धार । मायागुणें घेवोनि शरीर । श्रीरामरूपें पातला ॥ ६८ ॥ हाचि सत्त्वादि गुण-
लयांत । एकला होवोनि प्रतिबिंबित । कार्यगुणें त्रिविध भासत । ब्रह्माविष्णुमहेश ॥ ६९ ॥
घेवोनि गुणांचा आश्रय । करी उत्पत्ति स्थिति विलय । परी हा आपुला स्वरूप-ठाय ।
स्पर्शो न देई गुणांतें ॥ ७० ॥ तूंच बा जगताचें कारण । तूंचि तयासी आधार जाण ।
वरी जगत तेंहि तूं आपण । नटला आहेसी राघवा ॥ ७१ ॥ नाना भूतमात्रेंकरूनी ।
तूंचि एक येसी अवलोकनीं । आणि त्या प्रत्येक रूपाहूनी । अससी स्वयें वेगळा ॥ ७२

॥ तुझा वाचक असे ॐकार। परी तूं वाचेस अगोचर । किंवा वाच्यवाचक प्रकार। त्वद्रूप हेंचि निश्चयें ॥ ७३ ॥ कर्ता, कर्म आणि कारण। ऐसे नाना भाव जाण । तूंचि अंगीं करिसी धारण। मायेचियाच निमित्तें ॥ ७४ ॥ ऐसा तूं मायेचा अधीश्वर। परी गुणांहीं मोहियेले नर। तुजसी कल्पिती मानवशरीर। मर्यादित करोनि ॥ ७५ ॥ परी पाहतां जैसें गगन। सर्वांस असतांही व्यापून। राहतें असंग मलविहीन। तूंहि तैसाचि सर्वथा ॥ ७६ ॥ तूं निश्चल, तूं शाश्वत। तूं शुद्ध, तूं भावरहित। ज्ञानस्वरूप, त्रिगुणातीत। सत्तारूप केवल ॥ ७७ ॥ देवा, मी एक मूढ अबला। कायसी जाणीन तुझी लीला। म्हणोनि प्रेमें पादांबुजाला। लोटांगणचि घालितें ॥ ७८ ॥ आतां हेचि माझी विनवणी। कीं चित्त जडून राहो चरणीं। देह असतांहि कोणे ठिकाणीं। वियोग घडूं नयेचि ॥ ७९ ॥ नमन तुजला आत्मारामा। नमन तुजला मेघश्यामा। नमन तुजला पुरुषोत्तमा। नारायणा केशवा * ॥ ८० ॥ कोटिसूर्यांसारिखी तेजें। श्यामल अंगकांति विराजे। चापबाण करीं साजे। ऐसी मूर्ति साजिरी ॥ ८१ ॥ सुवर्ण-वर्णी पीतांबर। अंगीं नाना अलंकार। ऐसा माझा श्रीरघुवीर। ध्यावा हाचि वाटतें ॥ ८२ ॥ हाचि संसाराचें बंधन। सहजाच करील निरसन। म्हणोनि याचेंचि स्तुतिस्तवन। करीन हो मी सदैव ॥ ८३ ॥ येणेंपरी करूनि स्तुती। प्रदक्षिणा घालूनि मागुती। वंदूनि पतीच्या सेवेप्रती। सती ती जाय अहिल्या ॥ ८४ ॥ **अहिल्याकृत हें रामस्तोत्र**। पठणें चि-

तास करी पवित्र । भरला श्रीरामचि सर्वत्र । ऐसें अनुभवा आणितें ॥ ८५ ॥ म्हणोनि व्हावया श्रीरामकृपा । हेंचि जीवीं धरावें बापा । आणि भवींच्या त्रिविध तापा । निरसून जावें जनांहीं ॥ ८६ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८७ ॥ श्रीराम ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय ८ वा, सीतास्वयंवर.

श्रीराम ॥ यावरी तो श्रीकौशिक मुनि । बोलला नृपकुमारांलागुनी । आपणांस जाणें जनकसदनीं । यज्ञशोभा पहाया ॥ १ ॥ ऐसें सुचवोनि उभय कुमार । संगें घेऊनि तो मुनिवर । जावयालागीं गंगापार । तीरीं येऊन पोंचला ॥ २ ॥ तेथ नाविकास बोलावून । सिद्ध केलें नौकायान । तंव नाविकें श्रीरामातें पाहून । भयचि फार घेतलें ॥ ३ ॥ म्हणे हां जी श्रीरघुनाथ । आम्हीं द्रव्यहीन बहुत । म्हणोनि आहे जी विनवीत । स्पर्शूं नये नौकेला ॥ ४ ॥ आपुले पायींची लागोन धूळ । नौकेची स्त्री होईल तत्काळ । मग आमुचें कुटुंब सकळ । कैसा निर्वाह करील * ॥ ५ ॥ जेथ पालटला पाषाण । तेथ काष्ठाचें बळ काय जाण । आपुले पायांस मनुष्यचूर्ण । लाविलें आहे बोलती ॥ ६ ॥ तरी दयाळा ऐसें करीं । पाणी घालितों पायांवरी । शुद्ध निर्मल करोनि, वरी । यावें बैसावयातें ॥ ७ ॥

मग तेणें स्वहस्तेंकरून । केलें पादप्रक्षालन । मग त्या तिघांस बैसवून । पैलतिरासी पाव-
विलें ॥ ८ ॥ पुढती चालतां मार्ग कांहीं । मिथिलेस पावले ते लवलाही । ऋषिमंड-
ळींत जाऊन पाहीं । राहते झाले त्रैमूर्ति ॥ ९ ॥ वार्ता जनकासी होतां श्रुत । पूजाद्रव्यें
घेवोनि त्वरित । नृप तो उपाध्यायासहित । पूजनालागीं पातला ॥ १० ॥ मग मुनींस
पुजूनि सादर । साष्टांग केला नमस्कार । तंव ते संनिध देखिले कुमर । देवांऐसे तेजस्वी
॥ ११ ॥ मग म्हणे मुनींलागून । जी हे कवणाचे नंदन । भासती अत्यंत बुद्धिमान ।
आणि धीर प्रतापी ॥ १२ ॥ मुखचंद्र फारचि शोभती । चित्तास सहजीं आकर्षिती ।
वीर आणि उदारमूर्ति । क्षात्रतेजें मंडित ॥ १३ ॥ तंव मुनींनें केलें भाषण । दशरथाचे
हे कुमार जाण । श्रीराम आणि लक्ष्मण । नामें ऐशीं तयांचीं ॥ १४ ॥ यज्ञकर्म कारि-
तां राक्षस । विघ्नें कारितात बहुवस । म्हणोनि जाऊन अयोध्येस । आणिलें होतें ययांतें
॥ १५ ॥ यांची मूर्ति जैसी सुंदर । तैसाचि प्रतापही अनिवार । रामें मार्गींच सोडोनि
शर । ताटिका भूवरी पाडिली ॥ १६ ॥ पुढती पावतां आश्रमस्थानीं । मोठेंच कर्म केलें
यांनीं । सहस्र राक्षस मृत्युसदनीं । पावविले बा क्षणमात्रें ॥ १७ ॥ आणिकही ऐक एक।
श्रीरामें केलें अलौकिक । मिथिलामार्गे क्रमीत देख । आम्ही गंगेसि पावलों ॥ १८ ॥ तेथ
गौतमाचे आश्रमस्थलीं । शिला होवोनि जी राहिली । अहल्या, तियेस उद्धारिली । पाद-
स्पर्शेंचि राघवें ॥ १९ ॥ शिलामुक्त ती होतांचि सती । प्रेमें जाहली स्तवन कारिती । त्या

प्रसंगाची होतां स्मृती । चित्त आनंदें दाटतें ॥ २० ॥ असो, आतां हे दोघे कुमार । यालागींच आणिले येथवर । कीं अद्भुत चाप जें शांकर । त्याचें दर्शन कराया ॥ २१ ॥ तरी आतां तें आणवून । दाखवीं बापा यांलागून । अयोध्येलागीं कराया गमन । उत्कंठा फार तयांची ॥ २२ ॥ ऐसें ऐकोनि जनक नृपवर । प्रधानासी पाचारी सत्वर । आणि म्हणे तें चाप शांकर । आणूनि यांतें दाखविणें ॥ २३ ॥ मग म्हणे तो श्रीकौशिकातें । जी माझे मनीं ऐसें येतें । रामेंचि उचलून या चापातें । गुण जोडाया स्वहस्तें ॥ २४ ॥ ऐसें एक हें घडेल तरी । थोर संतोष होय अंतरीं । अर्पण करीन सीताकुमारी । श्रीरामचंद्राकारणें ॥ २५ ॥ ऐसें ऐकोन जनकवचन । कौशिकें रामाकडे पाहोन । केलें किंचित् सित वदन । मग बोलला नृपातें ॥ २६ ॥ राया उचित तुझा मानस । येथ तूं आणवी शिवचापास । सर्वेचि श्रीराम पुरवील आस । गुण जोडोन तयातें ॥ २७ ॥ ऐसें चाललें जंव भाषण । तोंचि पातलें धनुष्य जाण । आणावयास सहस्र जण । लागले होते जयातें ॥ २८ ॥ मग हेंचि शिवचाप म्हणोन । रामास सांगे नृपप्रधान । तंव पाहतांचि बाहु स्फुरोन । श्रीराम उभा राहिला ॥ २९ ॥ मग अंगींचा काढोन शेला । कटीस वेगें गुंडाळला । आणि एकेंचि करें तयाला । उभें केलें पुढारां ॥ ३० ॥ मग तयास लावितां दोर । वाकवूं लागे श्रीरघुवीर । तंव तें तात्काळ भूमीवर । खंड होऊन पडियेलें ॥ ३१ ॥ नाना देशींचे भूपवर । तेथ मिळाले होते अपार । त्यांहीं पाहोन चमत्कार ।

आश्चर्य केलें उदंड ॥ ३२ ॥ जनकेंहि श्रीरामास घेऊन । हृदयीं दिधलें आलिंगन । अंतः-पुरांतील स्त्रीजन । तेहि विस्मित जाहले ॥ ३३ ॥ मग हातीं देऊन सुवर्णमाला । त्यांहीं धाडिली सीता बाळा । श्रीरामचंद्राचिया गळां । नेऊनि घालावयातें ॥ ३४ ॥ तंव ती अत्यंत आनंदित । वदनीं शोभे मंद स्मित । सुवर्ण-अलंकार-मंडित । राजबाळा निघाली ॥ ३५ ॥ गळां मोतियांचा हार । कर्णीं पत्रें शोभतीं सुंदर । पायीं रुणझुणती नूपुर । मंदमंद चालतां ॥ ३६ ॥ ऐसी सुरम्य बालयुवती । सभेंत येवोनिया गजगती । मंद हास्य करोनि स्वहस्तीं । माळ घालीत श्रीरामा ॥ ३७ ॥ तो सोहळा फार मनोहर । पाहतां आनंदले नारीनर । सीतारामातें वारंवार । पाहून प्रेमें डोलले ॥ ३८ ॥ यापरी सीतास्वयंवर । सर्वांचा आनंदसागर । झालियावरी जनक नृपवर । सांगू आला मुनीतें ॥ ३९ ॥ म्हणे जी कौशिक, आतां त्वरित । पत्र देऊन पाठवावे दूत । बोलावून आणिजे राजा दशरथ । सर्व परिवारसमेत ॥ ४० ॥ मग मुनीच्या अनुमोदनीं । दूत धाडिले दशरथसदनीं । त्यांहीं अयोध्येलागीं येउनी । केलें वृत्त निवेदन ॥ ४१ ॥ तंव तीं ऐकोन पुत्रकीर्ति । बाळ ते येऊनि नयनांपुढती । सर्वांचि प्रेमाश्रूंची भरती । उदंड झाली तयाच्या ॥ ४२ ॥ नृप तो अत्यंत आनंदला । गर्जोन सर्वांतें बोलला । तांतडी करून आतां मिथिला-। पूर गांठूं चला रे ॥ ४३ ॥ हत्ती घोडे सकळ सेना । लेववून अलंकार नाना । चलावें जनकाचि-या सदना । जगन्मंगलाकारणें ॥ ४४ ॥ अरे माझा तो आणा रथ । मी आतांच निघेन

त्वरित । श्रीरामलक्ष्मण माझे सुत । पाहीन डोळे भरूनी ॥ ४५ ॥ वसिष्ठ आणि अरुंधती । यांहीं असावें सर्वांपुढती । राममाता तयांमागुती । ऐसी योजना करावी ॥ ४६ ॥ यापरी तेणें आज्ञापिलें । झणीं सकळ सिद्ध केलें । मग मिथिलेस पावतें झालें । वऱ्हाडीमंडळ सर्वही ॥ ४७ ॥ राजा दशरथ आला ऐसी । वार्ता पावतां जनकापाशीं । नृप तो शतानंदाचे निशीं । स्वागतालागीं धावला ॥ ४८ ॥ मग थोर सत्कारेंकरून । केलें दशरथाचें पूजन । आणि देऊन आलिंगन । नगरामाजी प्रवेशले ॥ ४९ ॥ तंव धांवले रामलक्ष्मण । आणि वंदिती पित्याचे चरण । कैसें उदंड अंतःकरण । संतुष्ट केलें कळेना ॥ ५० ॥ श्रीराम माझें आनंदसदन । बा रे पाहूं दे तुझें वदन । अहाहा ऐसा आनंददिन । भाग्येंचि मातें लाभला * ॥ ५१ ॥ ऐसे दशरथें उच्चारिलें । आणि रामास हृदयीं धरिलें । ब्रह्मानंदासहि तुच्छ केलें । राममूर्तीतें आलिंगुनि ॥ ५२ ॥ मग निवासासाठीं मंदिर । जनकें नेमून दिलें सुंदर । जेथ सुख-साधन-प्रकार । उदंड होते योजिले ॥ ५३ ॥ मग सुमुहूर्त करोनि निश्चित । मंडप उभारिला रत्नखचित । नाना तोरणें तयास शोभत । भव्य आणि प्रचंड ॥ ५४ ॥ नाना तऱ्हेचीं पुष्पें फळें । आणखी वेल उभे केले । ठायींठायींहि शोभविलें । दिव्य वस्त्रांहीं भूषणीं ॥ ५५ ॥ वैदिक कर्ममार्ग-रत । ब्राह्मण मेळविलेही बहुत । सुवासिनीहि दाटल्या आंत । नानालंकार-सुंदर ॥५६॥ नाना नर्तनें आणि गीतें । चालूं लागलीं असंख्यातें । भेरी-मृदंगांचीं गर्जितें । श्रवणीं दाटूं लागलीं ॥ ५७ ॥ मग दिव्य

रत्न-अलंकारीं । मंडित सुवर्णपीठावरी । दशरथाचे कुमार चारी । वाद्यगजरांत आरूढले ॥ ५८ ॥ मग वसिष्ठ कौशिक दोघे मुनी । बैसले तयांच्या दोहों स्थानीं । मंगल अग्नीस संस्थापुनी । प्रज्वाळिती तयातें ॥५९॥ तंव मुहूर्तकाळ पातला । पाहोन आणिली जनक-बाळा । कंठींच्या नाना रत्नमाळा । तेज दाविती सुरम्य ॥ ६० ॥ मग भार्येसह जनक नृपती । होऊन श्रीरामचंद्रापुढती । पादप्रक्षालनाची रीती । करिता झाला आरंभीं ॥ ६१ ॥ मग तेचि जलाचे कण । मस्तकीं तो करीं धारण । शंकरादिकहि देवगण । नित्य वांछिती जयातें ॥ ६२ ॥ मग ही माझी कन्यका सीता । तुजसी अर्पितसें मी आतां । संतोषो-नियां धरावी हातां । ऐसें विनवी राघवा ॥ ६३ ॥ आणि सीतेस हातीं धरून । उदक अक्षता यांहींकरून । शास्त्रानुसार कन्यादान । रायें केलें तयातें ॥ ६४ ॥ मग ऊर्मिला नामक दुहिता । दिधली लक्ष्मणाचिया हाता । मांडवी-श्रुतकीर्ति भ्रातृसुता । भरत-शत्रुघ्नां अर्पिल्या ॥ ६५ ॥ असो ऐसा सर्वतोपरी । आनंदीआनंद झालियावरी । वसिष्ठ कौशिक एके हारीं । बैसले होते एकदां ॥ ६६ ॥ तंव पाहोनि स्वस्थपण । जनक पातला तेथ आपण । मग आरंभी संभाषण । कन्येविषयीं आपुल्या ॥ ६७ ॥ म्हणे मी पूर्वीं यज्ञा-कारितां । नांगरें भूमि उखणूं जातां । तेथ पृथ्वीचे पोटीं अवाचितां । मज ही प्राप्त जाहली ॥ ६८ ॥ मग आपुलीच सुता म्हणून । केली कुटुंबाचे स्वाधीन । आणि आजवरी संभा-ळून । आजि अर्पिली श्रीरामीं ॥ ६९ ॥ एकदां मी आपुले सदनीं । बैसलों असतां सुखा-

सनीं । तेथ पातले नारदमुनी । नाम गात हरीचें ॥ ७० ॥ मग म्यां करोनि नमस्कार । आसनीं बैसविले मुनिवर । तेधवां भाषण ऐसें मधुर । त्यांहीं केलें मुनींद्रा ॥ ७१ ॥ कीं तुझा पूर्व भाग्योदय । होणार बापा निःसंशय । सांगतों तूंतें परम गुह्य । देवलोकींचें वृत्त जें ॥ ७२ ॥ परमात्मा श्रीभगवान । भक्तानुग्रहालागून । करावयास रावणहनन । अयोध्येंत अवतरला ॥ ७३ ॥ मायारूपें मनुष्यवेश । घेऊन पातला हा परमेश । राजा दशरथाचे गृहास । चार देहेंकरूनी ॥ ७४ ॥ तुझे गृहीं ही योगमाया । सीता होऊन पातली राया । म्हणोनि ती श्रीरामास द्यावया । प्रयत्न बापा करीं तूं ॥ ७५ ॥ ऐसें गुह्य हें मज सांगून । नारद पावले अंतर्धान । तैंह्वानि लक्ष्मी ऐसीच गणून । सीतेस म्यां जी पाळिलें ॥ ७६ ॥ मग कायसियें ही कुमारी । अर्पण होईल श्रीरामकरीं । याचि एका मुख्य विचारीं । वेगें करून लागलों ॥ ७७ ॥ मग जाहली कीं आठवण । शंकरें धनुष्य ठेविलें जाण । म्हणोनि तोचि योजिला पण । सीतास्वयंवरातें ॥ ७८ ॥ तयानें सर्वांचा गर्व हरिला । सीतेस श्रीराम भेटविला । मुनींद्रा, आपुलाचि आहे झाला । प्रसाद ऐसा आमुतें ॥ ७९ ॥ धनुष्य दाखवायाच्या साठीं । घेवोनि आलांत हा जगजेठी । आणि माझ्याचि मनींचीं गोष्टी । पूर्ण केलीत कृपेनें ॥ ८० ॥ सीतेसहित एके आसनीं । श्रीराम बैसला अवलोकुनी । धन्य मी जाहलों तिहीं भुवनीं । थोर भाग्य हें माझें ॥ ८१ ॥ देवा ! तुझेंचि पादतीर्थ । सेवून सृष्टि-उत्पादनार्थ । ब्रह्मदेव जाहलासे समर्थ । म्हणोनि

तूंच कीं परात्पर ॥ ८२ ॥ तैसाच बलि हाहि भूपाल । तुझेंच सेवून पादसलिल । सुरेशाच्या पदास तत्काल । प्राप्त झाला भूलोकीं ॥ ८३ ॥ बहुत कायसी ही बोली । तुझीच सेवूनि पादधूली । आतांचि अहिल्या मुक्त झाली । भर्तृशापापासूनि ॥ ८४ ॥ म्हणोनि तुजहूनी आणिक । कोठून असेल जगन्नायक । यालागीं तुझेचि पाय एक । नित्य म्यां जीवीं धरावे ॥ ८५ ॥ ज्याचे पायींच्या रजःकणीं । चित्त ठेवोनिया मुनिगणीं । मृत्यूस ठेविलें पायधुणी- । ऐसें दीन करूनी * ॥ ८६ ॥ आणि ज्याचे नामगायनीं । दुःखशोक जाती सरुनी । तोचि श्रीराम आम्हां धनी । सेवेस व्हावा सदैव ॥ ८७ ॥ येणेंपरी स्तवन केलें । मग रथ अश्व हत्ती भले । सहस्रावधि आणोनि अर्पिले । रामोपहाराकारणें ॥ ८८ ॥ आणखी कितीएक दासदासी । अर्पण केल्या राघवासी । तैशींच नाना वस्त्रें सीतेसी । सालंकार अर्पिलीं ॥ ८९ ॥ वसिष्ठ कौशिक हे मुनिवर । आणि मुख्य दशरथ नृपवर । तैसेचि लक्ष्मणादि तीन कुमार । उपहार सर्वां अर्पिले ॥ ९० ॥ मग जावया अयोध्येला । सर्वीं निरोप दिला घेतला । सीता पातली भेटावयाला । अंतःपुरांत जननीतें ॥ ९१ ॥ मातेनें एरीस कुरवाळून । आवडी दिधलें आलिंगन । आणि भजाया रघुनंदन । ऐसी खूण निवेदिली ॥ ९२ ॥ संसार आणि बाह्य शरीर । मनोबुद्ध्यादि भाव आंतर । राघवींच अर्पून अहंकार । श्रीरामसेवा करावी ॥ ९३ ॥ शुद्ध पातिव्रत्य धरावें । रामावांचून मनीं न ध्यावें । आपणातेंही विस्मृत व्हावें । श्रीरामसेवेकारणें ॥ ९४ ॥ ऐसिया परी सावध-

पणें । राहून पतिसेवा करणें । एक पति वोळतां सर्वजणें । वश होतात बालिके ॥ ९५ ॥ ऐसाच माझाही अनुभव । पति हाचि स्त्रियांचा देव । तेथेंचि ठेवोनि दृढ भाव । मोक्ष पावावा स्त्रियांहीं ॥ ९६ ॥ ऐसी सांगितली खूण । मागुती केली पाठवण । येणेंचि रीती श्रीरामचरण । साधकें भावें भजावे ॥ ९७ ॥ पाळितो सर्वही जीवांप्रती । म्हणोनि हा होय त्यांचा पती । यातेंच स्मरूनि एकचित्तीं । संसार गोड करावा * ॥ ९८ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीर-दासें प्राकृतीं ॥ ९९ ॥ श्रीराम ॥ ८ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

---

## अध्याय ९ वा, भार्गवगर्वहरण

श्रीराम ॥ यावरी मिथिलापुर सोडून । अयोध्यामार्गीं चालले जन । कांहीं योजन मार्ग चालून । जाते झाले पुढारा ॥ १ ॥ तंव दुष्ट चिन्हें होऊं लागलीं । रायें दशरथें अव-लोकिलीं । चित्तीं गजबज जाहली । काय होणार म्हणूनी ॥ २ ॥ मग जावोनि वसिष्ठा-पाशीं । रायें पुसिलें ऐसें तयांसी । जी हीं विपरीत चिन्हें कायसीं । मार्गीं होतीं मुनींद्रा ॥ ३ ॥ तंव वसिष्ठें पाहोन विचार । रायास दिधलें प्रत्युत्तर । कांहीं भयप्रसंग येणार । ऐसें यांचें सूचित ॥ ४ ॥ परी सर्वेंच निर्भयता । लाभेल; न करावी चिंता । दक्षिण अंगें

हारिणें जातां । वारंवार दिसतीं ॥५॥ मुनिराय ऐसें बोलला । तोंचि प्रचंड वारा सुटला । धुळीचा लोटचि उसळला । नेत्र सर्वांचे रोधिले ॥ ६ ॥ तंवचि जमदग्नीचा सुत । प्रतापें अत्यंत जो विख्यात । आणि तपस्तेजेंहि विराजत । पुढती येऊन ठाकला ॥ ७ ॥ जेणें क्षत्रियांचा गर्व हारिला । कार्तवीर्याचा अंत केला । **परशुराम** तो पाहोन नृपाला । भयचि अत्यंत वाटलें ॥ ८ ॥ मग सत्कारादि विसरून । 'त्राहि त्राहि' बोले वचन । कालमृत्यु-स्वरूप पाहोन । धैर्य सर्वही सांडिलें ॥ ९ ॥ साष्टांग घालोनि नमस्कार । विनवूं लागला वारंवार । प्राणाधिक हे माझे कुमार । त्यांस सांभाळी दयाळा ॥ १० ॥ परी राजयाची ऐसी विनवणी । धिक्कारून तो वीर झणीं । क्रोधपूर्ण ऐशा ईक्षणीं ॥ रामावरीच लोटला ॥ ११ ॥ म्हणे तूं अत्यंत क्षत्रियाधम । धरोनि राहसी माझेंच नाम । आतांचि तुझा निरासितों भ्रम । युद्धास येईं खालता ॥ १२ ॥ भंगोनि शिवाचें चाप जीर्ण । मूढा मिरविसी थोरपण । परी माझिया चापास बाण । लावोनि दाखवी ये वेळीं ॥ १३ ॥ तरीच तुजसी करावें समर । नातरी तूं कायसें पोर । एकेंचि घायें करीन ठार । सर्व क्षत्रिय तुम्ही रे ॥ १४ ॥ ऐकतां ऐसें तयाचें वचन । क्रोधावला श्रीरघुनंदन । मग झणीं उठोनि हातांतून । चाप ओढून घेतसे ॥ १५ ॥ सवेंचि तयास गुण जोडून । करावयास शरसंधान । आकर्ण ओढून बोले वचन । थोर आवेशें भार्गवा ॥ १६ ॥ ब्राह्मणा, दाखवी आतां स्थळ । छेदून पाडितोंचि तत्काळ । माझा बाण होईल विफळ । ऐसें सर्वथा घडेना ॥ १७ ॥

शरास लक्ष्य दाखवी कांहीं । नातरी तुजवरी टाकीन पाहीं । भार्गवा आतां मार्ग नाहीं । तुज पळून जावया ॥ १८ ॥ ऐसें बोलतांच श्रीराम । उतरला सर्वहि गर्वभ्रम । म्लान झाला भार्गवराम । पूर्वस्मृतीतें पावतां ॥ १९ ॥ मग म्हणे हां जी श्रीरघुवीर । प्रत्यक्षचि तूं परमेश्वर । उत्पत्ति स्थिति आणि संहार । तूंच करिसी जगाचे ॥ २० ॥ देवा, तूंच पुरुष पुराण । तूंचि विष्णु रमारमण । तुझिया पूर्व वाक्याचें स्मरण । मजासि होतसे ये वेळीं ॥ २१ ॥ पूर्वीं विष्णूची आराधना । करावयाचें आणून मना । चक्रतीर्थास राहून नाना । तपःप्रयास म्यां केले ॥ २२ ॥ तेधवां माझा अनन्य भाव । पाहोन तुष्टला रमाधव । चतुर्भुज मूर्ति स्वयमेव । होऊन पुढें ठाकला ॥ २३ ॥ मग मी करितां साष्टांग नमन । देव जाहले प्रसन्नवदन । मग बोलले मजलागून । सकळहि स्मरतें एधवां ॥ २४ ॥ वत्सा ऊठ बा लवकरी । तपाचें फळ हें घेईं करीं । ज्याचियेसाठीं आजवरी । कष्ट तुवां हे साहिले ॥ २५ ॥ तुझिया पितयाचे प्राण । कार्तवीर्यें ज्या केले हरण । तयास तुझियाचि हस्तें जाण । मृत्यु येईल निश्चयें ॥ २६ ॥ आतां तुवां बा मदंशेंकरून । करावें क्षत्रिय-निर्दलन । मग राज्यभार कश्यपीं अर्पून । स्वास्थ्य सेवीत राहावें ॥ २७ ॥ त्रेतायुगाचे ठायीं जाण । होणार असें मी अवतीर्ण । ते वेळीं हें माझें सगुण । रूप दावीन तुजला ॥ २८ ॥ जो तेजोंश तुझे ठिकाणीं । ठेविला तोहि तेचि क्षणीं । हरीन, ऐसें निश्चितपणीं । जाणून ठेवीं मनीं तूं ॥ २९ ॥ ऐसें मज बोलून वचन । देव पावले अंतर्धान । म्यांहि तैसें

तैसें करून । सर्व अनुभवा आणिलें ॥ ३० ॥ आतां माझिये आंगीं कांहीं । क्षत्रियतेज राहिलें नाहीं । म्हणोनि देवा तूंचि पाहीं । श्रकिांत होसी निश्चयें ॥ ३१ ॥ अहो ! आजि हें माझें जीवित । सफळचि जाहलें निश्चित । भगवान श्रीलक्ष्मीकांत । मजला प्रत्यक्ष भेटले * ॥ ३२ ॥ इया दृश्याचिया अंतरीं । प्रकृति जी कां वास करी । देवा तियेचिया पैल तीरीं । निवास आहे आपुला ॥ ३३ ॥ म्हणोनि तुमचिया पदाप्रती । देवादिकांतेंहि नोहेचि गती । परी अहा ! ही सगुण मूर्ति । प्रत्यक्ष कीं म्यां पाहिली ! ॥ ३४ ॥ जन्मावें आणि मृत्यु पावावें । वाढावें आणखी झिजावें । कांहीं अधिक-उणेपण पावावें । हाचि स्वभाव सकळांचा * ॥ ३५ ॥ परी प्रभो ते हे षड्भाव । सर्वचि होत अज्ञानप्रभव । म्हणोनि तयांचा लवहि संभव । तुझिये स्वरूपीं असेना ॥ ३६ ॥ ऐसा तूं सर्वविकाररहित । व्यापूनि ससी सर्वां आंत । म्हणोनि गमनादि क्रियाजात । तुझिये अंगीं नातळे * ॥ ३७ ॥ तुझें स्वरूप तों निर्विकल्प । तेथ माया रचिते संकल्प । आणि जगद्राशी अमूप । निर्माण करून दाविते ॥ ३८ ॥ बुडबुडे जलावरीच राहती । गमनादि नाना क्रिया करिती । परी ती जळाची नोहे गती । तें ठायींचें निश्चल ॥ ३९ ॥ अथवा अग्नीच्या अंगावरी । धूम आकाशीं संचार करी । परी अग्नि तो आपुल्याच परी । ठायीं स्थिरचि राहिला ॥ ४० ॥ ऐसिये परी श्रीरघुवीरा । तुझी ही माया त्वदाधारा । दाविते सृष्टीचा पसारा । परी तूं निःसंग निश्चयें ॥ ४१ ॥ ऐसा तूं शुद्ध सदोदित ।

परी लोक हे मायावृत । म्हणोनि तूंतें तत्त्वतां जाणत । ऐसा पुरुष दुर्मिळ ॥ ४२ ॥ परमात्मज्ञान तेचि **विद्या** । आणि माया तेचि **अविद्या** । उभयांचा विरोध येथ सध्यां । सहज सिद्ध होतसे ॥ ४३ ॥ म्हणून जोंवरी नाहीं विचार । तोंचि अविद्येस ये आकार । विचारोदयें निर्विकार । आत्मा प्रत्यक्ष होतसे ॥ ४४ ॥ अविद्येनेंच केला निर्मित । ऐशा देहादि संघातांत । चिच्छक्ति होतां प्रतिबिंबित । **जीव** त्यातेंचि बोलती ॥ ४५ । मग माझा देह, माझा प्राण । बुद्धि मनहि माझेंच जाण । ऐसी भावना धरून पूर्ण । जीव मोह पावती ॥ ४६ ॥ येणेंचि 'कर्ता' नांव येतें । मग फळ भोगावें लागतें । सुखासवें दुःखहि बा तें । घर धरून येतसे ॥ ४७॥ परी पाहतां संगरहित । आत्मा सुखदुःखांतें अतीत । आणि बुद्धि तों जडाचि निश्चित । तीस सुखदुःखें कायसीं ॥ ४८ ॥ म्हणून सुखदुःखभोक्ता कोण । ऐसें पाहतां नाहीं ठिकाण । विचारें सर्वचि मिथ्या जाण । हाचि निर्णय एकला ॥ ४९ ॥ ज्यांहीं विवेक नाहीं धरिला । तेचि म्हणती या आत्म-याला । जड बुद्धीचा संग झाला । म्हणोनि संसार भासतो ॥ ५० ॥ चैतन्यसंगें जड बुद्धीतें । म्हणती चेतनत्व येतें । बुद्धिसंगेंही आत्मयातें । जडत्व येतें कल्पिती ॥ ५१ ॥ म्हणोनि विचाराचिया अभावीं । सुखदुःखें होतीं म्हणावीं । पहातां निःसंग स्वरूपाचे गांवीं । अवसर नाहीं तयांतें ॥ ५२ ॥ परी प्रभो ऐसा विचार । तोचि एक लाभेल नर । संतसहवास निरंतर । करील जो कीं आदरें ॥ ५३ ॥ म्हणून संतांचा सहवास । घडला

नसेल ऐसियास । संसार-दु:खांचा निरास । करूं न येई सर्वथा ॥ ५४ ॥ संत-सहवासें परमेश्वरीं । प्रीति लावूं शिकावी खरी । मग तयास ध्यावें अंतरीं । उपासनेच्या क्रमानें ॥ ५५ ॥ मग तो वाढतां प्रीतिभर । तुटेल मायेचा आधार । चित्तमालिन्य होईल दूर । शुद्ध प्रेमें हरीच्या ॥ ५६ ॥ मागुती ज्ञानाची पात्रता । येऊन भेटेल सद्गुरुदाता । तेणें तत्त्वोपदेश करितां । मोक्ष पाविजे निश्चयें ॥ ५७ ॥ ऐसा निश्चित मोक्षक्रम । म्हणोनि देवींच पाहिजे प्रेम । त्यावणि लोटले कोटि जन्म । तरीहि निष्फळ जाणिजे * ॥ ५८ ॥ यालागिं देवा श्रीरघुपते । भक्तिच एक देईं मातें । तीचि एक या अविद्येतें । निरसावयासी समर्थ ॥ ५९ ॥ तुझिया भक्तीनें वेडे केले । आणि त्वत्कथा गाऊं लागले । त्यांहीं भूतळहि पावन केलें । कुळचि काय म्हणावें ॥ ६० ॥ म्हणोनि भक्तिप्रिया रघुनाथा । करुणाकरा जगद्धिता । तुझिये पायीं ठेवोनि माथा । पावन झालों जगीं मी ॥ ६१ ॥ म्यां दुष्ट क्षत्रिय निरसून । केलें जें पुण्य संपादन । तें सर्वही तुजलागून । अर्पण होवो श्रीरामा ॥ ६२ ॥ ऐसिये परी तत्त्वार्थस्तवन । ऐकून तोषले रघुनंदन । मग भार्गवासी आशीर्वचन । ऐसें केलें दयाळें ॥ ६३ ॥ जैसें बा तुझें मनोगत । तैसेंच होईल निश्चित । सर्व कामही परिपूरित । होवोत माझ्या कृपेनें ॥ ६४ ॥ मग वर याचिला भार्गवें । देवा हेंचि मजसि द्यावें । स्तोत्र हें पठतां जीवेंभावें । प्रेम लाभावें तयातें ॥ ६५ ॥ अंतकाळीं मग तुझी स्मृति । तयास राहावी निश्चितीं । आणि घडावी ज्ञानप्राप्ति । तुझिया भक्तिबळें-

चि ॥ ६६ ॥ तथास्तु बोलले रघुनंदन । मग भार्गवें केलें पदवंदन । आणि घेवोनि अनुज्ञावचन । महेंद्राचळीं तो चालला ॥ ६७ ॥ ऐसा सर्वही चमत्कार । रायें देखिला जैसा समोर । तंव तयास आनंदपूर । आलाचि ऐसें जाहलें ॥ ६८ ॥ मग राघवास हृदयीं धरून । आणि वारंवार आलिंगून । आनंदआसवें नयनांतून । उदंड तेणें गाळिलीं ॥ ६९ ॥ येणेंपरी तो स्वस्थ मानस । होऊन पावला अयोध्येस । उत्साह जाहला चारी दिवस । नृप आला म्हणोन ॥ ७० ॥ मग चार कुमारांसमवेत । आनंदानें काल क्रमीत । राजा दशरथ अयोध्येंत । राज्य करीत राहिला ॥ ७१ ॥ पुढती एकदां युधाजित । भरत-मातुल आला पुरींत । मग रायास अगत्यें पुसत । भरतास नेऊं पातलों ॥ ७२ ॥ मग नृपेंहि स्नेह जाणून । भरत आणखी शत्रुघन । करून दोघेही स्वाधीन । संतोषविलें तयाला ॥ ७३ ॥ इकडे श्रीराम आणखी सीता । तैसीच देवी कौसल्या माता । आनंद-भरित करून आतां । तोषवूं लागले जनांतें ॥ ७४ ॥ श्रीरामचंद्राचें उदारपण । आणीक शौर्यादि नाना गुण । जनांचें चित्त आकर्षण । करितां वृद्धीच पावलें ॥ ७५ ॥ सर्वचि अयोध्यावासी जन । श्रीराम म्हणोनि करिती गान । सारेंचि भरूनि जाय गगन । नि-त्यानंदसुखानें ॥ ७६ ॥ ऐसा श्रीराम देवाधिदेव । आपुल्या भक्तजनांस्तव । मायागुणें होऊनि मानव । लोक सुखवीत राहिला * ॥ ७७ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७८ ॥ श्रीराम ॥ ९ ॥

# अयोध्याकांड

## अध्याय १० वा, नारदागमन

श्रीराम ॥ एकदां श्रीराम सीतापती । सेवीत होते सुखविश्रांति । आणखी सन्निधीं सीता सती । उभी होती ठाकली ॥ १ ॥ सुवर्णखचित दिव्य रुचिर-। मंदिरीं सिंहासन सुंदर । सावळी मूर्ति सुकुमार । पूर्ण तेजें विराजत ॥ २ ॥ अंगीं नाना अलंकार । गळां कौस्तुभरत्नहार । आणि ढाळीत राहिली चामर । सीतादेवी पुढारां ॥ ३ ॥ मुखीं घेत-लासे तांबूल । चाललेत सुखाचे बोल । ऐसी असतां एकांत वेळ । तेथ नारद अवतरले ॥ ४ ॥ स्फटिकाऐसें दिव्य शरीर । तैसेंच बहु निर्मल अंतर । भक्तिप्रेम आणीक सुंदर । दिव्य ज्ञानही जयाचें ॥ ५ ॥ ऐसा मननशील मुनी । अकस्मात पुढती अवलोकुनी । रामें तत्काल असनाहूनी । उठोनि पायीं वंदिलें ॥ ६ ॥ सीतादेवीहि याचपरी । आदरें सर्वेचि नमस्कारी । मग बैसवूनि आसनावरी । श्रीराम बोले मुनींतें ॥ ७ ॥ मुनिराज, आपुलें दर्शन । अत्यंत दुर्लभ आम्हांलागुन । कां जे संसारियांचें मन । विषयीं आसक्त म्हणूनी ॥ ८ ॥ परि हें माझें भाग्य थोर । म्हणोनि ऐसे जी मुनिवर । दर्शनालागीं येथ-वर । स्वयें आपण पातलां ॥ ९ ॥ म्हणोनि आपुलिया दर्शनें । मी कृतार्थ जाहलों मुने ।

तरी आजि आपुल्या मनें । काय वांछिलें सांगिजे ॥ १० ॥ करावें स्पष्ट निवेदन । मी तें अवश्य संपादीन । ऐसेपरी श्रीरामवचन । ऐकून मुनि बोलले ॥ ११ ॥ अनुसरोनि लोकाचारीं । म्हणोनि आपणातें संसारी । देवा, मजसि तूं एके परी । मोहचि घालिसी वाटतें ॥ १२ ॥ अथवा देवा तूं संसारी । हीच गोष्ट पाहतां खरी । एवढें विश्व तुझियावरी । चाललें आहे सुखानें ॥ १३ ॥ जगताची जी कारणीभूत । माया ती तुझी गृहिणी होत । आणि ब्रह्मादिकांतें प्रसवत । तुझिया राहूनि संगतीं ॥ १४ ॥ तुझाच घेऊन हा आश्रय । निर्मिते सत्त्वादि गुणत्रय । मग तैशीच प्रजाहि होय । त्रिगुणात्मक तियेला । ॥ १५ ॥ म्हणोनि विश्वरूप महागृहीं । तूं गृहस्थ अससी पाहीं । सीतारूपें माया हीहि । पत्नी तुजला शोभते ॥ १६ ॥ रामा तूंचि होसी श्रीपती । आणि लक्ष्मी जानकी सती । तूंच शंकर पशुपती । आणि जानकी पार्वती ॥ १७ ॥ देवा तूंच ब्रह्मणस्पती । सीता हीच कीं सरस्वती । तूंचि शशी आणि गभस्ती । रोहिणी प्रभा ही जानकी ॥ १८ ॥ तूंचि इंद्र, आणखी इंद्राणी- । जानकी तुझी पट्टराणी । तूंचि अग्नीचिये ठिकाणीं । स्वाहा देवी जानकी ॥ १९ ॥ रामा तूंचि आहेस वरुण । मग सीताचि भार्गवी जाण । तूंचि वायु सर्वप्राण । सीता गति तयाची ॥ २० ॥ तूंचि यम होवोनि असतां । संयमिनी ही शोभे सीता । तूंचि निर्ऋति श्रीरघुनाथा । सीता तामसी तुझी ही ॥ २१ ॥ तूंचि कुबेररूपें अससी । सीता म्हणिजे संपत्तीसी । तूंच रुद्र सर्वग्रासी । सीता रुद्राणी

निश्चित ॥ २२ ॥ किंवा जें जें पुरुषवाचक । तें तें तूंचि बा, राम एक । आणि जें जें स्त्रीचें वाचक । ती ती सीता निश्चयें ॥ २३ ॥ म्हणोनि सीता आणि रघुपती । यांहींच व्यापिली सर्व जगती । तिळही जागा नाहीं रिती । सीतारामावांचुनी * ॥ २४ ॥ देवा, चिद्रूपावरी तुझिया । आज्ञान येतसे जें उदया । तयास **अव्याकृत** मूळमाया । ऐसें तत्त्वज्ञ बोलती ॥ २५ ॥ अव्याकृतापासून **महत** । नामें तत्त्व होतसे उदित । तेंचि बुद्धितत्त्व, ऐसें मत । सांख्यशास्त्रांत बोलिलें ॥ २६ ॥ तयापासून **लिंग** नामक । तत्त्व उत्पन्न होतें एक । अहंकारादि रूपें अनेक । त्याचपासून भासती ॥ २७ ॥ दहा इंद्रियें, पंच प्राण । बुद्धि, मन इत्यादि जाण । या सर्वांचें एकीकरण । त्यातेंचि लिंग बोलिजे ॥ २८ ॥ जन्म, मरण, सुखदुःखें । हे तयाचेचि धर्म देखें । **सूक्ष्म** ऐसेंहि शास्त्रमुखें । त्यांतेंचि आहे बोलिलें ॥ २९ ॥ अविद्या जी आदिरहित । स्वरूप जिचें निर्णयातीत । तियेस **कारण** नांव येत । शास्त्रविचारें पाहतां ॥ ३० ॥ **स्थूल** तें जाणती सर्व जण । एवं उपाधि तीन जाण । स्थूल सूक्ष्म आणि कारण । चैतन्याच्या संगतीं ॥ ३१ ॥ यांचे ठायीं ममात्मभाव । धरितां बोलिजेतें **जीव** । यांसी निःसंग तोचि **शिव** । ऐसें निश्चयें जाणिजे ॥ ३२ ॥ जागृति, स्वप्न आणि झोंप । हें अवस्थात्रयाचें रूप । आणि संसार-बंधाचेंहि माप । मोजिलें जाय यांयोगें ॥ ३३ ॥ परी या तीन अवस्थांहीं । चिद्रूप सर्वथा स्पर्शलें नाहीं । सर्वांवेगळें अखंड राही । साक्षीरूप केवल ॥ ३४ ॥ ऐसा सर्वांसी

साक्षीभूत । आत्मा चिन्मय जो शाश्वत । तोचि तूं आहेस कीं निश्चित । सीतानाथा श्रीरामा ॥ ३५ ॥ देवा, तुझ्याचि स्वरूपांतून । जाहलें विश्वाचें या जनन । पुढती तें राहे स्थिरावून । तुझ्याच ठायीं राघवा ॥ ३६ ॥ मग तेंचि विलया जातां । तुझ्याचि अंगीं राही तत्त्वतां । म्हणोनि विचारें पाहूं जातां । तूंचि सर्वांचें कारण ॥ ३७ ॥ जेविं दोर एक अवलोकून । सर्पचि, ऐसें व्हावें मन । मग त्याचि भ्रमेंकरून । कारणावीण शिणावें * ॥ ३८ ॥ तैसा आपुला शुद्ध स्वभाव । नेणोनि मानावें 'मी जीव'। आणि भ्रमून धावाधाव । नानापरी करावी * ॥ ३९ ॥ परी पाहतां नीट विचार । स्पष्ट प्रत्ययास येतो दोर । मग भयाचा होय संहार । अनायासेंचि तेधवां ॥ ४० ॥ त्यापरी निजरूपाचा बोध । व्हावयास घेतां अंतःशोध । 'अहं ब्रह्म' ऐसें निर्वेध । अनुभवातें येतसे ॥ ४१ ॥ मी जीव एवढा ऐसा । हाचि संसाराचा फासा । भ्रमेंचि भासतसे अपैसा । निरास पावे विचारें * ॥ ४२ ॥ मी चिन्मात्र केवल असंग । मज देहाचा कैचा संग । ऐसिया प्रत्ययें पाहतां मग । भवबंध कैंचा कोणातें * ॥ ४३ ॥ ऐसें सकळ संगरहित । चिद्रूप सर्वत्र जें विलसत । तेंचि हें येथें आहे स्थित । श्रीरामरूपें निश्चयें ॥ ४४ ॥ इया नाना शरीरांतरीं । बुद्धि आहेत नानापरी । तयांस ज्ञानप्रकाश करी । ऐसी एकाचि चिज्ज्योति ॥ ४५ ॥ ती चिज्ज्योति तीच एथ । श्रीरामरूपें आहे शोभत । म्हणोनि श्रीरामा तूंचि निश्चित । अंतर्यामी सकळांचा ॥ ४६ ॥ जैसी दोरीच सर्प दिसे । तैसा-

चि अज्ञानाच्या विलासें । विश्वाकार हा देवा, भासे । आत्मारामीं चिन्मात्रीं ॥ ४७ ॥ तोचि ज्ञानविचार घेतां । शुद्धस्वरूप येवोनि हातां । भ्रम निरास पावून तत्त्वतां । दुःखशोक आटती ॥ ४८ ॥ म्हणोनि ज्ञानाचाचि अभ्यास । अवश्य आहे भवभीतास । आणि भक्तीची धरितां कास । चित्तीं ज्ञान ठसावे * ॥ ४९ ॥ म्हणोनि मुक्तीचा अधिकारी । भक्ताचि होइजेल निर्धारीं । भक्तीवांचून नाना परी । कष्ट केले ते निष्फळ * ॥ ५० ॥ ज्यांचिया अंतरीं भगवंत । अखंड राहिला ऐसे संत । तयांचा मी एक अत्यंत । क्षुद्र सेवक श्रीरामा ॥ ५१ ॥ म्हणोनि देवा तूं आमुतें । कृपादृष्टीच ठेवी श्रीपते । मायेंतून करीं गा परतें । मोह घालूं नको जी ॥ ५२ ॥ ब्रह्मदेव जे आपुले सुत । तेचि माझे जनक होत । म्हणूनि पाळावें सदोदित । मजासि बालका आपुल्या ॥ ५३ ॥ ऐसिये परी स्तवन केलें । मग साष्टांगें पायीं वंदिलें । सर्वेचि नेत्र भरून चालले । आनंदाच्या आसवीं ॥ ५४ ॥ मग पुढती ऐसें बोले । कीं मज देवांहीं पाठविलें । तुझिये चरणीं निवेदिलें । पाहिजे एक म्हणूनि ॥ ५५ ॥ देवा, रावणासी निवटाया । तुवां घेतली मनुष्यकाया । परी तुज राज्यीं बैसवावया । सिद्धता केली नृपानें ॥ ५६ ॥ मग शिरीं आलिया राज्यभार । त्यांत राहाणें लागेल तत्पर । मग रावणवधाचा विचार । साधेल कैसा कळेना ॥ ५७ ॥ म्हणोनि 'हरीन मी भूभार' । ऐसा आपुला जो निर्धार । सिद्धीस नेइजे तो सत्वर । सत्यप्रतिज्ञ श्रीरामा ॥ ५८ ॥ ऐसें नारदाचें सूचित । ऐकूनि रामें केलें

स्मित । मग नारदासि म्हणितलें, मात । उदंड केली तुवां ही! ॥ ५९ ॥ बा रे मजला विदित नाहीं । ऐसें कोठून असावें कांहीं । आणि माझिया वचनीं पाहीं । अंतर कैचें पडावें ॥ ६० ॥ परी पाहिजे आला काळ । सरलें पाहिजे पुण्यबळ । मग शीघ्रचि असुर सकळ । निर्दाळीन मी निश्चयें ॥ ६१ ॥ मारावयास दशानन । उद्यांच करीन अरण्यगमन । तपस्विवेष स्वीकारीन । कार्य साधेल तोंवरी ॥ ६२ ॥ रावण करील सीताहरण । तेंचि मज होईल कारण । मग मी करीन निर्दाळण । कुळासमेत तयाचें ॥ ६३ ॥ श्रीरामचंद्राचें अभिवचन । येणें परी श्रवण करून । अंतरीं पूर्ण समाधान । मुनि नारद पावला ॥ ६४ ॥ मग प्रदक्षिणा करून । आणखी साष्टांग वंदून । अनुज्ञा घेऊन अंतर्धान । मुनि पावला क्षणमात्रें ॥ ६५ ॥ श्रीराम आणि नारदमुनी । उभयतांचा हा संवादध्वनी । प्रेमभाव ठेवोनि मनीं । नित्य वाचनीं ठेवावा ॥ ६६ ॥ येणें संसारप्रेम तुटे । वैराग्य आंगीं उमटे । भक्तिप्रेम अंतरीं दाटे । ऐसा अनुभव पाविजे ॥ ६७ ॥ पुढती होऊन स्वरूपज्ञान । तुटतें संसाराचें बंधन । पदार्थमात्रीं श्रीरामदर्शन । अखंड होऊं लागतें ॥ ६८ ॥ दवोंतेंही जो दुर्मिळ । तो मोक्ष यायोगें केवळ । निश्चयें होय हातींचा मळ । ऐसा अनुभव भक्तांचा ॥ ६९ ॥ म्हणोनि रघुवीर-भक्तजन । त्यांहीं घेइजे अनुभवून । चोहोंकडे श्रीरामदर्शन । घेऊन आनंद करावा * ॥ ७० ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७१ ॥ श्रीराम ॥ १० ॥

## अध्याय ११ वा, अभिषेकसिद्धता.

श्रीराम ॥ इकडे रघुवीराचा पिता । एकांतामाजी बैसला असतां । एक विचार अवचितां । चित्तीं तयाचे उदेला ॥ १ ॥ मग दूतातें पाठवून । आणिले वसिष्ठ बोलावून । आणि आपुले मनींचें वचन । ऐसें बोलला तयांतें ॥ २ ॥ म्हणे, अहो जी मुनिप्रवरा । विनंती एक श्रवण करा । मनीं आहे कीं श्रीरघुवीरा । राज्याभिषेक करावा ॥ ३ ॥ बाल वृद्ध नारी नर । पंडित शास्त्रज्ञ साधुवर । रघुनंदनाची वारंवार । प्रशंसा करिती पहा जी ॥ ४ ॥ ऐसा श्रीराम गुणमंडित । आणखी मीहि वृद्ध बहुत । म्हणोनि आलेंसें मनांत । राज्य स्वाधीन करावें ॥ ५ ॥ पाहतां भरत नाहीं येथ । परी न व्हावी दिवसगत । कार्य उरकोनि घ्यावें त्वरित । हेंचि योग्य एधवां ॥ ६ ॥ सोहळा पाहीन चार दिवस । फेडीन नयनांचीही आस । म्हणोनि माझिया मनोगतास । आपुली अनुज्ञा असो जी ॥ ७ ॥ म्हणोनि आतां वेळ जोडावी । सकळ सामग्री सिद्ध करावी । वार्ता राघवास निवेदावी । स्वयेंचि आपण मुनींद्रा ॥ ८ ॥ नानापरींचीं नव तोरणें । मंडित करून नानावर्णें । नगरांत सर्वत्र उभारणें । गुढ्या पताका उदंड ॥ ९ ॥ ऐसें करूनियां भाषण । सुमंत्रास करी पाचारण । मग तयास सांगे खूण । अभिषेकसिद्धता करा हो ॥ १० ॥ तेथ प्रथम ऐसें पाहीं । मुनींस लागेल जें जें कांहीं । तें तें आणूनि लवलाहीं । अवश्य पुरवावें ये वेळीं

॥ ११ ॥ मग राजाज्ञा शिरसा वंदून । मुनींस पुसे जैसा प्रधान । तयीं ते वसिष्ठ तपोधन । अभिषेकसिद्धता सांगती ॥ १२ ॥ म्हणती नाना अलंकार-मंडित । ऐशा कन्यका कांहीं बहुत । मंदिरीं सभामंडपा आंत । प्रभातीं सिद्ध असाव्या ॥ १३ ॥ तैसेच घालून सकळ साज । उभे पाहिजेत सोळा गज । त्यांत चतुर्दंत गजराज । ऐरावतीहि असावा ॥ १४ ॥ सकळ तीर्थांहून उदक । आणून कुंभ सहस्र एक । भरून ठेवावे उदयीक । यत्नें करूनि सुमंत्रा ॥ १५ ॥ बारा व्याघ्रांबरें, आणिक । भव्य- शुभ्र छत्र एक । तयास रत्नें मोतीं अनेक । जोडोनि शोभित करावें ॥ १६ ॥ आणखी वस्त्रें अलंकार । तेविं उदंड पुष्पांचे हार । यांहीं सकळ राजमंदिर । परिपूरित करावें ॥ १७ ॥ नाना आश्रमींचे मुनिवर । उदयीक आणवावेत सत्वर । जयांचें व्रतचि धर्माचार । दर्भ भूषण करींचें ॥ १८ ॥ नाना गायकांचें गायन । तैसें नर्तकींचेंही नर्तन । आणखी महावाद्यांचें वादन । थोर गजरें झडावें ॥ १९ ॥ ऐसी सिद्धता एकमेळीं । राजांगणांत प्रातःकाळीं । तैशीच सर्व सैनिकमंडळी । अश्वकुंजरांसमेत ॥ २० ॥ नगरांतील देवस्थानें । जीं जीं थोर अथवा सानें । त्यांचीं सर्वोपचारपूजनें । उदयीक होणें अवश्य ॥ २१ ॥ देशोदेशींचे नृपवर । तेहि पाचारी सत्वर । घेऊन नाना प्रेमोपहार । राज्याभिषेकाकारणें ॥ २२ ॥ ऐसें प्रधानास निवेदूनी । श्रीमान वसिष्ठ महामुनी । श्रीरामाच्या निवासस्थानीं । गेले त्वरित रथानें ॥ २३ ॥ मग

# अंतरीं प्रवेशतां । मुनींस देखोन अवचिता । रामें धावूनि ठेविला माथा । पादपद्मीं त्वरेनें

॥ २४ ॥ सुवर्णासनीं बैसविलें । मग सीतेनें जल आणिलें । आणि पाद प्रक्षाळिले । अत्यादरें करून ॥ २५॥ मग तें नीर उभयतांहीं । मस्तकीं घेतलें लवलाही । मग बोलती ऐसियांहीं । धन्य झालों मुनींद्रा ॥ २६ ॥ तंव कांहींसें करोनि स्मित । बोलले श्रीवसिष्ठ तात । रामा तुझें हें अवतारवृत्त । आधींच मातें ठाउकें ॥ २७ ॥ तुझिया पायींचे जलकण । मस्तकीं करोनियां धारण । शंकर ब्रह्मादि देव जाण । धन्य मानिती आपणां ॥ २८ ॥ ऐशिया तुझें हें वर्तन । लोकीं दाखवायालागून । पाहतां तूंचि शेषशयन । लक्ष्मीकांत श्रीविष्णु ॥ २९ ॥ देवांचें कार्य सिद्ध व्हावें । आणि भक्तिप्रेम वाढवावें । सर्वांचि रावणासी उद्ध- रावें । म्हणोनि येसी भूलोकीं ॥ ३० ॥ परी म्यां कार्यभाग जाणून । केलें न याचें उद्घा- टन । जैसा जैसा भाव वरून । दाविसी तैसा पाहतों ॥ ३१ ॥ पाहतां तूंचि गुरूंचा गुरु । आणि पितरांचाहि पितरु । परि मज करिसी नमस्कारु । लोकसंग्रहाकारणें ॥ ३२ ॥ तूंचि या जगताचा स्वामी । राहसी सर्वांच्या अंतर्यामीं । जगद्यापार मायाश्रमीं । तूंचि दावि- सी स्वरूपीं ॥ ३३ ॥ तूं आपुलिया इच्छेनुसार । घेऊन शुद्ध सत्वाचें शरीर । दाविसी लौकिक व्यवहार । योगमायाबळानें ॥ ३४ ॥ होऊन कोणाचा पुरोहित । करावें धारण जें जीवित । तें केवळ दोषभरित । ऐसें बा मी जाणतों ॥ ३५ ॥ परी इक्ष्वाकूच्या कुळांत । परमात्मा उद्धवणार निश्चित । ऐसें एकदां त्रिलोकतात । विधि मजला बोलले ॥ ३६ ॥ तयीं तुझिया संगतींत । राहूनि व्हावें परमपूत । ऐसें भावूनि पुरोहित । मी या रायाचा

जाहलों ॥ ३७ ॥ आजि तो माझा मनोरथ । फळासि आला हो निश्चित । श्रीरामरूपें त्रिजगन्नाथ । हा मी नयनीं पाहिला ॥ ३८ ॥ देवा, आतां हेंचि करीं । कीं माझा माया-मोह हरी । ये विषयीं तूं रावणारी । समर्थ होसि एकला ॥ ३९ ॥ मजसि म्हणितलें तुवां गुरु । म्हणोनि मागतों हा उपहारु । ऐसाचि एक देऊनि वरु । गुरुसंतोष करावा ॥ ४० ॥ असो, आतां हे सीतापते । उद्यीक अभिषेकिती तूंतें । म्हणोनि आमंत्रण द्यावयातें । रायें मजला धाडिलें ॥ ४१ ॥ म्हणोनि तुम्हीं उभयतांहींही । उपवास व्रत करावें पाहीं । शय्येस असावी मात्र मही । आणि व्रतस्थ राहिजे ॥ ४२ ॥ ऐसिया रीती निवेदूनी । जाते झाले वसिष्ठ मुनी । मग लक्ष्मणास अवलोकूनी । श्रीराम ऐसें बोलिला ॥ ४३ ॥ लक्ष्मणा, ऐक बा उद्यीक । मजसि आहे राज्याभिषेक । अरे! राजा आणि सेवक । शब्द कैंचे? निरर्थक ॥ ४४ ॥ बा हे पूर्वार्जित भोग । जीवाचा काढीत येती माग । त्यांचा धरून लोभराग । लाभ कैंचा घडावा ॥ ४५ ॥ मुख्य एकलाचि ईश्वर । व्यापून राहे सर्वांतर । आणि चालवी व्यवहार । त्याचा तोचि स्वभावें ॥ ४६ ॥ इया विचारें पाहूं जातां । मी तूं आहोंत निमित्ता । कर्तृत्व कैंचें आपुले हाता । भोक्तृत्व तेंही कोठलें ॥ ४७ ॥ म्हणोनि अहंभाव वायां । कोणी एक जी आहे माया । राहून ईश्वराच्या आश्रया । जगत्कंदुक चालवी ॥ ४८ ॥ यालागीं आतां राज्यावरी । वत्सा, बैसलों मीही जरी । तरी तूं प्राणचि अवधारीं । सदैव माझा निश्चयें ॥ ४९ ॥ ऐसें श्रीराम बोले वचन ।

तंव श्रीवसिष्ठ तपोधन । जाऊन वृत्त तें निवेदन । करिते झाले नृपातें ॥ ५० ॥ इतुकिया-माजी कोणीएकें । वर्तमान हें घेऊन निकें । कौसल्यासुमित्रांलागीं कौतुकें । परम आदरें निवेदिलें ॥ ५१ ॥ तंव लोटूनि आनंदभर । दोघींहीं दिधले गळींचे हार । कौसल्या ही निघाली सत्वर । दुर्गापूजेच्या कारणें ॥ ५२ ॥ राया दशरथ सत्यभाषी । राज्यीं बैसवील श्रीरामासी । परी कैकेयी-प्रेमपाशीं । चळेल काय कळेना ॥ ५३ ॥ ऐसा संशय उद्भवून । चिंतामग्न जाहलें मन । म्हणोनि दुर्गेचें पूजन । प्रेमें करीत बैसली ॥ ५४ ॥ इकडे स्वर्गीय देवजन । जाहले राक्षसभयें दीन । केव्हां होईल रावणहनन । ऐशा चिंतेकारणें ॥ ५५ ॥ मग सर्वांहीं जमून । व्हावया चिंतेचें निरसन । वाग्देवीस आदरेंकरोन । ऐशा रीती बोधिलें ॥ ५६ ॥ देवी, जावोनि मर्त्यलोकीं । विघ्न करावें रामाभिषेकीं । तुजवांचोनि ऐसें आणिकीं । कार्य सर्वथा घडेना ॥ ५७ ॥ मंथरेच्चिया जिव्हेवरी । मग कैकेयीच्या अंतरीं । प्रवेशून देवी ऐसें करी । रामें काननीं निघावें ॥ ५८ ॥ मग सर्वांचें मनोगत । पाहोनी वाग्देवीहि त्वरित । मंथरा दासीच्चिया मुखांत । प्रविष्ट होवोनि राहिली ॥ ५९ ॥ मग ती मंथरा निजमंदिरीं । चढोनि पाहती झाली पुरी । तंव ती आनंदाच्या भरीं । दाटून गेली अयोध्या ॥ ६० ॥ नाना पताका तोरणें भलीं । जागोजागीं उभारिलीं । प्रजा ती सारीच आनंदली । आंत बाहेरी सर्वथा ॥ ६१ ॥ पाहून एरी जाहली विस्मित । मग मातेस आपुल्या पुसत । माते, नगर हें सुशोभित । केलें आजि कासया ॥ ६२ ॥ कौसल्या पहा

ही आनंदली । आणि घेऊन वस्त्रावली । दान देतां रंगोनि गेली । काय कारण तयाचें ॥ ६३ ॥ तंव ती बोलली गे उदयीक । श्रीराघवाचा राज्याभिषेक । म्हणोनि नगर हें सकळिक । नाना परींहीं भूषविलें ॥ ६४ ॥ मग तें वृत्त होतां श्रुत । मंथरा दासी धावली त्वरित । आणि कैकेयीमंदिरा आंत । शिरून तीतें बोलते ॥ ६५ ॥ वेडे, कायसी तूं निजेली । तुजसि अनिष्ट वेळ आली । आपुल्या सुरूपतेची भुली । तुजला पडिली वाटतें ॥ ६६ ॥ तुज वाटे कीं रायाचें मन । मजवरीच गेलें जडून । परी तयानें कौसल्यानंदन । राज्याभिषेकीं योजिला ॥ ६७ ॥ ऐसें मंथरा जों बोलत । तंव एरी जाहली उत्थित । मग करींचें काढून देत । सुवर्णकंकण तियेतें ॥ ६८ ॥ आणि म्हणे हे बोल कायसे । आनंदामाजी अनिष्ट कैसें । रामींच माझेंहि प्रेम असे । भरताहूनि विशेषें ॥ ६९ ॥ मजसि आणि कौसल्येवरी । एकचि भाव तयाचे अंतरीं । सारिसीच आमुची सेवा करी । प्रिय वत्स हा श्रीराम ॥ ७० ॥ ऐसा माझा सखा राघव । येथ केउतें अनिष्ट नांव । तुझाचि मूढे मनोभाव । भ्रष्टला आहे एधवां ॥ ७१ ॥ तंव मंथरेनें केलें भाषण । बाई, नीट करी हें श्रवण । तुज हा घातक होय जाण । रामाभिषेक निश्चयें ॥ ७२ ॥ राजयाची ही प्रेमदृष्टि । तुजवरिची जाणिजे खोटी । कामसुखाच्या वांचूनि पोटीं । भाव नाहींच तयाच्या ॥ ७३ ॥ वरून तुजसि दाखवी प्रेम । अंतरीं कौसल्या आणि राम । ऐसा तयाचा दुष्ट क्रम । तुजला बाई कळेना ॥ ७४ ॥ याच कारणें गे तुझा सुत । येणें धाडिला दूर बहुत ।

रामाभिषेकाचे कार्यांत । विघ्न कांहीं न यावें ॥ ७५ ॥ श्रीरामाच्याच एकविचारें । सुमित्रेचा तनय वावरे । तेणें तियेचें आहेचि बरें । चिंता नलगे कराया ॥ ७६ ॥ परी शत्रुघ्न आणीक भरत । राहती नेणों कैशा स्थितींत । मग तयांसि अयोध्ये आंत । कैचे आणिती कळेना ॥ ७७ ॥ तूं तरी अंगें होऊन दासी । राहसील कौसल्या-सेवेसी । मग ती देहयात्रा कायसी । मरणाहूनि मरण हें ॥ ७८ ॥ म्हणोनि ऊठ यत्न करी । भरतेंचि यावें राज्यावरी । आणि रामें ही अयोध्यापुरी । सोडूनि जावें वनातें ॥ ७९ ॥ तरीच निर्भयपणें देख । भरतास होईल राज्याभिषेक । ऐसियास म्यां उपाय एक । शोधिला आहे पहा वो ॥ ८० ॥ पूर्वी देव आणि असुर । यांचियामाजी चालतां समर । इंद्रें सहायालागीं नृपवर । सैन्यासमवेत प्रार्थिला ॥ ८१ ॥ तेथ युद्ध चालतां तुमुल । गळाला रथचक्राचा कील । तयीं त्वां धीर करोनि अतुल । हस्त तेथें धरियेला ॥ ८२ ॥ नृपवराच्या विजयास्तव । तुवां गोविला आपुला जीव । ऐसें पाहोनि मग नृपराव । अत्यंत संतुष्ट जाहला ॥ ८३ ॥ मागुती युद्धाचें समापन । होतां तुजसि आलिंगून । राय बोलला, गे वरदान । मागोन घेईं गोरटे ॥ ८४ ॥ तयीं तुवां ते दोन वर । मागोन ठेविले नृपावर । होईल जेव्हां मज अवसर । तेव्हां मागेन म्हणोनी ॥ ८५ ॥ तुवांचि ऐसें हें वर्तमान । मजसि पूर्वी केलें कथन । तेंचि एधवां आठवून । तुझिया श्रवणीं घातलें ॥ ८६ ॥ तरी तूं आतां आपुलें चित्त । वरद्वयींच लावून खचित । पडून राहीं गे दुश्चित । मिष क्रोधाचें दावुनी

॥ ८७ ॥ इकडे तिकडे मंदिराआंत । अंगभूषणें पडूं देत । वेणीहि करूनि विस्कळित । रोष धरोनि बैसिजे ॥ ८८ ॥ रामास काननीं पाठवून । भरतास देईन सिंहासन । ऐसे वचनीं रायासि गोवून । मगचि संतोष दाखवी ॥ ८९ ॥ ऐसा तियेनें बोध केला । तो एरीचे अंतरीं भरला । अहाहा! हाचि विचार भला । ऐसेंचि म्हणूं लागली ॥ ९० ॥ मग ती बोलली मंथरेसी । एवढी बुद्धि तुज कायसी । म्यां न ओळखिलीच तुजसी । ऐसी चतुर म्हणोनी ॥ ९१ ॥ आतां राज्यीं बैसेल भरत । तुझे हे उपकार होती बहुत । आंदण देईन गांवें शत । मंथरे जाण तुजला ॥ ९२ ॥ ऐसी तिजसी करून गोष्ट । झणीं जाहली क्रोधाविष्ट । कलीनें चित्त केलें भ्रष्ट । सुविचार सर्व पळाले ॥ ९३ ॥ अंगींचे काढून अलंकार । फेकून भरिलें सर्व मंदिर । क्षुद्र वस्त्र एक अंगावर । घेवोनि लोळूं लागली ॥ ९४ ॥ मग मंथरेशीं करी भाषण । रामास वनांत धाडीन जाण । नातरी मीचि सांडीन प्राण । तरीच आतां उठेन ॥ ९५ ॥ तंव ' निश्चय पाहिजे थोर । तरीच पडेल हितावर ' । ऐसी आणीक देऊनि भर । मंथरा गेली घराला ॥ ९६ ॥ ऐसा दुष्टांचा सहवास । न करील कोणाचा हो नास । असो धीर कीं विचारी बहुवस । अवश्य पाडील भूवरी ॥ ९७ ॥ पाहतां नीतिन्यायप्रवण । सेवितो सद्गुरूचे चरण । परी तो बुडाला ऐसेंच जाण । दुष्टसंगासी लागतां ॥ ९८ ॥ ऐसी दुष्ट रिपूंची संगती । करिते आनंदाची माती । म्हणून तियेचा आपणाप्रती । संपर्क लागूं न द्या हो ॥ ९९ ॥ ऐसी

अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०० ॥ श्रीराम ॥ ११ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

## अध्याय १२ वा, अभिषेकविघ्न.

श्रीराम ॥ इकडे अभिषेकाचा उत्सव । मंत्र्यास सांगून स्वयमेव । परमानंदें तो नृपराव । शयनागारीं प्रवेशला ॥ १ ॥ तंव तेथ ती नाहीं सुंदरी । पाहूनि दचकला अंतरीं। म्हणे ही माझी मंचकावरी । सुंदरी कां वो दिसेना ॥ २ ॥ मी आंत प्रवेशतांच सत्वर । हास्य करोनि अति मधुर । सलज्ज येवोन माझ्या समोर । आलिंगन जी देतसे ॥ ३ ॥ ऐसी माझी ती आनंदखनी । आजि कां वो न दिसे नयनीं । मग बहुताचि खिन्न होउनी । दासीलागीं विचारी ॥ ४ ॥ तंव दासीनें दिधलें उत्तर । जी आजि देवी सर्वांवर । क्रोधावलीसे अनिवार । हेतु कांहींच कळेना ॥ ५ ॥ आम्हीं पुसितांहि नानापरी । कळलें नाहींच कीं तिळभरी । देवेंचि प्रवेशुनिया अंतरीं । स्वयेंचि शोध करावा ॥ ६ ॥ ऐसें ऐकतां तो नृपनाथ । पुढती जाहला भीत भीत । मग अंगीं ठेवूनि हात । सौम्य शब्दांहीं बोलला ॥ ७ ॥ सखये ! सांडोनि मंचकाप्रती । भूशय्याच कां आणिली चित्तीं। काय कारण ऐसिया रीती । क्रोध पावाया गोरटे ॥ ८ ॥ तूं न करिसीच संभाषण ।

तेणं मजासे जाहलें कठिण । प्रिये अंगीं एकहि भूषण । कां वो आजी दिसेना ॥ ९ ॥ ऐसें काय हें वस्त्र मलिन । अंगीं केलेंसें परिधान । काय जें वांछीत आहे मन । अवश्य सांगावें लाडके ॥ १० ॥ कवण गे तूझा पीडाकर । असो नारी कीं कोणी नर । तयास दंडीन मी सत्वर । संशय कैंचा ये विषयीं ॥ ११ ॥ बोल वो सखये चंद्रानने । काय वांछिलें आहे मनें । जें कां दुर्लभ कवणेंहि जनें । तेंहि पुरवीन निश्चयें ॥ १२ ॥ तुज ठाउकें माझें अंतर । तुझ्याचि स्वाधीन निरंतर । मग ऐसा रोषाचा विचार । कां वो केला लाडके ॥ १३ ॥ सांग, कोणास देऊं धन । कोण असेल जो आप्त जन; । अथवा कोणें दुखविलें मन । तयास लावूं भिकेला? ॥ १४ ॥ सांग शत्रूस तुझे वधीन । अथवा वधार्हास सोडवीन । बहुत काय, प्राणहि देईन । तुझिया इष्टाचे कारणें ॥ १५ ॥ देवा-ऐसा माझा तनय । श्रीराम प्राणाहून प्रिय । त्याचीच शपथ अन्यथा काय । अभीष्ट तुझें करीन ॥ १६ ॥ ऐसें नानापरी दशरथ । आर्जवोनि बोलतां शपथ । कैकेयी आपुले नेत्र पुसत । बोलूं लागली तयाशीं ॥ १७ ॥ म्हणे हो कार्य करीन म्हणतां । वरी रामाची शपथ घेतां । तरी माझिया या मनोगता । अवश्य पूर्ण करा जी ॥ १८ ॥ पूर्वीं देवांचें चाललें रण । तैं म्यांचि रक्षिले हे प्राण । तयींचें आपुलें ऐसें भाषण । मागोन घेई वर-द्वया ॥ १९ ॥ ते वेळीं जे दोन वर । मागून ठेविले आपणांवर । तेचि आतां मज सत्वर । देणें उचित तुम्हांतें ॥ २० ॥ तयांत एकें माझिया सुता । सिंहासनीं बैसवा भरता ।

द्वितीयें आपुल्या प्रिय सुता । वनीं धाडिजे श्रीरामा ॥ २१ ॥ तेणें जटावल्कलें लेवोनी । जाऊन राहावें हो काननीं । आणि कंदमूळादि सेवोनी । चौदा वर्षे क्रमावीं ॥ २२ ॥ मागुती यावें या नगरांत । अथवा तेथचि व्हावें स्थित । उद्यांचि होतां सुप्रभात । रामास पाठवा वनांत ॥ २३ ॥ आणि ऐसें जरी कां न घडे । तरी ऐका हें वचन रोकडें । प्राणचि सांडीन तुम्हांपुढें । आतांच याची प्रचीती ॥ २४ ॥ ऐसें तियेचें अति भयंकर । वाक्य पडतांच कानावर । नृप तो तत्काळ भूमीवर । मूर्च्छा येऊन पडियेला ॥ २५ ॥ मग लोटतां थोडा काळ । सावध जाहला भूमिपाळ । मग म्हणे मी जाहलों व्याकुळ । स्वप्न पाहोनी काय कीं ॥ २६ ॥ तंवाचि व्याघ्रीऐसी समोर । कैकेयीस पाहतां नृपवर । म्हणे प्रिये हें केउतें कठोर । प्राणघातक बोलसी ॥ २७ ॥ रामें अपराध काय केला । कां गे मोकलिसी अरण्याला । तूंच माझिया श्रीराघवाला । वर्णित होतीस सदैव ॥ २८ ॥ कौसल्येसी आणि मजसी । प्रीति रामाची एकसारिसी । ऐसें सदैव बोलतां तुजसी । कोप आजीच किमर्थ ॥ २९ ॥ राज्य सुखेंचि घे भरतासी । परी श्रीराम असूंदे मजपाशीं । तुज तयाची भीति कायसी । बाळ माझें गे निर्मळ ॥ ३० ॥ एवढें एकचि कृपादान । देईं, देईं वो मजलागून । ऐसें बोलून नृप तो लीन । जाहला पायीं तियेच्या ॥ ३१ ॥ तंव त्या कैकयीचें मन । अधिकाचि झालें क्षोभायमान । लाल तेजाळ करूनि नयन । रायास बोलूं लागली ॥ ३२ ॥ म्हणे तूं भ्रमिष्टचि काय राया । आपुला शब्द

करिसी बाया। तरी तूं सर्वेचि नरकीं जाया। सिद्ध झालासी निश्चयें ॥ ३३ ॥ परी उदयीक होतां प्रभात। वल्कलादिक नेसूनि त्वरित। श्रीराम वनास न निघत। तरी प्रतिज्ञा जाण ही ॥ ३४ ॥ मी घेईन कीं गळफास। किंवा विषचि भक्षीन खास। तुझिये कीर्तीचा करीन नास। देहासमवेत माझिया ॥ ३५ ॥ सत्य-प्रतिज्ञ आहे नृप। ऐसें जनांत दाविसी रूप। येणें दंभाचें भरून माप। उदंड पुण्य जोडिसी ॥ ३६ ॥ तुवां रामाची शपथ घेतली। तीहि सर्वथा मिथ्या केली। म्हणोनि नरकासि आहे ठेविली। गति ही तुजासि निश्चयें ॥ ३७ ॥ ऐसे ऐकतांच वचनशर। आणीक येवोन दुःखभर। नृप तो तत्काळ भूमीवर। मूर्च्छित होऊन पडियेला ॥ ३८ ॥ मग ऐसिया दुःखभरें। वर्षाऐसी रात्र सरे। अरुणोदयासी मधुर स्वरें। बंदी गाऊं लागले ॥ ३९ ॥ तंव स्वयेंचि उठोनि जाण। तयांतें करूनि निवारण। कैकयी मागुती आपुलें ठाण। धरून रोषाचें बैसली ॥ ४० ॥ पुढें जाहली सुप्रभात। तोंचि सभा-मंडपा आंत। ब्राह्मण क्षत्रिय वैश्य समस्त। कन्यका, ऋषिहि मिळाले ॥ ४१ ॥ हत्ती घोडे सकळ सैनिक। अयोध्येंतील सकळ लोक। तैसेंच छत्रचामरादिक। सर्व सिद्धता जाहली ॥ ४२ ॥ वसिष्ठें जैसें सांगितलें। तें तें सुमंत्रें सिद्ध केलें। गायन-वादनालागीं सज्जले। ते ते लोकही येउनी ॥ ४३ ॥ बाल वृद्ध पुरुष स्त्रिया। रात्रौ निद्रा नाहीं तयां। केव्हां पाहूं प्राणसखया। रामास डोळे भरुनी ॥ ४४ ॥ कासे जयाच्या पीतांबर। अंगीं नाना अलंकार। किरीट कुंडलें

मनोहर । वरी कौस्तुभ झळाळे ॥ ४५ ॥ श्यामल तनु सुकुमार । आणि जो मदनाहूनि सुंदर । अभिषेक होवोनि गजावर । बैसोन चालला तयातें ॥ ४६ ॥ मुखीं जयाच्या रम्य स्मित । शिरीं शोभतें छत्र बहुत । संगें प्रिय लक्ष्मणाची मूर्त । ऐशी शोभा उदंड ॥ ४७ ॥ केव्हां आमुच्या दृष्टी पडेल । आणि कैं होईल प्रभातकाल । ऐसिया उत्कंठेनें सकल । पुरजन तिष्ठत राहिले ॥ ४८ ॥ तंव अद्यापि राया दशरथ । कां न जाहलासे जागृत । ऐसा विचार येऊनि मनांत । सुमंत्र तेथें पातला ॥ ४९ ॥ 'जय' शब्दें लववूनि शिर । रायासि घातला नमस्कार । तंव भूवरी पडिला नृपवर । पाहूनि शंकित जाहला ॥ ५० ॥ मग कैकेयीलागीं पुसत । देवी असो जी तुझें हित । आजि व्याकुल नृपनाथ । भूवरी कां वो पडियेले ॥ ५१ ॥ तंव एरी म्हणे, बा जागरण । रायासि जाहलें आहे जाण । राम राम ऐसेंच स्मरण । लागून गेलें तयातें ॥ ५२ ॥ म्हणोनि जाहला हा व्याकुळ । तरी तूं आणवी तयाचा बाळ । दर्शनाचीच आस प्रबळ । आहे लागली तयाला ॥ ५३ ॥ तंव सुमंत्र म्हणे जी देव । कांहीं न बोलती स्वयमेव । म्हणोनि अंतरींचा भाव । स्पष्ट कांहींच कळेना ॥ ५४ ॥ ऐसें ऐकतां तयाचें वचन । राय बोलला हां जी प्रधान । मज श्रीराघवाचें दर्शन । अवश्य घडवी ये वेळीं ॥ ५५ ॥ तंव धांवोनि अत्यंत सत्वरीं । सुमंत्र पावला राममंदिरीं । मग प्रवेशूनि भीतरीं । कथन करीत तयातें ॥ ५६ ॥ म्हणे राघवा करीं गा त्वरा । आतांच चलावें राजमंदिरा । तुज भेटावयास नृपवरा । उत्कंठा

फार जाहली ॥ ५७ ॥ ऐसे शब्द ते जों बोलला । तोंचि रथांत आरूढला । आणि रायाच्या संनिध आला । घेऊन वेगें तयाला ॥ ५८ ॥ मग पितयाचे पुढती होऊन । रामें पायीं केलें नमन । तंव द्यावया आलिंगन । तांतडी केली नृपानें ॥ ५९ ॥ उठोनि बाहु उभारिले । रामा ऐसें उच्चारिलें । सर्वांचि दुःखावेगें दिधलें । आंग टाकून भूवरी ॥ ६० ॥ तैं हा हा करोनि रघुनाथें । वेगें सांवरिलें पितयातें । आणि धरून आपुल्या हातें । बैसवियेलें जेधवां ॥ ६१ ॥ तयीं तो मूर्छित पाहोनि राया । आक्रोशूं लागल्या सर्व स्त्रिया । रोदन ऐकून ऐसिये समया । वसिष्ठ अंतरीं धावले ॥ ६२ ॥ तयीं रामें म्हणितलें माते । या परमपूज्य पितयातें । अंतरीं महादुःख झोंबतें । काय कारण तयाचें ॥ ६३ ॥ तंव एरीनें केलें भाषण । बा रे तूंचि आहेस कारण । दुःख व्हावया निवारण । उपाय आहे तुजपाशीं ॥ ६४ ॥ राजयाचें कार्य कांहीं । तुवांचि करणें आहे पाहीं । तयींच सत्य प्रतिज्ञा राही । आजिचे वेळीं नृपाची ॥ ६५ ॥ नृपें मज दिधलें वरदान । परी तें आहे तुज-आधीन । म्हणोन सांगाया तुजलागून । धीर नाहीं नृपातें ॥ ६६ ॥ ऐसा पिता गुंतला वचनीं । सिद्ध तूं होईं त्याचे मोचनीं । पितयास उद्धरी नरकांतूनी । तोचि पुत्र म्हणावा ॥ ६७ ॥ तंव जैसा बाणें विंधिला । तैसा राम अंतरीं खोंचला । मग बोलिला अंबिकेला । देवी कायसे बोल हे ॥ ६८ ॥ पितयासाठीं सांडीन प्राण । विषहि सेवन करीन जाण । मज कायसें यांचें कारण । राज्य कौसल्या जानकी ॥ ६९ ॥ जो न सांगतां कार्य करी । तो उत्तम पुत्र

अवधारीं । करितो सांगितलियावरी । तो मध्यम पुत्र कीं * ॥ ७० ॥ आणि आज्ञा झालियाही । जो न मानी कार्य कांहीं । तो मळाचि जैसा कांहीं । पोटीं आला म्हणावा * ॥ ७१ ॥ म्हणोन जैसें पित्याचें मन । तैसें अवश्य मी करीन । निश्चयेंचि हा रघुनंदन । द्विधा होऊं शकेना ॥ ७२ ॥ ऐसी प्रतिज्ञा होतां श्रवण । कैकेयीनें केलें भाषण । एकें वरें भरतासि जाण । राज्याभिषेक करावा ॥ ७३ ॥ दुसऱ्या वरदानें करून । तुवां स्वीकारावें वन । जटावल्कलादिक सेवून । हीच आज्ञा नृपाची ॥ ७४ ॥ कंदमूलफलादि सेवित । चौदा वर्षं राहावें वनांत । हेंचि करणें तुज उचित । पितृ-आज्ञेनें एधवां ॥ ७५ ॥ स्वयेंचि तुजसी आज्ञापितां । धीर नाहीं नृपाचे चित्ता । इतुकें बोलोन भरतमाता । स्वस्थ राहिली क्षणमात्र ॥ ७६ ॥ तोंचि रामें केलें उत्तर । भरत बैसवा सिंहासनावर । हा मी काननीं चाललों सत्वर । नाहीं विलंब क्षणाचा ॥ ७७ ॥ परंतु देवें आम्हांसवें । कांहींच आजि न बोलावें । काय कारणें ? ऐसें जीवें । लागून राहे ये वेळीं ॥ ७८ ॥ तंव रायें नेत्र उघडून । पाहिलें श्रीरामाचें वदन । मग दुःखें हृदय भरून । उत्तर दिधलें राघवा ॥ ७९ ॥ बाळा मी निंद्य आतिशयित । स्त्रियेच्या पाशें जाहलों जित । चित्त माझें आहे भ्रमत । सन्मार्ग कांहीं कळेना ॥ ८० ॥ ऐसिया मज काय पुससी । सांडूनि माझिया शब्दासी । राज्यीं बैसवी आपणासी । अन्याय नाहीं तयानें ॥ ८१ ॥ येणें मजसीहि असत्याचा । दोष स्पर्शूं न शके साचा । ऐसी नृप तो बोलून वाचा । दुःखें व्याकुळ जा-

हला ॥ ८२ ॥ हा हा माझ्या श्रीरघुनाथा । बाळा प्राणप्रिया सुता । मजसि सांडून येथ आतां । कैसा जासी वनातें ॥ ८३ ॥ ऐसें बोलोन घाली मिठी । मग रामास धरून पोटीं । रायें उदंड मुक्तकंठीं । रोदन केलें तेधवां ॥ ८४ ॥ रामें पितयाचे नेत्र पुसिले । आणि आदरें आश्वासिलें । नीतिनैपुण्यहि आपुलें । दार्शित केलें सर्वेचि ॥ ८५ ॥ म्हणितलें, देवा दुःख केउतें । राजकारण पाहावें भरतें । मी हा जावोन अरण्यातें । आतांचि येईन पहा कीं ॥ ८६ ॥ मजसि राज्याचे कोटिगुण । वनांत सौख्य होईल जाण । सत्य ठरेल आपुलें भाषण । देवकार्य घडेल ॥ ८७ ॥ देवी कैकेयीचें मन । सहजीं पावेल समाधान । म्हणोनि करितां अरण्यगमन । ताता, चिंता त्यजावी ॥ ८८ ॥ देवी कौसल्या आणखी सीता । यांतें भेटूनि येतों आतां । मग पायीं ठेवून माथा । निरोप घेईन आपुला ॥ ८९ ॥ ऐसें नृपातें करून वचन । ध्यावया मातेचें दर्शन । रामें तेथून केलें गमन । आणि मंदिरीं पोंचला ॥ ९० ॥ कौसल्येनें होमहवन । आणखी करून द्रव्यदान । चालविलेंसें विष्णुपूजन । रामचंद्राच्या कारणें ॥ ९१ ॥ अंतर्यामी आत्मभूत । चित्प्रकाशें परिपूरित । जेथ जगदाकार निरसत । त्याचिया ध्यानीं रंगली ॥ ९२ ॥ श्रीमान् विष्णु आनंदमय । ध्यातां वृत्ति जाहली तन्मय । तेणें संनिध ठेला तनय । भान नाहीं तयाचें * ॥ ९३ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ९४ ॥ श्रीराम ॥ १२ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय १३ वा, अरण्यानिर्गम.

श्रीराम ॥ कौसल्या ध्यानामाजी स्थित । आणि श्रीराम संनिध तिष्ठत । ऐसा प्रसंग तो अकस्मात । सुमित्रेनें पाहिला ॥ १ ॥ मग बहुत तांतडी करून । तियेस करोनि सावधान । श्रीरामचंद्राचें आगमन । निवेदन केलें सतीनें ॥ २ ॥ तंव तें ऐकतां रामनाम । ध्यानाचा जाहला विराम । मग नेत्र उघडोनि श्रीराम । पाहतां पोटीं घेतला ॥ ३ ॥ न्याहाळून सुरम्य वदन । पुनः दिधलें आलिंगन । मग म्हणे बाळ करीं भोजन । क्षुधा लागली नसे कां ॥ ४ ॥ तंव रावघें केलें उत्तर । माते, अवसर नाहीं फार । वनीं जावयालागीं सत्वर । आज्ञा जाहली नृपाची ॥ ५ ॥ कैकेयीच्या संतोषास्तव । भरतास देवोन राज्यवैभव । मजसीं अरण्यगमनीं राव । आतांचि सांगता जाहला ॥ ६ ॥ तंव मुनींचें व्रत धरून । चौदा वर्षे सुखें क्रमून । मागुती येईन वेगेंकरोन । आज्ञा द्यावी अंबिके ॥ ७ ॥ ऐसें ऐकतांच वचन । अत्यंत उद्विग्न झालें मन । आणि दुःखें कळवळून । कौसल्या बोले तेधवां ॥ ८ ॥ बाळा, मग तूं आपुल्यासवें । मजासि अवश्य वनीं न्यावें । नातरी माझे प्राण वांचावे । तुजवीण कैसे पुरीं या ॥ ९ ॥ देव प्रसन्न जाहले तरी । भरतास बैसवोत राज्यावरी । परी बाळा, तुजसि वनांतरीं । काय कारणें धाडिती ॥ १० ॥ कैकेयीवरती तोषोन बहुत । देव सर्वस्वही देवोत । परी माझिया बाळा वनांत । कोण्या निमित्तें मोक-

लिती ॥ ११ ॥ आणि गा जैसा पूज्य पिता । तैशीच नोहे काय माता । म्हणोनि वनीं जावया आतां । नाहींच माझी अनुज्ञा ॥ १२ ॥ आणि माझें लंघूनि वचन । जरी करिशील अरण्यगमन । तरी मी आपुले प्राण सांडून । जाईन निश्चयें श्रीरामा ॥ १३ ॥ ऐसें बोलतां, तें रामगमन । लक्ष्मणासही न होतां सहन । तेणें पुढती सरसावून । वचन केलें श्रीरामा ॥ १४ ॥ म्हणे रामचंद्रा ऐसें किमर्थ । कां जी धरावा अरण्यपंथ । भ्रमला आहे हा नृपनाथ । यातें बंदींत घालितों ! ॥ १५ ॥ यास कळेना नीतिन्याय । स्त्रियेपुढें जो निर्वीर्य होय । वेड लागलियाचें काय । वचन मानावें आपणें ? ॥ १६ ॥ अभिषेकास तूं होईं सिद्ध । मी भरतास करितों बद्ध । त्याचे मातुल येतांहि, युद्ध । करून भूमीस पाडितों ॥ १७ ॥ पहा तूं माझें कैसें तेज । सकळिकांस आवरीन सहज । कोण आडवा येईल मज । तेंचि आतां पाहतों ॥ १८ ॥ ऐसें लक्ष्मणाचें क्रोधवचन । ऐकतां तोषला रघुनंदन । मग तयास आलिंगून । उत्तर देत यापरी ॥ १९ ॥ सखया वीरा लक्ष्मणा । तुझिया शौर्यास कैंची तुळणा । विजयीच होशील समरंगणा । हें मी निश्चयें जाणतों ॥ २० ॥ परी शौर्यदर्शन कराया । हें उचित स्थळ काय राया । राज्यादि भोग हे जाणार वायां । काय शाश्वत जगीं या ॥ २१ ॥ दिसतीं जीं हीं आपुलीं शरीरें । हें सर्वही जैं असावें खरें । तरीच तुझे हे आयास बा रे । सफळ ऐसे म्हणावे ॥ २२ ॥ परी विजेची जैसी चमक । भासमान होते क्षणैक । तैसेंचि बापा हें सकळिक । नावेक आहे भासत *

॥ २३ ॥ जैसा तापला लोहगोळ । मग त्यावरी टाकिजे जळ । तैसेंचि आयुष्याचेंहि बळ । क्षणापरतें टिकेना ॥ २४ ॥ सर्पे जैसा आकंठ गिळिला- । बेडूक नेणोन आपणाला । कीटक जे जे लागती मुखाला । ते ते सेवूनि डोलतो ॥ २५ ॥ तैसेचि येथील सारे जन । काळमुखीं गेलेत गुंतोन । परी विषयसुखालागून । उड्या घालिती तांतडी * ॥ २६ ॥ घेऊनि नाना परी आयास । उद्योग करिती रात्रंदिवस । सुख लागावें निजदेहास । हाचि हेतु धरोनी ॥ २७ ॥ परी देहभोग संपादून । जीवास कैचें समाधान । जीव तो वेगळाच देहाहून । भोग भोगूं शकेना ॥ २८ ॥ ज्यापरी मार्गामाजी लोक । विसाव्यासाठीं होती एक । अथवा काष्ठें जैसीं अनेक । एकत्र होतीं प्रवाहीं ॥ २९ ॥ तैसे मातापिता गणगोत । स्त्रीपुत्रादि आप्त बहुत । सर्वांचीही बापा संगत । क्षणैक आहे नेमिली ॥ ३० ॥ जैशी जळीं लहरी उठत । तैसेंच तारुण्य क्षणैक भासत । लक्ष्मी सर्वांस आहे प्रतीत । छायेचिऐसी चंचल ॥ ३१ ॥ स्वप्नाचिऐसें स्त्रीचें सुख । ऐसें सारेंचि क्षणिक देख । म्हणोनि कैचें करावें कौतुक । अभिमान कैंचा धरावा ॥ ३२ ॥ नाना दुःखांहीं परिपूर्ण । तो हा संसार स्वप्न जाण । परी नेणोन ऐसी खूण । मूढ तेथेंचि रंगती ॥ ३३ ॥ नित्य सूर्यास होतां उदय । चालला आयुष्याचा क्षय । क्षणांत उभाचि पडतो काय । परी कोणाही कळेना * ॥ ३४ ॥ गेला तोचि येतो दिवस । ते तेचि विषयभोग नीरस । परी या मतिमंद जनांस । वेग काळाचा नेणवे ॥ ३५ ॥ अपक्क मृत्तिकाघटांतून । जेविं

पाणी जाय झिरपून । तैसेंचि क्षणक्षण करून । आयुष्य वायां चाललें * ॥ ३६॥ नाना तऱ्हेचे रोग दुर्धर । शरीरास करिती बेजार । जैसे डाईज वारंवार । संधि पाहोन झोडिती ॥ ३७ ॥ व्याघ्रीऐसी दुष्ट जरा । गांजीत राहे सकळ नरां । मृत्यु बैसलाच आहे शिरां । समयीं पाडाया भूवरी ॥ ३८॥ देहावरती अहंभाव । ठेवोन म्हणती हा मी राव । उदंड माझें राज्यवैभव । सर्व-लोक-प्रसिद्ध ॥ ३९ ॥ परी पाहतां तेंचि शरीर । मृत्तिकेचाचि गोळा थोर । परी नेणोन तत्त्वविचार । त्यातेंचि आत्मा मानिती ॥ ४० ॥ परी देहास नाना विकार । आणि परिणाम वारंवार । मग तोचि आत्मा साचार । ऐसें केविं म्हणावें ॥ ४१ ॥ मग ऐसिया देहाचा आश्रय । घेऊन लोकीं दाविजे भय । हें आपणांस उचित काय । सांग लक्ष्मणा विचारें ॥ ४२ ॥ हाचि देहाचा अभिमान । सकळ नाशाचें मुख्य स्थान । यातेंचि **अविद्या** नामाभिधान । तत्वज्ञांहीं ठेविलें ॥ ४३ ॥ मी चिद्रूप आत्मा सर्वाधिगत । देहादि कोणी नव्हेचि निश्चित । ऐसें जें कां प्रत्ययास येत । **विद्या** नांव तयातें * ॥ ४४ ॥ अविद्या वाढवी संसारास । विद्या तयाचा करी निरास । म्हणोनि नाना प्रयत्नीं विद्येस । जोडून घ्यावी जनांहीं ॥ ४५ ॥ परी विद्येच्या अभ्यासांत । काम-क्रोधादि विघ्नें बहुत । त्यांतहि क्रोधचि हा बळवंत । यत्न वायां कराया ॥ ४६ ॥ अहो ! या क्रोधें व्यापिला नर । सांडूनि साराचि नीति-विचार । माता-पितयांलागींहि ठार प्रवृत्त होतो कराया ॥ ४७ ॥ क्रोधापासून तापे मन । क्रोधचि संसाराचें बंधन ।

क्रोधेंचि सत्कर्मांचें निरसन । म्हणोनि क्रोध त्यजावा * ॥ ४८ ॥ क्रोध हाचि हो महा वैरी । नाना पातकें घडवी करीं । तृष्णाचि वैतरणी नदी खरी । वाहूनि नेते जनांतें ॥ ४९ ॥ संतोष हेंचि नंदनवन । शांति कामधेनु पावन । तियेचें करितां नित्य सेवन । शत्रु कोणी घडेना ॥ ५० ॥ देह बुद्धि मन आणि प्राण । ऐशा सर्वांहिपासून जाण । वेगळेचि आहोंत कीं आपण । शुद्ध स्वयंप्रकाश * ॥ ५१ ॥ तैसेच पाहतां निराकार । म्हणून स्पर्शेना विकार । ऐसें आत्मस्वरूप साचार । जाणतां विश्राम पाविजे ॥ ५२ ॥ परी या देहादिकांपासुनी । आपुलें भिन्नत्व न ये कळोनी । तोंवरी संसार-दुःखांतूनी । सुटका नाहीं जनांतें ॥ ५३ ॥ यालागां सखया लक्ष्मणा । आपुला देहाशीं वेगळेपणा । निश्चयें जाणून, जन्ममरणा । जिंकून ध्यावें अवश्य ॥ ५४ ॥ मग देह मन बुद्ध्यादि-कांहीं । आचरावें जें सकळ कांहीं । राहून प्रारब्ध-कर्म-प्रवाहीं । प्राप्त तें तें सेवावें * ॥ ५५ ॥ व्यवहाराच्या ओघानुसार । ते ते चालवितां व्यापार । आपुलिया अंगीं कर्म-भार । लागूं न शके सर्वथा * ॥ ५६ ॥ अंतरीं राहून शुद्ध असंग । बाह्यतः नाना कर्में मग । आचारितांहि तयांचा लाग । आपणालागीं जडेना ॥ ५७ ॥ लक्ष्मणा ऐसा तत्त्व-विचार । तुवां अंतरीं ठेविलियावर । नाना दुःख-पूर्ण संसार । बाधूं न शके सर्वथा ॥ ५८ ॥ तुवांहि अंबे हेचि खूण । अंतरीं ठेवावी परिपूर्ण । वियोगदुःख तें होईल चूर्ण । ऐसें सामर्थ्य तयाचें ॥ ५९ ॥ जन हे आपुल्या कर्मानुसार । एकत्र होतात वारंवार ।

मागुती जातात दूरवर । पर्णें जैसीं प्रवाहीं ॥ ६० ॥ चौदाहि वर्षें क्षणाचिऐसीं । आतांच जातील निश्चयेसीं । म्हणोन दुःख सांडूनि मजसी । अनुज्ञा देईं सुखानें ॥ ६१ ॥ देवी, तुझें हें अनुमोदन । स्मृतींत येतांचि माझें मन । पावेल अत्यंत समाधान । कानना-माजी राहतां ॥ ६२ ॥ ऐसे परी बोलोन वचन । पायीं केलें साष्टांग नमन । तंव मातेनें तत्काल उठवून । पोटीं धरिलें आवडी ॥ ६३ ॥ मग म्हणे बाळा वनीं फिरतां । अथवा बैसतां, शयन करितां । स्वर्गलोकींच्या सकळ देवता । रक्षण तुझें करोत ॥ ६४ ॥ ऐसें बोलली आशीर्वचन । आणि बैसली तैसीच धरून । मग गहिंवरून आलिंगून । निरोप देती जाहली ॥ ६५ ॥ तंव सुमित्रेचा नंदन । परमानंदें गेला भरून । मग पायीं होऊन लीन । ऐसें बोलला राघवा ॥ ६६ ॥ म्हणे माझें थोर अज्ञान । तुवां केलें जी निरसन । तरी आतां तुझिये मागून । मीहि येणार वनातें ॥ ६७ ॥ तुझिया सहवासाचें सुख । मजसि उदंड लाभेल देख । चरण सेवोन पावेन हरिख । अनुज्ञा देईं यावया ॥ ६८ ॥ ऐसें लक्ष्मणें मागितलें । तंव तें राघवें मान्य केलें । मग तत्काळ जाते झाले । सीतेलागीं पुसाया ॥ ६९ ॥ तंव तें पतीचें आगमन । पाहोन सीतेनें वेगेंकरून । उठूनि पादप्रक्षालन । केलें भावें आवडी ॥ ७० ॥ मग म्हणे जी, नाहीं सेना । छत्रचामर तेंही दिसेना । ऐसेंच काय निमित्तें सदना । येणें केलें नाथजी ॥ ७१ ॥ किरीट न दिसे मस्तकाला । वाद्यघोषही नाहीं झाला । तैसाचि संगें नाहीं देखिला । सामंतराज किमर्थ ॥ ७२ ॥ ऐसें

पालनीं । आम्ही निघालों एधवां ॥ ७४ ॥ तुवां कौसल्येची सेवा । करीत काळ सुखें क्रमावा । आम्हांस सत्वर निरोप द्यावा । तातडी आहे गमनाची ॥ ७५ ॥ ऐसें श्रीरामवचन ऐकतां । अत्यंत उद्विग्न जाहली सीता । म्हणे वनींचें राज्य देतां । कारण कैचें नृपाला ॥ ७६ ॥ तंव म्हणती श्रीरघुवीर । रायें कैकेयीस दिधले वर । तेणें भरतास राज्याधिकार । मजसी वन हें लाभलें ॥ ७७ ॥ म्यां चतुर्दश वर्षें होत । तोंवरी राहावें काननांत । ऐसें कैकेयीचें वांछित । मान्य केलें नृपानें ॥ ७८ ॥ म्हणोनि ताताज्ञे अनुसरून । चाललों सेवावयातें वन । आतां तुवां कांहींक करून । विलंब होऊं न द्यावा ॥ ७९ ॥ तंव बोलली सीता सती । जी मी आधींच जातें पुढती । मजवांचोनि तुम्हांप्रती । जाणें उचित केउतें ॥ ८० ॥ तंव राम म्हणती अवो सीते । तुजसि कैसें न्यावें वनातें । हिंस्र श्वापदें उदंड जेथें । सिंह व्याघ्र अस्वलें ॥ ८१ ॥ मोठमोठे दुष्ट राक्षस । जे कां गिळिती मानवास । तेथ येवूनि आपुले जिवास । कां वो संकटीं घालिसी ? ॥ ८२ ॥ कंद मूल फलादि कांहीं । निर्वाह करणें लागेल पाहीं । नाना पक्वान्नें जैसीं गृहीं । तैसीं कैचीं वनीं या * ॥ ८३ । आणि तीं फळेंहि वेळेवरी । मिळतील ऐसें नाहीं सुंदरी । खडे कांटेही नाना परी । त्यांहीं मार्गही मिळेना ॥ ८४ ॥ ठायीं ठायीं

आडवे पर्वत । सर्प वृश्चिक तेही बहुत । ऐसीं संकटें अरण्यांत । किती म्हणोनि वर्णावीं ॥ ८५ ॥ पायींच करणें सर्व प्रवास । शीत वात झोंबेल अंगास । ऐसियामाजी भेटतां राक्षस । प्राण जातील भयानें ॥ ८६ ॥ म्हणोनि प्रिये तूं राहीं घरीं । मी परतून येईं तोंवरी । शब्द ते ऐकतां येणें परी । दुःखें क्षोभली जानकी ॥ ८७ ॥ मग म्हणे जी शास्त्रानुसार । जियेचा धरिला एकदां कर । तीस करावबास अंतर । कैचें चित्तीं आणितां * ॥ ८८ ॥ धर्म कैसा नीति कैसी । सांगावें काय आपणांसी । निष्कलंक ऐशा प्रिय पत्नीशीं । कैसें सोडूं इच्छितां ॥ ८९ ॥ देवा. मजसी आपुला आश्रय । असतां वनींचें कायसें भय । आणि भोजनी संकट काय । कंदमूलफलांचें ॥ ९० ॥ देवें सेवूनि उरला अंश । तेंचि माझें अमृत विशेष । तयाचे सेवनीं परम संतोष । मज सहवासीं आपुल्या ॥ ९१ ॥ चालतां आपुले बरोबरी । कांटे खडे लागतील तरी । पुष्पेंचि पसरिलीं ऐसी परी । गमेल मातें निश्चयें ॥ ९२ ॥ म्हणोन मजपासून शिण । तिळहि होणें नाहीं जाण । जें कां मनीं योजाल आपण । त्यातेंचि होईन साधक ॥ ९३ ॥ बालपणीं कोणी मजला । ज्योतिषी आहे जें बोलला । पतीसवें कीं वनवासाला । जावें लागेल तुजलागीं ॥ ९४ ॥ म्हणोनि तयाचेंहि भाषण । आजि होईल सत्य पण । यालागिं न्यावें जी मज आपण । काननामाजी अवश्य ॥ ९५ ॥ आणखी ऐकावी एक मात । रामायणें सांगतात बहुत । परी मजवीण देव वनांत । गेले कोठें तें दाखवा ॥ ९६ ॥ म्हणोनि संगें न्यावेंचि मला ।

साह्याचि करीन आपणांला । आतांहि सांडोनि जरी चाललां । प्राणाचि सांडीन तरी मी ॥ ९७ ॥ ऐसें पाहतां सतीचें मन । दिधलें राघवें अनुमोदन । म्हणे अवश्य करावें आगमन । आम्हांसवें वनातें ॥ ९८ ॥ तरी हे सकळहि अलंकार । अरुंधतीस देईं सत्वर । तैसाचि सकळ द्रव्यभार । अर्पण करीं द्विजांतें ॥ ९९ ॥ तंव धावूनि लक्ष्मण । बोलवून आणीत ब्राह्मण । कुटुंबवत्सल आणि पूर्ण । वेदविद्येचे पाठक ॥ १०० ॥ मग सकळ वस्त्रें धन । तयांस भावें केलें दान । तेविं अरुंधतीतें बोलवून । सर्वालंकार अर्पिले ॥ १०१ ॥ घरींच्या सकळ सेवकांसी । तैसेच नाना नगरवासी । सकाळिकांस केलें संतोषी । द्रव्य देवोनि यथेच्छ ॥ १०२ ॥ मग सुमित्रा आपुली माता । देऊनि कौसल्येचिया हातां । लक्ष्मण उभा ठाकला पुढता । धनुष्य हातीं घेउनी ॥ १०३ । ऐसे परीनें तिघेहि जण । श्रीराम सीता लक्ष्मण । सिद्ध होऊन चालले जाण । राजयाच्या निवासीं ॥ १०४ ॥ ते वेळीं ती श्रीराममूर्ति । आनंदाची करीत पूर्ती । चालतां देखोनि चित्तवृत्ती । तटस्थ झाली जनांची * ॥ १०५ ॥ श्यामल तनु बहु सुकुमार । मदनाहून अति सुंदर । तेज तें फांकलें सभोंवर । नेत्र वेधीत जनांचे ॥ १० ॥ भूवरी टाकितां पदकमळें । सकळ विश्व पावन केलें । ऐसेपरी चालतां पावले । नृपांगणाशीं क्षणमात्रें ॥ १०७ ॥ ऐसा राजा श्रीरघुवीर । दावूनि नाना लीलाप्रकार । करी निजभक्तांचा उद्धार । प्रीति ठेवूनि अंतरीं ॥ १०८ ॥ म्हणून तयाची धरावी कास । आणि गिळावें संसारभयास । पुर-

वूनि घ्यावी सकळ आस । रामभक्तीनें एकल्या ॥ १०९ ॥ जयांचें पूर्व भाग्य फळलें । त्यांहींच मन रामीं अर्पिलें । तेचि पूर्ण आराम पावले । पाहोनि श्रीराम सर्वत्र ॥ ११० ॥ मृत्यूचें तोंड काळें केलें । पातकाचें नांवचि पुसिलें । परमानंदें विश्व भरलें । ऐसें भाग्य तयांचें * ॥ १११ ॥ म्हणोनि लागा रघुनाथभजनीं । धन्य करा जी आपुली जननी । हेंचि सार्थक त्रिभुवनीं । सार जगाचें राम हा * ॥ ११२ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ११३ ॥ श्रीराम ॥

## अध्याय १४, गुह-भेट

श्रीराम ॥ मार्गीं चालला श्रीरघुपती । संगें लक्ष्मण सीता सती । ऐसें पाहोनि सर्वांप्रती । फार कष्ट जाहले ॥ १ ॥ तोंचि कैकेयीची कीर्त । सकळिकांस जाहली श्रुत । मग ते म्हणती परस्परांत । कैसें दैव पहा हो ॥ २ ॥ एकल्या स्त्रियेच्या प्रेमासाठीं । वनास पाठवी श्रीजगजेठी । ऐसा नृप हा न्यायदृष्टी । सोडून कैसा चालला ॥ ३ ॥ कैकेयीहि कैसी दुष्ट । महा घातकी आणि नष्ट । सकळिकांतें जो कां अभिष्ट । श्रीराम, त्यांतें मोकली ॥ ४ ॥ अहो कासया आतां नगरी । सोडूनि जाऊं वनांतरीं । जेथ श्रीराम गमन करी । सीतालक्ष्मणांसमेत ॥ ५ ॥ पहा कीं ऐसा श्रीरघुवीर । त्रिलोकसुंदर सर्वेश्वर । पायींच चालला

हा हरहर । हत्ती घोडे सोडुनी ॥ ६ ॥ तेसीच पहा ही सीतासती । पायींच मार्ग आक्रमिती । जियेचें नखहि लोकांप्रती । दृष्टीस येऊं शकेना ॥ ७ ॥ सीतेचें ऐसें मार्गक्रमण । रामासही हो करितें शिण । कैची कैकेयी ? राक्षसीण । जन्मास आली छळाया ॥ ८ ॥ कायसें दैवाचें हें बळ । पुरुषप्रयत्न येथ विफळ । अभिषेककार्यीं योजिली वेळ । अरण्यगमनीं लागली ॥ ९ ॥ ऐसे सकळ नगरजन । शोक करितां अवलोकून । **वामदेवानें** सांतवन । ऐसें केलें तयांचें ॥ १० ॥ म्हणे अहो हा शोक वायां । नेणतां श्रीराघवाची माया । तोचि कारण आहे इयां । इष्टानिष्ट प्रसंगां * ॥ ११ ॥ हाचि परमात्मा नारायण । सीता योगमाया जाण । शेष तोचि लक्ष्मुमण । आहे सांप्रत अवतरला ॥ १२ ॥ हाचि मायेच्या गुणाश्रयें । ते ते आकार घेतो स्वयें । जगदुत्पत्ति स्थिति-विलयें । नांवें ऐशीं जयांला ॥ १३ ॥ रजोगुणाचिया प्रसरीं । ब्रह्मा होऊनि उत्पत्ति करी । मागुती विष्णूचें रूप धरी । पालन करावयातें ॥ १४ ॥ मग तमोगुणाचा भाव । धरूनि हाचि सदाशिव । विलीन करीत स्वयमेव । जग आपुल्या स्वरूपीं ॥ १५ ॥ येणेंचि [1]**मत्स्याचें** रूप धरून । वैवस्वताचें केलें अवन । नौकेंत घेतलें बैसवून । जगत्प्रलयप्रसंगीं ॥ १६ ॥ समुद्राच्या मंथनंकाळीं । मंदर पर्वत चालला तळीं । [2]**कूर्म** होऊनि तये वेळीं । येणेंचि पाठी दीधली ॥ १७ ॥ पुढें एकदां प्रलयकाळीं । मही गेलिया रसातळीं । येणें [3]**वराह** महाबळी । होवोनि तीतें तारिलें ॥ १८ ॥ हाचि [4]**नारसिंह** अवतारीं । प्रल्हादासी कृपा करी । हिरण्य-

कश्यपूतें उद्धरी । दुष्ट जाणून नखांहीं ॥ १९ ॥ त्यावरी पुत्रांचें राज्य गेलें । म्हणून अदितीनें विनविलें । तयीं येणेंच दान घेतलें । वामनरूपें बळीशीं ॥ २० ॥ क्षत्रिय माजले अनावर । तयांचा भूमीस जाहला भार । तयीं येणेंचि केला संहार । भार्गवरूप धरोनि ॥ २१ ॥ तोचि परमात्मा जगन्नाथ । श्रीरामरूपें येथें नांदत । रावणादि दुष्टांचा निःपात । करील जाऊनी काननीं ॥ २२ ॥ श्रीहरि पुत्र व्हावा म्हणोन । दशरथें केलें आराधन । तेणें स्वयेंचि पुत्र होऊन । देव आलेत ये स्थळीं ॥ २३ ॥ म्हणोनि रामचि नारायण । पातला रावण-वधाकारण । मनुष्यावांचून तयास मरण । नाहीं ऐसें जाणुनी ॥ २४ ॥ तैसी सृष्टिव्यापार करिती । माया तेचि सीता सती । शेष लक्ष्मण ऐसे त्रिमूर्ती । वनीं जातील येथवां ॥ २५ ॥ म्हणोनि राजा अथवा राणी । येथ कारण नाहीं कोणी । देवींच भूभारनिवारणीं । रामास आहे प्रेरिलें ॥ २६ ॥ नारदेंचि श्रीरामास भेटून । आजि मी स्वीकारीन वन । ऐसें घेतलें आहे वचन । चिंता कायसी ये स्थळीं ॥ २७ ॥ अहो जे कोणी राम राम । ऐसा जपाचा करिती नेम । तयांचे सकळ संसारश्रम । नाश पावती सर्वेचि * ॥ २८ ॥ मग त्याचि श्रीरामचंद्रातें । दुःख स्पर्शेल हें केउतें । जयाच्या नामेंचि प्राप्त होते । मुक्ति भक्तजनांतें ॥ २९ ॥ नामस्मरणावांचूनि कांहीं । मोक्षास आन उपाय नाहीं । कलियुगींचा निर्णय पाहीं । रामनाम हें स्मरावें * ॥ ३० ॥ लोकांस भासे हा मानव । परी तो जाणा देवाधिदेव । इच्छावशें नृदेहभाव । घेऊनि आला भूलोकीं

॥ ३१ ॥ भक्तिप्रेमास यावा भर । व्हावा रावणाचा उद्धार । तैसाचि दशरथाचा वर । सफळ व्हावा यालागीं ॥ ३२ ॥ ऐसें वामदेवाचें भाषण । सकाळिकांहीं करितां श्रवण । संशय सांडूनि अंतःकरण । शांत जाहलें तयांचें ॥ ३३ ॥ श्रीराम हाचि सर्वेश्वर । ऐसा करूनि दृढ निर्धार । नामस्मरणाचि निरंतर । करीत राहिले आनंदें ॥ ३४ ॥ **श्रीरामसीतारहस्य** येथ । वामदेवें जें केलें कथित । पठण करोनी नियमित । अवश्य मनन करावें ॥ ३५ ॥ तेणें रामीं जडेल मन । प्रेमें घडेल उपासन । शीघ्रचि जोडेल आत्मज्ञान । श्रीरामप्रसादें करूनी ॥ ३६ ॥ रहस्य हें गुप्त असूं द्यावें । ऐसें सांगून वामदेवें । प्रयाण करितां, प्रेम-भावें । लोक रामींच रंगले ॥ ३७ ॥ असो यावरी श्रीरघुनाथ । सीतालक्ष्मणांचे समवेत । प्रवेशुनी नृपमंदिरांत । कैकेयीतें बोलती ॥ ३८ ॥ आम्ही पातलों तिघे जण । आम्हांस मान्य वनप्रयाण । आतां देवें करावें भाषण । हीच आमुची मनीषा ॥ ३९ ॥ तंव कैकेयी तत्काळ उठली । स्वयेंचि वल्कलें घेऊन आली । आणि तिघांसी तीन दिधलीं । ल्यावया वेगवेगळीं ॥ ४० ॥ रामें वस्त्रभार काढिला । मग वल्कल-स्वीकार केला । लक्ष्मण नेसून सिद्ध झाला । सीता तैशीच राहिली ॥ ४१ ॥ हातीं घेतलेंसें वल्कल । पाहे रामाचें मुखकमल । तंव तो भाव जाणून तत्काल । श्रीराम नेसवूं लागला ॥ ४२ ॥ तंव तो प्र-संग कष्टतर । पाहतांचि उठिला रुदनस्वर । राजस्त्रियांचा तो दुःखभर । असह्य झाला पाहतां ॥ ४३ ॥ तोंचि क्षोभला वसिष्ठ मुनी । म्हणे गे निजकुल-विनाशिनी ! । रामचि

घेतला असतां गोंवुनी । सीतेस कां वो गांजिसी ? ॥ ४४ ॥ पतिव्रता ही बाला सीता । आपुल्या पतीच्या सेवेकरितां । स्वेच्छया वनीं जात असतां । वल्कलें देसीं कायसी ॥ ॥ ४५ ॥ सकल वस्त्रांहीं अलंकारीं । भूषित होवोनि ही सुंदरी । जाऊं द्या हो वनांतरीं । श्रीरामसंतोषाकारणें ॥ ४६ ॥ तंव दशरथ म्हणे अहो । कोणी रथ घेऊनि या हो । माझिया बाळां धाडूं नका हो । पायींच चालत वनांतें ॥ ४७ ॥ ऐसें वाक्य उच्चारिलें । आणि तिघांसी अवलोकिलें । तोंचि भूवरी आंग टाकिलें । अश्रु चालले घळाळा ॥ ४८ ॥ इकडे प्राप्त होतांचि रथ । सीता चढून बैसली तेथ । मागुती बैसला श्रीरघुनाथ । उजवी घालून नृपातें ॥ ४९ ॥ मागुती उभयांचे धनुष्य बाण । आणि खड्गें घेऊनि लक्ष्मण । रथीं आरूढ होतांचि जाण । सुमंत्रें घोडे हाकिले ॥ ५० ॥ रायें म्हणितलें थांबा जरा । परी रघुनाथें केली त्वरा । सांगूनि सुमंत्रातें नृपवरा- । पासून वेगें निघाया ॥ ५१ ॥ यापरी सांगतां श्रीरघुनाथ । वेगेंकरून चालला रथ । अदृश्य होतांचि नृपनाथ । व्याकुळ होऊनि पडियेला ॥ ५२ ॥ मागुती नगरवासी जन । स्त्री बाल वृद्ध आदिकरून । थांब थांब जी रघुनंदन । म्हणोनि मागें धावती ॥ ५३ ॥ राया रुदन करून बहुत । सेवकांलागीं आज्ञापीत । कौसल्येचिया मंदिरा आंत । मजसि घेऊन चला रे ॥ ५४ ॥ तरीच आणखी कांहीं क्षण । वांचेल जाणा माझा प्राण । अहो मी आतां राघवावीण । वाचूं न शकें निश्चयें ॥ ५५ ॥ मग कौसल्यामंदिरांत । जातां पुनः

जाहला मूर्छित । मागुती लोटतां काळ बहुत । सावध होवोनि बैसला ॥ ५६ ॥ इकडे श्रीराघवाचा रथ । तमसा-तीरास पोंचला त्वरित । मग तेथेंच सीतेसहित । श्रीराम सौख्यें राहिला ॥ ५७ ॥ जलचि मात्र एक प्राशिलें । वृक्षमूळाशीं शयन केलें । लक्ष्मण आणि सुमंत्र राहिले । जागून रक्षण करीत ॥ ५८ ॥ इतुकियांत अयोध्यावासी । लोक पावले राघवापाशीं । म्हणती कीं आम्ही निश्चयेसीं । रामास नेऊं अयोध्ये ॥ ५९ ॥ नातरी आम्हीच जाऊं वनीं । ऐसा भाव धरिला मनीं । तेधवां श्रीराम विस्मय पावुनी । ऐसें मानसीं विचारी ॥ ६० ॥ नगरीं आतां माझें गमन । होऊं न शके निश्चयें करून । व्यर्थचि शिणतील सारे जन । यासि उपाय कायसा ॥ ६१ ॥ मग सुमंत्र-प्रधानास म्हणे । रथ आपुला सिद्ध करणें । आतांचि पुढचा मार्ग चालणें । उचित आहे आपणां ॥ ६२ ॥ मग सुमंत्रें कारितां तयारी । तिघेहि बैसती रथावरी । आणि रोखूनि अयोध्या नगरी । नेते झाले रथातें ॥ ६३ ॥ मग कांहीं मार्ग आक्रमितां । वनांत शिरले अवचितां । इकडे प्रभातीं पाहूं जातां । श्रीराम कोणा दिसेना ॥ ६४ ॥ दुःखित झाले सकळ जण । मग रथाची देखतां खूण । करीत चालले मार्गक्रमण । तोंचि अयोध्ये पोंचले ॥ ६५ ॥ मग चिंतितां सीताराम । त्यांहीं धरिला ध्यानक्रम । तेणेंचि पूर्ण सुखविश्राम । सेवीत राहिले सुखानें ॥ ६६ ॥ इकडे सुमंतें रथ आपुला । बहुत वेगेंचि चालविला । नाना प्रदेश येती दृष्टीला । धनधान्यांहीं समृद्ध ॥ ६७ ॥ यापरी सृष्टिशोभा पाहत । आणि चित्तास

संतोषवीत । पोंचले गंगेचा तीरप्रांत । शृंगबेराचे संनिधीं ॥ ६८ ॥ गंगेचें करितांच अवलोकन । प्रेमें तियेस करिती वंदन । मग प्रवाहीं जाऊनि स्नान । केलें सर्वां जणांहीं ॥ ६९ ॥ मग शिंशपा वृक्षाचे तळीं । पाहोन शीतळशी सावली । सर्व जणें बैसती जाहलीं । विश्रांति घ्यावयाकारणें ॥ ७० ॥ तंव पातला श्रीरघुनाथ । ऐसा वृत्तांत होतां श्रुत । **गुह** परमानंदें धावत । दर्शनाकारणें पातला ॥ ७१ ॥ हातीं घेतलीं पुष्पफळें । अंतरीं शुद्ध प्रेम भरलें । ऐसें येऊनि साष्टांग वंदिलें । श्रीरामचरणीं आदरें ॥ ७२ ॥ तंव तयास वेगें उठवून । रामें दिधलें आलिंगन । आणीक कुशल वर्तमान । प्रेमें पुसिलें तयातें ॥ ७३ ॥ मग गुहें जोडिले दोन्ही कर । आणि म्हणे जी श्रीरघुवीर । धन्यचि मी एक भूमीवर । आजि तुझिया प्रसादें ॥ ७४ ॥ तुवां जें दिधलें आलिंगन । तेणें माझें शरीर मन । कैसें आनंदें आलें भरून । सांगतां येना मुखानें ॥ ७५ ॥ आतां शृंगबेर राज्य समस्त । आपुलेंच आहे जी निश्चित । म्हणोनि येथ तें चालवीत । सुखें रहा जी दयाळा ॥ ७६ ॥ नगरीं येवोनि रघुनंदना । पावन करावें माझे सदना । फळमूळें म्यां आणोनि नाना । ठेविलीं आहेत तुजलागीं ॥ ७७ ॥ हीच या दासाची प्रार्थना । देवें आणावी आजि मना । यापरी ऐकोन गुहाच्या वचना । संतुष्ट झाले श्रीराम ॥ ७८ ॥ मग बोलती बा रे गुहा । मज म्हणसी येवोनि रहा । परी माझा हा पूर्वींच पहा । निश्चय आहे जाहला ॥ ७९ ॥ चौदा वर्षें जातीं तोंवरी । मी ग्रामीं प्रवेश न करी । फलमूलादि

आणिलीं तरी । तींही न सेवीं परांचीं ॥ ८० ॥ म्हणोनि राज्य माझेंचि खरें । तरी त्वांचि चालवावें बा रे । ऐसें सांगूनि श्रीरघुवीरें । संतोष केला गुहाचा ॥ ८१ ॥ मग वडाचा काढोनि रस । लाविती मस्तकींच्या जटेस । आणि उभयांहीं मस्तकास । मुकुट केला आपुल्या ॥ ८२ ॥ मग जलमात्र एक सेवून । सीतासमवेत रघुनंदन । सुखें करिते झाले शयन । वृक्षपर्णाच्या शेजेसी ॥ ८३ ॥ मग धनुष्य बाण भाता । घेऊनि संनिध लक्ष्मण-भ्राता । सिद्ध राहिला रक्षणाकरितां । संगतीं गुहहि तयाचे ॥ ८४ ॥ अहो ही ईश्वराची नियती । ऐसीच फिरते सर्वांवरती । रंक किंवा पृथ्वीपती । कोणास टाळितां नये कीं * ॥ ८५ ॥ म्हणोन सुज्ञें पाहोनि विचार । संसारलोभ करावा दूर । हृदयीं अखंड परमेश्वर । जोडूनि ध्यावा प्रयत्नें * ॥ ८६ ॥ हेंचि रामचरित्रसार । तत्त्वज्ञ सांगती वारंवार । भाग्य-संपन्न तेचि नर । आवडी त्यातें सेविती ॥ ८७ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८८ ॥ श्रीराम ॥ १४ ॥

---

## अध्याय १५ वा, वाल्मीकिवृत्तांत.

श्रीराम ॥ वृक्षपर्णाच्या शय्येवर । पहुडला पाहोनि श्रीरघुवीर । गुहासि येऊन दुःख-भर । नयनीं आसवें दाटलीं ॥ १ ॥ मग म्हणे तो लक्ष्मणाप्रती । बा, ही कायसी दैव-

गती । आजि ऐसा हा पृथ्वीपती । भूमीस निद्रित जाहला ॥ २ ॥ सुवर्णाचिया मंचकीं जेणें । घालून नाना आस्तरणें । राजमंदिरीं शयन करणें । तयासि ऐसी अवस्था ॥ ३ ॥ इतुकियालागीं जाहली मूळ । कैकयी दुर्बुद्धि केवळ । मंथरेच्याच नादें सकळ । घात केला तियेनें ॥ ४ ॥ ऐसें गुहें करितां भाषण । तयास बोलला लक्ष्मण । बा रे सुखदुःखा-ची खूण । ऐक कैशी ती सांगतों ॥ ५ ॥ अरे कोण कोणासि छळितें । आणखी कोण सुखी करितें । पाहतां कर्मचि आपुलें होतें । सुखदुःखाचें कारण ॥ ६ ॥ आनंद अथवा दुःख कांहीं । आपणांस कोणी देत नाहीं । 'आम्हांस छळिलें दुर्जनांहीं' । ऐसीं वायां बोलणीं ॥ ७ ॥ जैसें जयाचें पूर्वार्जित । तैसेंच तयास फळ होत । धरिला अभिमान व्यर्थ होत । 'हें मी करीन' म्हणोनि ॥ ८ ॥ आपणाशीं कोणी वैर करी । कोणी प्रेम ठेवी अंतरीं । तरी हें आपुल्या कर्मापरी । तैसें तैसें होतसे * ॥ ९ ॥ सुख किंवा दुःख दोन्ही । कर्मानुसार मिळती जनीं । म्हणोनि प्राप्त तें तें सेवुनी । स्वस्थ व्हावें भल्यांहीं ॥ १० ॥ मजसी विषयांची आस नाहीं । तयांचा द्वेषहि न करीं पाहीं । येवोत जावोत मजासि कांहीं । संबंध नाहीं तयांचा * ॥ ११ ॥ जेथ जयानें जैसें केलें । कर्म निंद्य अथवा भलें । तेंचि तैसें तयासि फळलें । येथ अंतर घडेना ॥ १२ ॥ म्हणोनि इष्टानिष्टें प्राप्त होतां । हर्षविषाद सांडा उभयतां । देवादिकांहि विधिलिखिता । शक्ति नाहीं पुसाया ॥ १३ ॥ ह्या सुखदुःखीं निरंतर । गुंतोनि राहिला आहे नर । पुण्यपापांहीं घडिलें शरीर । तेणें

द्वंद्व हें सुटेना ॥ १४ ॥ सुखाच्या मागुती आहे दुःख । दुःख संपतां येणार सुख । ऐसें हें युग्म अलंघ्य देख । दिनरात्रींच्या सारिखें ॥ १५ ॥ अथवा सुखाचे पोटीं दुःख । आणि दुःखीं सांठवलें सुख । ऐसें हें युग्म मीनलें देख । जलपंकांच्या सारिखें ॥ १६ ॥ म्हणोनि इष्टानिष्ट-प्रवाहीं । ज्ञाता धैर्ये निवांत राही । नातळे हर्ष-खेदादिकांही । माया म्हणोनि सर्वांतें ॥ १७॥ यापरी गुहाशीं संभाषण । करीत राहे जों लक्ष्मण । तोंचि आकाशीं प्रकाश पूर्ण । फांकोनि आला भूतळीं ॥ १८ ॥ तंव जागृत झाले रघुपती । सर्वेचि देखिली गंगा पुढती । मग गुहासि आज्ञापिती । नौकेस सिद्ध कराया ॥ १९ ॥ तंव गुहें नौका आणवून । चरणीं केलें निवेदन । देवें बैसावें सुखेंकरून । मी तीरासी पाववितों ॥ २० ॥ तईं सीतेसि चढवोनि वर । रामें गुहाचा धरिला कर । मग स्वयें आरुढले सत्वर । मागुती लक्ष्मण बैसला ॥ २१ ॥ गुहानें नौका चालविली । सर्वेचि मध्य गंगेंत गेली । तंव सीतेनें प्रार्थना केली । देवि गंगे नमस्ते ॥ २२ ॥ मी वनींहूनि येईन परत । जेधवां श्रीरामलक्ष्मणांसहित । तईं तुजसी पूजीन निश्चित । परम प्रेमेंकरोनी ॥ २३ ॥ मग नौका परतीरीं लागली । मंडळी भूमीवरी उतरली । वियोग-वेळा देखोनि आलीं । आसवें नयनीं गुहाच्या ॥ २४ ॥ मग म्हणे जी महाराज । संगेंचि वनांत न्या हो मज । नातरी आतां काय काज । देह ठेवाया भूवरी ॥ २५ ॥ तंव रामें म्हणितलें तयास । बा रे एक धरी विश्वास । चतुर्दश वर्षांअंतीं खास । तुजसी येईन भेटाया ॥ २६ ॥ ऐसें करोनि आश्वा-

सन । दिधलें हृदयीं आलिंगन । मग अंतरीं संतोषून । निरोप दिधला तयातें ॥ २७ ॥ मग कारितां मार्गक्रमण । वनीं प्रवेशले तिघेजण । तंव देखोन एक हरिण । शिकार केली तयाची ॥ २८ ॥ मग तयाचें मांस सेवून । शमविला आपुला हुताशन । वृक्षातळीं करोनी शयन । रात्र काढिली तिघांहीं ॥ २९ ॥ याच रीती कारितां प्रवास । पोंचले भरद्वाजाश्रमास । द्वारीं पाहूनि एके बटूस । निरोप ऐसा धाडिला ॥ ३० ॥ बा रे जावोनि मुनींपाशीं । सांग सीता लक्ष्मणांनिशीं । श्रीराम आला दर्शनासी । द्वारीं उभा असे कीं ॥ ३१ ॥ तंव तेणें जाऊनि सत्वर । मुनींस केला नमस्कार । आणि म्हणितलें श्रीरघुवीर । दारीं आलेत दर्शना ॥ ३२ ॥ तंव तें श्रवण होतां मुनी । नाना पूजासामग्री घेउनी । तयातें आदरें द्वारीं पूजोनी । आणिता झाला आश्रमीं ॥ ३३ ॥ मग आश्रमीं आणिल्यावरी । आणीक थोर सत्कार करी । म्हणे तुवां येऊनि येथवरी । पावन केलें सर्वांतें ॥ ३४ ॥ तुवां मजासि देवोन भेटी । ऐसें पावविलें जगजेठी । कीं सर्वहि तपांचिये शेवटीं । पोंचलों ऐसें वाटतें ॥ ३५ ॥ असो, राघवा तुझें वृत्त । मज पूर्वींच आहे विदित । तूंचि परमात्मा लक्ष्मीकांत । अवतीर्ण झालासि भूवरी ॥ ३६ ॥ प्रार्थिता झाला ब्रह्मदेव । म्हणोनि तयाचे कार्यास्तव । तुवां धरिला मनुष्यभाव । तूं तों असंग पाहतां ॥ ३७ ॥ परी जावोनि आतां वनीं । कार्य दाविशील घडवोनी । मी तें सर्वहि ओळखूनी । आहें निश्चयें राघवा ॥ ३८ ॥ तुझिया उपासनेचें बळ । तेणें ज्ञानदृष्टि होय निवळ । म्हणोनि म्यां हें जाणिलें

सकळ । प्रसाद सर्व तुझा हा ॥ ३९ ॥ यावरी काय बोलोन बहुत । मी कृतकृत्य झालों नितांत । श्रीराम परमात्मा साक्षात । जो मीं नयनीं पाहिला * ॥ ४० ॥ ऐसा मुनींचा ऐकोनि स्तव । श्रीराम म्हणे जी भूदेव । आम्ही आपुले क्षात्रिय-बांधव । कृपे नांदतों आपुल्या ॥ ४१ ॥ ऐसें करोनि प्रतिवचन । तिघांहीं मुनीस केलें वंदन । मग एक रात्र तेथें क्रमून । निरोप घेती मुनीचा ॥ ४२ ॥ प्रभातीं चालतां मार्ग कांहीं । यमुना पातली लवलाहीं । मग संगतीच्या मुनिपुत्रांहीं । काष्ठें आणिलीं वनींचीं ॥ ४३ ॥ मग तयांची करून शीघ्र नौका । पार पोंचाविलें रघुनायका । आणि मार्ग दाविला निका । चित्रकूटासि जावया ॥ ४४ ॥ मग कांहींक मार्ग चालतां । पोंचले चित्रकूट पर्वता । जेथ पवित्र आश्रम होता । वाल्मिकि महामुनीचा ॥ ४५ ॥ भोंवतीं दाटले नाना तरुवर । नित्य फलपुष्पें शोभती ज्यांवर । आणि पशुपक्षीहि बहुवार । क्रीडती संनिध जयाच्या ॥ ४६ ॥ अंतरीं ऋषिमंडळी बहुत । राहिली तपश्चर्या करीत । ऐशिया पवित्र आश्रमांत । प्रवेश केला तिघांहीं ॥ ४७ ॥ तेथ पुढती पाहोन मुनिवर । तयांस करिती नमस्कार । तंव जाणोनि श्रीरघुवीर । मुनि विस्मित जाहले ॥ ४८ ॥ मदनाहुनि बहुत सुंदर । मुखकमळ अति मनोहर । श्यामल तनु ती सुकुमार । संगें सीता लक्ष्मण ॥ ४९ ॥ ऐसा पाहतां रघुनंदन । उठोनि दिधलें आलिंगन । परमानंदें नेत्र भरून । आले तत्काळ मुनीचे ॥ ५० ॥ मग बहुत आदरें करून । तिघांचें चित्त संतोषवून । पक्व मधुर फळें आणवून । दिधलीं

सेवावयासी ॥ ५१ ॥ मग तें भोजन जाहल्यावर । रामें होवोनि मुनींसमोर । जोडोनि आपुले दोन्ही कर । प्रश्न केला मुनींतें ॥ ५२ ॥ म्हणे ताताज्ञेस अनुसरून । आम्हीं स्वीकारिलें वन । ऐसें सकळ वर्तमान । आपण जाणत असां कीं ॥ ५३ ॥ म्हणून जेथ आम्हां तिघांस । सुखें करितां येईल वास । ऐसें सांगावें जी निवास- । स्थान कांहीं मुनींद्रा ॥ ५४ ॥ ऐसा प्रश्न होतांचि श्रुत । वाल्मीकीनें केलें स्मित । म्हणे आम्हांसि पुससी मात । सर्वज्ञ होऊनि राघवा ॥ ५५ ॥ बा रे सर्वांचें निवाससदन । तूंचि असससी रघुनंदन । आणि तुझेंहि वसतिस्थान । सर्व भूतें हीं निश्चयें * ॥ ५६ ॥ ऐसें हें सर्व-साधारण । तुझें राहण्याचें ठिकाण । आतां विशेषें सांगतों खूण । पुससी म्हणोनि श्री-रामा ॥ ५७ ॥ जे कां अंतरीं शांत असती । आणि अभेद दृष्टीनें पाहती । तैसेचि द्वेष करूं नेणती । कोणेकाचा कदाही * ॥ ५८ ॥ वरी तुझिया ठायीं प्रेम । ठेवोनि सांडिती सकळ काम । त्यांचिया अंतरामाजी राम । निवास तुझा असावा * ॥ ५९ ॥ धर्माधर्मातें वोसंडोनी । रंगले जे कां तुझिया भजनीं । त्यांचिया हृदयीं प्रवेशुनी । तुवां राहावें श्री-रामा * ॥ ६० ॥ तुझा नाममंत्र सदा जपती । आणि तुजसीच शरण असती । तैसेच लोभास सांडूनि देती । पदार्थमात्रीं पूर्णत्वें ॥ ६१ ॥ आणि मानापमानादि कांहीं । द्वंद्व जयांतें बाधील नाहीं । तयांच्या अंतरीं जाऊनि राहीं । सीतेसहित श्रीरामा * ॥ ६२ ॥

**अहंकार सांडिला ज्यांहीं । शांति सेविली लवलाहीं । रागद्वेषास नांवासही । राहूं न दिलें**

सर्वथा ॥ ६३ ॥ तैशीच, सोनें आणि माती । एकचि, ऐशी ज्यांची मती । त्यांचिये ठायीं तुझी वसती । निश्चयें असावी श्रीरामा * ॥ ६४ ॥ अनिष्ट प्रसंगाचा द्वेष । आणि इष्टापासोन संतोष । उभयांस सांडोनि जे पुरुष । तूंतें सेवीत राहती ॥ ६५ ॥ ज्यांहीं मन बुद्धि देह प्राण । तुजलागीं केलों समर्पण । प्राप्त तें तें सेवोनि पूर्ण । अंतरीं संतोष जयांच्या ॥ ६६ ॥ त्यापरी कर्मांची पुष्पांजली । ज्यांहीं तुजवरी समर्पिली । त्यांचिया निर्मल अंतःस्थलीं । तुवां राहावें श्रीरामा * ॥ ६७ ॥ जन्म मृत्यु वृद्धि क्षय । इत्यादि षड्विकारांचें भय । देहासीच लागुनी जाय । आत्मा नित्य अलिप्त ॥ ६८ ॥ प्राणासि जडली क्षुधा तृषा । तैसीच सुखदुःखांचीहि रेषा । बुद्धीवरीच उमटे मृषा । आत्मा सर्वांवेगळा ॥ ६९ ॥ ऐसियापरी भाव सकळ । निरसून जाहले जे केवळ । त्यांचिया अंतरीं सर्व काळ । निवास तुवां करावा * ॥ ७० ॥ सकळिकांचिया अंतरांत । चैतन्य एक पूर्ण विलसत । अनादि अनंत आणि शाश्वत । त्याचेंचि नांव श्रीराम ॥ ७१ ॥ तोचि परमात्मा सर्वाधिगत । असूनि सकळ संबंधरहित । ऐसें निश्चयें जाणती सतत । त्यांचिये अंतरीं रहा जी ॥ ७२ ॥ अखंड चाललाहे अभ्यास । तेणें दृढचि जाहलें मानस । वरी वाढूंचि लागली आस । भक्तिप्रेमाची तुझिया * ॥ ७३ ॥ म्हणोनि चालला नामघोष । तेणें निरसले सकळ दोष । त्यांचें हृदय भरोनि निःशेष । तुवां राहावें श्रीरामा ॥ ७४ ॥ रामा, तुझिया नामाचें बळ । वर्णील ऐसा कोण कुशल ।

ज्याचिया प्रसादें मज निर्मल । ब्रह्मर्षि पद लाभलें ॥ ७५ ॥ पहा मी जन्में मात्र द्विज । किरातीं वाढविलेंसें मज । तेणें क्षुद्र कर्मींच सहज । बुद्धि माझी लागली ॥ ७६ ॥ एके शूद्रीसी जाहलों रत । पावलों पुत्रकन्या बहुत । मग सर्वैच चौरकर्मांत । द्रव्यासाठीं प्रवेशलों ॥ ७७ ॥ हातीं घेऊनि धनुष्यबाण । रानीं करीतसें मी भ्रमण । तईं जीवांस वाटे दारुण । काळाचि आला गिळाया ॥ ७८ ॥ पुढें एकदा सप्त मुनी । मजसी आढळले बा वनीं । ज्यांहीं आपुल्या तेजेंकरोनी । दिव्य केलें भूतळा ॥ ७९ ॥ तईं म्यां तयांसि देवोनि हाक । उभे केले ते सकाळिक । मग धाव ठोकोनी एक । गेलों संनिध तयांच्या ॥ ८० ॥ तंव ते मुनि बोलले मजसी । कासया मूढा धावा घेसी । तईं मी सांगें मारून तुम्हांसी । द्रव्य घ्यावया पातलों ॥ ८१ ॥ घरीं माझिया स्त्रियेस सुता । अन्न खावयास नाहीं आतां । म्हणोनि त्यांचे पोषणाकारितां । उपाय ऐसा करीं मी ॥ ८२ ॥ तंव पुन्हा बोलले मुनी । बा रे येवढें येई पुसोनी । आपुलिया जनांस; आम्ही वनीं । येथेंचि ठाकतों तोंवरी ॥ ८३ ॥ कीं तुमचिया रक्षणाकारण । मी जें करितों पापाचरण । त्याची भागी घ्यावया कोण । सिद्ध आहेत तुम्हांत * ॥ ८४ ॥ मग तें मानूनि मुनींचें वचन । म्यां स्वगृहीं केलें गमन । मग घेतलें विचारून । एकाएकातें वेगळें ॥ ८५ ॥ तयीं ते सांगती सर्व जण । पाप तुझेंच सारें जाण । आम्हांसी एक आहे कारण । प्राप्त झालिया सुखाचें * ॥ ८६ ॥ तंव तें ऐकतांच उद्वेगुनी । तत्काळ आलों मी परतोनी । जेथ ते

राहिले होते मुनी । दयेनें तिष्ठत मजलागीं ॥ ८७ ॥ त्यांचें दर्शन होतांक्षणीं । भाव उपजोनि अंतःकरणीं । धनुष्यबाण सांडोनि झणीं । पद मीं धारिलें तयांचें ॥ ८८ ॥ मग विनविलें जी मुनिराज । शरणागतास उद्धरा मज । दीन अनाथ पातकी आज । नरकामाजी चाललों ॥ ८९ ॥ तव तयांचें निर्मल मन । तत्काळ आलें कळवळून । मग मजलागीं ऊठ म्हणोन । 'मा भी' ऐसें बोलले ॥ ९० ॥ त्यांहीं पाहिलें ऐसें मनांत । हा तों दुराचारी बहुत । उपेक्षावा हेंचि उचित । ऐसा पापी सज्जनीं ॥ ९१ ॥ परी जाहला शरणागत । म्हणोनि करुणा उपजत । तरी परमार्थाची रीत । कांहीं यातें सांगिजे ॥ ९२ ॥ तेणें पापाचा होऊनि नाश । सवेंचि पावेल मोक्षसुखास । ऐसा विवेक आणूनि मनास । मातें बोलती तेधवां ॥ ९३ ॥ बा रे तुजसी असो कल्याण । सत्संग सफळ झाला जाण । आतां चित्तीं साठवीं पूर्ण । देतों उपदेश तयातें ॥ ९४ ॥ राघवा, ऐसें बोलूनि मला । त्यांहीं मंत्रोपदेश केला । फिरवून तुझ्याच नामाक्षरांला । 'मरा' म्हणती जपावें ॥ ९५ ॥ आम्ही परतून येऊं तोंवर । जप तूं चालवी निरंतर । ऐसें सांगून ते मुनिवर । मार्गी गेले आपुल्या ॥ ९६ ॥ मग जैसें तयांचें वचन । तैसाचि वर्तलों मी जपून । मंत्र जपतां देहादि भान । माझें संपूर्ण लोपलें ॥ ९७ ॥ यापरी लोटला बहुत काळ । मी तैसाचि राहिलों अचळ । तंव अंगावरती वारुळ । वाढूनि आलें माझिया ॥ ९८ ॥ पुढें सहस्र युगें गेलियावर । परतून आले ते मुनिवर । मग मजसी वारुळाबाहेर । हाक देती यावया

॥ ९९॥ तयीं मी जाहलों सावधान । ठाकलों वल्मीका आंतून । तयींपासून 'वाल्मीक' म्हणून । नांव मजला मिळालें ॥ १०० ॥ मग वल्कीकापासून तुवां । आजि जन्म घेतला नवा । म्हणोनि तुझिया द्विजस्वभावा । पूर्णता आली जाणिजे ॥ १०१ ॥ ऐसें मजसी सांगून रामा । मुनि ते गेले आपुल्या धामा । ऐसा तुझा हा नाममहिमा । प्रत्यक्ष मातें ठाउका ॥ १०२ ॥ आणि सीता लक्ष्मणांसहित । तुजसी पाहें मी साक्षात । म्हणोनि मुक्तचि मी निश्चित । संशय कैंचा श्रीरामा ॥१०३ ॥ असो, आतां श्रीरघुपते । निवास स्थान दावितों तूंतें । ऐसें म्हणोन निजशिष्यांतें । संगें घेतलें मुनीनें ॥ १०४ ॥ मग सर्वांहीं जाऊनि वनीं । पर्वत-नदीच्या मध्यस्थानीं । एक सुरम्य स्थळ पाहोनी । मान्य केलें निवासा ॥ १०५ ॥ मग जमवून साहित्याला । निर्मिली सुंदर पर्णशाला । आणि दिधली राहावयाला । श्रीरामसीतालक्ष्मणा ॥ १०६ ॥ तेथ वनींचें सौख्य सेवीत । तिघे-हि राहिले आनंदांत । अयोध्येहूनि येथेंचि बहुत । चित्त रंगलें तयांचें ॥ १०७ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०८ ॥ श्रीराम ॥ १५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥



# अध्याय १६ वा, दशरथशापवृत्त

श्रीराम ॥ इकडे रघुवीरादि त्रयां । पार पोंचवूनि गंगेचिया । परत अयोध्ये पावावया । सुमंत्र मार्गीं लागला ॥ १ ॥ मग सूर्य अस्तास गेला । तेधवां ग्रामीं प्रवेशला । आसवें दाटलीं नयनाला । मुख झांकूनि घेतलें ॥ २ ॥ रथ बाहेरि करूनि स्थित । प्रविष्ट झाला नृपसदनांत । मग जयजयकार करीत । प्रणाम पायीं घातला ॥ ३ ॥ तंव तो रायाचा दुःखभर । पुनः उमसूनि आला वर । म्हणे रे माझा श्रीरघुवीर । कोठें नेऊनि सोडिला ॥ ४ ॥ कोठें ठेविली सीता सती । कायसी लक्ष्मणाची गती । बा रे माझीं बाळें संप्रती । कोठें आहेत सांग कीं ॥ ५ ॥ हा हा कैसा हा मी निष्ठुर । वनीं लोटितों आपुले कुमर । ऐसिया पाप्यास निरंतर । धिक्कारावें जनांहीं ॥ ६ ॥ ऐशा पाहूनि मज चांडाळा । काय वाटेल माझिया बाळां । सुमंत्रा तुजसि येते वेळां । काय निरोप बोलले ॥ ७ ॥ हा हा बाळा श्रीरघुपते । बा रे लक्ष्मणा, बाळे सीते । कैसे सांडूनि मज वृद्धातें । वनीं गेलांत निघूनी ॥ ८ ॥ केउता दुःखाचा डोंगर । पडियला माझे शिरावर । प्राणचि माझा हा घेणार । संशय नाहीं लेशही ॥ ९ ॥ ऐसा विलाप करितां बहुत । राय बुडून गेला दुःखांत । तयीं सुमंत्रें जोडोनि हात । उत्तर केलें तयासी ॥ १० ॥ म्हणे रामसीतालक्ष्मणांनिशीं । आम्ही सर्व बैसलों रथाशीं । तों शृङ्गवेर नगरापाशीं । गंगातीरीं ठाकलों ॥ ११ ॥ मग

गुहानें कांहीं कंदफळें। आणूनि दिधलीं प्रेमामुळें। तईं तीं स्पर्शूनि करकमळें। राघवें तैसींच ठेविलीं ॥ १२ ॥ मग वटक्षीरेंचि लवलाहीं। जटेचे मुकुट रचून त्यांहीं। मजसि पुरास धाडिलें पाहीं। निरोप देऊनि यापरी ॥ १३ ॥ कीं बा, राजयास सांगें एक। आम्हांलागीं न करा शोक। अयोध्येहूनि वनींचें कौतुक। अधिक आम्हां निश्चयें ॥ १४ ॥ मातेसही साष्टांग वंदून। सांगिजे, चिंतेस वोसंडून। वृद्ध पितयास धीर देऊन। सौख्य होईसें करीं बो ॥ १५ ॥ तोंचि सीतेचेहि नयन। दुःखाश्रूंहीं आले भरून। तैसीच सांगे साष्टांग वंदन। चरणीं आपणां उभयांच्या ॥ १६ ॥ मग तिघांच्या नयनांतून। आसवें चाललींत भरून। ऐसेच नौकेंत आरूढ होऊन। नौका चालूं लागली ॥ १७ ॥ मग गंगेच्या पैलतीरीं। उतरून पुढें चालल्यावरी। प्रविष्ट होतांचि वनांतरीं। अदृश्य झाले लोचनां ॥ १८ ॥ तेधवां बहुत काळवरी। मज उदास वाटलें अंतरीं। मग मी तैसाच रथावरी। बैसोनि येथें पावलों ॥ १९ ॥ तंव कौसल्या बोलली, आतां। व्यर्थचि कासया रुदन करितां। प्रसंग ऐसा आपुल्या हातां। स्वयेंचि ओढून घेउनी ॥ २० ॥ कैकेयी आवडली बहुतें। तरी राज्य द्यावयाचें होतें। परंतु माझिया बाळकातें। कां हो धाडिलें वनासी ॥ २१ ॥ तंव जैसा डाग द्यावा क्षतीं। तैसा खोंचला तो भूपती। सर्वांचि आसवें नेत्रप्रांतीं। दाटूनि बोले तियेला ॥ २२ ॥ गे मी दुःखें जाहलों चूर। वरी हे करिसी शब्दप्रहार। आतांचि माझे प्राण बाहेर। चालले आहेत पहा वो ॥ २३

॥ पूर्वीं माझिया अज्ञानपणीं । एके मुनींची शापवाणी । मजसि जाहली ती ये क्षणीं । स्मृतींत आली माझिया ॥ २४ ॥ पूर्वीं एकदां मृगयेकारण । घेवोनि आपुले चापबाण । वनीं करीत असतां भ्रमण । नदीतीरीं मी पातलों ॥ २५ ॥ तंव मध्य रात्र जाहली असतां । तेथ मुनि एक झाला येता । आपुलिया पितरां तृषार्ता । जल नेऊनि द्यावया ॥ २६ ॥ तेणें पाणी घेतां भरुनी । जाहला जो एक जलध्वनी । तर्यीं मजसि वाटलें मनीं । श्वापद आलें तृषार्त ॥ २७ ॥ मग चापास जोडोनि शर । शब्दवेध म्यां करितां सत्वर । हा! हा! ऐसा मानवस्वर । श्रवणीं आला माझिया ॥ २८ ॥ अहो मी निरपराध असतां । कोणें विंधिलें मज अवचितां । अरेरे! माझे मातापिता । तृषेनें व्याकुळ राहिले ॥ २९ ॥ ऐसें ऐकतां मनुष्यवचन । भयभीत झालें माझें मन । मग तैसाच पुढें होऊन । संनिध गेलों तयाच्या ॥ ३० ॥ पाहतां, अंतरीं अतिशयित । व्याकुळ होऊन, नमिलें त्वारित । मग तयास बोललों मात । स्वामी क्षमा करा जी ॥ ३१ ॥ हा मी दशरथ मूढ जन । म्यांचि अविचारें नेणून । केलें आपणां शरसंधान । पोटीं घ्या जी दयाळा ॥ ३२ ॥ तैं तो तापस दयाघन । मजसि बोलला ऐसें वचन । बा रे भय देईं त्यजून । ब्रह्महत्या ही नसे कीं ॥ ३३ ॥ मी ज्ञातीनें वैश्यचि बापा । करीत राहात असें तपा । येणें महत्पातक नृपा । घडलें नाहीं तुजला ॥ ३४ ॥ परी तूं आतां वेगेंकरून । नीरें कुंभ घेईं भरून । आणि नेऊन करवीं पान । माझिया मातापित्यांतें ॥ ३५ ॥ माझिया

वाटे लावोन चित्त । राहिले आहेत ते निश्चित । तृषेनें तयांचे प्राण बहुत । व्याकुळ झाले असती कीं ॥ ३६ ॥ म्हणोनि बा रे जाईं झणीं । मस्तक ठेवोनि त्यांचे चरणीं । वृत्त सकळ घालून श्रवणीं । संतोष जोडीं तयांचा ॥ ३७ ॥ नातरी माझा वृद्ध पिता । क्षुब्ध होऊनिया अवचितां । तुजासि भस्म करील आतां । शाप देवोनि सर्वेचि ॥ ३८ ॥ आणि माझिये अंगीं शर । रुतला, तयातें काढी वर । तेणें सांडूनि दुःखभार । प्राण मी आतां सोडितों ॥ ३९ ॥ ऐसें तेणें करितां उत्तर । त्याचे अंगींचा काढोनि शर । जल घेऊनि मी सत्वर । गेलों वृद्धांसंनिधीं ॥ ४० ॥ तंव तयांस न दिसे कांहीं । वरी व्याकुळ क्षुधातृषांहीं । मार्गप्रतीक्षा करिती पाहीं । पुत्रागमनाकारणें ॥ ४१ ॥ जल आणावयास गेला । सुत तो कां न अद्यापि आला । तया बाळावांचून आम्हांला । रक्षिता कैचा वनीं या ॥ ४२ ॥ आमुच्या सेवेच्या कारण । तयास अत्यंत पडती शिण । म्हणोनि न कळे काय कठिण । चित्त झालें तयाचें ॥ ४३ ॥ ऐसें चिंतीत असतां मनीं । माझिया पायीं जाहला ध्वनी । तेधवां सुताचि आला म्हणूनी । वृद्ध मातें बोलला ॥ ४४ ॥ बाळा कां बा लागला वेळ । संनिध नव्हतें काय जळ । आम्हांस पाजून बापा तत्काळ । तूंही सेवीं पाडसा ॥ ४५ ॥ तयीं खेद आणखी भीती । दोन्ही दाटलीं माझिया चित्तीं । मग तैसाच होऊन पुढती । साष्टांग वंदिलें तयातें ॥ ४६ ॥ मग म्हणें जी मी नोहें सुत । अयोध्येचा राजा दशरथ । पातकी आलों होतों वनांत । रात्रौ मृगया कराया ॥ ४७ ॥

तंव आजि जलाचिये संनिध । बैसलों असतां जाहला शब्द । मग तये ठायीं धरून वेध । बाण म्यां मूढें सोडिला ॥ ४८ ॥ तंव 'हा हा' ऐसी मनुष्यवाणी । तेथून तत्काळ आली श्रवणीं । मग दचकूनि अंतःकरणीं । तेथ जाऊनि पाहिलें ॥ ४९ ॥ तंव विखरोनि जटाभार । मुनि एक पडला भूमीवर । ऐसें पाहोन माझें अंतर । शतधा विदीर्ण जाहलें ॥ ५० ॥ मग तैसाचि दीनपणीं । लागलों तयाचिया चरणीं । आणि ऐशी केली विनवणी । सांभाळा हो दयाळा ॥ ५१ ॥ तेधवां तेणें अंतरीं द्रवून । मजासि दिधलें आश्वासन । कीं तूं जाऊन जोडी मन । माझिया मातापित्यांचें ॥ ५२ ॥ तृषेनें असती ते व्याकुळ । तयांस नेऊन देईं जळ । मग वृत्तांत सांगूनि सकळ । प्राणदान मागावें ॥ ५३ ॥ यापरी तेणें आश्वासितां । कांहीं धीर वाटून चित्ता । येथवरी आलों दयावंता । ऐसा हा मी पातकी ॥ ५४ ॥ मी शरण आपुल्या पायां । महाराज जी करुणामया । रक्षण करा ऐसिये समया । इया दीनाचें दयाळा ॥ ५५ ॥ ऐसी ऐकतां माझी वाणी । तयांहीं अंगें टाकिलीं धरणी । आणि अत्यंत व्याकुळपणीं । बहु आक्रंदूं लागले ॥ ५६ ॥ मग मजसी म्हणती बा रे । तेथ आम्हांस नेई त्वरें । जेथ आमुचा बाळ शरें । तुवां विंधूनि पाडिला ॥ ५७ ॥ ऐसें वचन ऐकतां झणीं । त्यांस मीं नेलें तये ठिकाणीं । तंव तें शव पाहतांक्षणीं । त्यांहीं हंबरडा फोडिला ॥ ५८ ॥ अंगावरती फिरवोनि हात । म्हणती कां रे पाडिलासि येथ । आम्हांसवें कांहींच मात । कां न बोलसी पाडसा ॥ ५९ ॥

बाळा, आणावयासि जळ । फिरला असशील रानोमाळ । म्हणोनि आतां कांहीं काळ । विश्राम घेसी काय कीं ॥ ६० ॥ अथवा आम्हांसि सांभाळितां । तुजसि उबग आला चित्ता । म्हणोनि राग धरून आतां । अबोला केला काय गा ॥ ६१ ॥ बोल कीं गा बाळा तान्हया । आम्हांसि जल देईं प्यावया । तृषेनें व्याकुळ जाहलिया । आपुल्या वृद्ध पित्यातें ॥ ६२ ॥ तुजवीण आमुचा गा सांभाळ । वनीं कोण रे करिल बाळ । ऐसें आळवीत बहुत काळ । विलाप केला तयांहीं ॥ ६३ ॥ मग मजकरवीं लवलाहीं । चिता सिद्ध करून त्यांहीं । आपलीं शरीरें टाकून पाहीं । गमन केलें स्वर्लोकीं ॥ ६४ ॥ ते मजसी बोलला पिता । तुजहि हीच गति आतां । पुत्रासाठींच शोक करितां । मरण तूंतें घडेल ॥ ६५ ॥ ऐसी तयाची शापवाणी । मजसि प्राप्त झाली ये क्षणीं । मुनिशापाचे निवारणीं । सामर्थ्य कैचें कोणातें ॥ ६६ ॥ यापरी बोलून पूर्वकथा । नृप तो लागला शोकपथा । हा हा माझिया श्रीरघुनाथा । बाळे सीते लक्ष्मणा ! ॥ ६७ ॥ तुमचें वियोगदुःख कठिण । साहूं न शकती माझे प्राण । देह सोडूनि करिती निर्याण । ऊर्ध्वलोकीं पहा जी ॥ ६८ ॥ ऐसें शब्द बोलून तत्काळ । प्राण तो सोडी भूमिपाळ । तंवचि आक्रोशें सर्व स्थळ । दाटून राहिलें क्षणांत ॥ ६९ ॥ कौसल्या सुमित्रा मुख्य स्त्रिया । आणि नृपाच्या सर्वहि जाया । कपाळ पिटून तया ठायां । कल्लोळ करीत राहिल्या ॥ ७० ॥ प्रातःकाळ झालियावरी । वसिष्ठें देखिली जंव ही परी । तईं रायातें उचलोनि सत्वरीं । तैलद्रोणींत ठेविलें ॥ ७१ ॥

मागुती दूतांस आज्ञा करी । जा रे युधाजिताचे पुरीं । तेथ भरत निवास करी । शत्रुघ्नाचे समेत ॥ ७२ ॥ त्यास मातापित्यांचें दर्शन । घ्यावया यावें वेगेंकरून । ऐसें सांगून माझें वचन । घेऊन यावें अयोध्ये ॥ ७३ ॥ तंव ते दूत युधाजित- । नगरालागीं जाऊन त्वरित । वंदूनि सांगती सर्व वृत्त । जैसें वसिष्ठें बोलिलें ॥ ७४ ॥ तईं तें ऐकतां शत्रुघ्न-भरत । दोघे दचकले अंतरांत । म्हणती काय घडली मात । नगरामाजी कळेना ॥ ७५ ॥ मग त्या चिंते- चिया भरीं । आरूढ होऊनि अश्वावरी । सवेंचि पातले अयोध्यापुरीं । आज्ञेनुसार मुनींच्या ॥ ७६ ॥ तंव ते नगरवासी जन । सकळ दिसती उत्साहहीन । आनंदाचें एकहि चिन्ह । दृष्टी न पडे शोधितां ॥ ७७ ॥ मग तैसेच चिंतातुर मनीं । प्रवेशले राजयाचे भुवनीं । तंव तेथहि आनंदध्वनी । एकही कानीं पडेना ॥ ७८ ॥ तेथ एकली एके आसनीं । कै- केयी बैसली अवलोकुनी । पुत्रभावास अनुसरोनी । शीर्षें वंदिली तयांहीं ॥ ७९ ॥ तयीं तें भरताचें आगमन । पाहतां कैकेयी संतोषून । हृदयीं देऊनि आलिंगन । मांडिये घेई तयातें ॥ ८० ॥ मग मातृगृहींचें कुशल । तयास पुसूं लागली सकळ । म्हणे असे ना ? क्षेम बाळ । माझिया मातापित्यांचें ॥ ८१ ॥ तुवांहि सुखरूपपणें मज । येवोन भेट दिली आज । तेणें माझें चित्त सहज । थोर संतोष पावलें ॥ ८२ ॥ तंव भरत म्हणे माते । हें कुशलवृत्त असो परतें । नृपनाथ आजि या स्थळातें । कां न दिसती सांगिजे ॥ ८३ ॥ प्रवेश करितां मंदिरांत । मज दृष्टी न आले तात । तेणें माझें चित्त बहुत । अवस्थ झालें

असे कीं ॥ ८४ ॥ तंव कैकेयी म्हणे तयासी । बाळा चिंता ही कासयासी । दिव्य धाम तुझिया पितयासी । प्राप्त झालें निश्चयें ॥ ८५ ॥ जेथ सकळ पवित्र जन । पावती पुण्यें आचरून । तेथचि तेणें केलें गमन । स्वर्गलोकास जाणिजे ॥ ८६ ॥ तें ऐकतांचि कुमार भरत । अंग टाकूनि देई त्वरित । मग म्हणे अहो जी माझे तात । कोठें गेलांत निघूनी ॥ ८७ ॥ राजा रघुनाथाच्या पदरीं । आम्हांस अर्पिलें नाहीं तोंवरी । कैसें प्रयाण केलेंत वरी । संकटीं ठेवूनि आमुतें ॥ ८८ ॥ ऐसा व्याकुल होवोनि बहुत । शोक करीत असतां सुत । तयास उठवोनि नेत्र पुसत । कैकेयी बोलूं लागली ॥ ८९ ॥ म्हणे बालका सारें-चि कांहीं । तुजासि जोडूनि ठेविलें पाहीं । धीर धरोनिया लवलाहीं । दुःखास दूर करावें ॥ ९० ॥ तैं मग 'अंतकाळीं तात । काय बोलले' म्हणूनि भरत । पुसतां कैकेयी त्यातें बोलत । भय सांडोनि निःशंक ॥ ९१ ॥ कीं, हा रामा ! लक्ष्मणा ! सीते । ऐसें वारंवार बोलोनि तातें । गमन केलें स्वर्लोकातें । दुःखामाजी बालका ॥ ९२ ॥ भरत पुसे अंत-काळीं । श्रीराम नसेचि काय जवळीं । लक्ष्मण-सीताहि तये वेळीं । कोठें होतीं राहिलीं ॥ ९३ ॥ तेधवां वृत्तांत सांगावया । कैकेयी सिद्ध जाहली तया । म्हणे रामास अभिषे-काया । राजयें होतें योजिलें ॥ ९४ ॥ तयीं राज्य यावें तुला । म्हणोनि म्यां एक उपाय केला । मजसि वर दोन भूमिपाला- । पासूनि होते लाभले ॥ ९५ ॥ त्यांत एकें राज्य-सिंहासन । घेतलें तुजसाठीं मागुन । आणीक एकें रामास वन । सेवावयासि धाडिलें ॥

९६ ॥ तैं पतिव्रताधर्म स्मरून । सीताहि सेवूं गेली वन । लक्ष्मणाहि दोघांमागून । गेला सेवेकारणें ॥ ९७ ॥ ऐसे वनीं जातां सकाळिक । रायें उदंड केला शोक । अंतीं सोडिला हा इहलोक । 'रामा रामा' म्हणोनी ॥ ९८ ॥ ऐसे मातेचे ऐकतां बोल । भरत जाहला शोकाकुल । म्हणे आजि ही कैसी वेळ । प्राप्त झाली वोखटी ॥ ९९ ॥ तंव तयाचा शोक-भर । पाहोन एरी बोलली, कुमार ! । राज्य मिळतांहि ऐसें सुंदर । शोक करिसी किमर्थ ॥ १०० ॥ तैं ते शब्द पडतां श्रवणीं । क्षुब्ध होऊनि अंतःकरणीं । रोषें पाहूनि तियेतें झणीं । कुमार बोलूं लागला ॥ १०१ ॥ दुष्टे तुजसवें संभाषण । हेंचि महापातक जाण । तुजऐसी घोर चांडाळीण । कोठून होय जगीं या ॥ १०२ ॥ प्राण जी घेई निजपतीचा । तियेसी काय बोलणें वाचा । अवो तुजसी कुंभिपाकाचा । वास होईल निश्चयें ॥ १०३ ॥ ऐसिया स्त्रियेच्या गर्भांतून । जो हा देह पावला जनन । तोहि पापेंचि दाटला भरून । त्यातेंहि अवश्य त्यजावें ॥ १०४ ॥ म्हणोनि आतां अग्निप्रवेश । अथवा सेवावें महा-विष । किंवा खड्गेंचि करून नाश । पवित्र होतों अहो ! मी ॥ १०५ ॥ यापरी करूनि धिक्कारणी । भरत तेथून निघाला झणीं । मग जाऊन कौसल्याभुवनीं । पायीं मस्तक ठे-विलें ॥ १०६ ॥ तंव पाहतां भरतालागुन । हृदया देऊनि आलिंगन । सती ती मुक्तकंठें करून । रोदन करूं लागली ॥ १०७ ॥ अत्यंत सुकूनि गेलें वदन । वरी अश्रूंहीं गळती नयन । मग तैसीच दुःखें करून । भरतालागीं बोलली ॥ १०८ ॥ बाळा तुवां केलिया

गमन । ऐसें वृत्त आलें घडून । तव मातेनें स्वकर्मकथन । तुजसि केलें असेल ॥ १०९ ॥ माझा राम माझी सीता । वनीं निघून गेले आतां । मजसि लावून घोर चिंता । लक्ष्मण- हि गेला त्यांसवें ॥ ११० ॥ अंगीं नेसूनियां वल्कलें । जटामुकुट सिद्ध केले । आणि मजसि लोटून दिलें । महाशोकाच्या सागरा ॥ ११ ॥ हा हा रामा गुणनिधाना । सां- डूनि गेलास कैसा वना । तुजवांचूनि आम्हां जनां । त्रिभुवन शून्य जाहलें ॥ ११२ ॥ पाहतां तूंचि जगत्पती । खेळ करिसी मायेसंगतीं । परी हें जाणतां माझी मती । दुःखा- पासून सुटेना ॥ ११३ ॥ म्हणून वाटतें कीं, दैवगती । बलिष्ठ होय सर्वांपरती । ज्ञानी अज्ञानी सर्वांप्रती । सुखदुःखांत गोंविते * ॥ ११४ ॥ ऐसी अंतरीं कालवून । एरी शोक करितां बघून । भरत बोलता झाला वचन । पायीं लागून तियेच्या ॥ ११५ ॥ म्हणे माते माझें भाषण । एक तुवां करावें श्रवण । मी तिळही नाहीं कारण । इया घडल्या प्रसंगा ॥ ११६ ॥ रामराजयाच्या अभिषेकांत । कैकयी आहे विघ्न करीत । विदित हें नव्हतें मज खचित । म्यां न प्रेरिलें तियेला ॥ ११७ ॥ जरी मी असेन मिथ्या बोलत । तरि मज ब्रह्महत्या शत । केलियाचें पाप निश्चित । लागो, हेचि प्रतिज्ञा ॥ ११८ ॥ अथवा देवी अरुंधतीसहित । केलिया वसिष्ठांचा घात । खड्ग घालोनि मस्तकांत । तेंचि पाप घडो कीं ॥ ११९ ॥ यापरी करून शपथवचन । पुनः आरंभिलें रुदन । मग कौसल्येनें हृदयीं धरून । केलें सांत्वन तयाचें ॥ १२० ॥ इतुक्यांत वृत्त झालें श्रुत । कीं प्राप्त जाह-

लासे भरत । तंव श्रीवसिष्ठ मंत्रियांसमेत । तेथ येऊन पोंचले ॥ १२१ ॥ मग भरताचा पाहून खेद । वसिष्ठें केला विवेकबोध । महाजनांचा ऐसाच नाद । ज्ञान पाजावें जनांतें ॥ १२२ ॥ म्हणे हा वृद्ध राजा दशरथ । येणें धरिला परलोकपथ । तरी दुःखाचें मूळ येथ । कोठेंचि नाहीं पहा कीं ॥ १२३ ॥ इहलोकींचें विषयसुख । तेणें सकळ भोगिलें देख । आणखी पुण्यकर्में अनेक । यज्ञादि केलीं तयानें ॥ १२४ ॥ शौर्य दावूनि केली कीर्ती । सत्त्वनिष्ठा राखिली वरती । त्यापरी उदंड जोडिली प्रीती । सकळ प्रजा जनांची ॥ १२५ ॥ अंतीं श्रीरामा ऐसा सुत । जयाचे पोटीं जन्मास येत । त्याचियाकारणें व्हावें दुःखित । कैसे परी कुमारा ॥ १२६ ॥ तयाचें उदंड पुण्यधन । म्हणोनि इंद्राचें अर्धासन । तेणें केलें संपादन । शोक कैंचा तदर्थ ॥ १२७ ॥ आणखी एक श्रवण करी । जीव हा सर्वदा निर्विकारी । तयास जन्मनाशादि परी । स्पर्शू न शकती कदाही ॥ १२८ ॥ शरीर तों जड निश्चित । अपवित्र आणि अशाश्वत । म्हणोनि विवेक पाहतां निमित्त । शोकास नाहीं सर्वथा ॥ १२९ ॥ परंतु पिता, माता कीं सुत । काळेंकरून होतां मृत । मूढ ते निजमस्तक ताडित । शोक करिती उदंड ॥ १३० ॥ सज्जनांचा होतां वियोग । मनीं उपजे संसारविराग । तेणें सहज शांतीचा योग । विवेकियांतें लाभतो ॥ १३१ ॥ हेंचि ऐसिया प्रसंगांत । साधून घ्यावें आत्महित । याविण निःसार या विश्वांत । काय जोडावें आणखी? ॥ १३२ ॥ लोकीं जन्मास आला जो कां । तयास मृत्यु ठेविला

निका । म्हणोनि जन्मल्या कोणीएका । मृत्यु टाळतां नये कीं * ॥ १३३ ॥ आणि जीवाचें जन्ममरण । त्याच्या कर्मानुसारेंचि जाण । ऐसी अंतरीं जाणतां खूण । दुःख कैसें वियोगीं ॥ १३४ ॥ अरे ब्रह्मांडें कित्येक कोटी । दडून गेलीं काळाचे पोटीं । हांऊन गेल्या कित्येक सृष्टी । नांवहि नुरलें जयांचें * ॥ १३५ ॥ सप्तही समुद्रांचें जळ । आटोनि, उघडे पडती तळ । तेथ कायसी कथा केवळ । क्षुद्र देहाची एकल्या * ॥ १३६ ॥ वृक्षाच्या चंचल पर्णावर । जैसें पडलें असावें नीर । तैसेंच आयुष्य क्षणभंगुर । केव्हां गळेल कळेना ॥ १३७ ॥ ऐसें हें सारेंचि अशाश्वत । हातीं काय येणार यांत । कवणासाठीं व्हावें दुःखित । सांग मजला कुमारा * ॥ १३८ ॥ जीव हा येवोनि एका शरीरीं । कर्में करितो नाना परी । मागुती त्या त्या कर्मानुसारीं । देह आणीक जोडितो ॥ १३९ ॥ तेथ कर्में करोनि आणिक । पुनः संपादी देह एक । यापरी देहाची संगति देख । जीवात्मयातें सदांची ॥ १४० ॥ जैसें अंगींचें एक वसन । जीर्ण जाणोनि घ्यावें नूतन । अथवा मोडोनि जीर्ण सदन । नूतन सिद्ध करावें ॥ १४१ ॥ त्यापरी क्षीण झालिया शरीर । नूतन देहाचा अंगीकार । जीव हा करितो वारंवार । येथ शोक किमर्थ ॥ १४२ ॥ आणखी पहातां आत्मयालागीं । जन्मणें मरणें नाहीं जगीं । क्षयवृद्धि ही त्याचिया अंगीं । स्पर्शूं न शके कदाही ॥ १४३ ॥ आत्मा षडभावविरहित । वरी देशकालांसी अतीत । सत्तामात्रेंचि सकळिकांत । भरूनि आहे राहिला * ॥ १४४ ॥ तयाचें

केवल ज्ञान रूप । म्हणोनि कदाहि न घडे लोप । सकळ आनंदाचें माप । हाचि आत्मा निश्चयें ॥ १४५ ॥ देह मन बुद्धयादिकांचा । साक्षी होऊन राहे साचा । तयास कोठें तुझिया शोकाचा । लाग लागेल सांग बा ॥ १४६ ॥ तो तंव एकचि सकळिकांत । गूढ-पणें आहे संस्थित । त्याचिया समस्वरूपांत । अवकाश कैचा आणिकां ॥ १४७ ॥ ऐसें आपुलें स्वरूप विमल । जाणोनि चिन्मात्र आणि केवल । सांडूनि शोकादि अज्ञानमल । कर्मे कराया उठावें ॥ १४८ ॥ तैलद्रोणीपासून सत्वर । काढोनि पित्याचें मृत शरीर । अंत्य कार्य शास्त्रानुसार । चाल कराया एधवां ॥ १४९ ॥ यापरी **वासिष्ठबोधामृत** । श्रवणीं पडतां कैकेयि-सुत । उत्साह धरून ऊठला त्वरित । विहितकर्मे कराया ॥ १५० ॥ मग गुर्वाज्ञेस अनुसरून । शवाचें विधियुक्त केलें दहन । अकरावियास घातलें भोजन । आदरें सहस्र द्विजांतें ॥ १५१ ॥ वेदाध्यायी आचारशील । ऐसे ब्राह्मण बोलवून सकल । तयांस पित्रोद्देशें विपुल । धनधान्यादि अर्पिलें ॥ १५२ ॥ कोणास दिव्य वस्त्रें दिलीं । कोणास रत्नें अर्पण केलीं । तैशींच गोदानें थोर भलीं । अर्पण केलीं कित्येकां ॥ १५३ ॥ ऐसे तोषवून याचकजन । मागुती कैकयीचा नंदन । श्रीरामचंद्रास आठवून । चिंता करीत राहिला ॥ १५४ ॥ श्रीराम सीता सुमित्रानंदन । तिघेहि वनास गेले निघून । आतां मजसि येथें राहून । सौख्य काय कशाचें ॥ १५५ ॥ माता कैकयी तों राक्षसी । परि-पूर्ण पातकाची राशी । दर्शनेंचि जाळिते अंतरासी । न लगे संगति तियेची ॥ १५६ ॥

जावेंचि आतां अरण्यांत । झालेंच माझें ऐसें निश्चित । गृह स्त्री आणि राज्य समस्त । सांडूनि जाणार वनीं मी ॥ १५७ ॥ जेथ नसे श्रीरघुनंदन । तेंचि जाणावें महा वन । तेथ नांदती ते ते जन । पशुच ऐसे गणावे ॥ १५८ ॥ श्रीराम नाहीं ऐसें स्थळ । तेंचि स्मशानभूमि केवळ । तेथ राहतां एक पळ । दाह होणार अवश्य * ॥ १५९ ॥ म्हणोनि जेथ श्रीरघुनाथ । निवास करितो सीतेसहित । तेंचि स्थान आनंदभरित । हाचि निश्चय जाणिजे ॥ १६० ॥ तेथ मी आतां जाईन देखा । पाहीन माझा श्रीरामसखा । त्याचि-या सेवेच्या महासुखा । पात्र होईन ये वेळीं * ॥ १६१ ॥ श्रीराम हाचि आनंदघन । राहतो तेंचि इंद्रभुवन । तयास स्वमुखें म्हणेल वन । ऐसें धैर्य कवणाचें * ॥ १६२ ॥ श्रीरामाच्या चरणापाशीं । राहती तेच पुण्यराशी । एर तीं संसाराचीं पिशीं । श्रीराम सांडोनि नांदती ॥ १६३ ॥ यापरी करीत असतां चिंतन । ध्यानीं रंगून गेलें मन । तेणें श्रीरामसुखेंकरून । दाटून गेला कुमार ॥ १६४ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १६५ ॥ श्रीराम ॥

## अध्याय १७ वा, भरतविलाप.

श्रीराम ॥ यावरी श्रीमान वसिष्ठ मुनी । एकदां पातले सभाभुवनीं । मग भरत-शत्रु-

घ्नालागुनी । दूत धाडूनि आणवी ॥ १ ॥ मग दोघांतें देऊनि आसन । भरतासि ऐसें बोले वचन । बा रे तुझिया पित्याचें कथन । पूर्ण करणें आमुतें ॥ २ ॥ म्हणोनि राज्यीं अभिषेक तुला । आम्हीं सर्वांहीं आजि योजिला । कैकेयीनें वर हा भूपाला- । पासूनि मागून घेतला ॥ ३ ॥ तेणेंहि आपलें पूर्व वचन । जाणून दिधलें अनुमोदन । म्हणोनि तूंतें सकळ जन । आम्ही बैसवूं पदीं या ॥ ४ ॥ तंव तत्काळ बोलला भरत । अहो मी आतांच जाईं वनांत । श्रीरामावांचूनि या राज्यांत । लाभ मातें कायसा ॥ ५ ॥ हा मी श्रीरामाचा किंकर । मजसि कासया राज्याधिकार । मी तंव उदईकचि कांतार । जाणार सेवावयातें ॥ ६ ॥ श्रीरामास आणूं आतां । संगें येतील माझ्या माता । तुम्हींहि संगें यावें ताता । एक कैकेयी न यो जी ॥ ७ ॥ ती एक राक्षसीच सर्वथा । तियेतें माता म्हणणें वृथा । अहो तिनें परलोकपथा । अवश्य धाडावी वाटतें ॥ ८ ॥ परी हें रामास होतां श्रुत । तयास अप्रिय होईल खचित । याच कारणें मी स्त्रियेचा घात । करूं न शकें एधवां ॥ ९ ॥ असो उदईक होतां प्रभात । वनीं जाणार मी निश्चित । शत्रुघ्न संगें आहे येत । तुमची इच्छा पहा जी ॥ १० ॥ नेसून राघवा ऐसीं वल्कलें । वनींचीं सेवूं कंद-मूळें । भूमिचि शयन हें आपुलें । करूनि राहूं व्रतस्थ ॥ ११ ॥ जेव्हां परतून येईल राम । तोंवरी हाच आमुचा क्रम । दोघेहि अखंड चालवूं नेम । देह पडतील तोंवरी ॥ १२ ॥ ऐसें भरताचें स्पष्ट वचन । ऐकतां सभेचे सकळ जन । तोषून ‘योग्य’ ‘योग्य’ म्हणून ।

प्रशंसा करिते जाहले ॥ १३ ॥ मग प्रभात होतां कुमार । सेवूं निघतां वनांतर । सुमंत्रें सकळ सेनासंभार । सिद्ध केला निघाया ॥ १४ ॥ कौसल्यादि राजस्त्रिया । वसिष्ठ आले संगें तयां । श्रीराम नयनीं पाहावया । पुरचि सर्व निघालें ॥ १५ ॥ मग जाऊन शृंगबेरीं । उतरले सकळ गंगातीरीं । तंव तें पाहूनि गुहाअंतरीं । विचार एक उदेला ॥ १६ ॥ म्हणे ऐसी घेऊनि सेना । भरत चालला जो कां वना । तेणें राघवाविषयीं मना । काय आणिलें कळेना ॥ १७ ॥ प्रेमभाव ठेवोनि पोटीं । चालला असेल भेटीसाठीं । तरी गंगेच्या उत्तर तटीं । जाऊं द्यावें तयातें ॥ १८ ॥ नातरी अन्य हेतु दिसतां । एथेंच रोधून ठेवूं आतां । वेढा देऊन तयाभोंवता । सकळ लोक मिळूनी ॥ १९ ॥ मग हें सांगून आपुल्या जनां । स्वयें निघाला भरत-दर्शना । भेटीकारणें घेऊनि नाना । सुंदर मधुर फळेंही ॥ २० ॥ तंव अंगीं लेइलीं वल्कलें । जटे ऐसे केस वळिले । ऐसे सन्मुख अवलोकिले । भरत-शत्रुघ्न गुहानें ॥ २१ ॥ दुःखें दाटले अंतःकरणीं । मुखीं चालली रामवाणी । ऐसा भरत देखतां क्षणीं । प्रणाम केला गुहानें ॥ २२ ॥ तंव तयास तत्काळ उठवून । भरतें दिधलें आलिंगन । मग कुशल वृत्त पुसून । ऐसें बोलला तयातें ॥ २३ ॥ सखया येथ येऊन तुला । श्रीरघुवीरें सहवास दिला । वरि धरून तुज हृदयाला । नयनीं आसवें गाळिलीं * ॥ २४ ॥ एसिया तुझें हें भाग्य किती । धन्यता केवढी म्हणावी अती । अहो जयासी सीतापती । गोष्टी करीत राहिला * ॥ २५ ॥ बा रे श्रीराम रघु-

नंदन । कोठें भेटला तुजलागुन । तयानें कोठें केलें शयन । सीतादेवीसमेत ॥ २६ ॥ रामें पावन केलीं स्थळें । तीं तीं मजसि इये वेळे । दावून मित्रा, माझे डोळे । निववी बापा सत्वरीं ॥ २७ ॥ रामाचें प्रेम तुझियावरती । तुझीहि रामीं बहुत प्रीती । तुझिया ऐशा भाग्याप्रती । लाभेन बा मी केधवां? ॥ २८ ॥ ऐसी रामप्रेमाची माधुरी । सेवन करितां नाना परी । भरत सद्गद होऊन अंतरीं । नयनीं प्रेमाश्रु पातले ॥ २९ ॥ मग रामें शयन केल्या ठिकाणीं । गुहें तयास नेलें झणीं । तंव तें रचियलें वृक्षपर्णीं । तैसेंचि झाले पाहते ॥ ३० ॥ तेथ सीतेच्या अंगींचें सुवर्ण । घसवटून चिन्हित झालें तृण । पाहतां भरताचें अंतःकरण । परम व्याकुळ जाहलें ॥ ३१ ॥ मग कळवळून म्हणे तत्काळ । कैसा हो जन्मलों मी चांडाळ । सीता देवीस ऐसी वेळ । माझ्याच निमित्तें पावली ॥ ३२ ॥ अहो ही सुकुमार राजबाळा । कैसी पहुडली तृणशेजेला । जियेची शय्या परम मृदुला । रत्नपर्यंकीं असावी ॥ ३३ ॥ अहो ही सीता आणि राम । तृण-शय्येस घेती विश्राम । अरेरे तयांस व्हाया श्रम । मीचि निमित्त जाहलों ॥ ३४ ॥ कैकेयी जी पापराशी । माझा जन्म तियेचे कुशीं । धिक्कार असो ऐसियासी । खळ जो शिणवी राघवा ॥ ३५ ॥ अहो धन्य हा सुमित्रासुत । तेणें सार्थकीं लाविलें जीवित । आनंदानें गेला वनांत । श्रीरामाचे संगतीं ॥ ३६ ॥ तयांची किंकर-किंकरता । मजला भाग्यें प्राप्त होतां । तयीं मी आपुली सार्थकता । निःशंक झाली म्हणेन ॥ ३७ ॥ मित्रा श्रीराम कवणे

ठाया । राहतो आजि, तें सांग सया । तयास परतून आणावया । आतांच जाईन त्वरें मी ॥ ३८ ॥ यापरी ऐकतां भरतवचन । गुहाचा संशय गेला विरून । म्हणे हो याचें निष्पाप मन । लेश नाहीं मलाचा ॥ ३९ ॥ मग अंतरीं दाटून स्नेह । तयासी बोलता झाला गुह । म्हणे या विश्वांत निःसंदेह । तूंचि धन्य कुमार ॥ ४० ॥ श्रीराम सीता लक्ष्मण । अखंड देऊन राहिले ठाण । ऐसें तुझें अंतःकरण । प्रेमभक्तीनें दाटलें ॥ ४१ ॥ असो; श्रीरामदर्शनाकारण । सारेचि जाऊं चला आपण । तयाचा निवास आहे जाण । चित्रकूटाच्या प्रदेशीं ॥ ४२ ॥ श्रीराम सीतालक्ष्मणांनिशीं । मंदाकिनीच्या तीरापाशीं । राहिला होऊन आश्रमवासी । सौख्य सेवीत वनींचें ॥ ४३ ॥ मग जावयालागीं गंगापार । पांचशें नौका आणिल्या सत्वर । त्यांत एक राजनौका सुंदर । स्वयेंचि तेणें आणिली ॥ ४४ ॥ मग भरत-शत्रुघ्न दोघे सुत । सकळ मातांशीं समवेत । आणि वसिष्ठहि नौके आंत । आरूढ झाले सर्वेचि ॥ ४५ ॥ मग गंगेस ओलांडूनी । गेले कांहीं मार्ग क्रमूनी । तंव भरद्वाज-आश्रमस्थानीं । सकळ जाऊन पोंचले ॥ ४६ ॥ तेथ आपुली सेना विस्तृत । बाह्य प्रदेशीं करूनि स्थित । प्रविष्ट जाहले आश्रमांत । दोघे कुमार मुनींच्या ॥ ४७ ॥ तेथ तपस्तेजाचा दिनकर । ऐसा सन्मुख पाहोनि मुनिवर । आदरें साष्टांग नमस्कार । पायीं घातला तयांहीं ॥ ४८ ॥ तयीं हे जाणून दशरथसुत । मुनि संतुष्ट झाला बहुत । मग तयांचें आतिथ्य करीत । परम प्रेमें करोनी ॥ ४९ ॥ तयीं तो मस्तकीं

जटाभार । आणि वल्कलें अंगावर । पाहोनी पुसता झाला सत्वर । मुनि तो राजकुमारा ॥ ५० ॥ बा रे तूं तों अयोध्यापती । राज्यकर्ता व्हावास संप्रती । तया तुज ही वल्कल-प्रीती । कोठून उदेली एधवां ॥ ५१ ॥ आणि ऐसें हें घोर वन । संन्यासी मुनींचें निवासस्थान । तेथ तुझें हें आगमन । आजि कोठून जाहलें ॥ ५२ ॥ ऐसें वचन करितां श्रवण । तत्काळ भरताचें अंतःकरण । कळवळून, नेत्रहि अश्रुपूर्ण । होऊन वाहूं लागले ॥ ५३ ॥ मग म्हणे, देव सर्वांतरांत- । राहती जाणती सकळ मात । वरी मजलागीं पुसून घेत । कृपाचि हे मी मानितों ॥ ५४ ॥ अहो हा कैकेयीचा बेत । मज मुळींच नव्हता विदित । विघ्न आणून अभिषेकांत । वनीं धाडावें राघवा ॥ ५५ ॥ देवा, हेचि आपुले चरण । माझिया शब्दालागीं प्रमाण । ऐसें बोलतां तेच क्षण । पाय स्पर्शिले तयानें ॥ ५६ ॥ तेधवां तयाचें हृदयस्थान । आलें अत्यंत कळवळून । मग तैसाचि दुःखें भरून शब्द बोलला मुनींतें ॥ ५७ ॥ देवेंचि माझें अंतःकरण । शोधून पाहावें परिपूर्ण । शुद्ध-अशुद्धपणाची खूण । देवांस ठावी सर्वथा ॥ ५८ ॥ सांडूनि श्रीराम आनंदघन । आम्हांस कासया राज्यादि धन । हेंचि आमुचें शाश्वत धन । श्रीरामसेवा करावी* ॥ ५९ ॥ म्हणोनि मुने मी जाऊन सत्वर । घालून रामास नमस्कार । अर्पण करितों राज्याधिकार । सर्वहि पायीं तयाच्या ॥ ६० ॥ मग अयोध्येस नेऊनि तया । आसनीं बैसवीन रायाचिया । आणि सेवीत राहीन पायां । किंकर होऊन सदैव ॥ ६१ ॥ यापरी ऐकोनि भरतवचन ।

मुनीचें संतुष्ट झालें मन । मग प्रीतीनें हृदयीं धरून । आलिंगन दे तयातें ॥ ६२ ॥ मागुती तयास गौरवून । मुनीनें ऐसें केलें वचन । वत्सा, हेंच येणार घडून । पूर्वींच आम्हां ठाउकें ॥ ६३ ॥ असो, तूं आतां सांडी शोक । तुझीच भक्ति जाण अधिक । हृदयीं राहिला रघुनायक । लक्ष्मणापरीस तुझ्या कीं ॥ ६४ ॥ आतां तुम्ही सकळ जन । माझिया आश्रमीं घ्यावें भोजन । मग उदयीक रघुनंदन- । दर्शनालागीं निघावें ॥ ६५ ॥ मग 'जें आपुलें मनोगत । तैसेंच वर्तणें आम्हां उचित'। ऐसें भरतें बोलोनि त्वरित । मान्यता दिधली मुनीतें ॥ ६६ ॥ मग मुनीनें केलें मार्जन । सर्वांचि स्वीकारिलें मौन । मग होमगृहीं प्रवेशून । कामधेनूतें दोहिलें ॥ ६७ ॥ जें जें ज्याच्या अंतःकरणीं । तें तें तयास पुरवी झणीं । तिये कामधेनूस दोहितांक्षणीं । सर्व वांछित पावलें ॥ ६८ ॥ तयीं ते सकळ सैनिक जन । इच्छेनुसार पावले भोजन । वांछा धरील जी जी मन । ती ती संपूर्ण होतसे ॥ ६९ ॥ वसिष्ठाचा केला आदर । भरताचें तोषविलें अंतर । ऐसा उदंड केला सत्कार । मुनीनें धेनु-प्रसादें ॥ ७० ॥ मग आश्रमीं रात्र क्रमून । प्रभातीं झालिया सावधान । भरत-शत्रुघ्नांहीं जाऊन । वंदन केलें मुनीतें ॥ ७१ ॥ मग निरोप घेऊनि सत्वर । मार्गीं लागले दोघे कुमर । संगें सकळ सेनासंभार । तोही चालला पुढारा ॥ ७२ ॥ मग पावतां चित्रकूट-प्रदेशीं । तेथेंच ठेवूनि सकळिकांशीं । शोधावयास रामाश्रमासी । भरत शत्रुघ्न निघाले ॥ ७३ ॥ गुहास आणिक सुमंत्राप्रती । संगें घेऊन शोध करिती ।

सकळ वनांत शोधूनी पाहती । परी श्रीराम नाकळे ॥ ७४ ॥ मग उदंड झालिया शिण । मुनींस करितात विचारण । श्रीराम सीता लक्षुमण । कोठें असती मुनी हो ॥ ७५ ॥ तईं मुनींहीं केलें उत्तर । अहो जी येथेंच श्रीरघुवीर । राहतो तुमच्याचि नयनांसमोर । तुम्हांस कैंचा कळेना ॥ ७६ ॥ तयाची नाहीं ठाउकी खूण । म्हणोनि पावतसां जी शीण । तरी हें आम्ही करितों भाषण । ध्यानीं घ्यावें नेमक ॥ ७७ ॥ चित्रकूटाच्या पुढील देशीं । मंदाकिनीचे तीरापाशीं । श्रीराम सीतालक्ष्मणांनिशीं । एके आश्रमीं राहतो ॥ ७८ ॥ भोंवतीं दाटले आंबे फणस । ज्यांवरी उदंड फळांचे घोंस । आणखी चंपक केळी बहुवस । अत्यंत सुंदर शोभती ॥ ७९ ॥ यापरी सुरम्य दाटलें वन । तेथ राहे रघुनंदन । ऐसिया खुणेनें करितां गमन । आश्रमीं पावाल तयाच्या ॥ ८० ॥ अहो हा अहंकार चित्रकूट । हाचि रामाची रोधी वाट । तयास पायीं घालोनि नीट । मंदाकिनीतें वळावें* ॥ ८१ ॥ शुद्ध बुद्धि ही मंदाकिनी । सर्व निर्मलतेची जननी । तियेचेपाशीं एकांतस्थानीं । आत्माराम पाविजे* ॥ ८२ ॥ भोंवतीं दाटलें जें कां वन । तेंचि संकल्पयुक्त मन । त्यातें वर्जून श्रीरघुनंदन । अंतर्यामांत पाहावा * ॥ ८३ ॥ श्रीरामाचें आश्रमस्थान । लोभवी सकळिकांचें मन । म्हणोन तेथ बहुत मुनिजन । जाऊन विश्राम पावती ॥ ८४ ॥ मग ती मुनींची घेऊनि खुण । भरतें केलें मार्गक्रमण । आणि पाहूनि सीतारमण । परमानंदा पावला ॥ ८५ ॥ ऐशी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवण-

पथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८६ ॥ श्रीराम ॥ १७ ॥

## अध्याय १८ वा, भरतभेट.

श्रीराम ॥ श्रीरामाचें आश्रमस्थळ । परम पवित्र आणि मंगळ । तयाच्या प्राप्त होतां जवळ । हर्ष वाटला कुमारां ॥ १ ॥ तेथ श्रीरघुवीराचीं पदें । ठायींठायीं उमटलीं विशदें । अवलोकितांच परमानंदें । भरत अंतरीं दाटला ॥ २ ॥ वज्र अंकुश आणि कमळ । ध्वजादिकांचीं चिन्हें सकळ । भूमीवरी उमटलीं मंगळ । पदमुद्रेंत प्रभूच्या ॥ ३ ॥ त्यांहीं शोभवूनि भूमितळ । केलें परम पवित्र मंगळ । ऐशी रघुवीरपादधूळ । पाहतां शिरसा वंदिली ॥ ४ ॥ मग तत्काळ टाकूनि शरीर । लोळूं लागला धरणीवर । रघुनाथभक्तीचा येऊन पूर । शंका लज्जा पळाली ॥ ५ ॥ परमपावन श्रीरामचरण । त्यांहीं स्पर्शिले धूलिकण । तेहि अत्यंत पवित्र जाण । थोर भाग्य तयांचें ॥ ६ ॥ तयांहीं स्पर्शितां आपुली काया । दोष राहील कोणे ठाया । म्हणोनि श्रीरामें वरावया । पात्र होईल अवश्य ॥ ७ ॥ म्हणोनि श्रीपादरजःकण । भरतें सर्वांगीं केले धारण । म्हणे ही परमसुखाची खाण । आजि मजला लाधली ॥ ८ ॥ अहो मी धन्य त्रैलोक्यांत । माझें भाग्य थोर खचित । माझिया अंगास स्पर्श होत । रामपायांच्या रजांचा ॥ ९ ॥ जयाचें सौख्य देवादिकांही ।

उदंड शोधितां लाधलें नाहीं । रितेच परतूनि आले पाहीं । वेद चारीहि वृथैव ॥ १० ॥ यापरी श्रीरामभक्तीचा रस । दाटला भरताचे हृदयास । मग पावूनि अश्रुरूपास । बाहेर वाहूं लागला ॥ ११ ॥ सारखे पाझरती लोचन । ओघ चालला वदनावरून। तेणें सकळहि हृदयस्थान । स्नान केलेंसें जाहलें ॥ १२ ॥ तैसाचि प्रेममदें डोलत । संथपणें मार्ग क्रमीत । पावला श्रीराम-आश्रमा-आंत । भक्तराजा श्रीभरत ॥ १३ ॥ तेथ श्रीराम राजीवनयन । श्यामल सुकुमार मनमोहन । सुहास्य आणि प्रसन्नवदन । सन्मुख होता बैसला ॥ १४ ॥ वल्कलें लेयिला अंगावर । मस्तकीं शोभे जटाभार । संगें सीता लक्ष्मण वीर । सेवेकारणें तिष्ठती ॥ १५ ॥ ऐसा श्रीराम सीतारमण । दृष्टीस पडतां, न लगतां क्षण । धांवून भरतें तयाचे चरण । परम प्रेमें वंदिले ॥ १६ ॥ तंव रामें तयातें ऊठवून । प्रीतीनें दिधलें आलिंगन । प्रेमाश्रूंहीं नयनें भरून । अभिषेक केला तयातें ॥ १७ ॥ तंव तयांच्या माता तत्काळ । तेथ येत्या झाल्या सकळ । जैशी धावे प्यावया जळ । गाय तान्हेली उन्हाची ॥ १८ ॥ मग राघवें तत्काळ उठून । कौसल्येतें केलें वंदन । मग तैशाच क्रमेंकरून । सकळ माताहि वंदिल्या ॥ १९ ॥ रामें वंदन कारितां क्षणीं । कौसल्येचे अंतःकरणीं । दुःखावेगें केली दाटणी । दाबूं न शके बळानें ॥ २० ॥ इतुक्यामाजी वसिष्ठमुनी । प्राप्त जाहले तये स्थानीं । तयीं श्रीरामें पुढता होउनी । साष्टांग वंदिलें तयांतें ॥ २१ ॥ मग आपणासी धन्य म्हणून । सर्वांस आसनीं बसवून । रामें वसिष्ठांस केला

अ० ९

पथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८६ ॥ श्रीराम ॥ १७ ॥

## अध्याय १८ वा, भरतभेट.

श्रीराम ॥ श्रीरामाचें आश्रमस्थळ । परम पवित्र आणि मंगळ । तयाच्या प्राप्त होतां जवळ । हर्ष वाटला कुमारां ॥ १ ॥ तेथ श्रीरघुवीराचीं पदें । ठायींठायीं उमटलीं विशदें । अवलोकितांच परमानंदें । भरत अंतरीं दाटला ॥ २ ॥ वज्र अंकुश आणि कमळ । ध्वजादिकांचीं चिन्हें सकळ । भूमीवरी उमटलीं मंगळ । पदमुद्रेंत प्रभूच्या ॥ ३ ॥ त्यांहीं शोभवूनि भूमितळ । केलें परम पवित्र मंगळ । ऐशी रघुवीरपादधूळ । पाहतां शिरसा वंदिली ॥ ४ ॥ मग तत्काळ टाकूनि शरीर । लोळूं लागला धरणीवर । रघुनाथभक्तीचा येऊन पूर । शंका लज्जा पळाली ॥ ५ ॥ परमपावन श्रीरामचरण । त्यांहीं स्पर्शिले धूलिकण । तेहि अत्यंत पवित्र जाण । थोर भाग्य तयांचें ॥ ६ ॥ तयांहीं स्पर्शितां आपुली काया । दोष राहील कोणे ठाया । म्हणोनि श्रीरामें वरावया । पात्र होईल अवश्य ॥ ७ ॥ म्हणोनि श्रीपादरजःकण । भरतें सर्वांगीं केलें धारण । म्हणे ही परमसुखाची खाण । आजि मजला लाधली ॥ ८ ॥ अहो मी धन्य त्रैलोक्यांत । माझें भाग्य थोर खचित । माझिया अंगास स्पर्श होत । रामपायांच्या रजांचा ॥ ९ ॥ जयाचें सौख्य देवादिकांही ।

उदंड शोधितां लाधलें नाहीं । रितेच परतूनि आले पाहीं । वेद चारीहि वृथैव ॥ १० ॥ यापरी श्रीरामभक्तीचा रस । दाटला भरताचे हृदयास । मग पावूनि अश्रुरूपास । बाहेर वाहूं लागला ॥ ११ ॥ सारखे पाझरती लोचन । ओघ चालला वदनावरून । तेणें सकळहि हृदयस्थान । स्नान केलेंसें जाहलें ॥ १२ ॥ तैसाचि प्रेममदें डोलत । संथपणें मार्ग क्रमीत । पावला श्रीराम-आश्रमा-आंत । भक्तराजा श्रीभरत ॥ १३ ॥ तेथ श्रीराम राजीवनयन । श्यामल सुकुमार मनमोहन । सुहास्य आणि प्रसन्नवदन । सन्मुख होता बैसला ॥ १४ ॥ वल्कलें लेयिला अंगावर । मस्तकीं शोभे जटाभार । संगें सीता लक्ष्मण वीर । सेवेकारणें तिष्ठती ॥ १५ ॥ ऐसा श्रीराम सीतारमण । दृष्टीस पडतां, न लगतां क्षण । धांवून भरतें तयाचे चरण । परम प्रेमें वंदिले ॥ १६ ॥ तंव रामें तयातें ऊठवून । प्रीतीनें दिधलें आलिंगन । प्रेमाश्रूंहीं नयनें भरून । अभिषेक केला तयातें ॥ १७ ॥ तंव तयांच्या माता तत्काळ । तेथ येत्या झाल्या सकळ । जैशी धांवे प्यावया जळ । गाय तान्हेली उन्हाची ॥ १८ ॥ मग राघवें तत्काळ उठून । कौसल्येतें केलें वंदन । मग तैशाच क्रमेंकरून । सकळ माताहि वंदिल्या ॥ १९ ॥ रामें वंदन करितां क्षणीं । कौसल्येचे अंतःकरणीं । दुःखावेगें केली दाटणी । दाबूं न शके बळानें ॥ २० ॥ इतुक्यामाजी वसिष्ठमुनी । प्राप्त जाहले तथें स्थानीं । तयीं श्रीरामें पुढता होउनी । साष्टांग वंदिलें तयांतें ॥ २१ ॥ मग आपणासी धन्य म्हणून । सर्वांस आसनीं बैसवून । रामें वसिष्ठांस केला

अ० ९

प्रश्न । पितयासंबंधीं आपुल्या ॥ २२ ॥ म्हणे जी ताताचें वृद्धपण । तयांत एतुलें दुःख कठिण । म्हणोनि तयांचें सुखरूपपण । मजासि सत्वर ऐकवा ॥ २३ ॥ निघते वेळीं आम्हांकारणें । काय सांगीतलें जी तेणें । यापरी पुसतां वसिष्ठ म्हणे । वत्सा ऐक कथा ती ॥ २४ ॥ तुझिया वियोगाचा घाय । अत्यंत असह्य होऊन राय । राम-रामेति हाय हाय । करितां स्वर्गास पावला ॥ २५ ॥ तेधवां कर्णीं खोंचला शूल । ऐसे मुनींचे ऐकोनि बोल । श्रीराम अत्यंत दुःखाकुल । होऊन रडूं लागला ॥ २६ ॥ सवेंचि सीता आणि लक्ष्मण । रडूं लागले दोघेजण । वज्रपातचि झाला दारुण । ऐसें सर्वांतें जाहलें ॥ २७ ॥ हा हा आमुतें सोडून ताता । कोठें गेलां हो अवचितां । आम्हां बाळांस कोणीच आतां । त्राता नाहीं जगीं या ॥ २८ ॥ यापरी शोकें तिघेहि जण । व्यापिले पाहूनि परिपूर्ण । वसिष्ठें बोधाचें करून भाषण । सांत्वन केलें तयांचें ॥ २९ ॥ मग मंदाकिनीस जाउन । सकळिकांहीं सारिलें स्नान । मागुती रायास पिंडदान । दिधलें शास्त्रानुसारें ॥ ३० ॥ आपणास जें तेंचि पितराप्रती । ऐशी जाणूनि मनुस्मृती । इंगुदी-फलांचा गीरच अती- । आवडी त्यांहीं अर्पिला ॥ ३१ ॥ तेधवां नेत्रीं चाललें नीर । मग तैसेच उठोनि सत्वर । पुनरपि स्नानें करोनि वर । आश्रमीं येऊन ठाकले ॥ ३२ ॥ सकळिकांहीं याच परी । बहुत शोक केलियावरी । स्नानें करोनि दिवसभरी । उपवासी होऊन राहिले ॥ ३३ ॥ दुसरे दिवशीं प्रातःकाळीं । स्नानें करूनि आली मंडळी । मग जाऊन राघवाजवळी ।

भरत बोले तयातें ॥ ३४ ॥ म्हणे जी राघवा आनंदघना । कासया आतां जासी वना । आपुल्या पित्याच्या शोभवी स्थाना । अभिषेक करोनि आपणा ॥ ३५ ॥ ज्येष्ठ भ्राता पितयासम । ऐसा सर्व शास्त्रांचा नेम । म्हणोनि पितयामागें राम । तुवांचि राज्य करावें ॥ ३६ ॥ आणि प्रजेचें कल्याण जगीं । हेंचि कर्तव्य क्षत्रियांलागीं। तयांहीं श्रीहरि यज्ञ-यागीं । पूजून संतुष्ट करावा ॥ ३७॥ मागुती संपादून सुतां । त्यांवरी टाकून राज्यसत्ता । मगाचि वनीं निघावें ताता । ऐसें महात्मे सांगती ॥ ३८ ॥ म्हणोनि माझी प्रार्थना तुला। कीं परतून यावें पुराला । आतांचि वनीं राहावयाला । उचित काळ नव्हे कीं ॥ ३९ ॥ माझिया मातेची दुष्ट कृती । आतां न बोरे वागवों चित्तीं । प्रसन्न होऊन माझियावरती । ऐसी क्षमा करावी ॥ ४० ॥ ऐसें तेणें करोनि भाषण । सवेंचि घातलें लोटांगण । आणि धरून श्रीरामचरण । आदरें मस्तकीं वंदिले ॥ ४१ ॥ मग रामें तयातें ऊठवोनी । बैसविलें निज निकटस्थानीं । मग अश्रूंहीं नेत्र भरूनी । बोलूं लागला तयासी ॥ ४२ ॥ म्हणे त्वां जें म्हणितलें । तेंचि शास्त्रीं आहे बोलिलें । परी जें तातें आज्ञापिलें । तें न येई त्यजाया ॥ ४३ ॥ तेणें मजसि आहे कथित । कीं राज्य भरतास केलें अर्पित । तुवां चतुर्दश वर्षेंपर्यंत । वनीं जावोनि राहावें ॥ ४४ ॥ म्हणोनि राज्याचा तूंचि धनी । आणि म्यांचि जाणें योग्य वनीं । पित्याचा शब्द यत्नेंकरोनी । पाळणें कर्तव्य आपुलें ॥ ४५ ॥ सांडू-निया पित्याचें वचन । मूढ जो स्वैर करी वर्तन । त्यातें नरकचि निश्चयेंकरून । मृतचि

जाणावें तयातें * ॥ ४६ ॥ मग यावरी बोलला भरत । एथ हें बोलणें नाहीं उचित । तात नव्हतेचि सावध-चित्त । आज्ञा देते प्रसंगीं ॥ ४७ ॥ व्यापिले होते कामें करून । म्हणोनि स्त्रियेनें घेतले गोवुन । ऐशा तयांचें आज्ञावचन । प्रमाण कैसें म्हणावें ॥ ४८ ॥ यावरी रामें करोनि स्मित । ऐसें भाषण केलें परत । बा रे तुझे हे शब्द खचित । अयोग्य होती पाहतां ॥ ४९ ॥ तात नव्हते बापा स्त्रीजित । कामेंहि नव्हते केले भ्रांत । एकाचि भाव त्यांचिया मनांत । असत्य अंगीं न लागो ॥ ५० ॥ सज्जनांलागीं नरकवास । तोहि एकदां सुसह खास । परी असत्य शिवतां अंगास । त्यांसि असह्य होतसे * ॥ ५१ ॥ म्हणोनि नृपें बोलिलें वचन । तें मी सिद्धीस पाववीन । रघूच्या कुळीं पावूनि जनन । असत्य कैसें करावें ॥ ५२ ॥ ऐसें ऐकोन श्रीरामवचन । भरत म्हणे मग मीच जाउन । चतुर्दश वर्षे सेवितों वन । तुवां राज्य करावें ॥ ५३ ॥ यावरी बोलला श्रीरघुनाथ । आज्ञा तैशीच पाळणें उचित । ऐसा पालट करितांहि त्यांत । असत्य कांहीं टळेना ॥ ५४ ॥ तेधवां आपुलें हें वांछित । नाहीं प्रभूचे मनास येत । ऐसें पाहोनि तो थोर भक्त । अंतीं बोलला तयातें ॥ ५५ ॥ तरी मी येतों तुझियासवें । लक्ष्मणा ऐसा राहीन सेवे । नातरी वाचून काय जीवें । अग्निच आतां सेवितों ॥ ५६ ॥ मग तैशाचि निश्चयें जाण । रचिलें दर्भाचें आस्तरण । त्यावरी घालून आपुलें ठाण । पूर्वाभिमुख तो बैसला ॥ ५७ ॥ तंव ती सिद्धता पाहतां नयनीं । श्रीराम बहुत विस्मय पावुनी । त्यातें उमज द्यावया

मनीं । खूण देई गुरूंतें ॥ ५८ ॥ तेधवां एकांत साधूनि मुनी । तयास सांगे, बाळ! वनीं- । यावयाचा आग्रह धरूनी । तुवां न विघ्न करावें ॥ ५९ ॥ श्रीराम प्रत्यक्ष नारायण । भूलोकीं जाहलासे अवतीर्ण । सीताचि योगमाया जाण । शेष लक्ष्मण जाहला ॥ ६० ॥ रावणाचिया वधास्तव । प्रार्थिता झाला ब्रह्मदेव । म्हणोनि घेऊनि देहभाव । वधार्थ आहे चालला ॥ ६१ ॥ कैकेयीनें मागोनि वर । कर्म केलें जें ऐसें कठोर । तयास स्वयेंचि श्रीरघुवीर । निमित्त आहे प्रभु हा ॥ ६२ ॥ अंतर्यामीच रघुनंदन । प्रेरी सकळिकांचें मन । तेणेंविण एकहि जन । वर्तूं न शके स्वबुद्धया * ॥ ६३ ॥ म्हणोनि रामें परतून याया । बाळ, आग्रह न धरी वायां । सकळ सेनेस घेऊन, सया ! । जाईं परतून पुरीतें ॥ ६४ ॥ ऐसें ऐकतां वसिष्ठवचन । विस्मित जाहला कैकेयीनंदन । सर्वेचि प्रफुल्ल होऊन नयन । राघवासंनिध पातला ॥ ६५ ॥ मग घेऊनि पादुका हातीं । ठेवी श्रीरामचरणांपुढती । म्हणे जी देवा पूजनाप्रती । पादुका देईं मला या ॥ ६६ ॥ यांतें राज्यीं संस्थापून । सर्व वृत्तांत निवेदीन । आणि येशील तूं परतून । तंव सेवीन सुखानें ॥ ६७ ॥ मग त्यांसि रामें स्पर्शितां । पादुका जाहला स्वीकारिता । मागुती पायीं ठेवोनि माथा । अत्यंत सद्गद जाहला ॥ ६८ ॥ त्यावरी बोले रघुपतीसी । चतुर्दश वर्षांतीं प्रथम दिशीं । सांडीन मी या शरीरासी । तूं न भेटीस पावतां ॥ ६९ ॥ यापरी भरतें बोलतां मात । राघवें मान्य केलें त्वरित । मग सकळहि सेनेसमेत । भरत अयोध्ये निघाला ॥ ७० ॥

शत्रुघ्न आणि वसिष्ठ मुनी । सुमंत्र आणि सकळ जननी । रघुवीराचा निरोप घेउनी । अयोध्येलागीं निघाले ॥ ७१ ॥ तेधवां कैकेयीचे नयन । आसवांहीं आले भरून । पश्चात्तापें दाटूनि मन । प्रार्थिती झाली राघवा ॥ ७२ ॥ म्हणे मी देवा, अत्यंत दुष्ट । मोहेंचि होऊनि बुद्धि भ्रष्ट । तुजसि ऐसे द्यावया कष्ट । कारण जाहलें नेणतां ॥ ७३ ॥ अपराध माझा परम घोर । परी तूं करुणेचा सागर । पोटीं घेऊनि देईं धीर । हेंचि तूंतें मागतें ॥ ७४ ॥ जो श्रीपरमात्मा सनातन । अव्यक्त राहे सर्वांसि व्यापून । तोचि तूं विष्णु श्रीभगवान । मायाधीश ईश्वर ॥ ७५ ॥ तुवां मायेनें धरिली काया । संकल्प हेचि जाणिजे माया । म्हणोनि संकल्परूपा तुझिया- । देहीं सत्यता न ये कीं ॥ ७६ ॥ परी हा ज्ञात्यांचा अंतर्भाव । मूढांस न कळे तुझी माव । तेणें तुझा हा देहादि भाव । सत्याचि सर्वां भासतो ॥ ७७ ॥ देवा तूंचि सर्वांचा चालक । तुवांचि प्रेरिजती सारे लोक । इष्ट-अनिष्ट कर्में अनेक । तुझ्याच योगें चालती * ॥ ७८ ॥ हें सर्व विश्व तुझिया करीं । परतंत्र होऊनि राहिलें हरी । म्हणोनि आपुल्याच इच्छेपरी । वर्तूं न शके सर्वथा ॥ ७९ ॥ सूत्रधाराच्या इच्छेपरी । बाहुली जैसी नाच करी । तैशीच माया हीं तुझिया करीं । तुझिया सत्तेनें चालते ॥ ८० ॥ तुंवाचि देवकार्य जाणूनि मनीं । प्रसंगीं प्रेरिली ही मी जननी । तेणेंचि ऐसें मजकडोनी । कर्म घडलें अघोर ॥ ८१ ॥ देवादिकांहि ज्याचे चरण । दृष्टीस पडणें परम कठीण । तो हा साक्षात लक्ष्मीरमण ।

मजला प्रत्यक्ष जाहला ॥ ८२ ॥ म्हणोनि देवा श्रीरघुवीरा । जगज्जनका विश्वेश्वरा । सकळ भवभयसंहारकरा । नमन तूतें असो हें ॥ ८३ ॥ पुत्र, प्रासाद आणि धन । यांवरी चित्त गेलें जडून । म्हणोन तुझें स्वरूपज्ञान । करून देईं दयाळा ॥ ८४ ॥ ज्ञानखड्गींच आहे बळ । बंधनें छेदावया सकळ । म्हणोनि ज्ञानाचि वांछूनि विमळ । शरण आलें पदीं या * ॥ ८५ ॥ यापरी कैकेयीचें वचन । श्रवण होतां रघुनंदन । किंचित स्मित-वदनें करून । उत्तर करीत तियेतें ॥ ८६ ॥ मातें, तुवां जें बोलिलें वच । तें तें तैसेंच आहे साच । तुजसि बोलविलें मींच । अभिषेकाचे प्रसंगीं ॥ ८७ ॥ देवकार्य व्हावया-स्तव । मींच वाणीस प्रेरिलें तव । म्हणोनि तुझिये अंगीं लव । दोष नाहीं तयाचा ॥ ८८ ॥ आतां परतोन जाईं क्षेम । अंतरीं ठेवीं माझें प्रेम । येणें निरसून अज्ञानभ्रम । बंध सर्व सुटेल ॥ ८९ ॥ मी तों सर्वत्र समदृष्टीचा । मजसि प्रिय कीं अप्रिय कैंचा । भाव जैसा ज्या अंतरींचा । तैसाचि मीहि तयातें * ॥ ९० ॥ मूढांस वाटे ऐसें मनीं । श्रीराम राज्यास अंतरोनी । कष्टत फिरत राहे वनीं । परी तें अज्ञान तयांचें ॥ ९१ ॥ पाहतां माझी स्वरूपखूण । मिथ्याच माझें देह-धारण । तत्त्व हें अंतरीं जाणतां पूर्ण । भयाचि नाहीं तयातें ॥ ९२ ॥ म्हणोनि ऐशी ज्ञानकला । जी कां लाभली आजि तुला । ह्याचि भाग्यसूर्य उदेला । ऐसेंचि माते जाणिजे ॥ ९३ ॥ हेचि स्मृति ठेवूनि अंतरीं । सुखें तूं अंबे राहीं घरीं । स्मरूनि वर्ततां या संसारीं । लेप लागूं शकेना ॥ ९४ ॥ या-

परी रामाचें बोधवचन । ऐकूनि बहुत तोषलें मन । आणि सर्वांचि सर्व अज्ञान । निरस्त झालें तियेचें ॥ ९५ ॥ मग राघवातें आदरें नमुनी । आनंदें पूर्ण दाटूनी मनीं । एरी पातली आपुले सदनीं । सर्व मंडळीसमेत ॥ ९६ ॥ मग सकळ लोक आणि सेना । पाववून आपापुल्या सदना । आपण नंदीग्रामस्थाना । भरत जाऊनि राहिला ॥ ९७ ॥ तेथ श्रीरामपादुका दोनी । स्थापन करूनि सिंहासनीं । नित्य नेमें त्यांचिया पूजनीं । चित्त गोंविलें तयानें ॥९८॥ गंध पुष्पें अक्षतादिक । राजोपचार अर्पोनि अनेक । प्रेमें पूजी, रघुनायक-। ऐसाचि भाव धरूनी ॥ ९९॥ अंगीं ल्यावया वल्कलें । भोजनासाठीं कंदमूळें । शय्येलागीं भूमितळें । मस्तकीं जूट जटेचा ॥ १००॥ ऐसें इंद्रियांचें दमन। आणि चित्ताचें संयमन । वरी अखंड रघुनाथध्यान । धरून चित्तीं राहिला * ॥ १०१ ॥ ऐशीच शत्रुघ्नाची परी । दोघेहि राहिले एक सरी । श्रीरामाच्या वाटेवरी । नेत्र लावूनि सारिखे ॥ १०२ ॥ इकडे चित्रकूट-प्रदेशीं । श्रीराम आपुल्या आश्रमासी। राहतां नाना नगरवासी । दर्शना येऊं लागले ॥ १०३ ॥ ऐसें चालतां फार दिवस । विघडला पाहून एकान्तवास । रामें आणिलें ऐसें मनास । अन्यत्र जाऊन रहावें ॥ १०४ ॥ मग तो अत्रीच्या आश्रमासी । पावला सीता-लक्ष्मणांनिशीं । जेथ संबंध नाहीं जनांसी । आणि आनंद राहतां ॥ १०५ ॥ मग तये आश्रमीं प्रवेशून । मुनीस करून साष्टांग नमन । सांगूनि आपुलें नामाभिधान । श्रीराम त्यातें बोलिला ॥ १०६ ॥ म्हणे मी पित्याचिया

वचनें । वनवासार्थ आलों मुने । तेथ आपण दिधलिया दर्शनें । धन्याचि केलें एधवां ॥ १०७ ॥ तयीं तें वचन करितां श्रवण । मुनीनें तत्काल जाणिली खूण । कीं हाचि परमात्मा नारायण । भूवरी अवतीर्ण जाहला ॥ १०८ ॥ मग परम प्रेमें करून । आसनीं सर्वांस बैसवून । वनांचीं फळें सुरम्य रसघन । आणूनि दिधलीं तयानें ॥ १०९ ॥ मग तीं फळें सकळिकांहीं । सेवन केलिया लवलाहीं । मुनि संतुष्ट होऊन पाहीं । रामास ऐसें बोलला ॥ ११० ॥ बा रे आश्रमीं माझी जाया । बैसली आहे **अनसूया** । तियेस एकदां भेटून याया । सीतेस अंतरीं पाठवीं ॥ १११ ॥ तेधवां बोलला सीताकांत । प्रिये वंदूनि येईं त्वरित । तईं ती सीता जाऊन आंत । साष्टांग वंदी सतीतें ॥ ११२ ॥ तयीं सीतेतें अवलोकून । तियेचें संतुष्ट जाहलें मन । मग ती सीतेस हृदयीं धरून । मुख कुरवाळी आवडी ॥ ११३ ॥ मग विश्वकर्म्यानें निर्मिलीं । ऐशीं दोन कुंडलें भलीं । तैसींच दोन दुकूलें अर्पिलीं । सीतेस प्रेमें सतीनें ॥ ११४ ॥ मग एक दिव्य ऐशी उटी । तियेचे अंगीं लावून, शेवटीं । म्हणे जी कन्ये, येणें तुटी । तुझिया सौंदर्या नये कीं ॥ ११५ ॥ बाळे, निर्भय जाईं वनीं । राहीं पतीस अनुसरोनी । मागुती सुखरूपपणें सदनीं । दोघेहि पावा आपुल्या ॥ ११६ ॥ मग यावरी सकळिकांतें । भोजन वाढूनि आपुल्या हातें । परम भक्तीनें श्रीराघवातें । ऐसें बोलती जाहली ॥ ११७ ॥ बा रे श्रीराम जगत्पते । तूंचि निर्मिसी नाना जगतें । मागुती तयांतें रक्षावयातें । अवतार घेवोनि धांवसी ॥ ११८ ॥

देव मनुष्य आणि तिर्यक । ऐसे अवतार घेसी अनेक । वरी स्वरूपदृष्टच्या नावेक । लिप्त न होसी श्रीरामा ॥ ११९ ॥ तुझी ही माया सर्वांप्रती । गोंवूनि स्वरूपीं पाडिते विस्मृती । परी ती यावया तुझियापुढती । तिळहि धीर धरीना ॥ १२० ॥ म्हणोनि मायेचे तीन गुण । ते तुज स्पर्शूं न शकती जाण । तयांहीं देहचि आपुलें ठाण । केलें राहावयातें ॥ १२१ ॥ तूं तंव देहापासून दूर । परमात्मरूप श्रीरघुवीर । म्हणोनि निर्मल निर्विकार । अखंड असंग राहसी ॥ १२२ ॥ यापरी तत्त्वार्थाचें भाषण । करितां दाटून अंतःकरण । देहाचें पडून विस्मरण । अनसूया समाधि पावली ॥ १२३ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १२४ ॥ श्रीराम ॥ १८ ॥ २ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥



॥ अयोध्याकांड समाप्त ॥



# अरण्यकांड

## अध्याय १९ वा, विराधवध

श्रीराम ॥ अत्रि ऋषींच्या आश्रमास । ऐसा क्रमूनि एक दिवस । प्रभात होतांचि प्रयाणास सिद्ध झाले तिघेही ॥ १ ॥ मग सर्वांहीं आपुलें स्नान । सारून मुनीस केलें वंदन । मग म्हणती जी तपोधन । अनुज्ञा द्यावी आमुतें ॥ २ ॥ दंडक वनामाजी वास । करणें आणिलें आहे मनास । तरी ते मार्गीं लावावयास । शिष्यास कोणा देइजे ॥ ३ ॥ तंव मुनीनें केलें स्मित । म्हणे बा रे श्रीरघुनाथ । तूंचि सकळ-त्रैलोक्यतात । मार्ग दाविसी सर्वांतें ॥ ४ ॥ ऐसा जो तूं विश्वेश्वर । त्या तुज लावील मार्गावर । ऐसा शिष्य कोण चतुर । कोठूनि आणूं सांग बा ॥ ५ ॥ तथापि तुजासि लोकानुसारें । मार्ग दावितील शिष्य बा रे । ऐसें बोलोनि शिष्यांस त्वरें । आज्ञा केली तयानें ॥ ६ ॥ मग स्वयेंहि कांहीं पाउलें । मुनि ते त्यासवें चालत गेले । मग बळेंचि त्यांतें परतविलें । रामें प्रेमें आश्रमा ॥ ७ ॥ मग ते तिघेहि मार्ग क्रमीत । चालले मुनींच्या शिष्यांसमेत । तंव एक क्रोश अंतरांत । पाल लागलें नदीचें ॥ ८ ॥ मग जावया पैलपार । उपाय पुसतां श्रीरघुवीर । शिष्य बोलते झाले सत्वर । नौका सज्ज असे कीं ॥ ९ ॥ मग त्या तिघांस नौकेवरी ।

बैसवूनि शिष्यांहीं सत्वरीं । तत्काळ नदीच्या पैलतीरीं । नौका नेऊनि लाविली ॥ १० ॥ तैं तें शिष्यांचें चपळपण । आणि विमल अंतःकरण । पाहोनि रामें तोषोनि पूर्ण । कौतुक केलें तयांचें ॥ ११ ॥ मग निरोप घेऊनि त्वरित । त्यांहीं धरितां आश्रमपथ । रामें सीता-लक्ष्मणांसमेत । मार्ग धरिला वनाचा ॥ १२ ॥ तंव तें अरण्य अत्यंत घोर । वृक्ष दाटून राहिले अपार । नानापरींचे विचित्र स्वर । कानीं येती खगांचे ॥ १३ ॥ नाना-परींचे पश्वादिक । सिंह व्याघ्र ऐसे घातक । गर्जना करूनि भयानक । व्याकुळ करिती जनांतें ॥ १४ ॥ तैसेच राक्षस नानापरी । सदैव फिरती ज्या अंतरीं । ऐशा परम घोर कांतारीं । प्रविष्ट झाले तिघेही ॥ १५ ॥ तेधवां श्रीरामें म्हणितलें । लक्ष्मणा, अरण्य घोर संचलें । एथ आपणांस पाहिजे जपलें । गमन करितां वनीं या ॥ १६ ॥ म्हणोनि धनुष्य सिद्ध करीं । शरहि काढोन घेईं करीं । मी हा चालतों येथें पुढारीं । तुवां मागुती राहावें ॥ १७ ॥ मग ती जैशी जीवशिवांत । माया वर्तते सुरक्षित । तैसीच सीता येवो चालत । आपणां दोघांमधूनि ॥ १८ ॥ म्हणती दंडकारण्यापोटीं । राक्षसांची भीति मोठी । म्हणोनि आतां आपुली दृष्टी । तीक्ष्ण केली पाहिजे ॥ १९ ॥ यापरी बोलतां लक्ष्मणास । चालून गेले दोन कोस । तंव ते एके पुष्करिणीस । प्राप्त झाले तिघेही ॥ २० ॥ तेथ जल-प्रदेशावरी । कमलें विकसलीं नाना परी । शीतल सुरम्य ऐसें वारी । चित्र ओढूनि घेतसे ॥ २१ ॥ मग तयाचें मधुर जल । प्राशन करिते झाले सकल । आणि क्षणैक पहु-

डले शीतल । वृक्षच्छायेस तीरींच्या ॥ २२ ॥ तोंचि अत्यंत भयानक । तेथ राक्षस पातला एक । पसरूनि आपुलें महामुख । दाढा विक्राळ दावित ॥ २३ ॥ शूळ टाकिला स्कंधावर । तयास बांधिले कित्येक नर । वरी गर्जना भयंकर । करीत चाले वनांत ॥ २४ ॥ सिंह व्याघ्र ऐसे अनेक । वनीं राहती पश्वादिक । भेटतांच घास करून एक । गिळून टाकी तयांतें ॥ २५ ॥ तंव तयातें पाहतां क्षणीं । धनुष्य सज्ज करोनि झणीं । श्रीराम लक्ष्मणास बोले वाणी । वत्सा ऊठ त्वरेनें ॥ २६ ॥ समोर राक्षस पातला पाहीं । धनुष्य सिद्ध करोनि राहीं । सीते, भीति न धरींच कांहीं । हा मी आहें पुढारां ॥ २७ ॥ ऐसें बोलती इतुकियांत । राक्षस येऊन ठाकला तेथ । विकट हास्य करोनि त्वरित । बोलूं लागला तयांतें ॥ २८ ॥ बा रे तुम्ही आहांत कोण । जटा वल्कलें करितां धारण । कासया धरिलें धनुष्य बाण । स्त्रीहि किमर्थ संगतीं ॥ २९ ॥ वाटतें, करावें दोन घास । ऐसें तुमचें रूप सुरस । ऐशिया परम घोर वनास । कासया आलांत रहाया? ॥ ३० ॥ तेधवां रामें केलें भाषण । श्रीराम माझें नांव जाण । माझा बंधू हा लक्ष्मण । माझी स्त्री ही जानकी ॥ ३१ ॥ पितृवाक्यास अनुसरून । मी हें सेवीत आहें वन । करावें तुजऐशास शासन । याच उद्देशें एकल्या ॥ ३२ ॥ तंव तेणें पसरिलें मुख । विकट हास्य करून एक । मग स्कंधींचा शूल देख । दोहों हातीं घेतला ॥ ३३ ॥ मग म्हणे रे तूं नेणसी पोर । मी विराध राक्षस घोर । माझिया भयें मुनिहि थोर । आश्रम सोडून पळाले ॥ ३४ ॥ म्हणोनि

पोरा वांचवी प्राण । ठेवी स्त्री आणि धनुष्यबाण । नातरी आतांचि करीन भक्षण । सर्वांतेंहि पहा रे ॥ ३५ ॥ ऐसें बोलोनि तो तत्काळ । सीतेवरती धावला खळ । तंव रामेंहि न लगतां वेळ । करचि छेदिले शरानें ॥ ३६ ॥ तंव तेणें संतप्त होऊन । पसरिलें आपुलें विक्राळ वदन । आणि धांवला वेगेंकरून । रामालागींच गिळाया ॥ ३७ ॥ तंव तत्काळ तयाचे पाद । लक्षून रामें केला वेध । तेणें पाय गळून **विराध** । क्षणैक भूमीस पडियेला ॥ ३८ ॥ मागुती उठून सर्पापरी । खावया चालला तयाचिवरी । तंव श्रीरामें कंठावरी । बाण लक्षूनि सोडिला ॥ ३९ ॥ तंव तत्काळ तयाचें शिर । गळून पडलें भूमीवर । यापरी अद्भुत होवोन समर । रुधिर वाहूं लागलें ॥ ४० ॥ तंव तें पाहून घोर समर । सीतेस नवल वाटलें थोर । मग ती आलिंगन दे सत्वर । प्रेमें दाटूनि राघवा ॥ ४१ ॥ तेधवां स्वर्गींच्या देवगणांहीं । दुंदुभि वाजविल्या पाहीं । अप्सरा आणि गंधर्व हेही । नाचूं गाऊं लागले ॥ ४२ ॥ इकडे पडतां विराध-शरीर । प्रगटला एक दिव्य नर । तेजस्वी आणि अति सुंदर । वस्त्रालंकारमंडित ॥ ४३ ॥ मग जो दीनांचे संरक्षणीं । धावे हाक पावतां श्रवणीं । आणि संसारभय-वारणीं । शीघ्र प्रताप जयाचा * ॥ ४४ ॥ ऐसा श्रीराम सर्वार्तिहर । त्याचिया चरणीं वारंवार । तेणें करूनि नमस्कार । भाषण केलें यापरी ॥ ४५ ॥ म्हणें मी पूर्वी **विद्याधर** । शापें पावलों राक्षसशरीर । परी तूं भेटोनि करुणाकर । पूर्वावस्थेस पावलों ॥ ४६ ॥ जो कोपमूर्ति दुर्वास मुनी । पावे अन्यायावांचुनी जनीं । तुवां

तयाच्या शापांतूनी । मुक्त केलें दयाळा ॥ ४७ ॥ आतां यावरी ज्यांचिया बळें । संसार-भयाचें होय काळें । ऐशीं तुझीं चरणकमळें । चित्तीं राहोत माझिया ॥ ४८ ॥ तैशीच देवा माझी वाणी । सदैव राहो नामोच्चारणीं । आणि कथामृताचे श्रवणीं । कर्ण जडूनी असोत ॥ ४९ ॥ तुझिया पूजनीं निरंतर । गुंतून जावोत माझे कर । तैसें विलीन होवो शिर । तुझ्याच पायीं प्रभो हें ॥ ५० ॥ देवा श्रीरामा आत्मारामा । सर्व-संसार-आपद्-विरामा । निखिल-विश्व-आनंदधामा । घेईं माझा प्रणाम * ॥ ५१ ॥ या आपुल्या शरणागता । सोडवी मायेपासूनि आतां । आणि स्वस्थानीं जावयाकारितां । अनुज्ञा देईं प्रभोजी ॥ ५२ ॥ यापरी तयाचें विज्ञापन । ऐकून तोषला रघुनंदन । मग तयातें ऐसें वरदान । प्रेमें देता जाहला ॥ ५३ ॥ अगा, हे मायेचे सत्त्वादि गुण । तुजसि स्पर्शूं न शकती जाण । आतांचि माझिया दर्शनाकारण । मुक्तचि होसी निश्चयें ॥ ५४ ॥ माझिया ठायीं परिपूर्ण भक्ती । तीच जोडूनि देते मुक्ती । म्हणोनि तुजसि आहेच शक्ती । मोक्षस्थानातें वराया ॥ ५५ ॥ यापरी रघुवीराचा वर । संपादूनि तो विद्याधर । मागुती करूनि नमस्कार । देवलोकातें पावला ॥ ५६ ॥ अहो ही श्रीरामाची कृपा । वारिते सकळ संसार-तापा । म्हणोनि त्याचेंचि प्रेम बापा । जोडूनि ठेवावें अंतरीं ॥ ५७ ॥ श्रीराम जयराम ऐसें गातां । सर्व वांछितें येती हातां । ऐसा अनुभव येथांचे आतां । विद्याधरें या जोडिला ॥ ५८ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहि-

लीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ५९ ॥ श्रीराम ॥ १९ ॥ ॥ ६ ॥

## अध्याय २० वा, सुतीक्ष्णभेट

श्रीराम ॥ यावरी तेथून तिघे जण । निघूनि कारिती मार्गक्रमण । तंव ते प्राप्त जाहले जाण । शरभंगाचे वनासी ॥ १ ॥ तेधवां येतसे सीतारमण । संगें घेऊन सीता-लक्ष्मण । ऐसें दुरून करितां प्रेक्षण । शरभंग झाला पुढारा ॥ २ ॥ मग परम आदरें करुनी । आसन बैसावयास देउनी । कंद मूळें फळें आणुनी । अर्पिता झाला तयांतें ॥ ३ ॥ मग प्रेमें बोलला वचन । रामा तुझें घडावया दर्शन । येथ बहुत काळापासून । तप हें करीत असें मी ॥ ४ ॥ आतां ती ही पुण्यसंपदा । अर्पण करून तुझिया पदा । मोक्षस्थानास परमानंदा । जातों पावावयातें ॥ ५ ॥ ऐसें बोलोन तेणें तत्काळ । सांडूनि पुण्याचा लोभ सकळ । आपुल्या तपश्चर्येचें फळ । अर्पण केलें श्रीरामीं ॥ ६ ॥ मागुती घालूनि नमस्कार । चिता रचिता झाला सत्वर । आणि आरूढ होऊन तीवर । ध्यान करीत राहिला ॥ ७ ॥ सकळ जनांच्या अंतरांत । निवास करी जो श्रीरघुनाथ । जयाची सीता-लक्ष्मणा-आंत । सांवळी मूर्ति शोभते ॥ ८ ॥ मुखचंद्र शोभे बहु सुंदर । नेत्रींचें तेज सुमनोहर । अंगीं वल्कलें, मस्तकावर । जटाभार साजिरा ॥ ९ ॥ अहो या राघवावीण आन ।

कोण या लोकीं दयाघन । जो कां स्मरणमात्रें करून । आर्त सारी पुरवितो ॥ १० ॥ पहा मी आपुलें अंतःकरण । एकाग्र ठेवोनि, तयाचें स्मरण । कारितांचि धावला सीता-रमण । दर्शनाकारणें अहाहा ॥ ११ ॥ आतां मी सांडूनि देहभार । ब्रह्मलोकास जातों सत्वर । तरी हा माझा श्रीरघुवीर । लोचनीं पाहो आपुल्या ॥ १२ ॥ जयाचिया अंकीं सीता सती । ऐसा श्रीराम अयोध्या-पती । माझिया अंतरीं सदैव वसती । करूनि राहो अखंड ॥ १३ ॥ ऐसें अंतरीं ध्यान केलें । वरी साक्षात अवलोकिलें । मग अग्नींत दग्ध केलें । शरीर आपुलें शरभंगें ॥ १४ ॥ मग तो आपुल्या पुण्यावर । पावला एक दिव्य शरीर । आणि जाता झाला सत्वर । ब्रह्मलोकास तेधवां ॥ १५ ॥ मग तें शरभंगाचें वृत्त । कळतां सर्व दंडकवनांत । श्रीराम-दर्शनाकारणें त्वरित । मुनि सारेचि पातले ॥ १६ ॥ तंव ते संनिध येतां मुनिवर । तयांस घालूनि नमस्कार । तिघांहीं केला बहु आदर । मनुष्य-भावानुसारें ॥ १७ ॥ तेधवां नाना आशीर्वचनीं । रामास गौरविती ते मुनी । मग अत्यंत आदरें करूनी । भाषण करिती तयातें ॥ १८ ॥ देवा, तूंचि विष्णु सर्वेश्वर । घेऊनि आलासी अवतार । निवटून सर्व रजनीचर । भूभार दूर कराया ॥ १९ ॥ म्हणोनि बा श्रीरघुनंदना । आमुचीं संकटें आणी मना । प्रथम आम्हां तपस्विजनां । दुःखापासून सोडवीं ॥ २० ॥ यालागीं आमुचीं आश्रमस्थानें । पाहोनि घेईं एकदां नयनें । ऐशिया तुझ्या आगमनें । थोर उपकार आमुतें ॥ २१ ॥ ऐसी मुनींची विज्ञापना । रामें तत्काळ

आणूनि मना । तिघेही निघाले त्या मुनिजनां- । संगें आश्रम पहाया ॥ २२ ॥ तंव तेथ शिरें आणि हाडें । पडलीं पाहोनि चोहोंकडे । ऐसें हें काय येथें पडे । म्हणोनि पुसे श्रीराम ॥ २३ ॥ तेधवां मुनि ते बोलती वच । हा ऋषींच्या शिरांचा खच । समाधीमाजी राक्षस नीच । मस्तकें तोडिती मुनींचीं ॥ २४ ॥ नर-मासांवरी तयांचें मन । म्हणोनि फिरती रात्रंदिन । नव नव प्रसंग संपादून । घात करिती असा हे ॥ २५ ॥ ऐसें मुनींचें ऐकतां वचन । आणि पाहोन भयभीत वदन । प्रतिज्ञा करीत रघुनंदन । तत्काळ राक्षस-वधाची ॥ २६ ॥ मग त्या मुनिजनांसमेत । क्रमानें नाना आश्रम पाहत । श्रीराम मुनींचे सत्कार घेत । बहुत काळ राहिला ॥ २७ ॥ तयांत एकदां फिरतां वन । पातलें एक आश्रमस्थान । जेथ **सुतीक्ष्ण** नामें करून । निवास होता मुनीचा ॥ २८ ॥ तेथ सदैव असतीं विपुलें । सर्वचि ऋतूंचीं पुष्पफलें । तेणेंकरून कवणेहि काळें । संतोष वाटे राहतां ॥ २९ ॥ ऐसिया आश्रमीं निरंतर । अगस्त्य मुनीचा शिष्यप्रवर । सुतीक्ष्ण रामोपासन-तत्पर । होऊन नेमें राहत ॥ ३० ॥ तेणें सर्वेचि ऐकिलें वृत्त । आश्रमीं येतसे श्रीरघुनाथ । मग तत्काळ जाय धावत । भीतरीं आणावयातें ॥ ३१ ॥ मग परम प्रेमेंकरून । करीत रघु-वीराचें पूजन । तयीं भक्तीच्या आवेशेंकरून । नेत्र प्रफुल्ल जाहले ॥ ३२ ॥ कंठ जाहला सद्गदित । अंतरीं प्रेमानंदें दाटत । मग तैसाच स्तवन करीत । रघुवीराचें तेधवां ॥ ३३ ॥

देवा, तुझिया अंगींचे गुण । वर्णूं शकेल ऐसा कोण । प्रभो, तुझें स्वरूप जाण । प्रमाणां-

लागीं नाकळे ॥ ३४ ॥ तुझिया पायीं ठेवोनि भाव । वर्तती विरिंचि आणि शिव । हेचि संसारसागरीं नाव । सर्वांस आहे तराया ॥ ३५ ॥ म्हणोनि तुझिया पदकमलांचा । हा मी सेवक आहें साचा । सदैव तुझिया नाममंत्राचा । जपचि करीत असें मी ॥ ३६ ॥ गृह सुत दारा द्रव्यादि, हीच-। अंधकाराची मोठी खाच । तींतून तुवांच मजसि साच । काढिलें ओढून दयेनें ॥ ३७ ॥ तैसेंच नाना मलांचें गृह । ऐशा तनूचा धरून मोह । गुंतल्या मजसि निःसंदेह । तुवांचि सोडविलें कीं ॥ ३८ ॥ तुझें हें ऐसें प्रत्यक्ष दर्शन । जीवांस कैचें यावें घडून । परी तूं दीनांचा दयाघन । म्हणोनि भेटीस धांवसी ॥ ३९ ॥ सकाळिकांचा अंतर्वासी । पाहतां देवा, तूंच होसी । परी न येचि कित्येकांसी । तुझिया मंत्राची आवडी ॥ ४० ॥ मग तुझी माया ऐशियांतें । मोहींच अधिक गुंतविते । परी ती मंत्राच्या एकनिष्ठातें । भिऊन राहे राघवा ॥ ४१ ॥ म्हणोनि जो जी सेवा करी । तयास तैसाचि पावे हरी । जैसा भूपाळ सेवकावरी । सेवा पाहून तोषतो * ॥ ४२ ॥ देवा, तूंचि विश्वाची उत्पत्ति । स्थिति-विलय करिसी मागुती । मायेच्या सत्वादि गुणां-प्रती । आश्रय होऊनि एकला ॥ ४३ ॥ परी जे मायेनें मोहिले जन । तयांस तीनहि गुणें करून । विधि विष्णु आणि शिव होऊन । भाससी तूंचि श्रीरामा ॥ ४४ ॥ ज्या-परी नाना जल-पात्रांत । सूर्य होतां प्रतिबिंबित । एकचि नाना होऊनि भासत । तैसेंच त्रैविध्य तुझें हें * ॥ ४५ ॥ अहाहा! माझें भाग्य थोर । म्हणोनि देवा, तूं परात्पर ।

साक्षात आजि नयनांसमोर । उभा ठेलासि माझिया ॥ ४६ ॥ किंवा त्वन्मंत्रजपेंकरून । ज्यांहीं हृदय केलें पावन । तयांस तुझें प्रसाद-दान । ऐसेंच थोर राघवा ॥ ४७ ॥ नातरी सांडूनि शुद्धाचार । जे कां वर्तती चित्तानुसार । तयांस तुझें रूप गोचर । होऊं न शके सर्वथा * ॥ ४८ ॥ अहो जो अरूप ऐसा पुरुष । तेणें घेऊनि मायामिष । स्वीकारिला जो मनुष्य वेष । प्रत्यक्ष तो मी पाहतों ॥ ४९ ॥ मदनापासून शतसुंदर । मुखींचें हास्य सुमनोहर । हातीं विराजती चापशर । हृदयीं पूर दयेचा ॥ ५० ॥ अंगीं वल्कलें जटाभार । संगें सीता देवी सुंदर । तैसाचि उभा लक्ष्मण वीर । पादपद्मांच्या सेवेसी ॥ ५१ ॥ नील कमलाऐसी कांती । वरी शोभवी दिव्य शांती । अंगींच्या गुणांस नाहीं गणती । ऐसें मांगल्य प्रभूचें ॥ ५२ ॥ ऐसा परमात्मा सीता-रमण । माझिया परम भाग्याची खाण । म्हणून अखंड वंदीन चरण । मस्तकीं धरून तयाचे * ॥ ५३ ॥ देवा तुझिया स्वरूपीं कांहीं । देशकालांचें बंधन नाहीं । सर्वत्र भरून राहिलें पाहीं । एकेंचि ज्ञानप्रकाशें ॥ ५४ ॥ परी या तुझिया निर्गुणरूपा । ज्ञानीच एक जाणोत बापा । आम्हांसि हाचि मार्ग सोपा । सगुण भक्तीचा निर्भय ॥ ५५ ॥ म्हणोनि मनसी जें साक्षात । स्वरूप तुझें दृष्टीस येत । तेंचि ठसून राहो मनांत । आस नाहींच आणिकां ॥ ५६ ॥ यापरी स्तवन केलिया श्रुत । श्रीराम म्हणती करोनि सित । मुने हें तुझें हृदय खचित । परम शुद्धीस पावलें ॥ ५७ ॥ म्हणोनि तुज द्यावया दर्शन । स्वयें म्यां केलें

आगमन । बा रे भक्तीवांचून आन । साधन नाहीं मजलागीं ॥ ५७ ॥ माझिया मंत्राचे उपासक । जे कां मजसीच शरण एक । तयांस माझें स्वरूप देख। सदैव आहे गोचर ॥ ५८ ॥ सांडूनि सकळिकांची आस । माझेचि एकनिष्ठ झाले दास । तयांस हा मी रात्रंदिवस । प्रत्यक्ष भेटे जाणिजे * ॥ ५९ ॥ आतां तुवां हें केलें स्तवन । तयाचें करिती श्रवण-मनन । तयांस माझें प्रेम जडून । ज्ञान होईल निश्चयें ॥ ६० ॥ माझिया उपासनेनें तुज । जीवन्मुक्तिच लाभली आज । आतां देहांतीं येशील सहज । माझिया स्वरूपीं मिळाया ॥ ६१ ॥ आतां अगस्तीचें दर्शन । घ्यावें वाटतें मजलागून । कांहीं काळ तेथ जाऊन । राहावें ऐसें मानसीं ॥ ६२ ॥ तंव तें श्रीरामाचें भाषण । सुतीक्ष्णास मानलें पूर्ण । म्हणे जी मीहि येईन जाण । दर्शनालागीं मुनींच्या ॥ ६३ ॥ मग तें तत्काळ निश्चित होतां । निघाले श्रीराम लक्ष्मण सीता । सुतीक्ष्णही आश्रमपथा । दावीत चालला संगतीं ॥ ६४ ॥ मग ते मार्गक्रमण करितां । जेथ अगस्तीचा भ्राता । मार्गीं स्वाश्रमीं राहिला होता । तेथ जाऊन पोंचले ॥ ६५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६६ ॥ श्रीराम ॥ २० ॥



## अध्याय २१ वा, अगस्ति-भेट.

श्रीराम ॥ यावरी श्रीराम सीता लक्ष्मण । संगें जयांच्या मुनि सुतीक्ष्ण । मध्यान्ह-काळीं पोंचले जाण । अगस्त्यानुजाचे आश्रमीं ॥ १ ॥ तेथ तयानें सत्कारेंकरून । सकळिकांचें केलें पूजन । आणि सुंदर फळें आणून । अर्पिलीं सेवन कराया ॥ २ ॥ मग सर्वांहीं भोजन केलें । आणि एक रात्र तेथें राहिले । मग प्रभात होतांच निघाले । अगस्ति-आश्रमीं जावया ॥ ३ ॥ तंव त्या सुरम्य आश्रमस्थळीं । विविध तरु आणखी वेली। तयांस पुष्पें फळें लगटलीं । सर्वच ऋतूंचीं सदैव ॥ ४ ॥ नानापरींचे पश्वादिक । तैसेच पक्षी कूजती अनेक । तेणें नंदन-वनाचि एक । ऐसें वाटे ऐकतां ॥ ५ ॥ अंतरीं मुनि निवास करिती । देवर्षि ब्रह्मर्षि ऐसे किती । शोभा आणिली आश्रमाप्रती । ब्रह्मलोकाची तयांहीं ॥ ६ ॥ ऐसिया आश्रमाचे द्वारीं । रामें जाऊन पोंचल्यावरी । सांगूनि धाडिलें सुतीक्ष्णा करीं । श्रीराम आला म्हणोनि ॥ ७ ॥ मग सुतीक्ष्णें आनंदें करून । आश्रमामाजी केलें गमन । तंव तेथ अगस्तीचें स्थान । मध्यभागींच देखिलें ॥ ८ ॥ भोंवतीं बैसले सारे मुनी । सर्वांस प्रेम श्रीराम-भजनीं । आणि तयांस प्रेमेंकरोनी । मंत्रार्थ सांगत अगस्ति ॥ ९ ॥ यापरी पाहतां दिव्य मुनिवर । सुतीक्ष्णास आनंद झाला थोर । मग पुढें होवोनं पायांवर । मस्तक ठेवी मुनींच्या ॥ १० ॥ मग बोलिला जोडोनि हात । प्रभो

जी पातले श्रीरघुनाथ । द्वारीं सीता-लक्ष्मणांसमेत । दर्शनासाठीं तिष्ठती ॥ ११ ॥ तंव मुनि म्हणे, बा रे त्वरित । तयांस घेवोन येईं आंत । त्यातेंचि मी नित्य आहें ध्यात । आस भेटीची धरूनी ॥ १२ ॥ ऐसें बोलूनि मुनिसमेत । स्वयेंचि उठोनि आला तेथ । मग परम प्रेमपूरित । होऊन बोले श्रीरामा ॥ १३ ॥ अहा जी परम आनंदधाम । ऐसा-चि तूं बा सीताराम । तुवां येवोनि माझा आश्रम । पावन केला ये वेळीं ॥ १४ ॥ माझा अत्यंत प्रिय अतिथी । भेटला श्रीराम सीतापती । बा तूं फार शिणलास पथीं । आतां येईं भीतरीं ॥ १५ ॥ तयीं त्या मुनींतें अवलोकून । रामेंहि अत्यंत आदरें करून । पायीं साष्टांग केलें वंदन । सीतालक्ष्मणांसहित ॥ १६ ॥ मग त्या मुनिरायें सत्वरीं । रामास उठवोनि आपुल्या करीं । आलिंगून धरिलें अंतरीं । भक्तिप्रेमांहीं दाटला ॥ १७ ॥ वरी त्या गात्रस्पर्शेंकरून । आनंदें अत्यंत आला भरून । सर्वांचि अश्रूंहीं दोन्ही नयन । भरून चमकूं लागले ॥ १८ ॥ मग तैसेंचि आनंदभरें । रामास धरून एकें करें । सीतालक्ष्मणां-सवें मुनिवरें । आश्रमीं नेलें तेधवां ॥ १९ ॥ मग तेथ देवोनि शुभासन । शुद्धांतःकरणें केलें पूजन । आणि वनींचीं फळें अर्पून । संतुष्ट केलें तयांतें ॥ २० ॥ मागुती क्षणैक विश्राम घेत । बैसला असतां श्रीरघुनाथ । पुढती होऊनि जोडूनि हात । अगास्ति बोलूं लागला ॥ २१ ॥ देवा तुझें हें आगमन । होईल ऐसें मनीं धरून । मार्गींच लावून रा-हिलों मन । आजपर्यंत वनीं मी ॥ २२ ॥ जेधवां क्षीरसागर-तीरीं । तुजसि प्रार्थना केली

सुरीं । कीं, हा भूभार देवा हरी । निवटूनि रावणादिकांतें ॥ २३ ॥ तेव्हांपासून तुझिया दर्शनीं । आस लागून राहिलीं मनीं । म्हणोनि तप आचरीत वनीं । मुनिसमवेत राहिलों ॥ २४ ॥ देवा, सृष्टीच्या पूर्वीं एक । तूंचि होतासि निरुपाधिक । तेव्हां तुजवीण कांहीं आणिक । विकल्प तेथ असेना ॥ २५ ॥ तेथ तुझ्याच आश्रयावरी । तुझ्याचि रूपीं जियेस उरीं । ऐसी तुझी जी शक्ति श्रीहरी । **माया** नांव तियेचें ॥ २६ ॥ तीच माया तुझियावरती । आवरण घालून तुज लोपविती । तेधवां तियेस नाम देती । अव्याकृत म्हणोनी ॥ २७ ॥ तीच जाणिजे मूळ प्रकृती । माया ऐसेंहि तीतेंच म्हणती। कोणी आविद्या नामें गणिती । कोणी संसार, बंध कीं ॥ २८ ॥ तुझ्याच संगें तिजपासून । **महत्तत्त्वास** होतें जनन । बुद्धितत्त्व तें हेंचि म्हणून । सांख्यशास्त्रांत बोलती ॥ २९ ॥ तींतून तुझ्याच बळेंकरून । **अहंकार** हा पावतो जनन । मग तोचि बुद्धिसंगेंकरून । तीन रूपांहीं भासतो ॥ ३० ॥ तामस, राजस ऐसे दोन । तिसरा सात्त्विक नामेंकरून । ऐसे अहंकार-तत्त्वाचे तीन । प्रकार शास्त्रांत बोलिले ॥ ३१ ॥ मग तामसाहंकारांतून । **तन्मात्रांचें** होतें जनन । तन्मात्रारूप सूक्ष्मांतून । **स्थूल** भूतें जन्मती ॥ ३२ ॥ मग अहंकार जो राजस । तेथून जन्म ये इंद्रियांस । आणि आकार पावतें मानस । सात्त्विक अंशेंकरूनी ॥ ३३ ॥ मग या सर्वांलागीं मिळून । **लिंग** ऐसें नामाभिधान । हेंच सर्वत्र राहे व्यापून । सूक्ष्मत्वानें सदैव ॥ ३४ ॥ त्यांतून आकारा ये विराट ।

तेथून स्थूलभूतें होतीं प्रकट । त्याजपासून उमटे नीट । जगदाकार चराचर ॥ ३५ ॥ देवादि योनि, मनुष्य-योनी । पश्वादिकांच्या तिर्यक् योनी । ऐसें सर्वचि प्रगटे तेथुनी । काळें कर्मानुसार ॥ ३६ ॥ देवा, तूंचि होसी **ब्रह्मदेव** । धरूनि रजोगुणाचा भाव । निर्माण करिसी सकळ विश्व । स्थावरजंगम स्वयेंचि ॥ ३७ ॥ मागुती सत्त्वांशें करून । तूंचि त्याचें करिसी पालन । तेधवां तूंचि **विष्णु** होऊन । सर्वांलागीं भाससी ॥ ३८ ॥ प्रलयकाळ आलिया मग । तूंचि विलीन करिसी जग । हाचि तमोगुणाचा संग । तुजसि **रुद्र**त्व देतसे ॥ ३९ ॥ हेचि सत्त्वादि तीन गुण । बुद्धीशीं संयुक्त होतां जाण । तीन अवस्था करिती निर्माण । जागृति स्वप्न सुषुप्ति ॥ ४० ॥ परी तूं देवा, तयांसी दूर । केवळ चिन्मात्र श्रीरघुवीर । साक्षीरूपास तुज विकार । स्पर्शूंच न शके एकहि ॥ ४१ ॥ जेधवां प्रभोजी वाटे तुजला । कीं ही करावी सृष्टिलीला । तयीं तूं घेऊन गुणमायेला । सगुण झालासें भासतें ॥ ४२ ॥ रामा, तुझी ही माया दोन- । प्रकारें होतें भासमान । एक **विद्या** म्हणजे ज्ञान । दुजें अज्ञान, **अविद्या** ॥ ४३ ॥ जे कां जाहले अविद्याधीन । तयांचें **प्रवृत्ति**पथीं मन । परी जे होत विद्यावान । त्यांस माने **निवृत्ति** * ॥ ४४ ॥ त्यांचें वेदान्तावरी मन । तत्त्वार्थाचें करिती शोधन । आणि अंतरीं राहिले भरून । तुझिया प्रेमें श्रीरामा ॥ ४५ ॥ ऐसे विद्येच्या अभ्यासांत । जे कां सदैव होती रत । तेचि सर्व बंधनातीत । होऊन मोक्षातें पावती ॥ ४६ ॥ परी जे अविद्याधीन सर्वथा । होवोन धरिती

प्रवृत्तिपथा । तयांस वाहणेंचि लागे माथां । संसार-ओझें सदैव ॥ ४७ ॥ तुझिया भक्तीची फार प्रीति । वरी जे मंत्रातें उपासिती । तेचि इया विद्येतें पावती । आणिकां लाभ घडेना ॥ ४८ ॥ म्हणोनि ज्यांहीं जोडिली भक्ती । त्यांतेंचि लाभे भवबंधमुक्ती । जे या प्रेमामृतास मुकती । त्यांत बंधन निश्चयें * ॥ ४९ ॥ राघवा, काय बोलोन बहुत । एकचि जाणिजे सारभूत । सत्संगाचि म्हणावा निश्चित । मोक्षप्राप्तीस कारण * ॥ ५० ॥ ज्यांचिया चित्तीं साम्य भाव । पदार्थीं तिळहि नाहीं हाव । आणि ईषणात्रयाचें नांव । तेंहि नाहीं जयांसी * ॥ ५१ ॥ इंद्रियांचें जाहलें दमन । चित्ताचें पूर्ण संयमन । आणि भक्तींत रंगलें मन । आस्था नाहीं आणिकीं * ॥ ५२ ॥ प्रसंगीं पावतीं इष्टानिष्टें । परी चित्तस्थिति न पालटे । ऐसा सर्वचि संग तुटे । अंतरापासूनि जयांचा * ॥ ५३ ॥ सकळ कर्मांतें झिडकारून । एके ब्रह्मींच गोविलें मन । आणि प्रसंगीं पावतां उत्थान । यमादिकांची सिद्धता ॥ ५४ ॥ जें जें पावे त्याचा संतोष । कोठेंचि कांहीं न गमे दोष । यापरी जयांचा अंतर्वेष । त्यांतेंचि संत बोलिजे ॥ ५५ ॥ मग तयांची होतां संगती । ईश्वरकथाचि श्रवणीं येती । तेणें सर्वेंचि जडते प्रीति । श्रीरामरूपीं जनांची ॥ ५६ ॥ पुढें प्रीतीच्या परिपाकांत । श्रीराम-स्वरूपज्ञान होत । ऐसाचि सर्वांहीं केला निश्चित । मार्ग मुक्तीचा अनुभवें ॥ ५७ ॥ म्हणोनि मजला रघुनंदना । प्रेमाचि उदंड देईं मना । आणि तैसीच प्रेमी जनां । संगति देईं विशेषें ॥ ५८ ॥ देवा आजि हें माझें जीवित । तुझिया

दर्शनें जाहलें फलित । माझे सारेचि यज्ञ खचित । फळास पावले ये वेळीं ॥ ५९ ॥ एकाग्र करून अंतःकरण । म्यां जें केलें तपश्चरण । त्याचेंचि फळ हें पावलों जाण । प्रत्यक्ष तूंतें पूजिलें ॥ ६० ॥ आतां तुजसि हेचि विनती । माझ्या हृदयीं करीं वसती । कोणेहि स्थितींत तुझी स्मृति । सांडून मातें न जावो ॥ ६१ ॥ ऐसें सुंदर स्तवन केलें । मग एक चाप आणविलें । जें कां पूर्वींच होतें ठेविलें । रामासाठीं महेंद्रें ॥ ६२ ॥ तैसेच भाता आणीक बाण । खड्गहि मुनीनें केलें अर्पण । मागुती केली ती आठवण । भूभार वारावयाची ॥ ६३ ॥ मग म्हणे, येथून कोस चार । गेलिया लागेल वन सुंदर । तेथ गौतमीच्या तीरावर । स्थान आहे सुरम्य ॥ ६४ ॥ नांव तयाचें पंचवटी । तेथ राहावें त्वां जगजेठी । सुखें काळ क्रमूनि शेवटीं । अवतार कार्य करावें ॥ ६५ ॥ मग तें ऐकोन अगस्तिवचन । संतुष्ट जाहला रघुनंदन । मग निघाला करीत गमन । मुनीनें दाविल्या पथानें ॥ ६६ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६७ ॥ श्रीराम ॥ २१ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

---

## अध्याय २२ वा, लक्ष्मणोपदेश.

श्रीराम ॥ यापरी अगस्तीचें स्थान । सांडूनि करूं लागतां गमन । कांहीं एक मार्ग

क्रमून । गेले श्रीराम जधवां ॥ १ ॥ तईं जैसें गिरीचें शिखर । तैसें प्रचंड ज्याचें शरीर। ऐसा जटायू पक्षिवर । मार्गीं तेणें पाहिला ॥ २ ॥ तयीं तो वाटूनि चमत्कार । लक्ष्मणास बोले श्रीरघुवीर । धनुष्यबाण आणी सत्वर । राक्षस आहे पुढारां ॥ ३ ॥ नाना मुनींच्या पवित्र देहां । येणें करून टाकिलें स्वाहा । आणि पसरला आहे पहा । निर्भयपणानें ये स्थळीं ॥ ४ ॥ तयास उडावितों एके बाणीं । ऐसें वचन ऐकतां क्षणीं । भयभीत होवोनि अंतःकरणीं । जटायू बोले राघवा ॥ ५ ॥ दशरथ-तनया श्रीरघुवीर । मजवरी न सोडी बापा शर । मी त्वत्पित्याचा मित्र थोर । वृद्ध गृध्र जटायू ॥ ६ ॥ तेचि मैत्री स्मरून आतां । तुझ्याहि साधीन कांहीं हिता । तुम्ही तिघेही राहूं जातां । पंचवटीतें ये वेळीं ॥ ७ ॥ तेथ प्रसंगीं दोघेजण । वनास जातां मृगयेकारण । मीच सीतेचें संरक्षण । आश्रमीं करीन प्रयत्नें ॥ ८ ॥ तंव ते गृध्राचे बोल ऐकून । राघवें म्हणितलें स्नेहें करून । बारे उचित तुझें वचन । अवश्य ऐसेंच करीं तूं ॥ ९ ॥ मग कांहीं मार्ग क्रमून । सीता लक्ष्मण रघुनंदन । गौतमीतीरास पोंचले जाऊन । पंचवटीचे ठिकाणीं ॥ १० ॥ तंव सर्वांहीं दर्शन होतां । प्रेमें वंदिली गौतमी सरिता । मग आपुल्या निवासाकरितां । स्थान एकांतीं पाहिलें ॥ ११ ॥ जेथील शोभा अवलोकितां । अत्यंत संतोष व्हावा चित्ता । आणि जे स्थळीं निवास करितां । व्हावेंचि आरोग्य शरीर ॥ १२ ॥ जेथ कदंबादि वृक्ष भोंवतीं । आम्र फणसाहि दाटूनि असती । आणि अन्य जनांची संगती ।

जेथ सहसा घडेना ॥ १३ ॥ ऐसें एक सुरम्य स्थान । उत्तर-तीरास संपादून । तेथ निर्माण केलें सदन। बंधुद्वयें स्वयेंचि ॥ १४ ॥ मग तेथ राहती सकळ । सुखाचि करिती सर्वकाळ । एकेंचि चित्तें राहतां केवळ । स्वर्गचि होय मही ही * ॥ १५ ॥ गौतमीच्या पात्रीं जाऊन । नित्य तिघांहीं करावें स्नान । सीतेनें आपुलें गमनागमन । मधून दोघांच्या करावें ॥ १६ ॥ त्यावरी लक्ष्मणें जावें वनीं । यावें कंदमूळें घेउनी । मग तीं रामसीतेस अर्पूनी । जलचि सेवावें आपणें ॥ १७ ॥ रात्रौ घेऊनि धनुष्यबाण । रक्षणीं धरावें सावधपण । यापरी श्रीरामसेवे कारण । तनुमनेसीं झिजावें ॥ १८ ॥ तंव एकदां श्रीरघुनाथ । एकांतीं बैसला असतां तेथ । लक्ष्मणें ऐसें परम विनीत । होऊन पुसिलें तयातें ॥ १९ ॥ म्हणे जी देवा सीतारमण । मजसि एवढें करवीं श्रवण । मोक्ष व्हावया मुख्य कारण । कोणतें इया जीवांतें ॥ २० ॥ अनुभव कैचा, ज्ञान कैंचें । भक्ति कैची, वैराग्य कैचें। एतुलें मजसि आपुल्या वाचे । सांगून देईं दयाळा ॥ २१ ॥ तंव तयास बोले रघुवीर । हे तंव अत्यंत गूढ विचार । परी यांचिया योगें सत्वर । निरास होतो भ्रमाचा ॥ २२ ॥ म्हणोनि मी तुझ्या प्रश्नानुसारें । तुजसि सकळ सांगतों बा रे । श्रवण करितां परम आदरें । चित्त देवोनि रहावें ॥ २३ ॥ विसरोनी आपुली स्वरूपस्थिती । मी तों देहचि मानणें चित्तीं । हेचि माया जाणिजे निश्चितीं । हेचि संसारीं गोविते ॥ २४ ॥ विक्षेप आणखी आवरण । ऐसीं मायेचीं रूपें जाण । त्यांत विक्षेप आहे कारण । जग निर्माण कराया ॥ २५ ॥

दुज्या आवरणांगें करून । विलीन होतें स्वरूपज्ञान । ऐसी राहिली आहे भरून । माया शक्तिच सर्वत्र ॥ २७ ॥ ज्यापरी पाहूं लागतां दोर । भ्रमें भासतो सर्पाकार । तैसाचि ह्या सर्व जगदाकार । भ्रमेंचि भासे स्वरूपीं * ॥ १८ ॥ म्हणोनि शुद्ध स्वरूपविचार । जो कां अंतरीं पाहील नर । तयास कांहींच नाहीं भार । मिथ्यारूपें जगाच्या ॥ २९ ॥ जें जें दिसतें, होतें श्रुत । तें तें मिथ्याच आहे निश्चित । जैसें स्वप्न होतें प्रतीत । अथवा राज्य मनींचें ॥ ३० ॥ इया संसार वृक्षाचें मूळ । देहसंबंध एकचि केवळ । देहेंचि एकें जोडती सकळ । बंधनें दारासुतांचीं ॥ ३१ ॥ सांडितां देहादिकांचा मळ । आत्मा सदैव राहे निर्मळ । म्हणोनि देहेंचि आलें बळ । संसारवृक्षीं जाणिजे * ॥ ३२ ॥ स्थूल भूतांपासोनि देह । आकार पावे निःसंदेह । हेंचि अहंकाराचें गृह । यांतेंचि क्षेत्र बोलती ॥ ३३ ॥ बुद्धि इंद्रियें आणि मन । यांत चैतन्य प्रतिबिंबून । स्थूल सूक्ष्म भूतें धरून । देहा क्षेत्र म्हणावें ॥ ३४ ॥ इया सर्वांपासून जीव । भिन्नचि आहे जाण सदैव । इया ज्ञानालागीं उपाय । ऐक एक सांगतों ॥ ३५ ॥ लोकीं आपुला व्हावा मान । ऐसी वांछा दूर करून । आपुलें जें जें सद्वर्तन । तें तें झांकून असावें ॥ ३६ ॥ तैसीच आपुली कांहीं करणी । लागेल कोणाचे अंतःकरणीं । म्हणोनि आपुली देह-वाणी । सांभाळावी सदैव ॥ ३७ ॥ कोणी कांहीं बोललें उणें । तरी तें साहावें शांतपणें । आणि सर्वत्र सम वर्तणें । अंतःकरणापासुनी ॥ ३८ ॥ शरीर वाणी आणि मन । याहीं परम आदरेंकरून ।

श्रीसद्गुरूंचें चरणसेवन । करीत राहावें सदैव ॥ ३९ ॥ तैसेंच इंद्रियांसहित मन । नित्य ठेविजे निज-आधीन । आणि निवटावी चित्तांतून । विषयसुखाची वासना ॥ ४० ॥ सांडून अहंकाराची वाट । विचार हाचि पहावा नीट । कीं हें दुःख कैसें दाट । भरून राहिलें जगीं या ॥ ४१ ॥ जन्मकाळींचे केउते शिण । कैसें दुःखद बाळपण । आणि पुढेंहि आहे दारुण । बार्धक्य कैसें अघोर ॥ ४२ ॥ म्हणोनि स्त्रीसुत आणि धन । यांतून पूर्ण काढावें मन । आणि इष्टानिष्टागमन । समाचि मानीत रहावें * ॥ ४३ ॥ सर्वांतर्यामीं आत्माराम । तोचि आपुला सुखविश्राम । ऐशाचि निश्चयें त्याचें प्रेम । उदंड जोडून ठेवावें * ॥ ४४ ॥ पवित्र रम्य आणि निर्जनें । ऐसीं सेवावीं तीर्थस्थानें । आणि संसारीं रंगले मनें । संबंध सोडावा तयांचा ॥ ४५ ॥ व्हावया आत्मस्वरूपज्ञान । नानापरीचे यत्न करून । वेदान्ततत्त्वाचें श्रवण मनन । एकाग्रचित्तें करावें * ॥ ४६ ॥ ऐशा साधनांमाजी मन । गढून राहतां रात्रंदिन । तरी मग स्वरूपाचें ज्ञान । तेणेंचि जोडेल अवश्य ॥ ४७ ॥ देह इंद्रियें प्राण मन । बुद्धि अहंकार यांच्याहून । आत्मस्वरूप चैतन्यघन । वेगळें आहे सर्वथा ॥ ४८ ॥ आत्मा सर्व मलांहीं रहित । ज्ञानरूपेंचि आहे स्थित । हेंचि चित्तीं होतां निश्चित । ज्ञान त्यातें बोलिजे ॥ ४९ ॥ मग तेंचि कोणीएक काळें । अंतरीं प्रत्यक्ष प्रतीत झालें । तेधवां तेंचि आहे बोलिलें । विज्ञान शब्दें जनांत ॥ ५० ॥ आत्मा व्यापून राहे सकळ । चैतन्य-आनंद-रूप केवळ । त्यातें स्पर्शाया नाहीं बळ ।

कोणेकाहि विकारा ॥ ५१ ॥ त्याचिया अंगीं बुद्धयादिक । उपाधि स्पर्शू न शके एक । क्षयवृद्धयादि भाव अनेक । तेहि त्यातें नातळती ॥ ५२ ॥ तोचि आपुले प्रकाशावरी । देहादींतें प्रकाशित करी । आणि स्वयें अंतराअंतरीं । गूढ रूपानें राहतो ॥ ५३ ॥ तोचि वर्ततो एकीएक । तेथ लेशेंहि न ये आणिक । सद्रूप आणि चिद्रूप देख । हेंचि लक्षण तयाचें ॥ ५४ ॥ सकळ संबंधांहीं वर्जित । स्वप्रकाश आणि साक्षीभूत । ऐसिया तयाची प्राप्ति होत । विज्ञानयोगें एकल्या ॥ ५५ ॥ म्हणोनि सद्गुरूची खूण । आणि शास्त्राचें निरूपण । यांहीं जीवाचें शिवपण । शोधून घ्यावें अवश्य * ॥ ५६ ॥ मग ती जीवाची परमात्मता । विवेकें पूर्ण प्रतीत होतां । अविद्या कार्यकारणसहिता । तत्काळ पावे लयाला ॥ ५७ ॥ याचि अवस्थेतें जनीं । बोलती मोक्ष नामेंकरूनी । तो हा मोक्ष आत्मस्थानीं । नामेंचि सत्ता पावतो ॥ ५८ ॥ लक्ष्मणा, ऐसें मोक्षलक्षण । वैराग्य-ज्ञानविज्ञान-पूर्ण । तुज सांगून दिधलें जाण । तुझिया वांछेनुसारें ॥ ५९ ॥ परी जे माझिया ठायीं भक्ती । सांडोनि अन्य साधनें करिती । तयांस ह्या पदाची प्राप्ती । दुर्लभ ऐसें जाणिजे ॥ ६० ॥ जैसें रात्रीस घेऊन दीपा । पदार्थ शोधून घेणें बापा । तैसेंच जनांहीं स्वात्मरूपा । पाविजे भक्तिपथानें ॥ ६१ ॥ म्हणोनि मद्भक्तीचें कारण । सांगतों, तेंचि करी श्रवण । मद्भक्तांचीच संगति जाण । मद्भक्तीतें जन्मवी ॥ ६२ ॥ आणि माझिया सेवेकारितां । करावें एकादश्यादि व्रता । अन्य कोणीहि पर्व येतां । ऐसेंचि नियत राहावें ॥ ६३ ॥ माझिया

कथेचें होतां श्रवण । किंवा पठण कीं निरूपण । तेथ अत्यंत प्रेम-पूर्ण । होवोनि चित्त धरावें ॥ ६४ ॥ सांडूनि नाना परीचे काम । माझिया पूजनीं धरावा नेम । वरी माझेंच श्रीराम नाम । प्रेमें गात राहावें ॥ ६५ ॥ यापरी ठेवितां नित्यक्रम । अंतरीं भरेल माझें प्रेम । मग तें जडलिया प्रेम निष्काम । शीघ्राचि वैराग्य जोडतें ॥ ६६ ॥ मागुती स्वरूपाचें ज्ञान । मग साक्षात घ्यावें दर्शन । यापरी विज्ञान संपादून । अवश्य मोक्षास पावणें ॥ ६७ ॥ लक्ष्मणा, तुझिया प्रश्नानुसारें । ऐसें निरूपण केलें सारें । एथ चित्त लाबितां बा रे । मोक्ष संनिध तयाच्या ॥ ६८ ॥ परी बा, जयाचें अंतःकरण । भक्तीस शिवतलें नाहीं जाण । तयास ऐसा तत्त्वार्थ श्रवण । होऊंच नेदी प्रयत्नें ॥ ६९ ॥ आणि जयाचें अंतःकरण । माझिया प्रेमें दाटलें पूर्ण । तयास अगत्यें करवीं श्रवण । तत्वार्थ माझा एतुला * ॥ ७० ॥ इया तत्त्वार्थाचें मनन । जो कां श्रद्धेनें करील जन । त्याचें सर्व अज्ञानबंधन । तुटून जाय त्वरेनें ॥ ७१ ॥ आणि मद्भक्तांची संगती । जे कां प्रयत्नें संपादिती । त्यांचिया मोक्ष येतसे हातीं । म्हणोनि सत्संग करावा *॥ ७२ ॥ जे कां योगी आणि विमल । अंतरीं जाहले सुशीतल । आणि भक्तीमाजी सर्व काळ । रंगून गेले माझिया ॥ ७३ ॥ तैसेंच शुद्ध स्वरूपज्ञान । तेंहि जेथें विराजमान । ऐसिया पुण्यजनांचें सेवन । अवश्य जीवें करावें *॥ ७४ ॥ अंतरीं एकनिष्ठा धरून । करितां सत्संगाचें सेवन । तयास माझें स्वरूपदर्शन । प्राप्त होईल निश्चयें ॥ ७५ ॥ ऐसें सर्वार्थ-पूर्ण

अ. ११

वचन । रामें बोलिलें लक्ष्मणालागुन । साधकें नाना प्रयत्नें करून । अनुभव घ्यावा तयाचा ॥ ७६ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७७ ॥ श्रीराम ॥ २२ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

## अध्याय २३ वा, खरदूषण-वध

श्रीराम ॥ यापरी श्रीराम-सुमित्रासुत । ज्ञानवार्तांच्या आनंदांत । काळ क्रमिती सीते-सहित । पंचवटीचे संनिधीं ॥ १ ॥ तंव तया महा वनांतरीं । स्वेच्छया नाना रूपें धरी । बलिष्ठ एक दीर्घ-शरीरी । राक्षसी होती राहत ॥ २ ॥ तियेनें एकदां श्रीराम-पद । मार्गीं देखिलें सकल-सुखद । जयांत चिन्हें शोभती विशद । पद्म-वज्रांकुशादिकें ॥ ३ ॥ मग तयाच्या सौंदर्येंकरून । कामार्त जाहलें तियेचें मन । तंव ती तैशीच आश्रमस्थान । शोधीत आली पहाया ॥ ४ ॥ तेथ मदनाऐसा सुंदर । साक्षात देखिला श्रीरघुवीर । मग ती आणिक होऊनि आतुर । बोलूं लागली राघवा ॥ ५ ॥ अगा तूं कोण आणि कासया । निवास करिसी वनीं इया । जटा वल्कलें अंगीं ल्याया । कां रे आणिलें मनीं त्वां ॥ ६ ॥ मी ही रावणाची भगिनी । शूर्पणखा नामें करूनी । इच्छेनुसार रूपें धरोनी । संचारितसें वनीं या ॥ ७ ॥ मद्बंधु एक माझिया सवें । येथ राहतो **खर** या नांवें । मुनि-जनांतें

भक्षूनि राहावें । ऐसीच दीक्षा आमुची ॥ ८ ॥ रावणें आम्हांसि दिधलें वन । तेथ तूं आलासि गा कोठुन । यापरी ऐकोनि तियेचें वचन । श्रीराम बोले तियेला ॥ ९ ॥ म्हणे मी दशरथाचा सुत । राम नामें आहे विश्रुत । माझा हा बंधु सुमित्रासुत । भार्या सीता असे ही ॥ १० ॥ परी वो पुसाया माझें नाम । तुज आम्हांशीं काय काम । ऐसें तियेस पुसतां श्रीराम । राक्षसी बोले मागुती ॥ ११ ॥ अगा तूं होसी परमसुंदर । मजसि करितोसि कामातुर । म्हणोनि चाल येईं सत्वर । वनांत जाऊं क्रीडाया ॥ १२ ॥ तुझी ही कांति कैसी सतेज । मी तों सोडूंच न शकें तुज । म्हणोनि माझिया संगें आज । येईं आनंदें रमाया ॥ १३ ॥ तेधवां हांसोन श्रीरघुवीर । तियेस करिता झाला उत्तर । म्यां ही भार्या एकवार । पूर्वींच आहे पर्णिली ॥ १४ ॥ म्हणोनि सपत्नीचें दुःख । तुजसि भोगणें लागेल देख । मग कैचें वाटेल सुख । रमतां माझिया संगतीं ॥ १५ ॥ म्हणोनि मद्बंधु सुमित्रासुत । आश्रमीं बाहेर आहे स्थित । त्यासि घेवोनि जाईं वनांत । क्रीडेलागीं सुंदरी ॥ १६ ॥ तोचि तुझा होवोनि वर । शोभवील तुझें रूप सुंदर । म्हणोनि आतांचि जाऊनि सत्वर । त्याचि सुंदरा वरावें ॥ १७ ॥ तंव ती तैशीच लक्ष्मणाप्रती । जाऊनि म्हणे तूं होईं पती । भ्रात्राज्ञेनें माझिया संगतीं । चाल क्रीडाया एधवां ॥ १८ ॥ तंव तें तियेचें ऐकतां वचन । लक्ष्मण बोले तिजलागुन । सुंदरी, मी तों सेवा करून । राहतों तया प्रभूची ॥ १९ ॥ म्हणूनि मजसी करितां पती । दासीच होसी तूं संप्रती ।

मग दास्य येतां अंगाप्रती । दुःख आणिक केउतें ॥ २० ॥ म्हणून राजा राघवाप्रती । अवो तूं करूनि घेईं पती । त्याचिया संगें रमतां प्रीतीं । पूर्ण संतोष पावसी ॥ २१ ॥ तंव तें वचन होतां श्रुत । राक्षसी क्रोधावली बहुत । मग तत्काळ आश्रमा-आंत । जाऊनि बोले राघवा ॥ २२ ॥ अरे तूं किमर्थ ऐशा रीती । चाळवितोसि मजप्रती । आतां तुझीच तुझिया पुढती । सीता टाकितें गिळोनी ॥ २३ ॥ ऐसें बोलोन विक्राळपणीं । धावली सीतेवरी तत्क्षणीं । तंव लक्ष्मणें नासिकीं कर्णीं । खड्गें तत्काळ छेदिली ॥ २४ ॥ तथीं मग फोडोनि हाक थोर । धावली जेथ होता खर । मग ओरडूं लागली अनिवार । सर्वांग रक्तें नाहलें ॥ २५ ॥ तंव तो पाहतां चमत्कार । क्रोधें संतप्त झाला खर । म्हणे गे कोणें मरणद्वार । स्वयेंचि उघडून घेतलें ॥ २६ ॥ कवणें विरूप केलें तुज । आतांचि सांगोनि देईं मज । क्षण न लागतां तयास आज । वधून धाडीन यमपुरीं ॥ २७ ॥ तेधवां राक्षसी बोले त्यासी । अरे या गौतमी-तीरापाशीं । श्रीराम सीतालक्ष्मणांनिशीं । येऊन आहे राहिला ॥ २८ ॥ तेणें सकळ दंडक वन । मुनींस ठेविलें निर्भय करून । तेणेंचि माझे नाककान । लक्ष्मणाकरवीं छेदिले ॥ २९ ॥ म्हणोनि जरी म्हणविसी वीर । आणि बंधु असती साचार । तरी तूं उभयांसी करीं ठार । श्रीराम आणि लक्ष्मण ॥ ३० ॥ तयांचें सेवीन एक रुधिर । नातरी सांडीन येथें शरीर । यापरी ऐकतां तियेचें उत्तर । खर अत्यंत क्षोभला ॥ ३१ ॥ मग तयानें अत्यंत घोर । चौदा सहस्र राक्षस वीर । धा-

डिले तत्काळ राघवावर । निःपात कराया कारणें ॥ ३२ ॥ तैसाचि चालला खर आपण । संगें त्रिशिरा आणि दूषण । नाना शस्त्रास्त्रीं निपुण । युद्धार्थ वेगें चालले ॥ ३३ ॥ तयांचा कल्लोळ श्रवणीं येतां । श्रीराम म्हणे सुमित्रासुता । राक्षस येती वाटतें आतां । मजसी युद्ध कराया ॥ ३४ ॥ तरी तूं सीतेस घेऊन त्वरें । गुहेंत जाऊन राहणें बरें । मी हे राक्षस आपुल्या शरें । ठार करितों रणीं या ॥ ३५ ॥ आणीक कांहीं नव योजना । तुवां न आणावी आपुले मना । सत्वर येथून करीं गमना । आण माझी तुजला ॥ ३६ ॥ तईं तें मानून श्रीरामवचन । सीतेस घेऊन वेगें करून । लक्ष्मणें एक गुहेचें स्थान । अवलंबियेलें तेधवां ॥ ३७ ॥ मग कटी कसूनि रघुनाथें । स्कंधीं लाविले दोन भाते । मग जोडोनि धनुष्यातें । सिद्ध होऊनि राहिला ॥ ३८ ॥ तोंचि शस्त्रास्त्रें घेऊनि घोर । राक्षस पातले चौदा हजार । फेकूं लागले राघवावर । वृक्ष पाषाण उदंड ॥ ३९ ॥ तेधवां रामें सोडोनि शर । तत्काळ पाषाण केले चूर । मग त्या सर्वांस केलें ठार । सहस्र एक शरांहीं ॥ ४० ॥ मागुती सोडोनि तीव्र बाण । त्रिशिरा, खर आणि दूषण । भूमीस पाडून न लगतां क्षण । स्वस्थ झाला श्रीराम ॥ ४१ ॥ ऐसा लोटतां अर्ध प्रहर । झाला सर्वांचा संहार । मग लक्ष्मणें सीतेस सत्वर । राघवापाशीं आणिली ॥ ४२ ॥ तयीं ते पाहून राक्षस मृत । लक्ष्मण जाहला सुविस्मित । सीताहि अंतरीं दाटूनि बहुत । प्रेमें आलिंगी राघवा ॥ ४३ ॥ मग लागून शस्त्रप्रहार । व्रण जे जाहले अंगावर । त्यांतें पुसोनि सीतेनें

सत्वर । कष्ट हरिले प्रभूचे ॥ ४४ ॥ इकडे आपुल्या बंधूसहित । सकळ राक्षस जाहले मृत । पाहूनि राक्षसी चालली त्वरित । लंकापुरीस ते वेळां ॥ ४५ ॥ मग ती रावणाचिया सभेंत । प्रविष्ट जाहली आक्रंदत । आणि तत्काळ अंग टाकित । राक्षसेंद्राच्या पुढारां ॥ ४६ ॥ तयीं तें पाहतां दशानन । सोडूनि उठिला सिंहासन । मग 'वत्से, ऊठ' म्हणोन । सांत्वन करी तियेचें ॥ ४७ ॥ म्हणे सुंदरी तुजसि कोणीं । विरूप केलें सांगे झणीं । त्यास आतांचि येच क्षणीं । ठार करितों निर्धारें ॥ ४८ ॥ सांग, छळिलें कां सुरवरें । अथवा यमें वरुणें खरें । किंवा सांग दुष्टें कुबेरें । शीघ्रचि वधीन तयातें ॥ ४९ ॥ तेधवां राक्षसी म्हणे त्यातें । अहा रे षंढा मूढमते । तूं तों कैसा आपणातें । राजा म्हणविसी कळेना ॥ ५० ॥ राज्यीं घडेल जी जी मात । ती ती तुज कळाया त्वरित । नाहीं ठेविले तुवां दूत । राज्य करिसी किमर्थ ॥ ५१ ॥ स्त्रियांचें करितां आराधन । गमाविसी मूढा सारा दिन । आणि करोनियां मद्यपान । धुंद राहशी सदैव ॥ ५२ ॥ खर, दूषण आणि त्रिशिरा । सकळिकांचा जाहला चुरा । चौदा सहस्र राक्षस वीरां । भूमीस पाडिलें राघवें ॥ ५३ ॥ आणि एवढा करूनि प्रळय । वनीं राहे तैसाच निर्भय । श्रीराम, दशरथाचा तनय । जनस्थानाचे प्रदेशीं ॥ ५४ ॥ तेणें सारेंचि माझें वन । मुनींस निर्भय ठेविलें करून । परी हें कांहींच वर्तमान । तुजसि ठावें नसे कीं ॥ ५५ ॥ ऐसे तियेचे शब्द श्रवण । करितां विस्मय पावोनि रावण । म्हणे हा श्रीराम कैंचा कोण । सांग मजला

विस्तारें ॥ ५६ ॥ तेणें इतुकियांचा घात । कराया काय कारण होत । सांग, आतांचि जाऊन त्वरित । निःपात करितों तयाचा ॥ ५७ ॥ यापरी पुसतां दशानन । राक्षसी सांगे वर्तमान । अगा मी गौतमीतीरावरून । चाललें होतें एकदां ॥ ५८ ॥ तयीं जें पंचवटीचें स्थान । पूर्वींचें मुनिनिवास-सदन । तेथ राहिला आश्रम करून । श्रीराम तो म्यां पाहिला ॥ ५९ ॥ धनुष्य बाण घेवोनि करीं । उभा राहिला आश्रमद्वारीं । जटा वल्कलेंहि अंगावरी । शोभा देती सुरम्य ॥ ६० ॥ कनिष्ठ बंधु सुमित्रासुत । तोहि तैसाच संगतीं स्थित । वामांगीं परम शोभा देत । सुंदर भार्या त्याची ॥ ६१ ॥ ती तंव अत्यंत रूपवती । लक्ष्मीच ऐसी विलसे सती । पाहतां तियेच्या तुलनेप्रती । स्वर्गीं अप्सरा असेना ॥ ६२ ॥ अथवा गंधर्वांच्या नारी । तियेची पावूं न शकती सरी । जैशी नभींची चंद्रिका दुसरी । वनप्रदेशीं उदेली ॥ ६३ ॥ यापरी सौंदर्य अवलोकितां । तत्काळ माझिया आलें चित्ता । ऐसी त्रैलोक्यसुंदरी कांता । व्हावी आपुल्या रावणा ॥ ६४ ॥ म्हणोनि आणावयास तीतें । योजून जैं मी पुढें होतें । तेधवां रामेंचि छेदिलें मातें । लक्ष्मणाकरवीं यापरी ॥ ६५ ॥ तयीं मी दुःखें आक्रंदत । खरापाशीं जावोनि त्वरित । सांगतां घडली सकळ मात । तोहि तत्काळ क्षोभला ॥ ६६ ॥ मग तो घेऊन सारेचि असुर । धावोनि गेला राघवावर । परी त्या सर्वांस केलें ठार । तत्काळ रामें पहा कीं ॥ ६७ ॥ अगा हा श्रीराम आणी मनांत । तरी हें जाळील सारेंचि जगत । ऐसेंचि मजसि संदेह

रहित । प्रतीत झालें ते वेळीं ॥ ६८॥ परी ती तयाची सुंदर जाया । तुजसी प्राप्त होईल सया । तरीच सार्थक जाणिजे इया । असुरकुळींच्या जन्माचें ॥ ६९ ॥ म्हणोनि कांहीं यत्न करून । तियेस तुवां यावें घेऊन । परी तूं बापा एक वचन । अंतरीं ठेवी अवश्य ॥ ७० ॥ साक्षात राघवाचें तेज । असह्यचि आहे जाण तुज । म्हणोनि रामास वंचोनि, काज । साधून घ्यावें आपुलें ॥ ७१ ॥ यापरी राक्षसीचें वचन । रावणें ऐकिलें देवोनि मन । मग बहुतां परी करून । गौरव केला श्वसेचा ॥ ७२ ॥ मग सांडूनि सभास्थान । गृहीं करिता झाला गमन । परी तेथही तयाचें मन । चिंता-व्याकुळ जाहलें ॥ ७३ ॥ खरादि माझे राक्षस घोर । कैसे राघवें केले चूर । पाहतां मनुष्य हा पामर । आणि जो एकाकी वनस्थ ॥ ७४ ॥ अहो हा माझा बंधु खर । केवढा बळी आणखी शूर । परी त्यातें-हि केलें ठार । कैसें येणें मानवें ॥ ७५ ॥ अथवा नोहेचि हा मानव । श्रीराम जाणिजे देवाधिदेव । पातला माझिया नाशास्तव । मनुष्यरूपानें भूवरी ॥ ७६ ॥ सुरांहीं साधून माझें वैर । प्रार्थिला हा श्रीलक्ष्मीवर । म्हणोनि अवतरलासे भूवर । रघूच्या कुळांत ये वेळीं ॥ ७७ ॥ म्हणोनि याचिया हस्तें मज । जरी मरण पातलें आज । तरी मी होणार महाराज । वैकुंठ-पुरीचा निश्चयें ॥ ७८ ॥ नातरी राक्षस-सिंहासन । मजसि आहेचि चिरंतन । म्हणोनि आतांचि करूं गमन । युद्धाकारण राघवीं ॥ ७९ ॥ व्हावया रघुवीराची कृपा । भक्तीचा मार्ग नोहेचि सोपा । विरोधपथेंचि तत्काळ बापा । पावूं श्रीरामपदासी

॥ ८० ॥ ऐसेंच आपुल्या अंतःकरणीं । तयानें निश्चित केलें झणीं । अहो ही सकळ सुखाची खाणी । नाना मार्गांहीं पाविजे ॥ ८१॥ पहा कीं रामचि परमेश्वर । ऐसें जाणूनिही तो असुर । शोधूनि काढिता झाला सार । युद्ध हेंचि तयासी ॥ ८२॥ जैसी श्रद्धा आणि भाव । तैसा तैसा तयास उपाव । म्हणोनि युद्धचि राक्षसराव । योजिता झाला स्वबुद्धया ॥ ८३ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८४ ॥ श्रीराम ॥ २३ ॥ ॥ ७ ॥

---

## अध्याय २४ वा, सुवर्णमृगहनन.

श्रीराम ॥ विरोधमार्गींच जाणें उचित । ऐसें अंतरीं होतां निश्चित । रावण विचारी निज मनांत । कीं हें साधेल केउतें ॥ १ ॥ मग योजूनि कांहीं मनीं । उठला प्रभात झाली पाहुनी । आणि तैसाच वेगेंकरूनी । रथ सिद्ध करीतसे ॥ २ ॥ मागुती आरूढ होऊनि वरी । मार्गीं रथ चालवी सत्वरीं । तयीं तो मारीचाचे घरीं । जाऊन पोंचला क्षणार्धें ॥ ३ ॥ तंव तो मारीच मुनींच्या परी । वल्कलें लेवूनि अंगावरी । जटाहि धारण करी शिरीं । आणि ध्यात हरीतें ॥ ४ ॥ परमात्मा जो लक्ष्मीकांत । गुण आकार यांहीं राहित । कीं जो स्वयें स्वस्वरूपांत । नाना आकार भासवी ॥ ५ ॥ ऐशिया परमात्म्याचें

ध्यान । करितां मारीचाचें मन । सांडून सकळ संकल्पवन । एकाग्र होऊनि राहलें ॥ ६ ॥ मागुती होतां सावधान । तेणें केलें अवलोकन । तंव तो देखिला दशानन । गृहास आला आपुले ॥ ७ ॥ मग परम आदरें करून । तयास स्वासनीं बैसवून । पुसून कुशल वर्तमान । मारीच म्हणे तयातें ॥ ८ ॥ अहो जी एकाकी रथांतून । किमर्थ केलें आगमन । किमर्थ आजि आपुलें वदन । चिंतामग्न जाहलें ॥ ९ ॥ सांगे आपुलें इष्ट काज । मी तें साधून देईन सहज । परी तें केव्हांहि महाराज । नीतीस सांडून नसावें ॥ १० ॥ सेवूनि अन्यायाचा पथ । पाप सांठवावें बहुत । हें तों सर्वथा नोहे उचित । विचारवंतां आपणां * ॥ ११ ॥ यापरी मारीचाचें वचन । श्रवण करितां दशानन । म्हणे म्यां केलें आगमन । किमर्थ तें हें सांगतों ॥ १२ ॥ अयोध्यादेशीं श्रीदशरथ । नामें नृप एक राज्य करित । तयाचा श्रीराम नामें सुत । शौर्यें विख्यात भूवरी ॥ १३ ॥ तयास तयाच्या वृद्ध तातें । धाडिलें वनीं राहावयातें । म्हणोनि तो आज पंचवटीतें । येऊन आहे राहिला ॥ १४ ॥ संगें लक्ष्मण तयाचा भ्राता । तैसीच तयाची भार्या सीता । जियेचें सौंदर्य अवलोकितां । रतीस लज्जा येतसे ॥ १५ ॥ तयानें माझे राक्षस-वीर । निमित्तावांचूनि केले ठार । आणि प्रत्यक्ष माझा खर । भ्राताहि तेणें मारिला ॥ १६ ॥ माझी शूर्पणखा भागिनी । नाकीं कानीं शस्त्रें छेदुनी । अरे हा दुष्ट निर्धास्त वनीं । नांदत आहे पहा कीं ॥ १७ ॥ म्हणोनि तयाची भार्या सीता । आश्रमामाजी एकली असतां । हरून आ-

णणें आहे आतां । तुझिया साह्यें करोनी ॥ १८ ॥ तुवां होवोनि मृग सुंदर । आश्रमापासून श्रीरघुवीर । लक्ष्मणासहित न्यावा दूर । मग म्यां सीतेस हरावें ॥ १९ ॥ यापरी माझें मनोगत । सिद्धीस पाववून मग त्वरित । बा, तूं येऊन राहीं निवांत । इये आपुले आश्रमीं ॥ २० ॥ ऐसें बोलतां लंकानाथ । मारीचें जेधवां केलें श्रुत । तयीं तो अंतरीं आश्चर्यचकित । होवोनि बोले तयातें ॥ २१ ॥ गा हा सर्वनाशाचा पथ । तुजासि कवणें केला सूचित । तुझा तो वैरीच जाण खचित । तुझिया नाशातें इच्छितो ॥ २२ ॥ अरे या रघुनाथाचें तेज । पूर्वींच प्रत्यया आलें मज । तयाची स्मृति होतांहि आज । चित्त भयभीत होतसे ॥ २३ ॥ कौशिक-यज्ञाचें संरक्षण । कराया हाचि सीतारमण । येऊन आम्हांसवें दारुण । युद्ध करिता जाहला ॥ २४ ॥ तेधवां बालचि असून तेणें । मजासि फेकूनि एकेंचि बाणें । सागरीं नेवोनि टाकिलें क्षणें । शतयोजन-प्रदेशीं ॥ २५ ॥ तेंहून माझें अंतःकरण । भयेंचि व्यापिलें आहे पूर्ण । घडीघडी होवोनि रामस्मरण । तोचि सर्वत्र भासतो ॥ २६ ॥ एकदां याचि वैरा स्मरुनी । पुनः मी गेलों दंडक-वनीं । मृगाचें सुरम्य रूप धरोनी । कित्येक असुरांसमेत ॥ २७ ॥ परी तत्काळ सोडूनि शर । तेणें विंधिलें माझें अंतर । आणि समुद्रामाजी सत्वर । फेकूनि दिधलें पुनश्च ॥ २८ ॥ तेव्हांपासून घेऊनि धाक । येथ येवोनि राहिलों देख । अंतरीं सदैव रघुनायक । दाटोनि बैसला, ढळेना ॥ २९ ॥ म्हणोनि ऐसा माझिया पाठीं । लागला आहे हा जगजेठी ।

तेणें आणीक संसारगोष्टी । कांहींच एक सुचेना ॥ ३० ॥ राजा, रान, राणी, रात । यापरी कांहींहि होतां श्रुत । तत्काळ चित्त होतें शंकित । राम आला म्हणोन ॥ ३१ ॥ ऐसा लागून राम-ध्यास । सर्व कार्यांचा झाला नाश । निद्राकाळींहि माझे मनास । राम हा सोडूं शकेना ॥ ३२ ॥ तुज काय सांगावें बहुत । स्वप्नामाजीहि दृष्टीस येत । मग दचकून व्हावें जागृत । ऐसें चाललें प्रत्यहीं ॥ ३३ ॥ म्हणोनि रे तुवां लंकानाथें । न जावें ऐशा अनिष्ट पथें । गृहास परतावें, हेंच येथें । तुझिये हिताचें जाणिजे ॥ ३४ ॥ अगा हें राक्षसांचें कुल । चालत आलें जें दीर्घकाळ । तयाच्या विनाशाची वेळ । आणूं नये तुवां ही ॥ ३५ ॥ व्हावया तुझें परम हित । मी ही सांगत आहें मात । म्हणोनि सांडूनि शंका किंत । चित्तांत घेईं विवेकें ॥ ३६ ॥ सोडूनि विरोधाची मती । प्रेमेंचि सेवीं सीतापती । इया करुणेच्या मेघाप्रती । भक्तिच एक जिंकिते * ॥ ३७ ॥ इया प्रसंगाची मात । मजासि पूर्वींच आहे श्रुत । कीं, श्रीहरीतें आदियुगांत । प्रार्थना केली विधीनें ॥ ३८ ॥ कीं जी देवा भूलोकावरी । अवतीर्ण होईं नर-शरीरीं । आणि भूभार दूर करीं । दशाननातें वधूनी ॥ ३९ ॥ म्हणोनि विधीची ही प्रार्थना । देवाधिदेवें आणूनि मना । तुजसि पाववावया निधना । अवतार घेतला असे हा ॥ ४० ॥ अरे हा श्रीराम नोहे नर । प्रत्यक्ष जाणिजे लक्ष्मीवर । भूभार सर्व कराया दूर । वनीं येऊन राहिला ॥ ४१ ॥ म्हणून बा रे लंकानाथा । आतां न लागें आणिक पथा । सुखेंचि आपुले गृहीं सर्वथा । जाऊन

राही ये वेळीं ॥ ४२ ॥ तेधवां बोलला राक्षसवर । अरे हा परमात्मा श्रीरघुवीर । माझिया वधार्थ भूमीवर । अवतीर्ण झाला असेना ! ॥ ४३ ॥ तरी तो आपुलें मनोगत । सिद्धीस नेईल हें निश्चित । म्हणून हेंचि आतां उचित । भार्या त्याची हरावी ॥ ४४ ॥ येथ जाईल माझा प्राण । तरी मी पावेन पद निर्वाण । नातरी श्रीराम पावतां मरण । सेवीन सीता सुखानें ॥ ४५ ॥ म्हणोनि मारीचा तुझें मत । वायांचि, ऐसें जाण येथ । आतां उठोनि बा रे त्वारित । लागे कार्यास माझिया ॥ ४६ ॥ घेऊनि मृगाचें रूप रुचिर । आश्रमापासून श्रीरघूवीर । बंधूसमवेत नेईं दूर । नलगे वृथा कथा ही ॥ ४७ ॥ आतां आणीक कांहीं मात । सांगून आड येशील येथ । तरी हें खड्गाचि मस्तकांत । घालीन तुझ्या निश्चयें ॥ ४८ ॥ तयीं तें वचन होतां श्रुत । मारीच पाहे अंतरांत । कीं मज वधील सीताकांत । वरी संसारीं नये मी ॥ ४९ ॥ परी या दुष्टाचिया हातीं । जरी पावेन मरणगती । तरी मज नरकाचीच प्राप्ती । होणार हें तों निश्चयें ॥ ५० ॥ म्हणोनि श्रीरामकरीं निधन । तेणें आपणा स्वीकारून । रावणाचें तें आज्ञावचन । अंगीकारिलें ते वेळीं ॥ ५१ ॥ मग ते दोघेहि रथीं बसून । पावले रामाचें आश्रमस्थान । मग मारीच मृग बनून । वनीं संचारूं लागला ॥ ५२ ॥ अंगीं सुरम्य सुवर्णकांती । वरी रौप्यबिंदु शोभती । तैशींच शृंगेंही चमकतीं । रत्नाऐशीं सतेज ॥ ५३ ॥ मणि जडिले ऐसे खुर । नयन नीलाऐसे रुचिर । आणि सर्वही शरीरावर । विद्युत्प्रभा साजिरी ॥ ५४ ॥ ऐसा सकळहि अंगें करून । मृग तो अत्यंत शोभाय-

मान । सीतेचें आकर्षावया मन । धांवे आश्रमाभोंवतीं ॥ ५५ ॥ धांवतां मध्येंच व्हावें स्थिर । क्षणैक यावें सीतेसमोर । पुनश्च भय पावोनि दूर । धांवूनि जावें त्वरेनें ॥ ५६ ॥ यापरी सीतेचें अंतःकरण । मोहून घ्यावयालागीं पूर्ण । खळ तो होवोनि मायाहरिण । वनीं संचारूं लागला ॥ ५७ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ५८ ॥ श्रीराम ॥ २४ ॥ ॥ ७ ॥

---

## अध्याय २५ वा, सीताहरण.

श्रीराम ॥ इकडे दशाननाची मती । ध्यानीं आणून सीतापती । बोलतां झाला सीतेप्रती । प्रिये हें ऐक रहस्य ॥ १ ॥ कीं हा भिक्षूचें रूप धरून । आश्रमीं येईल दशानन । तरी तूं पावोनि अंतर्धान । अग्नींत अदृश्य राहावें ॥ २ ॥ आश्रमीं ठेवूनि आपुले छाये । एक वर्ष क्रमावें प्रिये । मागुती प्रकट होइजे स्वयें । रावणवध झालिया ॥ ३ ॥ मग तें वचन होतां श्रुत । सीताहि तैसेंच आचरत । आश्रमीं छायाच करूनि स्थित । अदृश्य होवोनि राहिली ॥ ४ ॥ मग ती छायारूपाची सीता । मृगास पाहूनि संचारतां । प्रेमें विनयें होवोनि युता । बोले आपुल्या प्रियातें ॥ ५ ॥ म्हणे जी पहा हो मृग सुंदर । निर्भय करीत वनसंचार । अंगींचा सुवर्णवर्ण रुचिर । नेत्र ओढून घेतसे ॥ ६ ॥ म्हणून

धरून आणून तया । मजसी द्या जी क्रीडावया । यापरी बोलतां श्रीरघुराया । मानलें वचन तियेचें ॥ ७ ॥ मग तो घेऊनि धनुष्यबाण । बंधूस बोलला, गा लक्ष्मण । मी हा धराया हेमहरिण । वनांत आहें चाललों ॥ ८ ॥ येथ एकली आहे सीता । माझी प्राण-प्रिया वनिता । म्हणून तियेच्या रक्षणाकरितां । तुवां सावध असावें ॥ ९ ॥ इया अर-ण्यामाजी घोर । राक्षस फिरती वारंवार । म्हणोनि येथ क्षणहि भर । दुर्लक्ष होऊं न द्यावें ॥ १० ॥ तेधवां लक्ष्मणें बोलिलें वच । अहो हा नोहेचि हरिण साच । मृगाच्या रूपें दुष्ट मारीच । वनीं फिरत असे हा ॥ ११ ॥ तैं राम म्हणे असेल असुर । तरी जाऊनि करितों ठार । नातरी क्रीडेलागीं सुंदर । मृग होईल प्रियेतें ॥ १२ ॥ म्हणोनि जातोंचि आतां वनीं । मृगास येथ आणितों धरुनी । तुवां नाना प्रकारें करोनी । सीतेचें रक्षण करावें ॥ १३ ॥ ऐसें सांगून सीतारमण । वेगेंचि गेला धराया हरिण । जो कां सकळ-कामपूर्ण । मायातीत ईश्वर ॥ १४ ॥ अहो हें कैसें भाग्य थोर । भक्तानुकंपी परमेश्वर । चालला मृगामागें सत्वर । भक्तकाजाचे कारणें ॥ १५ ॥ जो कां विमल, विकाररहित । चिद्रूप परमात्मा निश्चित । तो हा कांतारीं धांव घेत । मृग आणूनि द्यावया ॥ १६ ॥ नातरी इया परमात्मयातें । सकळ काम-परिपूरितातें । आणीक कोणतें कार्य होतें । सीतेशीं अथवा मृगाशीं ॥ १७ ॥ असो, तो मायामृग सुंदर । धावे संनिध आणखी दूर । क्षणैक येवोनि दृष्टीसमोर । सवेंचि अदृश्य होतसे ॥ १८ ॥ यापरी दावोनि माया-

लीला । नेतां रामास दूरांतराला । चित्तीं जाणोनि कपटकला । राघवें बाणें विंधिलें ॥ १९ ॥ तंव हा लक्ष्मणा धांवें क्षणीं । मी येणें पाडिलों धरणीं । यापरी बोलोनि रामवाणी । अंग टाकिलें तयानें ॥ २० ॥ तयीं मृगाचा मिथ्याकार । सांडूनि प्रगटिलें रक्षःशरीर । आणि पसरला भूमीवर । रुधिर वदनीं चाललें ॥ २१ ॥ तेधवां तयाचे देहांतून । तेज एक तें वेगें निघून । पाहत असतांचि सारे जन । राघवा-अंगीं मिळालें ॥ २२ ॥ अहो जयाचें नामस्मरण । भावें कीजेल पावतां मरण । तरी तो स्वरूपीं पाविजे जाण । अज्ञ जीवहि असोनि ॥ २३ ॥ मग तयाची प्रत्यक्ष मूर्ती । ठेवूनी आपुल्या नयनांपुढती । मरण पावलिया असुराप्रती । गति कायसी वदावी ॥ २४ ॥ परी तें करितां अवलोकन । विस्मित जाहले देव-जन । म्हणती अहो हा पापी दुर्जन । मुनिहिंसक राक्षस ॥ २५ ॥ तयानें श्रीराम-स्वरूपांत । पावावें हें नवल बहुत । अथवा महिमा हा अद्भुत । रघुराया-च्या कृपेचा ॥ २६ ॥ पूर्वीं जेधवां श्रीरामबाण । लागून विंधिलें अंतःकरण । तैंहूनि श्रीराघवाचें स्मरण । अखंड जडलें तयातें ॥ २७ ॥ याचि भयें स्त्री-पुत्रादिक । उपाधि सांडोनियां सकळिक । अंतरीं हा एक रघुनायक । ध्यात राहिला सदैव ॥ २८ ॥ तेणें आधींच परमपूत । वरी अंतींहि श्रीरघुनाथ । सुरम्य मूर्तीस अवलोकित । प्राण सोडिता जाहला ॥ २९ ॥ मग राघवीं मिळावया । आणिक काय व्हावें तया । म्हणोनि अखंड स्मरणेंचि इया । सकळ मंगळ वरावें ॥ ३० ॥ द्विज असो कीं राक्षस दुष्ट । पातकी

आणिक धर्मभ्रष्ट । अंतीं रामास पावेल स्पष्ट । स्मरणमात्रेंचि तयाच्या* ॥ ३१ ॥ यापरी बोलून परस्पर । स्वर्गास गमन करिती सुर । मागुती विचारी श्रीरघुवीर । कीं हें कैसें वर्तलें ॥ ३२ ॥ खळें या माझ्याचऐशी वाणी । बोलून दिधली हांक झणीं । परी ती पावती प्रियेच्या श्रवणीं । कैसें होईल कळेना ॥ ३३ ॥ ऐसा होवोनि चिंतातुर । तेथून परतला श्रीरघुवीर । इकडे आश्रमामाजी तोंवर । वृत्त ऐसें वर्तलें ॥ ३४ ॥ वनींची हाक होतांचि श्रुत । सीता दचकली अकस्मात । मग लक्ष्मणालागीं बोलत । ऐसें जाऊन तेधवां ॥ ३५ ॥ अहो जी धावा धांवा त्वरित । नाथांस खळें या पीडिलें खचित । वनींची हाक आतांचि श्रुत । होत आहे पहा ही ॥ ३६ ॥ तंव तो बोलला सुमित्रासुत । हें रामवाक्य नोहे खचित । मारीच राक्षस होतां मृत । गर्जिन्नला असे हा ॥ ३७ ॥ देवाधिदेव रघुनंदन । कोपतां त्रिलोकी करील दहन । देवी, तो हें दीनवचन । बोलेल कोण्या निमित्तें ॥ ३८ ॥ तेधवां क्रोधें सुमित्रासुता । पाहोन बोलूं लागली सीता । तत्काळ तियेच्या नेत्रप्रांता । आसवें येऊन ठाकलीं ॥ ३९ ॥ म्हणे तूं होसी परम कपटी । तुझिया हेंचि आहे पोटीं । कीं या रघुनाथाला संकटीं । ऐसेंच गोंवावें एकदां ॥ ४० ॥ रघुनाथाचा कराया घात । भरतें तुज धाडिलें खचित । स्वयें तूं इच्छिसी अंतरांत । हरून न्याया मजलागीं ॥ ४१ ॥ परी तूं अंतरीं ठेवी खूण । कीं मी सांडीन आपुला प्राण । परी तुझिये हातास जाण । न ये कल्पांतीं निश्चयें ॥ ४२ ॥ अगाई ऐसें कौटिल्य थोर । जाणूं न शकला श्रीरघुवीर । कीं

हा जगतीं पातला चोर । भार्या चोरून न्यावया ॥ ४३ ॥ परी ही राघवाची प्रिया । आणिकां स्पर्शेल हें तों वायां । राघवावांचून देहा इया । कोण स्पर्शू शकेल! ॥ ४४ ॥ ऐसें बोलोनिया ती स्वरें । मस्तक पिटूं लागली करें । आणि तैशीच मुक्त स्वरें । रोदन करूं लागली ॥ ४५ ॥ तंव ते सियेचे शब्द दुर्धर । ऐकतां उद्विग्न होऊनि थोर । लक्ष्मणें आपुलें कर्णद्वार । झांकून घेतलें करांहीं ॥ ४६ ॥ अत्यंत करपला अंतःकरणीं । मग तो सीतेस बोले झणीं । गांजिसी व्यर्थ वो चांडाळणी । ऐशिया वचनीं मला तूं ॥ ४७ ॥ धिक् धिक् ऐशा तुजकारणें । जी तूं बोलसी अनार्यपणें । नाशास पावसी ऐशा गुणें । हेंचि भाकित ययाचें ॥ ४८ ॥ ऐसें बोलोन, वनदेवींतें । सांगून तियेस संभाळण्यातें । परम दुःखें सुमित्रासुतें । गमन केलें वनासी ॥ ४९ ॥ मग तो समय पाहून उचित । रावण तेथ पातला त्वरित । संन्याशाच्या वेषें, करांत । घेऊन दंडकमंडलू ॥ ५० ॥ मग तयास अवलोकितां । आदरें नमस्कारी सीता । आणि आणून देई स्वतां । कंदमूलादि तयातें ॥ ५१ ॥ मग म्हणे जी मुनि-प्रवरा । सेवूनि इया वन्याहारा । येथ सुखें विश्राम करा । सांडूनि चिंता मनींची ॥ ५२ ॥ आतांचि येतील माझे नाथ । आणि आपुला यथातथ । पूर्ण करूनि मनोरथ । संतोष करितील आपुला ॥ ५३ ॥ ऐसें ऐकोन सतीचें वचन । तिजसि बोले दशानन । सुंदरी तूंतें अवलोकून । संतुष्ट झालों असें मी ॥ ५४ ॥ आतां तुझें नामाभिधान । ऐकवी एकदां मजलागून । तुझिया पतित्वाचा मान । तोहि

कोणा तें सांगिजे ॥ ५५ ॥ आणि ऐसिये वनांतरीं । राहसी किमर्थ तूं सुंदरी । नाना भयांचिया आगरीं । तेंहि सांगे मला वो ॥ ५६ ॥ तेधवां सकळ वर्तमान । सीतेनें तयास निवेदून । अंतीं तयाचें नामाभिधान । पुसिलें जाणावयातें ॥ ५७ ॥ तयीं तो दुष्ट म्हणे प्रिये । हा मी राक्षसराजा स्वयें । सारें त्रैलोक्य ज्याचिया भयें । कंप पावूं लागतें ॥ ५८ ॥ नामें रावण मी विख्यात । पौलस्त्य मुनींद्राचा सुत । कामें होवोनि परिपीडित । न्यातुझा तूंतें पातलों ॥ ५९ ॥ मुनिवृत्तीचा हा रघुराज । तुझें कवण साधील काज । म्हणोनि सुंदरी मातेंचि आज । तुवां आवडी वरावें ॥ ६० ॥ वनींचें दुःख हें अतिशयित । सांडूनि सखये आतां त्वरित । माझिया संगें होवोनि रत । सेवीं नाना सुखांतें ॥ ६१ ॥ तंव तें वचन ऐकतां क्षणीं । सीता दचकली अंतःकरणीं । मग कांहींशीं धीरपणीं । परतून बोले तयातें ॥ ६२ ॥ कीं तूं कोण रे ऐसा नीच । मजसि बोलसी दुष्ट वच । तयीं तूं राघवहस्तें साच । नष्ट होशील ये वेळे ॥ ६३ ॥ आतांचि माझे प्राणनाथ । येतील सुमित्रासुतासहित । मग तूं दुष्टा एके क्षणांत । मरशील शरें तयांच्या ॥ ६४ ॥ अरे या सतीस लावील हात । ऐसा कोण ये त्रैलोक्यांत । ससा माजला जरीहि बहुत । सिंहीस स्पर्शूं शकेना ॥ ६५ ॥ ऐसें सीतेचें ऐकतां वच । क्रोधावला तो परम नीच । मग आपुलें स्वरूप साच । दाविता झाला तियेतें ॥ ६६ ॥ पर्वताऐसा देह थोर । दहा मुखें आणि वीस कर । कांति घनदाट अंगावर । कृष्णमेघासारिखी ॥ ६७ ॥ ऐसिया तयातें

अवलोकितां । दचकल्या वेगें वनदेवता । आणिकांतेंहि पडली चिंता । प्राण-रक्षणाकारणें ॥ ६८ ॥ मग रावणें फोडोनि धरणी । भूभागचि उपटिला झणीं । आणि रथीं घालोनि सीता राणी । चालला आकाशपथानें ॥ ६९ ॥ तयीं अहो जी नाथा त्वरित । धावा धावा हो सुमित्रासुत । यापरी सती ती परमभीत । मार्गीं आक्रंदूं लागली ॥ ७० ॥ तंव तो आक्रोश करितां श्रुत । जटायू वृक्षाग्रीं होता स्थित । तेणें पुढती होवोनि त्वरित । हाक दिधली तयासी ॥ ७१ ॥ अरे तूं करोनि मोठी त्वरा । कोठें चालला अससी खरा । रथीं रघुवीराची दारा । घेऊन निर्लज्जपणानें ॥ ७२ ॥ पुरोडाश जैसा पावन । श्वानें नेइजे यज्ञांतून । तैसा सीतेस तूं दुर्जन । नेऊं म्हणसी काय रे ॥ ७३ ॥ ऐसें बोलोन तो द्विज-वर । रथाचा करिता झाला चूर । मग तुरगहि करोनि ठार । चाप भंगी तयाचें ॥ ७४ ॥ तेथवां क्षोभून राक्षसवीर । सीतेस सवेंचि ठेवूनि दूर । खड्ग करोनि तीव्र प्रहार । पक्ष छेदी तयाचे ॥ ७५ ॥ तयीं आसन्न-मरणस्थिती । पावून जटायू पडिला क्षिती । मग तो सवेंचि लंकापती । रथ जोडीत आणखी ॥ ७६ ॥ मग त्यावरी घालोनी सती । चालला मार्गीं शीघ्रगती । तयीं थोर उद्वेग चित्तीं । दाटूनि आला सतीच्या ॥ ७७ ॥ येथ या दुष्टाचे हस्तांतून । कोण सोडवीं मजलागून । म्हणोन परम भय पावून । फार आक्रंदूं लागली ॥ ७८ ॥ अहा जी नाथा प्राणप्रिया । धांव बा धाव आतां सदया । मजसि चांडाळान इया । कैसें गोविलें पहा कीं ॥ ७९ ॥ जिवलगा अहो श्रीरघुवीरा । खळ हा हरितो

आपुली दारा। या जी, या जी, करोनि त्वरा। दासीस मुक्त कराया ॥ ८० ॥ अहा जी लक्ष्मणा शुद्धांतरा। या जी! आतां रक्षण करा। नेणोनि केलिया वाक्प्रहारा। दयाळा क्षमा करा हो ॥ ८१ ॥ ऐसें चालतां आक्रंदन। येईल नेणों रघुनंदन। म्हणोनि परम-वेगें करून। खळ तो हाकी रथातें ॥ ८२ ॥ यापरी रथ चालतां गगनीं। भूमीस एके पर्वतस्थानीं। पांच वानर बैसले मिळोनी। ऐसें सीतेनें पाहिलें ॥ ८३ ॥ मग रामास व्हाया विदित। काढूनि अलंकार त्वरित। बांधूनि उत्तर-वस्त्रार्धांत। फेकिले तेथ तियेनें ॥ ८४ ॥ इतुकियामाजी सागरतीर। ओलांडूनि तो दुष्टप्रवर। सीतेसहित जाऊन सत्वर। पातला लंकापुरीतें ॥ ८५ ॥ मग आपुल्या अंतःपुरीं। सुंदर अशोक-वनांतरीं। राक्षसीं-च्या रक्षणामाझारी। ठेविता झाला सतीतें ॥ ८६ ॥ तेथ हा नाथा हा श्रीरामा। हा हा माझिया सुखविश्रामा। कैं तूं येऊन आपुल्या धामा। भार्येस नेशील तुझ्या या ॥ ८७ ॥ हा जी प्रियकर श्रीरघुराज। तुजासि मुकलें कीं मी आज। येथून न्यावयालागीं मज। येशील काय सख्या तूं ॥ ८८ ॥ ऐसें आठवूनि नाना रीती। दुःखें व्याकूळ होवोनि अती। काल कंठीत राहे सती। अश्रुपूरित लोचनीं ॥ ८९ ॥ नाहीं वेणीं नाहीं फणी। नाहीं अंग कीं वस्त्र-धुणी। अखंड एक घेतली स्मरणी। हा राम हा श्रीनाथजी * ॥ ९० ॥ ऐसा ध्यास घेतला थोर। तेणें शुष्क झालें शरीर। मुख जें परम मनोहर। तेंहि गेलें सुकोनी ॥ ९१ ॥ अहो हा वियोग श्रीरामाचा। अग्निच एक आहे साचा। ह्याचि

दाह करी जगाचा । दुःखज्वालांहीं सदैव ॥ ९२ ॥ नाहीं रघुनाथाचा योग । तयास सुखाचा कैंचा योग । तेणें दुःखाचाचि लाग । जोडूनि ठेविला म्हणावा * ॥ ९३ ॥ म्हणोनि सीता देवीची स्थिती । साधकें साधून आपणाप्रती । एकदां राजा श्रीरघुपती । भेटीस आणावा आपुले ॥ ९४ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ९५ ॥ श्रीराम ॥ २५ ॥ ॥

## अध्याय २६ वा, जटायूद्धार.

श्रीराम ॥ इकडे मृगाचें करून हनन । जेधवां परतला रघुनंदन । तईंच पुढती दीन-वदन । लक्ष्मण येतां देखिला ॥ १ ॥ मग श्रीराम अंतरीं पाहत । कीं ही यातें न ठावी मात । सीता पावक-स्वरूपा-आंत । अदृश्य होऊन राहिली ॥ २ ॥ आश्रमामाजी छाया-सीता । जी कां ठेविली आहे आतां । तीच इया सुमित्रासुता । साचीऐसी वाटते ॥ ३ ॥ तरी हें तयाचें अंतःकरण । चाळूंच नये जी आपण । म्हणोनि आतां सीतेकारण । दुःख झालेंसें दाखवूं ॥ ४ ॥ नातरी वैराग्य स्वीकारून । जरी मी राहीन उदासीन । तरी या राक्षसांचें हनन । कोण आणीक करील ॥ ५ ॥ परी मी कामुकाऐसा एथ । जरी शोकाचा धरीन पथ । तरि मग सीतेचा शोध करीत । पावेन लंकेस सर्वेचि ॥ ६ ॥ मग जे राव-

णादिक असुर । तयांस समरीं करोन ठार । सीतेसहित येऊन सत्वर । पावेन अयोध्यापुरीतें ॥ ७ ॥ म्यां हा धरिला मनुष्यभाव । ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेस्तव । म्हणोन तैसेंच मायालाघव । करून दावूं जगातें ॥ ८ ॥ मग ती माझी अवतारकृती । जे कां प्रेमें ऐकती गाती । तयांस सवेंचि मोक्षप्राप्ती । भक्तिमार्गानें चालतां * ॥ ९ ॥ ऐसें योजूनियां मनीं । पुसता झाला भ्रातयालागुनी । रे तूं आलासि कैसा वनीं । सांडूनि माझ्या प्रियेला ॥ १० ॥ उटजीं पाहोनि ती एकली । बहुधा राक्षसीं असेल नेली । किंवा फाडून भक्षण केली । असेल आतां प्रिया ती ॥ ११ ॥ तेधवां जोडोनि दोन्ही हात । आसवें दाटून लोचनांत । लक्ष्मणें केलें निवेदित । जैसें घडलें आश्रमीं ॥ १२ ॥ देवा आपुल्याऐसी वाणी । वनींहूनि पावतां श्रवणीं । भय पावोनि सीताराणी । दुःखें व्याकुळ जाहली ॥ १३ ॥ आणि 'वेगेंच जाईं वनीं' । ऐसें बोलली मजलागुनी । तैं म्यां बोलिलें देवी मनीं । नलगे शंका धराया ॥ १४ ॥ शब्द हे नोहेत रघुनाथाचे । हें तों राक्षसकौटिल्य साचें । ऐसें सांगतां मजसि वाचे । जे कां देवी बोलली ॥ १५ ॥ प्रभो तें देवीचें दुर्वचन । काय सांगावें तुजलागून । मीं तें श्रवणीं येतांच कान । वेगें झांकून घेतले ॥ १६ ॥ मग तुजसि शोधाया त्वरित । म्यां वनींचा धरिला पथ । ऐसें लक्ष्मणें सांगतां वृत्त । रामें बोलिलें तयासी ॥ १७ ॥ कीं, बा तुझें हें आचरण । येथ अनुचित घडलें जाण । साच मानूनि स्त्रीभाषण । टाकूनि आलासि केउता ॥ १८ ॥ आतां आश्रमामाजी प्रिया । कोठून दृष्टीस येईल सया । तिजला नेऊन भक्षावया ।

खळ नसतील चुकले ॥ १९ ॥ ऐसा होवोन चिंतातुर । आश्रमीं पातला श्रीरघुवीर । तैं ती न देखतांच सत्वर । परम व्याकुळ जाहला ॥ २० ॥ म्हणे हा सुंदरी प्राणप्रिये । येधवां कोठें गेलीस सये । नित्याऐसी आश्रमीं इये । कां न दृष्टीतें पावसी ॥ २१ ॥ अथवा सखये, विनोदासाठीं । लपून असती काय वो पाठीं । तरी तें सांडूनि आतांचि भेटी । द्यावया येईं त्वरेनें ॥ २२ ॥ मग तें सारेंचि वनस्थान । शोधून पाहे श्रीरघुनंदन । परी ती कोठेंचि नये दिसून । जगन्माया तयातें ॥ २३ ॥ संगें पाहत सुमित्रासुत । परि तो रिताच आला परत । अहो हें कायसें नवल येथ । माया गवसेना विवेका ॥ २४ ॥ हस्तीं घेऊनि शुद्धदीप । अंधार शोधूं जातां बाप । गवसेल अंधाराचें रूप । ऐसें कैसें घडावें * ॥ २५ ॥ असो; मग दृष्टी न येतां सती । बहुत शिणला श्रीरघुपती । मग विचारी वतदेवींप्रती । सीता कोठें म्हणोनी ॥ २६ ॥ मार्गीं श्वापदें दृष्टीस येतां । त्यांसि म्हणे वो कोठें सीता । पक्षियांसही अवलोकितां । तैसेंच पुसे तयातें ॥ २७ ॥ वृक्षांलागीं पुसे सीता । पाषाणांसी पुसे सीता । सकळिकांसी माझी सीता । म्हणे कोठें ती दाखवा ॥ २८ ॥ परी तयातें कवणेहि परी । भेटली नाहीं निज सुंदरी । मग तो थोर विलाप करी । स्मरूनि रूपागुणांतें ॥ २९ ॥ सर्वसाक्षी श्रीभगवान । त्यातें सीता न येई दिसून । आणि जो परमानंदघन । तोचि शोकें व्यापिला ॥ ३० ॥ सकळिकांसी व्यापून असे । म्हणून गमनागमन नसे । तोचि वनांत धांवत असे । सीताशोधानिमित्तें ॥ ३१ ॥ निर्मम

आणीक निरहंकार । परमात्मा जो श्रीरघुवीर । तोचि शोक करीत थोर । माझी जाया म्हणोनि ॥ ३२ ॥ अखंड आनंदरूप राम । सकाळिकांचा सुखविश्राम । तोचि पावत आहे श्रम । नानापरी फिरूनी ॥ ३३ ॥ ऐसा परिपूर्ण रघुनंदन । वर्ततो मायेस अनुसरून । परी तयातें प्राकृत जन । कामी म्हणती स्त्रियेचा * ॥ ३४ ॥ असो ऐसा श्रीरघुनंदन । शोधीत असतां सारें वन । जेथ जटायू पावला पतन । तेथ येऊन पोंचला ॥ ३५ ॥ तों तेथ मोडून पडिला रथ । देखोन बोलला सीतानाथ । लक्ष्मणा येणेंचि पथें खचित । सीतेस नेली खळांहीं ॥ ३६ ॥ येथ जिंकून एकाप्रती । अन्यें हरण केली सती । ऐसें बोलती तोंचि पुढती । दृष्टीस आला जटायू ॥ ३७ ॥ तंव तयाचें प्रचंड शरीर । वरी माखून गेलें रुधिर । ऐसें पाहून श्रीरघुवीर । म्हणे हा कोण असे रे ॥ ३८ ॥ लक्ष्मणा, येणेंचि माझी सखी । फाडूनि घातली जाण मुखीं । आणि तृप्तीस पावूनि शेखीं । खळ हा येथें लोळतो ॥ ३९ ॥ आतांचि हरितों याचे प्राण । आण रे माझें धनुष्य बाण । तंव तें श्रीरामाचें भाषण । श्रवणीं आलें खगाच्या ॥ ४० ॥ मग तो बोलला रघुनंदना । बा तूं न करीं माझिया हनना । मी हा स्वयेंचि मृत्यु-सदना । आतांचि आहें चाललों ॥ ४१ ॥ भार्या तुझी हरण करून । येथून जातां दशवदन । हा मी जटायू वेगेंकरून चालून गेलों त्यावरी । ४२ ॥ मग चंचूच्या बळेंकरून । म्यां थोर केलें रणकंदन । परी अंतीं तो दशानन । पक्ष छेदी त्वरेनें ॥ ४३ ॥ तईं तो घाय लागून थोर । मी हा पड-

लों धरणीवर । आतां देखोन तुजसमोर । सोडितों प्राण सुखानें ॥ ४४ ॥ तंव तें ऐकतां रघुनंदन । दुःखें होऊन सजल-नयन । प्रेमें तयाचे अंगावरून । हात फिरवोनी बोलला ॥ ४५ ॥ अगा तूं मदर्थ त्यजिसी प्राण । तो तूं सखाचि माझा जाण । मिला माझिया प्रियेचें हरण । कोणें केलें सांग बा ॥ ४६ ॥ तंव जटायू म्हणे, सती । रावणें नेली जी रघुपती । खळ तो येथून दक्षिणेप्रती । जाता झाला त्वरेनें ॥ ४७ ॥ यावरी मजासि सीता-रमण । बोलतां अत्यंत होतसे शिण । आतां सांडूनिया मी प्राण । जातों वेगें स्वधामा ॥ ४८ ॥ अहा जी माझें भाग्य थोर । म्हणोनि आजि तूं श्रीरघुवीर । ठाकला असती येऊन समोर । अंतकाळींच्या क्षणाला * ॥ ४९ ॥ तूंचि परमात्मा श्रीभगवान । भक्त-प्रेमास वश होऊन । वर्तसी मायेस अनुसरून । मानवरूपें महीतें ॥ ५० ॥ अंतसमयीं पाहोन तुज । हा मी मुक्तचि झालों आज । आतां हस्तें स्पर्शूनि मज । अनुज्ञा देईं जावया ॥ ५१ ॥ यापरी बोलोन पक्षिप्रवर । अंगीं लागतां श्रीरामकर । प्राण सोडोनि भूमीवर । निश्चेष्ट होवोनि पडियेला ॥ ५२ ॥ राघवें बांधवाऐसा शोक । करूनि अश्रु गाळिले अनेक । मग तयास दिधला पावक । काष्टें घेऊनि वनींचीं ॥ ५३ ॥ त्यावरी स्नान करूनि मग । तयांहीं मारिला एक मृग । आणि तयाचे मांस-भाग । काढोनि सर्वत्र फेकिले ॥ ५४ ॥ मग 'हें सेवीत सारे द्विज । जटायू संतृप्त होवो आज'। ऐसें बोलोन श्रीरघुराज । वरदान देई तयातें ॥ ५५ ॥ जटायो, तुवां येथून आतां । मजशीं पावावी

सरूपता । मग ऐसें श्रीरामें बोलतां । विमान आलें सवेंचि ॥ ५६ ॥ मग धरूनि दिव्य शरीर । वरी तो आरूढला द्विजवर । आणि श्रीविष्णू-ऐसाच थोर । तेजें शोभूं लागला ॥ ५७ ॥ अगीं सुवर्ण अलंकार । कांसे सुरम्य पीतांबर । शंख चक्र गदादि चार । आयुधें हस्तीं शोभतीं ॥ ५८ ॥ विष्णूचि ऐसे पार्षद चार । संनिध उभे असती सादर । आणि कित्येक योगिवर । स्तवन करीत राहिले ॥ ५९ ॥ ऐसें विष्णूचें ऐश्वर्य सारें । अंगीं पावूनि पक्षि-प्रवरें । हात जोडोनि परम आदरें । स्तवन केलें प्रभूचें ॥ ६० ॥ कीं प्रभो, हे अगणित गुण । तुझे वर्णूं शकेल कोण । जो तूं सर्वांचें आदिकारण । अतीत सर्वां प्रमेयां ॥ ६१ ॥ इया जगाच्या स्थितिलयांतें । तूंचि कीं कारिसी सीतापते । आणि पाहतां त्वद्रूप तें । असंग ऐसें सर्वथा ॥ ६२ ॥ ऐसा तूं निर्लेप निराकार । सर्वांतर्यामी परमेश्वर । त्वत्पदीं हा मी निरंतर । लीन राहें दयाळा ॥ ६३ ॥ प्रभो जें तुझिया ठायीं सुख । तयास सीमाच कैंची देख । म्हणोनि पहाया तुझें मुख । देवी इंदिरा लोभली * ॥ ६४ ॥ देवादिकांस पावतां शीण । तूंचि कीं कारिसी निवारण । म्हणोनि देवा तुझेचि चरण । आम्ही सेवूं सदैव ॥ ६५ ॥ धनुष्य भाता आणि बाण । जेणें स्वकरीं केले धारण । तोचि श्रीराम सीतारमण । आम्ही सेवूं सदैव ॥ ६६ ॥ त्रिलोक-सुंदर हा श्रीराम । भास्क-रासरिसा तेजोधाम । स्तवन करितां सारे काम । पूर्ण करितो मनींचे * ॥ ६७ ॥ अहो जयाच्या अंतरी प्रेम । तेथेंचि रामें केलें धाम । ऐसा हा आमुचा सीताराम । आम्ही सेवूं

सदैव ॥ ६८ ॥ श्रीराम हाचि दयाघन । आमुचें विश्रांतीचें स्थान । हाचि दावाग्नि, संसार-वन । जाळून टाकी क्षणार्धे ॥ ६९ ॥ जयातें शिवादि देव थोर । आराधितात निरंतर । जेणें हजारों राक्षसवीर । ठार केले रणांत ॥ ७० ॥ तोचि हा माझा श्रीरघुवीर । शोभतो श्यामवर्णे रुचिर । जैसें यमुनेचें विशुद्ध नीर । वंदन माझें तयातें ॥ ७१ ॥ अहो, हा ऐसा श्रीजगजेठी । तयाच्या कैसा येईल भेटी । अखंड जयाच्या संसार-गोष्टी । अंतरीं दाटून राहिल्या * ॥ ७२ ॥ परी जे शिवादि योगीश्वर । यातेंचि ध्यातात निरंतर । तयांसी राजा हा रघुवीर । तुटीच पडूं न देई ॥ ७३ ॥ म्हणोनि यातेंचि सदोदित । हा मी राहें शरणागत । याचेचि पाय तारूनि नेत । भवाब्धिमाजी जनांतें ॥ ७४ ॥ भवानी आणि भवानी-पती । यांच्या अंतरीं ज्याची वसती । आणि सारेचि ज्यातें भजती । देव दानव मानव ॥ ७५ ॥ ऐसा सर्वांचे मनोरथ । पुरविणार हा सीतानाथ । तयातें आजी हा मी येथ । प्रेमें पायीं वंदितों * ॥ ७६ ॥ अहो या रघुवीराचे दास । अखंड जपती परहितास । कोणेकाचे गुणवैभवास । ऐकून आनंद पावती * ॥ ७७ ॥ आणि जयांच्या विमलांतरीं । लेशहि मळास नाहीं उरी । पराचें द्रव्य आणीक नारी । स्वप्नींहि ये ना तयांच्या * ॥ ७८ ॥ ऐसी कीर्ति नांदते थोर । जयाच्या दासांची भूमीवर । तयासि माझे अनेकवार । असोत पायीं प्रणाम ॥ ७९ ॥ जयाच्या मुखींचें रम्य स्मित । सर्वांचे नेत्र ओढून घेत । आणि ज्याचिया अंगीं शोभत । सांवळा वर्ण सुनीळ ॥ ८० ॥ नयन-

कमलांची आरक्तता । लोभाचि उपजवीत चित्ता । तयास अंतरामाजी ध्यातां । महा आनंद आमुतें * ॥ ८१ ॥ अहाहा ! देवा कमलावरा ! । सर्व-आनंद-सुखसागरा । कवण भाग्यें तूं हा सोयरा । झालासि आम्हां कळेना * ॥ ८२ ॥ देवा, तूंचि एक सीतापती । नटसी इया नाना आकृती । जैसीं नाना बिंबें भासती । एकेंचि सूर्यें जलांत ॥ ८३ ॥ ब्रह्मदेव, विष्णु आणि शिव । तूंचि कीं होसी देवाधिदेव । अंगीं धारण करोनि भाव । सत्त्वरजस्तमांचे ॥ ८४ ॥ ऐसा त्रिलोक-सुंदर राम । शत मदनांचें सौंदर्यधाम । तोचि आर्तांचा निजविश्राम । आम्ही सेवूं सदैव * ॥ ८५ ॥ **शतपथ** नामें जें ब्राह्मण । तयानें हीच दाविली खूण । कीं हा अत्यंत सुलभ जाण । श्रीराम प्रेमें एकल्या * ॥ ८६ ॥ यापरी ऐकून रम्य स्तवन । चित्तीं तोषला रघुनंदन । मग म्हणे बा तूं करिसी गमन । सुखेंचि माझ्या पदाला ॥ ८७ ॥ आणि तुवां जें केलें स्तवन । तेंहि जो पठेल नेमें करून । तोहि देहांतीं माझेंच स्थान । पावेल माझ्या स्मृतीनें ॥ ८८ ॥ मग हा रघुनाथाचा वर । ऐकून तोषला पक्षिप्रवर । आणि जाऊन पोंचला सत्वर । सरूपतेला हरीच्या ॥ ८९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ९० ॥ श्रीराम ॥ २६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

---

## अध्याय २७ वा, कबंधोद्धार

श्रीराम ॥ यावरी श्रीराम सीताकांत । पुनरपि होऊन शोकाक्रांत । चालला सीताशोध करीत । पुढती भ्रात्यासंगती ॥ १ ॥ तंव तेथ एक आश्चर्यकर । राक्षस दृष्टीस आला घोर । जयाला मुख मात्र वक्षावर । आन कांहींच असेना ॥ २ ॥ बाहू योजनपर्यंत दूर । पसरून ठेविले भूमीवर । आणखी करीत स्वाहाकार । हस्तीं गवसे तयाचा ॥ ३ ॥ तयाच्या हस्तप्रदेशा आंत । गुंतले श्रीराम-सुमित्रासुत । मग तें ध्यानीं येतांचि त्वरित । श्रीराम म्हणे पहा कीं ॥ ४ ॥ लक्ष्मणा, जयास नाहीं शिर । मुख मात्र आहे वक्षावर । ऐसा हा एक विचित्र असुर । पसरला आहे महीतें ॥ ५ ॥ जें जें हातास येईल कांहीं । तें तें गट्ट करून राही । तयाच्या हस्तांतरींच पाहीं । आपण येऊनि गुंतलों ॥ ६ ॥ आतां परतून जावया येथ । आणिक कांहींच नाहीं पथ । आणि हा आतांच निजमुखांत । घालील पाहीं आपणां ॥ ७ ॥ तंव तो बोलला लक्ष्मण वीर । प्रभो जी येथ कैंचा विचार । दोघेहि तयाचे दोन्ही कर । छेदूनि काढूं शरानें ॥ ८ ॥ मग दोघांहीं सोडोन शर । छेदितां तयाचे दोन्ही कर । खळ तो नवल पावूनि थोर । ऐसें बोले तयांतें ॥ ९ ॥ अरे हे माझे छेदील कर । ऐसा कोणीच नसतां वीर । तुम्ही कोण हो दोघे कुमर । ऐसे वीर बलाढ्य ॥ १० ॥ तयीं श्रीराघवें आपुली कथा । घालून

त्याचिया कर्णपथा । पुसिलें बा रे तुवांहि आतां । वृत्त सांगावें आपुलें ॥ ११ ॥ तंव तो कबंध नामें असुर । त्यासि म्हणे कीं, जी रघुवीर । कृतार्थ केलें कीं साचार । येथ येऊन दयाळा ॥ १२ ॥ प्रभो मी पूर्वीं गंधर्ववर । रूपें होतों परम सुंदर । मजासि देखोन नारी थोर । मोहीत होत तत्क्षणीं ॥ १३ ॥ तईं म्यां करून तपाचरण । साधिलें आपणा अवध्यपण । वरप्रदान घेऊन पूर्ण । ब्रह्मदेवाच्या कृपेनें ॥ १४ ॥ पुढें एकदां अष्टावक्र-मुनी । अष्टधा वक्र अंगें देखुनी । हास्य केलें जी अवगणुनी । निजरूपाच्या मदानें ॥ १५ ॥ तईं तो संतप्त होवोन थोर । मजसि शापिता झाला सत्वर । अगा तूं योनि पावोनि आसुर । अरण्यामाजी राहसी ॥ १६ ॥ तयीं मी लागतां त्याचे पायां । पुनरपि येऊन माझी दया । मुनि तो मजलागीं रघुराया । उःशाप ऐसा बोलला ॥ १७ ॥ त्रेता-युगांत रमावर । श्रीरामरूपें येईल भूवर । तेणें त्वद्बाहू छेदिल्यावर । शापनिर्मुक्त जाण तूं ॥ १८ ॥ ऐसें मुनींचें होतां उत्तर । तत्काळ पावलों रक्षःशरीर । आणि सेवीतसें कांतार । तैंहून जाण राघवा ॥ १९ ॥ पुढें मी एकदां सुरेंद्रावरती । चालून गेलों श्री-रघुपती । तेधवां तयानें मस्तकावरती । तीक्ष्ण वज्रानें ताडिलें ॥ २० ॥ तेधवां तो थोर वज्राघात । साहून लाभलें मज जीवित । तयास हेंचि एकलें निमित्त । वरप्रभाव विधीचा ॥ २१ ॥ परी या शीर्षहीनाचा प्राण । वांचणें होय परम कठिण । म्हणोन जनांचें अंतः-करण । थोर कष्टी जाहलें ॥ २२ ॥ मग ते त्या देवराजाप्रती । जेधवा करूं गेले विनती ।

तें मुख होईल वक्षावरती । ऐसें देवेश बोलला ॥ २३ ॥ तैंहून याच ठायावरी । राहतसें मी रावणारी । जें कां पसरल्या इया करीं । गवसेल तें तें सेवुनी ॥ २४ ॥ आतां गर्तेत घालून मज । इंधनें टाकून श्रीरघुराज । स्वहस्तें अग्नि देऊनि आज । देहापासूनि सोडवी ॥ २५ ॥ मग मी आपुली पूर्वस्थिति । सर्वेचि पावेन हे श्रीपती । मागुती दावीन मार्गाप्रती । भार्या शोधावयाच्या ॥ २६ ॥ यापरी कबंधाचें वचन । ऐकतां तैशाच क्रमेंकरून । तयातें दोघे करिती दहन । श्रीराम आणि लक्ष्मण ॥ २७ ॥ तेधवां मदना ऐसा सुंदर । तेथून प्रगटला एक नर । शोभती ज्याचिया अंगावर । स्वर्णालंकार उदंड ॥ २८ ॥ तेणें प्रदक्षिणा घालूनि झणीं । नमन केलें श्रीरामचरणीं । आणि सद्गद अंतःकरणीं । स्तवन केलें यापरी ॥ २९ ॥ प्रभो तूं वाणीस अगोचर । आणि मनासही होसी दूर । ऐसिया तुझा अंत पार । न कळे ब्रह्मादिकांतें ॥ ३० ॥ देवा, तुझिया स्वरूपापाशीं । प्रवेश नाहीं देहद्वयाशीं । आश्रय होऊनहि व्यक्ताशीं । स्वयें अव्यक्त प्रभो तूं ॥ ३१ ॥ आणि या केवल रूपाहून । जें जें कांहीं वर्ततें आन । तें तें सारेंचि जड म्हणून । अनात्मरूप जाणिजे ॥ ३२ ॥ म्हणोनि जेथ पावेना मन । ऐसा प्रभो तूं परम गहन । ऐशिया तुझें स्वरूपज्ञान । कोणास कैसें घडावें ॥ ३३ ॥ म्हणून तुझें कराया स्तवन । धैर्य जें करितें माझें मन । तें या प्रीतीचें मोहन । आन काय म्हणावें * ॥ ३४ ॥ पूर्ण चिदात्मयाचा आभास । पावोनि बुद्धीच्या संयोगास । स्वरूपीं संकोच घेतां तयास ।

जीव नामानें बोलती ॥ ३५ ॥ आणि या बुद्ध्यादि पदार्थांतें । साक्षी होऊनि जें जाणतें । तयातें सकल शास्त्रमतें । ब्रह्म कैवल्य बोलती ॥ ३६॥ तें जें रूप संकल्प-रहित । सकळिकांचें आश्रयभूत । त्यावरीच हें सर्व पदार्थ-जात । अज्ञानयोगें भासतें ॥ ३७ ॥ देवा, तुझें जें सूक्ष्म शरीर । तेंचि **हिरण्यगर्भ** सार । आणि जें दुसरें स्थूल शरीर । **विराट** त्यातें बोलती ॥ ३८ ॥ सूक्ष्म जो हिरण्यगर्भ, तयाचें । स्वरूप संक-ल्पमात्रचि साचें । ध्यातां सकळहि मंगळाचें । पद पावावें साधकें ॥ ३९ ॥ त्याच हिरण्यगर्भावरती । भासताहे ही सकळ जगती । भूत भविष्य याहि स्थिती । तेणेंचि येती प्रतीती ॥ ४० ॥ आणि तुझें जें स्थूल शरीर । तेंचि ब्रह्मांड हें साचार । हाचि जाहलासे आधार । विराट नांव द्यावया ॥ ४१ ॥ म्हणोनि तूंचि या विश्वाकारें । नटला आहेसि साचोकारें । आणि तुझे हे अवयव सारे । लोक भूर्भुवस्वरादि ॥ ४२ ॥ **पाताळ** तुझें पादतळ । ऊर्ध्वभाग तो **महातळ** । आणि **रसातळ तलातळ** । गुल्फ तुझे प्रभो हे ॥ ४३ ॥ दोन्ही जानु तेचि **सुतळ** । मांड्या जाणिजे प्रभो **वितळ** । **अतळ** आणीक **महीतळ** । जघन तुझे हे राघवा ॥४४ ॥ **नभोदेश** हें नाभिस्थान । **ज्योतिर्गण** तें उरः-स्थान । आणि **महर्लोक** तेचि मान । ऐसें देवा जाणिजे ॥ ४५ ॥ **जनलोक** तें तुझें वदन । **तपोलोक** तें भालस्थान । **सत्यलोक** नामें करून । शीर्ष तुझें शोभतें ॥ ४६ ॥ **इंद्रादिक** जे लोकाधार । तेचि तुझे जाणिजे कर । आणि **दिशा** हे साचार । कर्ण तुझे

प्रभो जी ॥ ४७ ॥ **अश्विनीकुमार** दोघेजण । तीं तुझीं नासापुटेंच जाण । आणि **अग्नि** जो तोचि जाण । वदन तुझें श्रीरामा ॥ ४८ ॥ **सूर्य** तोचि तुझा नयन । आणि **चंद्रमा** जाणिजे मन । तुझिया भुवईचें वक्रीभवन । तोचि **काळ** समर्थ ॥ ४९ ॥ **वाचस्पति** ही तुझी बुद्धि । **रुद्रचि** अहंकार त्रिशुद्धि । **वेद** जे सकळ ज्ञाननिधि । तीच वाणी तुझी ही ॥ ५० ॥ तुझिया दाढा तोचि **यम** । **नक्षत्रें** दंतपंक्ति उत्तम । आणि **माया** हें मनोरम । हास्य तुझ्या मुखींचें ॥ ५१ ॥ देवा, तुझें जें अंग मोडणें । तेंचि कीं **सृष्टि** उत्पन्न करणें । आणि **धर्माधर्म** दोन्ही ठाणें । पोट-पाठ क्रमानें ॥ ५२ ॥ तुझे देवा, निमिषोन्मेष । हेचि **रात्र** आणि **दिवस** । तैशाच कुक्षी त्या राघवेश । **सप्त सागर** जाणिजे ॥ ५३ ॥ **वृक्ष** तेचि अंगींचे रोम । **रेत** तोचि पर्जन्यक्रम । आणि **ज्ञान** हाचि उत्तम । महिमा तुझा राघवा ॥ ५४ ॥ ऐसें हें तुझें श्रीरघुवीर । विश्वचि होय स्थूल शरीर । याचिया ध्यानयोगेंचि सत्वर । **मोक्ष** लाभे नरातें ॥ ५५ ॥ मीहि त्याचि स्वरूपावर । भावना करीत राहें स्थिर । ज्यातें ध्यातांचि सर्व शरीर । रोमांचांहीं दाटतें ॥ ५६ ॥ तेथ जोडोनि ठेवितां मन । सहजचि पावावें मोक्षस्थान । तरीहि रामा हें मूर्तिध्यान । तेंहि चिंतीत असें मी ॥ ५७ ॥ **धनुष्य बाण** घेवोनि करीं । चालला जो कां वनांतरीं । लक्ष्मणासमेत, निजसुंदरी । शोधून काढावयातें ॥ ५८ ॥ अंगीं सावळा वर्ण रुचिर । जटा वल्कलें शोभती वर । आणि अंगींचें जें कौमार । तेंहि आनंद देतसे ॥ ५९ ॥

राघवा, हेंचि तुझें ध्यान । माझिया चित्तीं राहो जडून । हेंचि कीं चिंतितो रात्रंदिन । उमेसमवेत महेश ॥ ६० ॥ आणि काशीस देवोन ठाण । सर्वांस हेंचि सांगे खूण । कीं हें श्रीराम-नामस्मरण । अखंड सेवा हो अंतरीं * ॥ ६१ ॥ हेंचि ब्रह्माचें वाचक नाम । निरसी सकळ संसारश्रम । म्हणोनि ध्यावें धरूनि नेम । अंतीं यावया मुखातें * ॥ ६२ ॥ म्हणोनि तूंचि श्रीरघुवीर । परमात्मा श्रीपरमेश्वर । परी हा तत्वार्थ गूढ थोर । मायामूढांस कळेना ॥ ६३ ॥ असो, हे श्रीराम सीताप्रिया । अयोध्याधीशा श्रीरघुराया । विश्वेश्वरा, तुझिया पायां । वंदन माझें असो हें ॥ ६४ ॥ आतां अंतींची विनवणी । हेचि एक तुझिया चरणीं । या मायामोहापासूनि झणीं । मातें सोडवी दयाळा ॥ ६५ ॥ ऐसी प्रार्थना करितां श्रवण । संतुष्ट होवोनि सीतारमण । म्हणे तूं सुखेंचि निर्वाण ठाण । जावोनि सेवीं निश्चयें ॥ ६६ ॥ आणि तुवां जें केलें स्तवन । तेंहि पठतील जे कां जन । तेहि जोडून माझें ज्ञान । पावती माझ्या पदातें ॥ ६७ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६८ ॥ श्रीराम ॥ २७ ॥

---

## अध्याय २८ वा, शबरी-भेट

श्रीराम ॥ यापरी रघुनाथाचा वर । प्राप्त होतांचि तो गंधर्ववर । रामासि म्हणे त्वां

आतां सत्वर । शबर्याश्रमास जाइजे ॥ १ ॥ तुझिया पादारविंदावरती । देवा, तियेची केवढी प्रीती । तेथेंचि तुझिया प्रियेची गती । कळून येईल सर्वही ॥ २ ॥ ऐसें बोलोन तेच क्षणीं । विमानीं आरूढ झाला झणीं । आणि वैकुंठाचे ठिकाणीं । पावला श्रीरामकृपेनें ॥ ३ ॥ म्हणोनि रघुनाथाचें नाम । स्मरणें हेंचि उत्तमोत्तम । येणेंचि विष्णूचें परम धाम । जीवें पावावें निश्चयें * ॥ ४ ॥ असो, यावरी श्रीरघुनाथ । क्रमूनि कांहीं आरण्य पथ । गेलिया अल्पचि काळा आंत । पावला शबरीनिवासा ॥ ५ ॥ तंव तो देखोन श्रीरघुवीर । **शबरी** हर्ष पावोनि थोर । उठोनि साष्टांग नमस्कार । पायीं घाली प्रभूच्या ॥ ६ ॥ मग परम आदरें करून । लक्ष्मणासहित रघुनंदन । बैसवी देऊन सुखासन । तंव अश्रूंहीं दाटली ॥ ७ ॥ मग ती पादप्रक्षालन । करून, सर्वांगीं अभिषेकून । सवेंचि अर्घ्यादिकें करून । प्रेमें पूजी तयातें ॥ ८ ॥ नानापरीचीं सुमनोहर । पुष्पें वाहून चरणांवर । सुरम्य पक्व फळें मधुर । आवडी अर्पी प्रभूतें ॥ ९ ॥ ऐसें आपुल्या भावानुसार । पूजून संतुष्ट जाहली फार । मग जोडोनि दोन्ही कर । बोलूं लागली तयासी ॥ १० ॥ राघवा, माझे गुरु या स्थळीं । निवसत होते पूर्व काळीं । तयीं मीं तयांची पादधूळी । येथेंचि राहून सेविली ॥ ११ ॥ पुढें हें सोडून स्थूल शरीर । त्यांहीं जोडिलें वैकुंठपुर । तयास काळ लोटला थोर । आजपर्यंत राघवा ॥ १२ ॥ परी तयांहीं गमन करितां । मजसि सांगितलें स्वतां । कीं तूं येथेंच राहून आतां । ध्यावें परमात्मपदातें ॥ १३ ॥

परमात्मा श्रीलक्ष्मीनाथ । अवतीर्ण झाला आहे येथ । राक्षसांचा करूनि घात। धर्मरक्षणाकारणें ॥ १४ ॥ मानवरूपें रघुकुळांत । प्रकट होऊनि तो श्रीकांत । आजि येऊनि आहे राहत । चित्रकूटाचे प्रदेशीं ॥ १५ ॥ तो ये आश्रमीं येऊनि तुज । दर्शन देईल श्रीरघुराज । म्हणोनि तोंवरी वत्से, निज-। देह रक्षण करावा ॥ १६ ॥ मागुती श्रीराम भेटल्यावर । अग्नींत टाकोनि हें शरीर । रामस्वरूपामाजी सत्वर । तुवां पावावें सुखानें ॥ १७ ॥ म्हणोनि गुरूपदेशानुसार । येथ मी राहिलें आजवर । कीं तूं येऊन श्रीरघुवीर । भेट देशील एकदां ॥ १८ ॥ आजि तें गुरूक्त देवा, तुवां । फलास आणिलें कीं एधवां । कृपा ही केउती रमाधवा । दासीवरती तुझी वो ॥ १९ ॥ अहो, ज्या निजरूपाचें दर्शन । गुरुदेवांतें न आलें घडून । तेंचि मी मतिहीन जातिहीन । ऐशी स्त्रीहि लाभल्यें ॥ २० ॥ राघवा, तुझे जे दासजन । त्यांच्या दासांचें दासस्थान । तेंहि वराया मजलागून । योग्यता नाहीं तिळाची ॥ २१ ॥ मग साक्षात तव दासीची । योग्यता मज येईल कैंची । म्हणोनि तुझ्या या भेटीची। थोर नवलाई निश्चयें ॥ २२ ॥ स्वरूप तुझें रघुनंदना । न कळे वाणीस किंवा मना। तेथ मी मूढ तव स्तवना। करीन कैची कळेना ॥ २३ ॥ म्हणून पायींच वंदन एक। करीतसें मी रघुनायक । नकळेचि कांहीं मज आणीक । येणेंचि तोषावें दयाळा ॥ २४ ॥ ऐसें ऐकून तियेचें वचन । आणि पाहून विमल मन । संतोष पावून रघुनंदन । ऐसें बोलता जाहला ॥ २५ ॥ वत्से माझिया दर्शनासाठीं ।

भावचि एक पाहिजे पोटीं । त्यावीण वायांचि साऱ्या गोष्टी । वर्ण किंवा आश्रम ॥ २६ ॥ सद्गद होवोनि अंतःकरणीं । रंगतां माझिया नामस्मरणीं । उपाय आणिक ये ठिकाणीं । वायांचि ऐसें जाणिजे * ॥ २७ ॥ सांडूनि प्रेमभक्तीचा पथ । यज्ञदानादि केलीं बहुत । तरी तें वायांचि सर्व होत । दर्शनाकारणें माझिया * ॥ २८ ॥ म्हणोनि जोडाया माझें प्रेम । तुज सांगतों **साधनक्रम** । येथ हेंचि करावें **प्रथम** । सज्जनसंग सुखाचा ॥ २९ ॥ माझ्याचि कथा कराव्या श्रवण । तें हें **द्वितीय** साधन जाण । आणि माझेचि गावे गुण । तें हें **तृतीय** जाणिजे ॥ ३० ॥ म्यां जें मांगून ठेविलें ज्ञान । तें सांगूनि समजावून । संतोषवावे सकळ जन । तें हें **चतुर्थ** जाणिजे ॥ ३१ ॥ यावरी माझ्याच ऐसा भाव । ठेवून पूजावा श्रीगुरुदेव । आणि अभ्यासें दैवी स्वभाव । अंगीं दृढचि करावा ॥ ३२ ॥ साधून यमादि नियमादिक । वृत्ति जोडावी जी सात्त्विक । तें हें **पंचम** साधन एक । माझिया प्राप्तीकारणें ॥ ३३ ॥ माझिया पूजनीं एकनिष्ठ । राहणें हेंचि साधन **षष्ठ** । आणि माझा जो मंत्र श्रेष्ठ । सेवन त्याचें **सप्तम** ॥ ३४ ॥ माझिया भक्तांच्या पूजनीं । थोर आनंद करणें मनीं । आणि भूतमात्रावलोकनीं । ईश्वरभाव ठेवणें ॥ ३५ ॥ तैसाच विषयांमाजी वीट । आणि शमादिकांत धीट । ऐसी अवस्था पावणें नीट । तें हें साधन **अष्टम** ॥ ३६ ॥ आणि स्वरूप-तत्त्वविचार । करिजे वेदवाक्यानुसार । तेंचि सर्व-साधन-शिखर । **नवम** साधन जाणिजे * ॥ ३७ ॥ माझिया ठायीं जडाया भाव ।

ऐसीं हीं साधनें होता नव । यांहींच अंतीं माझा ठाव । प्राप्त कीजेल जनांहीं ॥ ३८ ॥
ऐसीं साधनें करितां सारीं । हो कां पुरुष अथवा नारी । निश्चयें तयाचें माझियावरी ।
चित्त रंगेल अखंड * ॥ ३९ ॥ ऐसी मद्भक्ति पावतां जनन । स्वरूप माझें अनुभवून ।
साधक पावेल मोक्षस्थान । याचि जन्मीं, शरीरीं ॥ ४० ॥ म्हणोनि मोक्ष व्हावयास्तव।
मद्भक्ति हाचि मात्र उपाव । आणि भक्तीचा व्हाया उद्भव । नव साधनें समर्थ ॥ ४१ ॥
येथ प्रथम साधन करितां । क्रमेंचि आणिक यावें हातां । यापरी भक्तीस प्राप्त होतां ।
अंतीं मोक्षातें पाविजे * ॥ ४२ ॥ वत्से तुझेंहि अंतःकरण । माझ्या भक्तींत रंगलें पूर्ण ।
म्हणोनि स्वयेंचि आलों तूर्ण । दर्शन तूतें द्यावया ॥ ४३ ॥ आतां दर्शनेंचि इया तुज।
मोक्षचि झाला ऐसें समज । आतां यावरी सांगें मज । मार्ग माझ्या प्रियेचा ॥ ४४ ॥
तेधवां शबरी बोले वचन । प्रभो तूं सकल-ज्ञानघन । त्या तुज एतुलें वर्तमान । विदित
काय नसे जी ॥ ४५ ॥ परंतु लोकानुसारें मज । प्रश्न करिसी श्रीरघुराज । म्हणोनि मीहि
सांगतें आज । सीता कोठें असे तें ॥ ४६ ॥ रावणें सीता हरण केली । आणि लंकेंत
आहे ठेविली । येथ तुवां योजना केली । ऐसी पाहिजे राघवा ॥ ४७ ॥ येथून क्रमितां
अल्पांतर । लागेल पंपा सरोवर । त्यापुढें पर्वत आहे थोर । ऋष्यमूक म्हणोनी ॥ ४८ ॥
तेथ सुग्रीव वानरराव । राहतो वालीचे भयास्तव । त्याचिया संगें तुजसि ठाव । लागेल
तुझिया प्रियेच्या ॥ ४९ ॥ आतां हें जाळून निजशरीर । विष्णुपदीं मीं जातें सत्वर ।

तोंवरी येथ श्रीरघुवीर । थांबून राहे क्षणैक ॥ ५० ॥ ऐसें बोलून तत्काळ तिनें । वनींचीं आणूनियां इंधनें । चेतवून पूर्ण निर्भय मनें । प्रवेश केला भीतरीं ॥ ५१ ॥ यापरी झाडून सारे मळ । आणि तोडून अविद्याजाल । शबरी प्राप्त झाली तत्काळ । श्रीविष्णूच्या पदातें ॥ ५२ ॥ अहो हा दयाळू श्रीभगवान । जोडतां काय नये घडून । शबरी जी कां जातिहीन । तीहि मोक्षातें पावली * ॥ ५३ ॥ मग जे ब्राह्मण वर्णाधिकारी । पुण्यशील कीं परोपकारी । तेहि जेधवां श्रीरघुवीरीं । चित्त देवोनि राहती ॥ ५४ ॥ तयीं ते पावती मोक्षसुख । हें काय बोलावें आणिक । तयांच्या भाग्यासि कोणी एक । सरीच पावूं शकेना ॥ ५५ ॥ म्हणोनि धरूनि मोठा छंद । भजावा एक श्रीरामचंद्र । आणि अखंड परमानंद । जोडून घ्यावा जनांहीं * ॥ ५६ ॥ नाना विचार नाना क्रम । नाना मंत्रादिकांचे श्रम । सांडूनि सारेंचि हा श्रीराम । अखंड चित्तीं भजावा ॥ ५७ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपणा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ५८ ॥ श्रीराम ॥ २८ ॥ ३ ॥

॥ अरण्यकांड समाप्त ॥



# किष्किंधाकांड

## अध्याय २९ वा, सुग्रीवसख्य

श्रीराम ॥ सांडून शबरी-आश्रमस्थान । लक्ष्मणासहित रघुनंदन । पुढती कांहीं मार्ग क्रमून । **पंपा** सरातें पावला ॥ १ ॥ तंव तें पंपा सरोवर । परम रमणीय आणि रुचिर । वेधी सकळिकांचें अंतर । दृष्टीस येतां तत्क्षणीं ॥ २ ॥ तयाचा विस्तार एक कोस । आणि जलशोभा बहुवस । तैसेंच सखोल, आणि जयास- । संबंध नाहीं मलाचा ॥ ३ ॥ नाना परींचीं सुरम्य कमलें । अंबुज कल्हार कुमुदोत्पलें । यांहीं सर्वांगीं शोभविलें । प्रफुल्ल होवोनी जयातें ॥ ४ ॥ हंस कारंडव कित्येक । फिरती सुंदर चक्रवाक । तैसेच कुक्कुट क्रौंचादिक । नाना नादें कूजती ॥ ५ ॥ नाना वेली आणि तरुवर । उदंड दाटले तीरावर । बहुत पुष्पांचाहि भार । लगटून गेला जयातें ॥ ६ ॥ जैसें साधूंचें अंतःकरण । तैसें जलाचें निर्मलपण । वरी पुष्पसुगंधाचें मिश्रण । नेत्रघ्राणांतें वेधिती ॥ ७ ॥ येणेंपरी तें रम्यस्थान । दृष्टीस येतांचि रघुनंदन । तोषला परमाल्हादें करून । भ्राता तैसाचि लक्ष्मण ॥ ८ ॥ मग तें तयाचें सुंदर नीर । प्राशन करूनि श्रीरघुवीर । लक्ष्मणासहित तीरावर । विश्राम घेई क्षणैक ॥ ९ ॥ मग तो शीतल सुंदर देश । पहावयाची धरूनि

आस । उठोनि दोघेहि श्रीराघवेश । तीरीं चालूं लागले ॥ १० ॥ अगाध पसरूनि गेलें नीर । वृक्षहि दाटोनि गेले थोर । आणि पुढेंचि भव्य रुचिर । ऋष्यमूकाद्रि शोभतसे ॥ ११ ॥ ऐशा शोभेचें अवलोकन । करितां निमग्न झालें मन । तेणें सहजचि दोघे नंदन । मंद घेणानें चालती ॥ १२ ॥ तयीं त्या पर्वत-अग्रावर । वसे जो सुग्रीव वानरवर । तयें ते दोघे वीरकुमार । सहजीं नयनीं देखिले ॥ १३ ॥ तंव तो भयभीत होवोनि थोर । हनुमंतासी बोले सत्वर । मित्रा, कोण हे दोघे वीर । किमर्थ आलेत ये स्थळीं ॥ १४ ॥ माझा नाश साधावयास । वालीनें धाडिलें का रे यांस । न कळेचि कांहीं मन्मनास । भयाचि वाटे तयांचें ॥ १५ ॥ म्हणोनि द्विजपुत्राच्या रूपा । धरून तेथ जाऊन बापा । मजवरी एवढी करी कृपा । शोध घेईं तयांचा ॥ १६ ॥ तंव तें मानून मित्रवचन । वेषें होऊन द्विजनंदन । तत्काळ पावला तो हनुमान । रामलक्ष्मणांसंनिधीं ॥ १७ ॥ आणि दावून प्रेमादर । साष्टांग घालोनि नमस्कार । तयांस म्हणे हो पुरुषवर । कोण कोठील आपण ॥ १८ ॥ पाहतां तारुण्य अंगीं दिसे । वरी क्षात्रियतेज विलसे । आणखी सूर्य-चंद्रांसरिसे । कांति दावीत असां कीं ॥ १९ ॥ स्वामीच तुम्ही त्रैलोक्याचे । ऐसेंच मजसि वाटे साचें । पातलां आहांत या जगताचे । उद्धारार्थ काय कीं ॥ २० ॥ मायेनें घेऊनि मनुष्यवेष । तुम्ही दोघे प्रधान पुरुष । भूमिभाराच्या निवारणास । अवतरलांत जगीं का ॥ २१ ॥ किंवा नर आणि नारायण । तेचि हे तुम्ही दोघेजण । लीलया करीत

असाल भ्रमण । ऐसेंहि प्रतीत होतसे ॥ २२ ॥ सकळ जनांचिया हृदयमंदिरीं । जो कां निवास करितो हरी । तोचि या मूर्तिद्वयामाझारी । प्रगट झालासे भूवरी ॥ २३ ॥ यापरी हनुमंताचें वचन । ऐकतां तोषोन रघुनंदन । म्हणे जी लक्ष्मणा, याचें ज्ञान । कैसें आहे पहा वो ॥ २४ ॥ येणें बोलिलें जें जें कांहीं । तयांत दोष लेशही नाहीं । बटु हा निपुणचि आहे पाहीं । शब्दशास्त्रांत सर्वथा ॥ २५ ॥ मग हनुमंतासी श्रीराम । सांगे आपुलें नाम धाम । घ्यावया वनवासाचे श्रम । तेंहि कारण बोलला ॥ २६ ॥ मागुती सांगून सीताहरण । म्हणे मी तियेच्या शोधाकारण । काननीं करितसें भ्रमण । संगें घेऊन लक्ष्मणा ॥ २७ ॥ यावरी तूं कोण सांगे मज । ऐसें बोलतां श्रीरघुराज । बटु तो म्हणे मी समीरात्मज । अंजनीसुत मारुती ॥ २८ ॥ इया ऋष्यमूक अद्रीवरती । राहतो **सुग्रीव** वानरपती । तयाचा सचीव मी संप्रती । आणीक होत तिघेही ॥ २९ ॥ तयाचा भ्राता एक ज्येष्ठ । **वाली** म्हणून वर्तती दुष्ट । तेणें सुग्रीव राज्यभ्रष्ट । करून बाहेर काढिला ॥ ३० ॥ आणि सुग्रीवपत्नी रुमा । तेणें ठेविली आपुले धामा । त्याच्याचि भयें या वानरोत्तमा । येथ राहणें लागतें ॥ ३१ ॥ म्हणून राघवा वाटे मज । तुवां साधाया आपुलें काज । आजि हा सुग्रीव वानरराज । मित्र जोडोनि ठेविजे ॥ ३२ ॥ तुझा जो भार्याहारक चोर । त्यास शोधून कराया ठार । हा तुज सहाय करील वीर । ऐसें निश्चयें जाणिजे ॥ ३३ ॥ तंव श्रीराम त्यातें बोलत । हेंचि बा माझेंहि मनोगत ।

तयासी सख्यचि कराया निमित्त । येथ आलों असें मी ॥ ३४ ॥ तंव तो हनुमान वीर-वर । प्रकटवूनि निज दीर्घ शरीर । म्हणे वो माझिया स्कंधावर । शीघ्र आरूढ होइजे ॥ ३५ ॥ मग ते श्रीराम लक्षुमण । स्कंधीं करितांचि आरोहण । तयानें तत्काळ गांठिलें ठाण । उड्डाण करूनि गिरीचें ॥ ३६ ॥ मग एक पाहोनि वृक्ष थोर । छायेस ठेवोनि दोघे कुमर । हनुमान सुग्रीवाचिया समोर । जावोनि वंदी तयातें ॥ ३७ ॥ आणि म्हणे, जी नाहीं भय । जाणिजे भाग्याचाच उदय । आलेत दोघे दशरथ-तनय । तुझिया मैत्री कारणें ॥ ३८ ॥ श्रीराम आणि सुमित्रासुत । तयांसी सख्य जोडी त्वारित । येणेंच तव बा मनोगत । सिद्धी पावेल वाटतें ॥ ३९ ॥ ऐसें बोलतां हनुमान वीर । सुग्रीव हर्ष पावला थोर । मग तैसाच उठोनि सत्वर । राघवांपाशीं पातला ॥ ४० ॥ मग डाहळ्या तोडून दोन । दोघांस देऊन वन्यासन । स्वयेंहि पुढती बैसे येऊन । चित्त आनंदें दाटलें ॥ ४१ ॥ तेधवां रघुवीराची कथा । लक्ष्मणें त्यातें विदित करितां । सुग्रीव म्हणे जी श्रीरघुनाथा । चिंता सारी त्यजावी ॥ ४२ ॥ मींच सीतेचा लावुनी शोध । करितों तव शत्रूचा वध । आतां तुवां ये विषयीं निर्वेध । ऐसें होऊन राहणें ॥ ४३ ॥ मग जीं सीतेचीं आभरणें । गुहेंत ठेविलीं होतीं तेणें । तीं रघुनाथें पहायाकारणें । तेथ आणोनि दाविलीं ॥ ४४ ॥ तईं तें सोडून उत्तरीय । पाहतां जाणून श्रीरघुराय । हृदयीं धरूनि हाय हाय । करून दुःखित जाहला ॥ ४५ ॥ तेधवां तयास

देऊनि धीर । बोलला भ्राता लक्ष्मण वीर । प्रभो, हा किमर्थ करणें घोर । सुग्रीवराय भेटतां ॥ ४६ ॥ मग सुग्रीवहि बोले झणीं । हीच माझी प्रतिज्ञा-वाणी । भेटवीन रघुरायाची राणी । रणीं मारूनि रावणा ॥ ४७ ॥ इतुकियामाजी अंजनीसुत । अग्नीस करीत प्रज्वालित । मग ते संनिध येती त्वरित । सखे सुग्रीव-राघव ॥ ४८ ॥ मग अग्निनारायणापुढती । दोघेहि परस्परांप्रती । बहुत प्रेमें आलिंगिती । सख्य केलें म्हणाया ॥ ४९ ॥ यावरी बैसले भूमीवरती । मग सुग्रीव म्हणे, जी रघुपती । ऐक माझिया बंधूची कृती । वाली हें नाम जयाचें ॥ ५० ॥ एकदां गर्व होवोनि बहुत । मयाचा **मायावी** नामें सुत । चालून आला किष्किंधेंत । द्वंद्व युद्धाच्या निमित्तें ॥ ५१ ॥ तंव तयाचा शब्द घोर । ऐकोनि क्रोध पावूनि थोर । धावोनि वाली मुष्टिप्रहार । करिता झाला तयासी ॥ ५२ ॥ तयीं तो मायावी व्याकुळ । होवोनि काढिता झाला पळ । आणि प्रवेश करी तत्काळ । गुहाप्रदेशीं आपुल्या ॥ ५३ ॥ मग तयाच्या मागें धावत । वालीहि प्रविष्ट झाला आंत । मजसि सांगूनि 'तूं द्वारांत । बैस येथें' म्हणोनि ॥ ५४ ॥ मग एक मास झाल्यावर । गुहाद्वारासि येतां रुधिर । देखोनि वाटलें केलें ठार । वालीस दुष्टें राक्षसें ॥ ५५ ॥ मग मी गुहेच्या द्वारापुढती । ठेवून शिला एक पुरती । पातलों तैसाच नगराप्रती । अत्यंत दुःखित होउनी ॥ ५६ ॥ तेधवां सारेचि नगर-जन । इच्छा नसतांहि मजलागुन । अर्पिती राज्यसिंहासन । वाली नाहीं म्हणोनी ॥ ५७ ॥ तयीं तें जाणूनि जनांचें मत ।

मीं राज्य घेतलें निजकरांत । तंव तो वाली इतुकियांत । नेणों कैचा पातला ॥ ५८ ॥ आणि दूषणें देऊन बहुत । मजसि मुष्टीचे घाय करीत । तयीं मी भयभीत होवोनि त्वरित । नगराबाहेर पळालों ॥ ५९ ॥ मग क्रमिलिया कांहीं पथ । येथ मी पातलों श्रीरघुनाथ । कीं तो येऊंच न शके येथ । मुनि-मातंग-भयानें ॥ ६० ॥ परी तो तयींहून माझी दारा । पातकी भोगितो कीं रघुवीरा । आणि मी सेवीत दुःखभारा । दीन हा येथें राहतों ॥ ६१ ॥ ऐसिया संसार-आर्तास मज । त्वां भेट देऊनि श्रीरघुराज । सकळ संतोषाचीच आज । खाण जोडून दिधली * ॥ ६२ ॥ येणेंपरी हें सुग्रीव-उक्त । राघवें सकळ करितां श्रुत । मित्रदुःखानें तोहि त्वरित । थोर संताप पावला ॥ ६३ ॥ मग म्हणे मित्रा ऐक वचन । मी या वालीचा नाश करून । निश्चयें तुजलागीं भेटवीन । तव पत्नीस जाणिजे ॥ ६४ ॥ तंव सुग्रीव म्हणे हा वाळी । सर्व बळियांमाजी बळी । कीं जो देवादिकांहि मुळीं । साध्य होऊं शकेना ॥ ६५ ॥ तयास मारायाचें काज । मित्रा, कैचें साधेल तुज । ऐक तयाचें एक सहज । वृत्त शौर्याचें सांगतों ॥ ६६ ॥ एकदां दुंदुभि नामें असुर । धरून महिषाचें रूप थोर । वालीशीं कराया द्वंद्व घोर । रात्र-प्रसंगीं पातला ॥ ६७ ॥ तेधवां संतप्त होवोनि थोर । त्यावरी धांवला हा वीरवर । आणि शिंगें धरूनि सत्वर । पालथा घाली तयातें ॥ ६८ ॥ मग पाय उदरावरती । ठेवूनि, मस्तक पिळोनि हातीं । छेदून तोडून ऊर्ध्वप्रांतीं । फेंकूनि देई करानें ॥ ६९ ॥ राघवा, मग तें

तयाचें शिर । जावोनि एक योजन दूर । तेणें मातंग-आश्रमावर । सिंचन केलें रुधिराचें ॥ ७० ॥ तैं तो मातंग-मुनिप्रवर । तत्काळ पावूनि क्रोधभर । वालीस म्हणे तूं होशील ठार । यावरी येतां स्थळीं या ॥ ७१ ॥ तैंहून वालीनें हा पर्वत । वर्ज्यचि केला आहे सतत । मींहि मग ती जाणोनि मात । आसरा केला गिरीचा ॥ ७२ ॥ मग तो सुग्रीव कपिनायक । रामास नेऊन तें मस्तक । दाखवी, जैसें शिखरचि एक । पर्वतावरती उदेलें ॥ ७३ ॥ आणि म्हणे जी सीतापते । शिर हें उचलोनि फेकी हातें । तरि मग वालीस मारावयातें । सामर्थ्य तुझें म्हणें मी ॥ ७४ ॥ तेधवां हांसोनि रघुनायकें । शिर तें पादांगुष्ठेंचि एकें । स्पर्शून सर्वेंचि लोटिलें निकें । शतयोजन प्रदेशीं ॥ ७५ ॥ तंव तें अद्भुत देखोन तेज । संतोष पावूनि वानरराज । आणिक एक सांगे काज । धनुःकौशल्य पहाया ॥ ७६ ॥ म्हणे हे ताडाचे वृक्ष सात । खळ तो धरूनि निजकरांत । गदगद हालवोनि त्वरित । अ-पर्ण करितो निश्चयें ॥ ७७ ॥ तरी तूं आपल्या एकें बाणें । आतांचि सर्वांस छिद्र करणें । तरि मग मीं तुज खास म्हणे । समर्थ वाली वधाया ॥ ७८ ॥ तंव त्यासीहि श्रीरघुवीरें । आपुली संमति देऊन त्वरें । तयांचें छेदन केलें शरें । धनुष्य जोडोनि तत्क्षणीं ॥ ७९ ॥ आणि परतूनि तूणीरांत । शर तो प्रविष्ट झाला त्वरित । तयीं तो सुग्रीव अतिशयित । आश्चर्य आनंद पावला ॥ ८० ॥ मग म्हणे देव श्रीरघुवीर । तूंचि कीं होसी परमेश्वर । त्रैलोक्य तुझियाचि आश्रयावर । नांदत आहे सर्व हें ॥ ८१ ॥

अहा जी माझें सुकृत थोर । म्हणोनि साक्षात् लक्ष्मीवर । चालून आला माझें घर । सख्य मजशीं कराया ॥ ८२ ॥ देवा, पावूनि तुमचा संग । जन हे भवाचा कारिती भंग । मग मीं विनवावें कैसें सांग । तुज दारेच्या कारणें * ॥ ८३ ॥ स्त्री-सुत आणीक द्रव्यादिक । मायाच ही होय रघुनायक । म्हणोनि प्रेमाचि तुमचें एक । तेंचि आम्हां अवश्य ॥ ८४ ॥ मूर्ति ही अहाहा! आनंदाची । मजसि आजि लाभली कैंची । ऐसिया माझ्या भाग्योदयाची । सरी कोणातें केउती ॥ ८५ ॥ मृत्तिकेसाठीं उखणूं जातां । अवचित रत्नचि यावें हातां । तैसाचि हा मी पावलों आतां । आनंदरूपा श्रीरामा ॥ ८६ ॥ आजि हा भेटून रघुनंदन । सारेंचि माझें भवबंधन । तुटलें क्षणमात्रेंचि करून । अनादि मायानिर्मित ॥ ८७ ॥ यज्ञ केले नि दानें केलीं । कीं तपःकर्मेंहि आचरिलीं । अथवा पूर्तें कीं इष्टें भलीं । तींहि केलीं उदंड ॥ ८८ ॥ तरी या संसाराचें बळ । ओहटेनाचि जें एक तिळ । अधिकचि वाढे प्रत्येक वेळ । पापपुण्याच्या प्रवाहें ॥ ८९ ॥ परी क्षणैक या सीताकांता । चित्तीं निश्चल होऊन ध्यातां । समूळ संसार विनाशाकरितां । अवकाश नाहीं क्षणाचा ॥ ९० ॥ म्हणोनि राझवा माझें मन । तुझिया पायींच राहो जडून । आणिक वदनांत रात्रंदिन । नाम तुझें असावें ॥ ९१ ॥ अहो या नामाचें चिंतन । आदरें करितां लावून मन । जन तो घोरांहि पातकांतून । मुक्त होय क्षणमात्रें ॥ ९२ ॥ म्हणोनि युद्धीं पावावा जय । आणि जोडावे दारा-तनय । हें मज कांहींच नलगे सोय । भक्तिच एक

असो ही ॥ ९३ ॥ राघवा मी एक तुझाचि अंश । वरी सेवितों तव चरणांस । म्हणोनि मायामोह-विनाश । तुवांचि माझा करावा ॥ ९४ ॥ ‘हा मित्र, आणि हा माझा वैरी’ । ऐसे भेद हे नानापरी । राहिले होते माझ्या अंतरीं । पूर्वीं मायाभ्रमानें ॥ ९५ ॥ परी हें दर्शन होतांच तव । सर्वत्र समचि भासे भाव । शत्रु-मित्रांहीं कोणता ठाव । गांठिला आतां कळेना ॥ ९६ ॥ जोंवरी मायेचें आवरण । तोंचि ‘हा दोष आणि हा गुण’ । तोंचि हें विश्वींचें नानापण । प्रतीत होते मनातें * ॥ ९७ ॥ परी जें भासतें नानापण । तेंचि सकल भयाचें कारण । आणि अंधतमीं जी बुडवण । तीहि येणोंचि एकल्या * ॥ ९८ ॥ आणि या दारादि बंधांप्रती । हेचि अविद्या कारण होती । ती तंव रामा तुझिया हातीं । दासी होवोनि राहते ॥ ९९ ॥ म्हणोनि मन हें सदोदित । तुझ्याच पायीं राहो निश्चित । आणि सदैव मद्वदनांत । नाम तुझें असो कीं ॥ १०० ॥ तव भक्तांचें करितां काज । कर हे गुंतोत श्रीरघुराज । आणि हें मदंग देवा तुज । भेटोन लागो सार्थकीं ॥ १०१ ॥ तुझ्याचि रूपीं रघुनंदन । जडून राहोत हे लोचन । आणि त्वद्भक्तांचें दर्शन । तेंचि एक करोत ॥ १०२ ॥ तुझिया अवतारांच्या कथा । नित्य येवोत श्रवणपथा । आणि पाउलेंहि सर्वथा । चालोत तव मंदिरातें ॥ १०३ ॥ तुझिया पादधूलीचे कण । जयांत पावलेत संमिश्रण । ऐसिया तीर्थांचें धारण । माझिया अंगीं करावें ॥ १०४ ॥ आणि भवानी श्रीशंकर । ज्यांतें चिंतिती निरंतर । त्या तव पायींच माझें शिर । नम्र राहो अखंड ॥

१०५ ॥ यापरी **सुग्रीवकृत स्तुती** । ऐकतां तोषला सीतापती । म्हणे हो तिळहि याचे चित्तीं । मालिन्य नाहीं राहिलें ॥ १०६ ॥ ऐसी अध्यात्म-रामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०७ ॥ श्रीराम ॥ २९ ॥

---

## अध्याय ३० वा, वालिहनन

श्रीराम ॥ चित्ताचे त्रिगुणादि मायामळ । जरी क्षयास पावती सकळ । तरी हा चालूंच न शके तिळ । लोकव्यवहार जगाचा ॥ १ ॥ म्हणोनि मायेची व्हावी वाढ । ऐसें आंतून योजून गूढ । श्रीराम सुग्रीवालागीं उघड । ऐसें वचन बोलला ॥ २ ॥ मित्रा, सारेंचि एकलें सम । ब्रह्मचि तुजसि भासे परम । तरी त्वां न पावावा विराम । संग्राम वालीशीं कराया ॥ ३ ॥ नातरी म्हणतील लोक मज । येणें कांहीं न साधिलें काज । मग हें अग्निसमक्ष आज । सख्य केलें किमर्थ ॥ ४ ॥ म्हणोनि युद्धालागीं रणीं । वालीस पाचारी आतां झणीं । मग मी तयास एकेंचि क्षणीं । भूमीस पाडीन निश्चयें ॥ ५ ॥ तंव तें राघवाचें मत । सुग्रीवासही झालें संमत । मग तो पुरास जावोनि त्वरित । हाक देई तयातें ॥ ६ ॥ तंव तो शब्द येतां श्रवणीं । धांवला वाली समरांगणीं । मग तो येतांचि वक्षीं हाणीं । सुग्रीव वेगें तयातें ॥ ७ ॥ मग तेणेंहि चवताळून । सुग्रीवातें केलें ताडन ।

मग ते दोघेहि अंगें मिळोन । वेगें ताडूं लागले ॥ ८ ॥ तयीं त्या मेळणीमाजी बाण- । सोडितां, सुग्रीव निश्चित कोण । ऐशा संशयें सीतारमण । उगाच राहे क्षणैक ॥ ९ ॥ तयीं ते वालीचे घाय दुर्धर । साहूंच न शके सुग्रीव वीर । तेणें ओकूं लागला रुधिर । मग काढी पळातें ॥ १० ॥ मग वाली जाय किष्किंधेसी । सुग्रीव पातला रामापाशीं । मग म्हणे बा तूं मारावयासी । चित्तीं योजिलें काय जी ॥ ११ ॥ हेंचि जरी तव मनोगत । तरी तूंचि करीं गा माझा घात । तयास ऐसें युद्ध निमित्त । किमर्थ व्हावें दयाळा ॥ १२ ॥ प्रत्यय दावून निजबलाचा । काय जी मिथ्या करिसी वाचा । आपुल्या इया शरणागताचा । त्याग कैंचा करावा * ॥ १३ ॥ तंव तें वचन होतां श्रुत । श्रीराम जाहला अश्रुभरित । मग 'बा, न भी' म्हणोनि त्वरित । आलिंगन देई तयातें ॥ १४ ॥ मित्रा, तुमचीं स्वरूपें सम । पाहतां करितात नयनभ्रम । मग म्यां कैंचा धरून नेम । बाण सोडावा सांग बा ॥ १५ ॥ परी तुज आतां कांहीं खूण । करितों ओळखायाकारण । पुष्पमाला ही कंठीं धारण । करूनि जाईं रणीं तूं ॥ १६ ॥ मग वालीचे हराया प्राण । तिळहि विलंब न करीं जाण । शपथपूर्वक हें मद्भाषण । बधीन वालीस एधवां ॥ १७ ॥ मग लक्ष्मणाचिया हातीं । माळा घालून स्कंधावरती । तयास पुनश्च सीतापती । युद्धालागीं पाठवी ॥ १८ ॥ मग पुनरपि कराया रण । बंधूची हाक करितां श्रवण । आणिक क्षोभ पावूनि द्विगुण । वाली युद्धार्थ निघाला ॥ १९ ॥ तयीं तें पुनश्च जाणें रणीं ।

पाहून दचकली तारा राणी । मग पतीस बोलली वाणी । रणीं न जायाकारणें ॥ २० ॥
म्हणे जो आतांचि पराजित । केलिया परतून आहे येत । तरी तयाच्या संगें खचित ।
बलाढ्य कोणी असेचि ॥ २१ ॥ तंव तो बोलला वीरवर । प्रिये मी आतांचि तयास
ठार । करून परतून येतों सत्वर । शंका कैची तुझी ही ॥ २२ ॥ तयास सहाय होणार
कोण । कैचें शंकेचें कारण । अथवा त्याचेहि प्राण हरण । करून येतों पहा वो ॥ २३ ॥
युद्धार्थ निरोप आलियावर । गृहींच कैंचा राहील शूर । म्हणोनि लाडके, माझा कर ।
सोडून देईं एधवां ॥ २४ ॥ यापरी पतीचें वचन श्रुत । होतांहि तारा बोले परत । नाथ
ऐकोनि एवढें वृत्त । रुचेल तैसेंच वर्तणें ॥ २५ ॥ मृगयेसाठीं गेलिया वनीं । अंगदें वृत्त
ऐकिलें कानीं । कीं एक श्रीराम नामें करोनी । पुत्र अयोध्यापतीचा ॥ २६ ॥ भ्राता
लक्ष्मण, भार्या सीता । ऐसे वनांत राहत असतां । रावणें संधी पाहोनि स्वतां । भार्या नेली
तयाची ॥ २७ ॥ मग तो भार्येचा शोध करीत । पातला ऋष्यमूकाचा पर्वत । आणि
तेथ सुग्रीवासमवेत । सख्य केलें तयानें ॥ २८ ॥ वरी प्रतिज्ञाहि केली रामें । कीं मी
वालीस मारून नेमें । मित्र सुग्रीव त्यातें प्रेमें । राज्य देईन तयाचें ॥ २९ ॥ म्हणोनि
याचि वार्तेनुसार । आजि हे पातले दोघे वीर । एकत्र होऊनि कराया समर । हेंचि नि-
श्चित जाणिजे ॥ ३० ॥ नातरी पराभूत झालियास । पुनश्च धैर्य कैचें रणास । म्हणूनि
नाथ या गृहवैरास । सोडून द्या जी एधवां ॥ ३१ ॥ राज्य हें अर्पून सुग्रीवातें । आपण

सेवू रघुवीरात । जो का संकटीं सकाळेकांत । तारूनि नेतो दयाळू * ॥ ३२ ॥ ऐसें बोलत असतां सती । परम भय पावून चित्तीं । पतीच्या पूज्य चरणांप्रती । वंदन घाली साष्टांगें ॥ ३३ ॥ आणि धरूनि दोन्ही चरण । नयनीं होवोनि अश्रुपूर्ण । म्हणे जी नाथ हें भाषण । वायां करूं नये कीं ॥ ३४ ॥ तयीं प्रियेस उठवोनि हातें । प्रेमें धरुनियां स्वहृदयातें । वाली म्हणे वो सुंदरी येथें । भय कांहींच नसे कीं ॥ ३५ ॥ स्त्रीस्वभावेंचि भय हें तुज । वाटतें, परी तें व्यर्थचि समज । मजहि ठावें कीं श्रीरघुराज । अवतरलासे या लोकीं ॥ ३६ ॥ परी तो साक्षात नारायण । तयास सखा कीं वैरी कोण ? । करावा भूभार निवारण । हाचि उद्देश तयाचा ॥ ३७ ॥ म्हणोनि हा श्रीलक्ष्मीपती । जरी असेल त्याचे संगतीं । तरी मी आपुल्या गृहाप्रती । आवडी आणीन तयातें ॥ ३८ ॥ मस्तक ठेवून पायांवर । संतुष्ट करीन तो श्रीवर । जो कां जैसा भजेल नर । त्यातें तैसाचि राम हा ॥ ३९ ॥ आणि राघवावांचून स्वयें । सुग्रीवाचि एक असेल प्रिये । तरि मग समरीं मी निश्चयें । वधून येईन तयातें ॥ ४० ॥ तयासी कराया राज्यदान । चिंता कांहींच नव्हती आन । परी हे सुंदरी तेणेंकरून । लांछन आहे शूरातें ॥ ४१ ॥ कां कीं माझिया ऐशा शूरें । युद्धार्थ जाणें सांडूनि त्वरें । शत्रूस विनवावें आदरें । हें तों कैचें घडावें ॥ ४२ ॥ म्हणून सांडूनि सारें भय । करावा चित्ताचा निश्चय । ऐसें बोलून तो वीरराय । वेगें युद्धार्थ चालला ॥ ४३ ॥ तंव तो येतांचि देखूनि त्वरें । उडी घेऊनि सुग्रीववीरें ।

तयास निजमुष्टिप्रहारें । ताडन केलें जेधवां ॥ ४४ ॥ तेधवां तोहि वाली वीर । तैसाचि हाणी मुष्टिप्रहार । यापरी मग ते परस्पर । घायें ताडूं लागले ॥ ४५ ॥ मग सुग्रीवें भय पावून । पाहिलें रामचंद्राचें वदन । तयीं कृपाळू श्रीभगवान । गुण जोडी धनुष्या ॥ ४६ ॥ मग वृक्षाच्या आड राहून । वालीचें लक्षून वक्षःस्थान । शर तो विद्युत्पातासमान । वीर तो सोडिता जाहला ॥ ४७ ॥ तंव शब्द एक झाला घोर । आणि बाणें तो भेदोनि वीर । आपटितांचि भूमीवर । भूमि कंपित जाहली ॥ ४८ ॥ मग घडी एक लोटल्यावर । नेत्र उघडोनि वाली वीर । अवलोकन करितां, सीतावर । दृष्टीस आला तयाच्या ॥ ४९ ॥ धनुष्यबाण जयाच्या करीं । आणि जटेचा मुकुट शिरीं । तैशीच वनमाळा साजिरी । विशाल वक्षःस्थळींची ॥ ५० ॥ दंड भव्य तैसे सुंदर । अंगकांति श्यामल रुचिर । संगें सुग्रीव लक्ष्मण वीर । तिष्ठती सेवेकारणें ॥ ५१ ॥ यापरी करितां अवलोकन । वीर तो होवोनि सावधान । बोलला राघवा, येणेंकरून । साधिलें काय तुवां बा ॥ ५२ ॥ कवण देखोन तूं अपराध । आजि हा माझा केलासि वध ? । त्वां राजधर्मास आणिला बाध । ऐशा गर्ह्य कृतीनें ॥ ५३ ॥ वृक्षाच्या आड राहोनि, शर । सोडून ज्या तूं केलें समर । तो तूं कैचा न होशी चोर । यश जोडिशी केउतें ॥ ५४ ॥ जरी तूं होतासि क्षत्रियवीर । आणि मनुवंशज साचार । तरी तूं कां न बा केलें समर । येऊन माझ्या पुढारां ॥ ५५ ॥ रावणें सीतेस केलें हरण । म्हणून साह्य घ्याया कारण । तूं या

सुग्रीवमित्रास शरण । आलासि ऐसें ऐकतों ॥ ५६ ॥ परी हें केउतें सुग्रीवबळ । मी तों आतांचि न लगतां वेळ । लंकाचि येथें आणितो सकळ । सीतारावणांसमेत ॥ ५७ ॥ त्या मज धरून व्याधरीती । पावविसी तूं निधनाप्रती । आणि म्हणविसी 'धर्ममूर्ति । राजा राम महात्मा' ॥ ५८ ॥ सुग्रीवें काय केलें हित । आणि म्यां कोण केला घात । रामा, कोण रे साधली मात । सांग येणें वधें त्वां ॥ ५९ ॥ लाभला कोण येणें धर्म । हें तूंतेंचि ठावें मर्म । गा या मांसाचें भक्षणकर्म । तेंहि तूतें अशास्त्र ॥ ६० ॥ यापरी दूषणें देवोनि बहुत । निंदितां, बोलला सीताकांत । अरे मी धर्म रक्षायानिमित्त । फिरत आहे भूवरी ॥ ६१ ॥ धर्मास सांडोनि वर्ते स्वैर । त्यातें निवटून करावें ठार । याचलागीं हे चापशर । करीं मीं धरिले वानरा ॥ ६२ ॥ कन्या, भागिनी, तैसीच सून । भ्रातृजाया ह्या सर्व समान । त्यांशीं जो बलात्कारें करून । रममाण होतो पातकी ॥ ६३ ॥ अगा तो वध्यचि आम्हां नृपा । किमर्थ वल्गना करिसी बापा । सुग्रीवजायेसी रमतां पापा । कां न धर्मार्थ पाहिला ॥ ६४ ॥ म्हणोनि धर्मनष्टास तुज । धर्मरक्षक मी रघुराज । दंडावयास आलों आज । प्रश्नचि कैचा ये विषयीं ॥ ६५ ॥ महात्मे फिरतात भूमीवर । आणि करितात लोकोद्धार । परी तूं काय वनींचा वानर । नेणसी स्वरूप तयांचें ॥ ६६ ॥ यापरी बोलतां श्रीरघुवीर । वीर तो येवोनि भानावर । जाणूनि प्रत्यक्ष लक्ष्मीवर । प्रेमें वंदी तयातें ॥ ६७ ॥ मग म्हणे जी राम सीतावर । मी मूढ अज्ञानी पामर । नेणोनि

वदलों जें उत्तर । क्षमा करीं गा तयाची ॥ ६८ ॥ राघवा, तुझी ही मूर्ति रुचिर । योग्यांसही जी दुर्लभ फार । ती मज प्रत्यक्ष नेत्रांसमोर । अंतकाळींच लाभली ॥ ६९ ॥ आणि तुझाचि साक्षात बाण । लागून सोडितसें मी प्राण । तरी हें एतुलें पुण्यमरण । माझिया सुकृतें लाभलें ॥ ७० ॥ अहो जयाचें घेऊनि नाम । अंतीं पाविजे परमधाम । तो हा प्रत्यक्ष सीताराम । माझिया पुढती ठाकला * ॥ ७१ ॥ राघवा तूंचि लक्ष्मीधव । जानकी हेचि लक्ष्मी तव । रावणादिकांच्या नाशास्तव । अवतीर्ण झालासि निश्चयें ॥ ७२ ॥ आतां माझिया बाळा अंगदा । दृष्टि कृपेची ठेवीं सदा । आणि जावया परम पदा । अनुज्ञा देईं मला वो ॥ ७३ ॥ मग अंगींचा काढी शर । म्हणोनि सांगतां वाली वीर । रामें तत्काळ लावोनि कर । विशल्य केलें तयातें ॥ ७४ ॥ तयीं तो रामचंद्राचा कर । सकळ सुखशांतीचें घर । स्पर्शतांचि मग सांडूनि शरीर । वाली स्वर्लोकीं पावला ॥ ७५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७६ ॥ श्रीराम ३० ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय ३१ वा, तारातत्त्वबोध

श्रीराम ॥ वाली रणांत पावतां पतन । कपि ते करिती पलायन । आणि तारेस नि-

वेदन। करिती वृत्त रणींचें ॥ १ ॥ आतां नाना प्रयासें करून। करणें अंगद-परिपालन। सकळ मंत्र्यांतें बोलावून। हेंचि सांगावें तयांतें ॥ २ ॥ द्वारें बंद करून चारी। आम्ही सांभाळितों ही पुरी। तांतडी करूनि राज्यावरी। बैसवी बाई कुमारा ॥ ३ ॥ तंव तें वृत्त होतांच श्रुत। तत्काळ तारा होय मूर्छित। मागुती होवोनि सावध-चित्त। कपाळ पिटी करांहीं ॥ ४ ॥ म्हणे हें राज्य आणीक धन। कशास आतां मजलागून। अहो! मी करून सहगमन। पतीस भेटाया चाललें ॥ ५ ॥ मग ती तत्काळ आपुली वेणी। सोडून उठली तेच क्षणीं। आणि त्या रणभूमीचे ठिकाणीं। प्राप्त झाली सर्वोंचि ॥ ६ ॥ तेथ तें आपुलें पतिशरीर। पडलें पाहोनि धरणीवर। सती ती आक्रंदूं लागली थोर। अंग टाकोनि भूवरी ॥ ७ ॥ हे नाथ, हे देव, वीरमणी। कां वो पडिलांत ऐसे रणीं। ऐसी चालतां ती शोकवाणी। दृष्टीस आला श्रीराम ॥ ८ ॥ मग ती त्यासि बोलली सती। अगा तूं वधून मज संप्रती। पाठवी बापा स्वर्गावरती। पतिसंगतीला जावया ॥ ९ ॥ माझिया भेटीस माझे पती। उत्कंठित झाले असतील अती। मजवीण त्यांतें स्वर्गावरती। सौख्य कांहीं न वाटे ॥ १० ॥ पत्नीवियोग झालियावर। केउते असतात कष्ट थोर। ते तुजलागीं श्रीरघुवीर। अनुभूत आहेत सर्वथा ॥ ११ ॥ म्हणून वधून बापा मज। एतुलें साधूनि देईं काज। येणें तुजसि जोडेल सहज। पत्नीदानाचें सुपुण्य ॥ १२ ॥ मग सुग्रीवासि म्हणे सती। बा, तुवां निवटून माझा पती। जोडून घेतलें

आपणाप्रती । राज्य निर्वेध पुरीचें ॥ १३ ॥ आतां तूं आणि तुझी दारा । सुखेंचि नांदूनि संसार करा । आजि तूं निर्वैर झालासि पुरा । वधून माझ्या प्रियातें ॥ १४ ॥ यापरी शोक करितां सती । पुढती होवोनि श्रीरघुपती । तत्त्वज्ञानोपदेशाचे रीती । शोक निवारी तियेचा ॥ १५ ॥ म्हणे तूं किमर्थ करिशी शीण । नसतांचि शोकाचें कारण । अवो, तूं मानिशी सांग कवण । माझा प्राणेश म्हणूनि ॥ १६ ॥ देहींच धरिसी पतीचा भाव । किंवा पति तो म्हणसी जीव? । पाहतां दोहींहि अंगीं वाव । शोकास कांहीं दिसेना ॥ १७ ॥ देहचि म्हणशील माझा पती । तरी तो पडिलाचि आहे पुढती । जड जो भूम्यादि पंचभूतीं । निर्माण झाला स्वभावें ॥ १८ ॥ नातरी पाहतां जीवाप्रती । तयास ना जन्म नाहीं मृती । येणें जाणें इत्यादि विकृती । त्यातें पावूं शकेना ॥ १९ ॥ तो नव्हे नारी किंवा नर । व्यापून राहिला सर्वभर । आणि हा निःसंग निरंतर । आकाशाऐसा सर्वथा ॥ २० ॥ तो तरी अखंड जैसा तैसा । ज्ञानस्वरूप शुद्ध अपैसा । मग हा शोक करायासरिसा । अवसर कैंचा ये विषयीं ॥ २१ ॥ म्हणून दोहींहि अंगीं शोक । कराया निमित्त कांहीं एक । नाहींच; ऐसें रघुनायक । जेधवां दावी विवेकें ॥ २२ ॥ तयीं ती शंकित होवोनि सती । म्हणे जी यापरी असतां स्थिती । सुखदुःखें हीं कोणाप्रती । होतात सांगे राघवा ॥ २३ ॥ देह तों काष्ठाचि ऐसा जड । आत्मा नित्य निःसंग उघड । मग या सुखदुःखांचें झाड । कोणावरती तगावें? ॥ २४ ॥ तंव

राम म्हणे, जो अहंकार । अज्ञानें नांदतो देहावर । तोचि आपुले मस्तकीं भार । घेऊनि कुंथे ययांचा * ॥ २५ ॥ अविचार हेंचि याचें मूळ । येणेंचि संसारा आणिलें बळ । पाहतां जीवात्मा तो केवळ । सर्व संबंधां वेगळा ॥ २६ ॥ जीवाच्या शुद्ध स्वरूपावर । जो हा भासतो संसार थोर । तयास अविवेकाविण आधार । कांहींच नाहीं कामिनी * ॥ २७ ॥ विषयभोगींच निरंतर । चित्त देऊनि राहे नर । तयाचा मिथ्याहि हा संसार । नाश पावूं शकेना ॥ २८ ॥ पहा कीं स्वप्नींचें मिथ्या भय । न कारितां जागृतीचा उपाय । स्वप्नींच पावूं न शके लय । तैसीच परी ययाची ॥ २९ ॥ अनादि अविद्यायोगें करून । अहंकाराचें मातलें रान । तेणेंचि भव हा साच होऊन । रागद्वेषांहीं दाटला ॥ ३० ॥ बाई, मनाचि हें एक जाण । संसार बंधाचें कारण । जीव हा व्यर्थचि पावे शीण । मन मी ऐशा भ्रमानें * ॥ ३१ ॥ जैसा स्फटिकमणी विमल । स्वयें निर्वर्ण असतां केवळ । ठेवावा जया जया जवळ । त्या त्या वर्णे भासतो ॥ ३२ ॥ त्यापरी इंद्रियें बुद्धि मन । यांचिया संबंधमात्रें करून । बळेंचि संसाराचें बंधन । आत्मया अंगीं जाणिजे ॥ ३३ ॥ मीचि मन हा भाव धरून । कराया कामभोगाचें सेवन । तेणेंचि सत्त्वादि गुणबंधन । अंगीं लादून घेतलें ॥ ३४ ॥ मग सत्त्वरजतमांवरी । कर्में आचरून नानापरी । देहहि निर्मिले तदनुसारीं । इष्ट-अनिष्ट-मिश्रित ॥ ३५ ॥ यापरी कर्मबंधानुसारें । जीव हा भ्रमण करोनि तारे । प्रलयीं तैशाच निज संस्कारें । वासना जोडूनि ठेवितो ॥ ३६ ॥

मग त्या वासनाभिमानावरी। अविद्ये-अंतरीं निवास करी। मग सृष्टिकाल आल्यावरी। तेथींच योनि पावतो ॥ ३७ ॥ ऐसें भ्रमण केलिया बहुत। सुकृत जेधवां होय उदित। तईं मद्भक्तांची संगत। कोणेक वेळीं लाभते ॥ ३८ ॥ मग त्या सत्संगयोगें तया। माझें प्रेम येऊनि उदया। मत्कथा श्रवण करावया। आवडी वाढूं लागते ॥ ३९ ॥ तेथ आयासावांचून पुढें। स्वरूपज्ञान श्रवणीं पडे। मग वाक्यार्थ-पेटी उघडे। सद्गुरुकृपा-बळानें ॥ ४० ॥ मग प्रत्यया येई झणीं। कीं मी देहादि नोहे कोणी। मन-बुद्धीचा माझिया ठिकाणीं। संबंध नाहीं तिळाचा ॥ ४१ ॥ मी हा सर्व-विशेष-रहित। चिद्रूप आत्मा कीं शाश्वत। सर्व बंधनांहीं अतीत। परमानंदस्वरूप * ॥ ४२ ॥ यापरी प्रत्यक्ष प्रतीत होतां। आणि संशय विलया जातां। तत्क्षणीं मोक्ष आला हातां। ऐसें निश्चयें जाणिजे ॥ ४३ ॥ तारे, हें म्यां बोलिलें वच। तें जो अंतरीं शोधील साच। तो या भवबंधाचा काच। पावूं न शके सर्वथा ॥ ४४ ॥ म्हणोनि बाई, हे ज्ञानविचार। तुवां विवरावे वारंवार। आणि हा निवटूनि दुःखपूर। मोक्षस्थानास वरावें ॥ ४५ ॥ पूर्व-जन्मीं तूं माझें प्रेम। जोडिलें होतें अत्युत्तम। म्हणून दर्शन द्यावया श्रीराम-। रूपें तुजला पावलों ॥ ४६ ॥ आतां तूं अंतरीं माझें ध्यान। ठेवूनि स्वरूपीं लावी मन। मग तूं प्राप्त तीं कर्में करून। नित्य निर्लेप राहसी ॥ ४७ ॥ यापरी सांगतां श्रीरघुवीर। तारा संतोष पावोनि थोर। सकळ शोक करूनि दूर। वंदी साष्टांग राघवा ॥ ४८ ॥

मग ती विवेकयोगें सती । पावून स्वरूपानंदाप्रती । परिपूर्ण जीवन्मुक्त-स्थिती । सेवीत राहिली सुखानें ॥ ४९ ॥ श्रीरघुवीराची संगती । क्षणैक पावून कीं हो सती । तोडून अज्ञानबंधाप्रती । मोक्षस्थानातें पावली * ॥ ५० ॥ सुग्रीवेंहि हें राम-भाषण । चित्त देवोनि केलें श्रवण । आणि अज्ञान सांडूनि पूर्ण । स्वास्थ्य चित्ताचें जोडिलें ॥ ५१ ॥ यावरी वालीचें अंत्यविधान । कराया सांगतां रघुनंदन । सुग्रीवेंहि प्रेमें करून । सिद्धता केली तयाची ॥ ५२ ॥ सर्वांहीं मिळून राजोपचार । घालून तयाच्या अंगावर । मोठाचि दावूनि प्रेमादर । पुष्पक विमानीं ठेविलें ॥ ५३ ॥ मग ते सर्वहि वानर वीर । चालले तयाचे सभोंवार । तारा आणि अंगद कुमर । हेहि संगें चालले ॥ ५४ ॥ ब्राह्मणमंडळी आणि प्रधान । हेहि चालले भोंवताळून । दुंदुभि भेरी आदिकरून । वाद्यें गर्जती पुढारां ॥ ५५ ॥ यापरी थोर सत्कारयुत । तयाचें अंत्य जें कार्य विहित । तें सर्व सारून आले परत । स्नानें करून सर्वहि ॥ ५६ ॥ मग श्रीरामपायीं नमून । सुग्रीव अंतरीं संतोषून । म्हणे, जी देवें हें सिंहासन । स्वयेंचि आतां वरावें ॥ ५७ ॥ आणि प्रभो, मी तुझिया पदा । सेवीन लक्ष्मणा ऐसा सदा । मग सस्मित होऊन तदा । रामें केलें उत्तर ॥ ५८ ॥ म्हणे, तूं तोचि मी निर्धारें । कासया अन्य विचार बा रे । म्हणोनि नगरीस जाऊन त्वरें । अभिषेक करीं आपणा ॥ ५९ ॥ चतुर्दश वर्षें होती तोंवरी । मी न ग्रामीं प्रवेश करीं । लक्ष्मण येऊनि बरोबरी । मत्कार्य साधील सर्वथा ॥ ६० ॥ प्रेमें युवराजपदावर ।

बैसवीं बापा अंगद वीर । मग सर्व हें झालियावर । शोध घे माझ्या प्रियेचा ॥ ६१ ॥ तोंवरी मी आणि लक्ष्मण । इया पर्वतीं देऊन ठाण । पर्जन्यकाळपर्यंत जाण । निवास करितों दोघेहि ॥ ६२ ॥ ऐसें श्रीरामें बोलिल्यावरी । तयाची आज्ञा वंदूनि शिरीं । सुग्रीव पावला किष्किंधापुरीं । सुमित्रासुतासमेत ॥ ६३ ॥ मग आपणास अभिषेकून । मागुती नानोपचारें करून । श्रीमान सौमित्राचेंहि मन । संतुष्ट केलें तयानें ॥ ६४ ॥ मग परतूनि सुमित्रासुत । राघवापाशीं येतां त्वरित । दोघेहि प्रवर्षणपर्वत-। शिखरीं जाऊं निघाले ॥ ६५ ॥ मग तेथ एक सुमनोहर । स्फटिकनिर्मित गिरि-गव्हर । देखोन दोघे-हि वीरवर । चित्तीं संतोष पावले ॥ ६६ ॥ संनिध खळखळ वाहे नीर । मौक्तिका-ऐसें बहु सुंदर । आणि पुष्पें फळें मधुर । तींहि दाटलीं भोंवतीं ॥ ६७ ॥ नाना परींचे पक्षि-प्रवर । विहार करिती वृक्षांवर । तैसेच नाना मृग सुंदर । क्रीडा करिती स्वच्छंदें ॥ ६८ ॥ यापरी देखोन रम्य स्थान । सौमित्रासहित रघुनंदन । तेंचि आपुलें निवास-भुवन । करूनि राहिले सुखानें ॥ ६९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवण-पथा । म्हणून लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७० ॥ श्रीराम ॥ ३१ ॥



## अध्याय ३२ वा, कर्मोपासना.

श्रीराम ॥ राहत असतां गिरिगव्हरांत । श्रीराम आणि सुमित्रासुत । पर्जन्यकाळ लोटला त्वरित । लीलया, ध्यानीं न येतां ॥ १ ॥ क्षुधा लागतां कंदमूळें । आणि सुरम्य मधुर फळें । आणून दोघांहीं एके मेळें । प्रेमें भक्षण करावीं ॥ २ ॥ आकाशीं वर्षाकालानुसार । वारे उसळोनि येती थोर । आणि मेघहि अनावर । वर्षाव करिती जलाचा ॥ ३ ॥ सुवर्णझूल घालोनि वर । जैसे सजवावे गजवर । त्यापरी मेघ ते थोर थोर । शोभा देती नभातें ॥ ४ ॥ विजेचेही कडकडाट । होऊन बसविती कर्णपुट । वाटे, सर्वांगीं ध्यावया भेट । पर्जन्यदेवी उदेली ॥ ५ ॥ ऐसी निसर्गशोभा रुचिर । नित्य नूतन संतोषकर । पाहतां नेणती दोघेही वीर । काळ गेला केउता ॥ ६ ॥ लाहून नूतन तृणांकुर । पश्वादिकांच्या आंगावर । पुष्टता, आणि चर्येत थोर । आनंद शोभूं लागला ॥ ७ ॥ धावतां पर्वतीं स्वेच्छेनुसार । मध्येंच मृग ते होती स्थिर । एकाग्र नेत्रें श्रीरघुवीर- । मूर्तीस पाहूं लागती ॥ ८ ॥ ते हे पश्वादि द्विजादिक । नेणों पूर्वींचे सिद्ध लोक । श्रीरामभेटीस अत्युत्सक । होऊन येथें पातले ॥ ९ ॥ कीं हा भगवान रमावर । घेऊनि श्रीरामरूप रुचिर । काननीं आणीक पर्वतांवर । विहरेल कार्यप्रसंगीं ॥ १० ॥ मग ती नारायणाची मूर्ती । पाहून करून लोचनपूर्ती । सर्वांचि निरसूं संसार-आर्ती । ऐसाचि भाव तयांचा ॥ ११ ॥

असो, या अंतरीं एके वेळीं। लक्ष्मणें जाऊन रामाजवळी। प्रेमें तयाच्या चरणकमळीं। वंदन केलें आदरें ॥ १२ ॥ आणि म्हणे जी श्रीरघुराज। पूर्वींच एकदां बोधून मज। माझें समस्त अज्ञान-बीज। देवेंचि आहे नाशिलें ॥ १३ ॥ यावरी एक माझिया मना। आस उपजली रघुनंदना। कीं कर्ममार्गेंही आराधना। कोणी करिती प्रभूची ॥ १४ ॥ हो कां ब्राह्मण, क्षत्रिय वीर। किंवा हो शूद्र, कीं पामर। भावें पूजूनि श्रीरघुवीर। मोक्षस्थानातें पावती * ॥ १५ ॥ इया हरीच्या उपासनेंत। नलगे आश्रम आणि जात। सकाळिकांतेंचि सुगम होत। हेंचि साधन एकलें * ॥ १६ ॥ हेंचि मोक्षाचें साधन। म्हणोनि सांगती सारे जन। नारद व्यास कमलासन। ऐसेंचि मत तयांचें ॥ १७ ॥ म्हणोनि उपासनेचा पथ। मजासि सांगावा विस्तृत। यापरी बोलतां सुमित्रासुत। श्रीराम सांगूं लागले ॥ १८ ॥ अगा या उपासनेच्या रीती। उदंड; तयांतें नाहीं मिती। परी त्या आंतून मी संप्रती। तुजला संक्षेपें सांगतों ॥ १९ ॥ आपुल्या गृह्यसूत्रानुसार। द्विजत्व प्राप्त झालियावर। सद्गुरूपासूनिया सत्वर। मंत्र जोडावा आवडी ॥ २० ॥ मग तयाच्या शब्दानुसारें। मजसी पूजावें अत्यादरें। लक्ष्मणा, अंतरामाजीच बा रे। पूजन माझें करावें ॥ २१ ॥ नातरी सूर्यनारायणीं। अथवा अग्नीच्याहि ठिकाणीं। किंवा मूर्ति पाहोन कोणी। पूजीत जावें मला वो ॥ २२ ॥ अथवा शालिग्राम शिला। तीहि घेऊन आराधनेला। साधकें माझिया पूजाक्रमाला। आरंभ वेगें करावा ॥ २३ ॥ प्रथमतः

शरीरशुद्धीसाठीं । पाहिजे प्रातःस्नान परिपाठीं । मग संध्यादि विहित गोष्टी । त्याहि साराव्या सशास्त्र ॥ २४ ॥ मग कर्म सिद्धीस पावावया । चित्तीं संकल्प करून सया । मद्बुद्धीनेंच श्रीगुरुराया- । लागीं पूजावें अंतरीं ॥ २५ ॥ आराधनेला योजिली शिला । तरी स्नान घालणें तिला । आणि मार्जन प्रकार भला । प्रतिमेचिया ठिकाणीं ॥ २६ ॥ मग गंधपुष्प इत्यादिकांहीं । माझें पूजन करितां पाही । सफळ होइजे लवलाही । भावैक-मात्रबळानें ॥ २७ ॥ पूजनाचा नित्य-नेम । साधून, वर्जावे सर्व काम । आणि चित्ताचें सर्व प्रेम । मातेंचि एक वहावें * ॥ २८ ॥ प्रतिमेवरती अलंकार । घालितां संतुष्ट मदं-तर । परी या सर्वांत बापा थोर । भाव निर्मल एकला ॥ २९ ॥ लक्ष्मणा, भावें एकलें नीर । मजासि अर्पण करील नर । तरी गा तेणेंचि माझा थोर । संतोष होतो जाणिजे * ॥ ३० ॥ मग गंध कीं पुष्पाक्षता । किंवा नाना खाद्यें अर्पितां । वश होईन मी तत्वतां । काय आणीक वदावें ॥ ३१ ॥ लक्ष्मणा अग्निस्वरूपीं मातें । पूजितां आहुती देणें हातें । आणि दिनकरीं स्थंडिलातें । काढून पूजा करावी ॥ ३२ ॥ ऐशीं जोडून हीं साधनें । बैसणें माझिया आराधने । तेथ आरंभीं साधकजनें । आसन सिद्ध करावें ॥ ३३ ॥ दर्भासनावरी हरिणाजिन । त्यावरी निर्मळ घालून वसन । साधकें सन्मुख होऊन, मन । आधीं निर्मल करावें ॥ ३४ ॥ मग केशवादि नामानुसार । करावे सर्व न्यासप्रकार । तत्वन्यास-हि जे बहुसार । तेहि शास्त्राज्ञे करावे ॥ ३५ ॥ मग मंत्रादि पंजरन्यास । तेहि करावे मन्मू-

तसि । मग शुद्ध एकाग्र मानस । करोनि पूजा करावी ॥ ३६ ॥ कलश डावे अंगीं पुढती । आणि पुष्पादि उजवे हातीं । ठेवून त्यांताचि परमप्रीति । पात्रें चार करावीं ॥ ३७ ॥ देइजे एकें अर्घ्यदान । द्वितीयें कीजे पाद्यदान । आणि मधुपर्क आचमन । यांतें दोन्ही शेष जीं ॥ ३८ ॥ मग जी लक्ष्मणा सर्वांतरीं । चित्कला एक निवास करी । आणि जी आपुले सर्व शरीरीं । पूर्ण व्यापून राहते ॥ ३९ ॥ तियेचें हृदयकमलाआंत । करावें ध्यान सावचित्त । तेथ सूर्यप्रकाश बहुत । शोभतो ऐसें भावुनी ॥ ४० ॥ अथवा पूजितां मत्प्रतिमेला । हाच भाव पाहिजे धारिला । कीं, या अंतरीं एक चित्कला । व्यापून आहे राहिली ॥ ४१ ॥ मग पाद्य-अर्घ्यादि दान । मज करावें प्रेमेंकरून । मागुती घालून शुद्ध स्नान । नाना वस्त्रें वोपिजे ॥ ४२ ॥ नानापरींचे अलंकार । लेववावेत अंगावर । आणिक सर्वहि राजोपचार । शक्तीनुसार करावे ॥ ४३ ॥ कर्पूर कुंकुम कीं अगर । आणि चंदन सुमनोहर । तैसींच कुसुमेंही सुंदर । आणि वासाचीं वहावीं ॥ ४४ ॥ धूप, दीप कीं नीरांजन । आणि नैवेद्य समर्पून । लक्ष्मणा एकेंचि भावेंकरून । संतुष्ट मातें करावें ॥ ४५ ॥ भावभोक्ताचि मी ईश्वर । हेंचि या सकाळिकांचें सार । म्हणोनि भावचि एक थोर । पूजनीं माझ्या अवश्य * ॥ ४६ ॥ जेथ हा भाव तेथेंचि देव । भावेंवीण साधन वाव । जरी मी पाहिजे देवाधिदेव । तरी हा भाव धरावा * ॥ ४७ ॥ अथवा जाणून शास्त्राज्ञेला । समंत्र होम करावा भला । मुनि अगस्ति जैसें बोलला । तैशा रीतीनें प्रयत्नें ॥ ४८ ॥

मग म्हणून पुरुषसूक्त । अथवा मूलमंत्र उचित । तदनुसारें शास्त्रविहित । कुंडांत होम करावा ॥ ४९ ॥ अथवा पूजून अग्नीप्रती । देइजे तयातें मंत्राहुती । आणि कल्पून दिव्य मूर्ती । अंतरीं ध्यावें तयातें ॥ ५० ॥ मग तीं पार्षदगणांप्रती । बलिदानें देऊनि मागुती । होमकार्याची ऐसिया रीती । परिपूर्णता करावी ॥ ५१ ॥ मग अंतरीं माझें रूप । ठेवून बा रे करावा जप । जपतां वैखरीचा लोप । अवश्य केला पाहिजे ॥ ५२ ॥ यावरी मुखवासासाठीं । तांबूल समर्पून शेवटीं । परम प्रेम धरून पोटीं । स्तवन माझें करावें ॥ ५३ ॥ नर्तन-गायनादि प्रकार । तेहि करावे मजसमोर । आणि साष्टांग नमस्कार । मजसि भावें करावा ॥ ५४ ॥ मग पाउलें धरूनि हातीं । प्रसाद मागावा मजप्रती । आणि तो कल्पून बहुप्रीती । मस्तकीं धारण करावा ॥ ५५ ॥ मग हे दयाळू देवाधिदेवा । सोडवी मज या पासून भवा । तुजवीण शिण हा माझिया जीवा । तिळहि आतां न साहे * ॥ ५६ ॥ यापरी अत्यंत करुणस्वरें । मजसि विनवूनि साधकवरें । अंतीं रूप हें अत्यादरें । हृदयीं लीन करावें ॥ ५७ ॥ लक्ष्मणा, ऐशी ही उपासना- । रीती संपूर्ण आणूनि मना । नित्यनेमानें माझ्या भजना । प्रवृत्त होतां जनांहीं ॥ ५८ ॥ तयांतें माझिया कृपागुणें । जाणिजे कोठेंच न पडे उणें । इहपरलोकींच्याहि तेणें । सर्व सौख्यांतें पाविजे ॥ ५९ ॥ अंतरीं धरून माझें प्रेम । जरी हा सेविला पूजाक्रम । तरी तो देहांतीं माझेंच धाम । पावेल बा रे निश्चयें ॥ ६० ॥ आणीक ऐक गा माझा वर ।

कीं हा मद्बोध कल्याणकर । नर जो वाचील वारंवार । तोहि पावेल तयातें ॥ ६१ ॥
यापरी बंधूस समजावून । पुनश्च तो श्रीरघुनंदन । सीता-वियोग-दुःखें करून । शोकीं
संमग्न जाहला ॥ ६२ ॥ सखये सुंदरी जानकी सीते । असशील आजि कोणे स्थळातें ।
प्रिये या मजसी भाग्यहीनातें । भेट देशील केधवां ॥ ६३ ॥ यापरी चिंता लागून थोर ।
दुःखें होवोनि गेला चूर । तेणें रात्रींत तिळहि भर । निद्रा न आली तयाला ॥ ६४ ॥
इकडे सुग्रीव वानरपती । विसरला पाहून रामाप्रती । एकांत पाहूनिया मारुती । भेटून
त्यातें बोलत ॥ ६५ ॥ म्हणे जो राघवें तुझियावर । पूर्वीं उपकार केला थोर । तो तूं
होवोनि कृतघ्न नर । चित्तीं नाहीं ठेविला ॥ ६६ ॥ तुजचिसाठीं जेणें रणीं । पाडिला
वाली वीराग्रणी । आणि तयाची सुंदर राणी । तारा तूतें दीधली ॥ ६७ ॥ तैसेंच राज्य
जोडिलें तुज । ऐसा जो कां श्रीरघुराज । तो तूं करिशील केव्हां काज । म्हणून वाट
पाहतो ॥ ६८ ॥ परी तूं वानर मंदमती । स्त्रियांसी आसक्त होवोन अती । स्वमुखें
केलिया प्रतिज्ञेप्रती । अंशेंहि आतां नेणसी ॥ ६९ ॥ सीतादेवीचा लावीन शोध । ऐसें
बोलून तूं निर्वेध । राहसी, तो तूं पावसी वध । वालीऐसाचि निश्चयें ॥ ७० ॥ तयीं तो
सुग्रीव वीराग्रणी । म्हणे ही साच गा तुझी वाणी । तरी तूं जावोनि आतां झणीं । कार्य
एक करावें ॥ ७१ ॥ पसरूनि सप्त द्वीपावर । राहती आपुले वानरवीर । ते सर्व येथ
आणी सत्वर । निरोप सांगूनि तयांतें ॥ ७२ ॥ दहा हजार वानरदूत । आतांचि पाठवी

बापा त्वरित । सकळिकांहीं पक्षपर्यंत । परतून आलें पाहिजे ॥ ७३ ॥ आज्ञा मोडील तयाचा प्राण । मीचि निश्चयें हरीन जाण । ऐसें सर्वांस सांगून पूर्ण । कार्य साधावें तुवां हें ॥ ७४ ॥ मग तो हनुमानहि त्वरित । दाही दिशांस धाडी दूत । दान-मानादिकांहीं बहुत । संतोष करून तयांचा ॥ ७५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवण-पथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७६ ॥ श्रीराम ॥ ३२ ॥

---

## अध्याय ३३ वा, सुग्रीवोत्तेजन.

श्रीराम ॥ इकडे पर्वत-शिखरावरी । बैसून श्रीराम शोक करी । म्हणे गा लक्ष्मणा, कोणे परी । सखी ती भेटेल सांग कीं ॥ १ ॥ राक्षसें धरून नेली सती । जिवंत किंवा पावली मृती । लक्ष्मणा, कांहींच न कळे गती । काय आतां करूं गा ॥ २ ॥ येऊन येथवां कोणी तरी । सांगेल काय बा, ती सुंदरी । प्राण माझिया भेटीवरी । ठेवून आहे म्हणोनी ॥ ३ ॥ वृत्त हें येतांच माझ्या श्रवणीं । तत्काळ घेऊन येईन क्षणीं । जेथ ती माझी असेल रमणी । तेथून स्वपराक्रमानें ॥ ४ ॥ ऐक गा माझें प्रतिज्ञा-वच । कीं जो एतुला परम नीच । तयातें दग्धचि करीन साच । पुत्रमित्रांसमेत ॥ ५ ॥ अरेरे ! माझी प्राणसखी ती । केवी गवसली नीचाप्रती । कोमलांगी ती कवणे रीती । कष्ट साहेल

कळेना ॥ ६ ॥ प्रिये तूं माझिया भेटीविण । केउता पावत असशी शीण । आणि धरून राहसी प्राण । तोहि कैसा कळेना ॥ ७ ॥ चंद्रानना ही नसतां पाशीं । रविसा पीडितो कीं हा शशी । अगा, तूं कां न शीतळ होशी । स्पर्शून माझ्या प्रियेला ॥ ८ ॥ आणि हा सुग्रीवही निष्ठुर । न पाहे कष्ट हे माझे घोर । जोडून राज्य बहु सुंदर । रंगून गेला स्त्रियेशीं ॥ ९ ॥ शोधून माझी प्राणप्रिया । आणितां वेळ नाहीं तया । सर्वेही पर्जन्य-काळ वायां । केला येणें कृतघ्नें ॥ १० ॥ तयातें उपकाराची स्मृती । तैसी नाहींच मित्र-प्रीती । शत्रूच म्हणून तयाप्रती । कां न आतां म्हणावें ॥ ११ ॥ म्हणून वालीऐसीचि गती । उचित ऐसिया मूढाप्रती । यापरी बोलूनि श्रीरघुपती । फार संतप्त जाहला ॥ १२ ॥ तईं तें पाहून सुमित्रासुत । म्हणे, जी देव मीचि त्वरित । जाऊनि वधून येतों येथ । आज्ञा एक असावी ॥ १३ ॥ मग तो घेऊन चाप-शर । पुढती उभा ठाकला वीर । तयीं तें पाहून श्रीरघुवीर । परतून बोले तयातें ॥ १४ ॥ अगा हा सुग्रीव माझा थोर । सखा तूं न करीं बापा ठार । जावोनि धाक घालोनि फार । चित्त पाहावें तयाचें ॥ १५ ॥ मग जें तेथील यथातथ । वृत्त तें येऊन सांगे येथ । त्यावरी जो योग्य होय पथ । तो मी पाहीन स्वयेंचि ॥ १६ ॥ यापरी बोलतां सीतावर । आज्ञा वंदूनि तो सत्वर । क्रोधें संताप दावूनि थोर । धावूनि गेला पुरीतें ॥ १७ ॥ इकडे श्रीराम रघुनंदन । सर्वेंचि सीतेस आठवून । क्षुद्र मूढ पुरुषासमान । दुःखें व्याकूळ जाहला ॥ १८ ॥ सकळ मंग-

सीतेस आठवून । क्षुद्र मूढ पुरुषासमान । दुःखें व्याकूळ जाहला ॥ १८ ॥ सकळ मंग-



ळाची खाण । आणि ज्ञानाची मूर्तिच जाण । तो हा श्रीराम सीतारमण । शोकावेगांहीं दाटला ॥ १९ ॥ बुद्धयादिकांचा साक्षी देव । मायेस जयाचा न लगे ठाव । तैसेच राग-लोभादि भाव । नातळतीच जयातें ॥ २० ॥ तो हा सकळ-आराम राम । कैचा पावेल शोकादि श्रम । परी तो साधीत आहे काम । ब्रह्मेंद्रादि सुरांचें ॥ २१ ॥ दश-रथाचिया तपास्तव । मानवरूपांत आला देव । कराया सुगम मोक्षोपाव । सर्व सामान्य जनांतें ॥ २२ ॥ मायया मोहून गेले जन । तयांस व्हावया स्वरूपज्ञान । अवतारकथा ही विस्तारून । लोकीं ठेवीत असे हा ॥ २३ ॥ निर्गुण परमात्मस्वरूपावर । दृष्टि लावूं न शकती नर । तयांस ध्यान कराया रुचिर । मूर्तिच व्हावी हरीची * ॥ २४ ॥ मग ते गाऊन हरीच्या कथा । लागती उपासनेच्या पथा । मग चित्ताचे मल सर्वथा । नष्ट होतील तयांचे ॥ २५ ॥ म्हणोनि भक्तवत्सल देव । अंगें घेऊनि मनुष्यभाव । चारित्र-रूपें सुगमोपाव । करून ठेवी जनांतें ॥ २६ ॥ मग त्या शरीरभावानुसार । दावूनि शोकादिकांचा भर । मायागुणांच्या आश्रयावर । भूतळीं तो हा क्रीडतो ॥ २७ ॥ म्हणून वर्ततां त्रिगुणा आंत । तयाचें स्वरूप त्रिगुणातीत । जैसें आकाश सकळिकांत । आणि निर्लेप सदैव ॥ २८ ॥ ऐसें स्वरूप रघुवीराचें । तेचि एक जाणती साचें । मल ते जयां-च्या अंतरंगींचें । समूळ गेले लयाला ॥ २९ ॥ जनकादिक जे तत्त्वज्ञानी । तेचि मर्म हें जाणती मनीं । कीं हा भक्तांस अनुसरोनी । तैसा तैसा क्रीडतो ॥ ३० ॥ असो तो

श्रीमान लक्ष्मण वीर । पावला तत्काळ सुग्रीवपुर । आणि चापाचा टणत्कार । करून भिववी सर्वांतें ॥ ३१ ॥ तंव ते सामान्य जे वानर । स्वच्छंदें बैसले टेकावर । तयांहीं किलकिल करून थोर । पाषाण हातीं घेतले ॥ ३२ ॥ तईं तो सुमित्रेचाहि सुत । क्रोधें होऊनि संतापित । त्यांतें निमूल कराया त्वरित । शर जोडोनि धावला ॥ ३३ ॥ इतुकियामाजी अंगद वीर । सकळिकांतें सारून दूर । राघवानुजातें नमस्कार । येऊनि घाली त्वरेनें ॥ ३४ ॥ तेधवां तयातें लक्ष्मण वीरें । उठवोनि वेगें आपुल्या करें । हृदयीं धरून प्रेमभरें । भाषण केलें तयासी ॥ ३५ ॥ कीं सुग्रीवास जाऊन सया । वृत्त हें ऐसें सांगे तया । राघवें तुजवरी कोपूनियां । लक्ष्मणालागीं धाडिलें ॥ ३६ ॥ तयीं त्या अंगदें जावोनि झणीं । घातलें सुग्रीवाच्या श्रवणीं । तयीं त्या कपीच्या अंतःकरणीं । थोर गजबज जाहली ॥ ३७ ॥ मग तो हनुमंतातें त्वरित । बोलावूनिया सांगे मात । बा, हा क्षोभला सुमित्रासुत । जाऊन वेगें शांतवी ॥ ३८ ॥ मग तो हनुमान गेलियावर । मागुती तारेस बोलला वीर । तुवांहि बोलोन मृदु सुंदर । क्रोध तयाचा हरावा ॥ ३९ ॥ आणि हें माझें अंतःपुर । तयातें दावोनि सुमनोहर । मग तो सुखित झालियावर । भेटीस आणवी माझिया ॥ ४० ॥ मग तें वचन होतांच श्रुत । तारा सिद्ध होवोनि त्वरित । राजवाड्याच्या मध्यचौकांत । येऊनि ठेली सर्वांचि ॥ ४१ ॥ पुढती जाय जो वायुसुत । तेणें वंदूनि भक्तियुत । मग सत्कार करूनि बहुत । ऐसें म्हणितलें तयातें ॥ ४२ ॥ कीं

हे देव! या जी येथ । गृह हें आपुलेंचि निश्चित । दृष्टिही फेकून अंतःपुरांत । सुग्रीव-भेटीस चलावें ॥ ४३ ॥ मागुतीं होईल आज्ञा जैशी । वर्तूं तैसेच निश्चयेसीं । यापरी बोलोनि लक्ष्मणजीशीं । हातीं धरिलें तयानें ॥ ४४ ॥ मग ते भव्य प्रासादांतें । पाहत चालले राजपथें । आणि विशाल नृपमंदिरातें । सुग्रीवाच्या पावले ॥ ४५ ॥ तेथ ती सुग्रीवदारा तारा । चंद्राच ऐसी स्मितसुंदरा । लेवून सर्वांहि अलंकारा । स्थितचि होती पुढारां ॥ ४६ ॥ सती ती करोनि रम्य स्मित । बोलली लक्ष्मणातें त्वरित । कराया स्थान हें परमपूत । या जी देव कृपालो! ॥ ४७ ॥ अहो जी आपुलें शुद्ध चित्त । भक्तप्रेमीच अतिशयित । मग हा कोप किंनिमित्त । सुग्रीवातें, आमुतें? ॥ ४८ ॥ देव! हा सुग्रीव कपीश्वर । कष्ट जे काढीत होता थोर । तयातें आतांचि करुणाकर । श्रीराघवेशें तारिलें ॥ ४९ ॥ उभयतांहीं करूनि दया । तयाचा दुःखौघ नेला लया । आणि या विस्तृत भाग्योदया । पात्र करून ठेविलें ॥ ५० ॥ तो हा सुग्रीव वानरपती । विसरला कृतोप-कारांप्रती । आणि रंगला स्त्रीसंगतीं । ऐसें वाटलें काय कीं! ॥ ५१ ॥ परी जे वानर नानादेशीं । राहती तयांतें आणावयासी । हजारों दूत ते दाहीं दिशीं । धाडिले आहेत तयानें ॥ ५२ ॥ प्रभो ते पर्वत-तुल्य-शरीर । आतांचि समग्र येतील वीर । मग हा तत्काळ कराया समर । निघेल सर्वांसमेत ॥ ५३ ॥ समरीं रावणाचा प्राण । हरील न लागतांचि क्षण । पहा जी आतांचि माझा रमण । संगें येईल आपुल्या ॥ ५४ ॥ अंतः-

पुरीं तो आहे स्थित । तयातें देवें भेटूनि त्वरित । आणि करूनि भयवर्जित । संगें घेऊन चलावें ॥ ५५ ॥ यापरी ऐकून तियेची वाणी । क्रोध क्षीण होऊनि क्षणीं । लक्ष्मण अंतः-पुराचे ठिकाणीं । प्रविष्ट झाला तयाच्या ॥ ५६ ॥ तयीं तो सुग्रीव रुमेसहित । तेथ पर्यंकीं होता स्थित । तो त्यास देखोन अतिशयित । वेगें दचकून ऊठिला ॥ ५७ ॥ तेधवां तयाचे धुंद नयन । पाहतां लक्ष्मणें क्रोधावून । म्हणितलें रे तूं परमहीन । स्मरत नससी श्रीरामा ॥ ५८ ॥ अरे जो रघुनाथाचा बाण । वालीचा घेता झाला प्राण । तो तव मार्गप्रतीक्षा जाण । करीत आहे एधवां ॥ ५९ ॥ आतां माझिया करवीं तुज । मरण प्राप्त होवोन आज । स्वर्गलोकांत बंधुराज- । भेटीस जाणें पातलें ! ॥ ६० ॥ तयीं ते वाग्बाण तीव्रतर । श्रवणीं येतांच वायुकुमर । स्वयेंचि पुढती होऊन उत्तर । देता झाला तयातें ॥ ६१ ॥ अगा हें बोलसी कैसें तरी । ययाची प्रीती श्रीरघुवीरीं । तुजपेक्षांहि बहुतां परी । अधिकचि आहे निश्चयें ॥ ६२ ॥ सदैव श्रीराघवाचें काज । चिंतीतसे हा वानरराज । तयातें 'विस्मृति होय तुज' । ऐसें कैसें बोलिजे ॥ ६३ ॥ कोट्यावधी ही वानरसेना । आतांचि पहा कीं येतांना । आतां सीतेचिया शोधना । विलंब नाहीं क्षणा-चा ॥ ६४ ॥ म्हणून श्रीराम-मनोरथ । निश्चयें साधील वानरनाथ । संशय घ्यावया-लागीं येथ । निमित्त कैचें कोणातें ॥ ६५ ॥ ऐसें ऐकतां प्रत्युत्तर । स्तब्ध होवोन लक्ष्मण वीर । आपला कृत्रिम क्रोधभर । निरस्त करिता जाहला ॥ ६६ ॥ तयीं तो सुग्रीव पर-

मादरें । तयातें आलिंगून त्वरें । म्हणे बा, आम्हांस साचोकारें । रामेंचि आहे रक्षिलें ॥ ६७ ॥ हा राम आपुल्या एकें बाणें । त्रैलोक्यही जिंकील क्षणें । तयातें आणिकीं साह्य करणें । हें तों व्यर्थ निश्चयें ॥ ६८ ॥ तथीं तो सुमित्रेचाहि सुत । म्हणे मित्रा हें मद्भाषित । तुवां न घेइजे अंतरांत । प्रेमेंचि केलें म्हणूनी ॥ ६९ ॥ असो; मी जातोंचि आतां त्वरित । काननीं एकला श्रीरघुनाथ । बैसोन असेल शोक करीत । विरहें सीता सतीच्या ॥ ७० ॥ ऐसें बोलतां सुमित्रासुत । सुग्रीवें तत्काळ आपुला रथ । सिद्ध करून आणून तेथ । दोघेहि संगें बैसले ॥ ७१ ॥ मग तो अंजनीचा सुत । नील अंगद आदि बहुत । श्रीराघवाच्या भेटीनिमित्त । सारेचि वेगें निघाले ॥ ७२ ॥ छत्रें चामरें बहु सुंदर । ढळती सुग्रीव-लक्ष्मणांवर । आणि पुढती गर्जती थोर । वाद्यें भेरी मृदंग ॥ ७३ ॥ ऐसें दर्शन रघुवीराचें । स्थळ जें सर्वहि आनंदाचें । तें मग कां न करी चित्ताचें । विंधन साऱ्या जगाच्या ॥ ७४ ॥ म्हणोनि किष्किंधेचे जन । थोर आनंदोत्सवें करून । निघाले शोधीत रघुनंदन । पुर सोडून गिरीला ॥ ७५ ॥ हेंचि अंतरीं ठेवून येथ । साधकें वरावा श्रीरघुनाथ । विविध जे माया-मनोरथ । दूर फेकोनी तयांतें ॥ ७६ ॥ ऐसी अध्यात्म-रामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७७ ॥ श्रीराम ॥ ३३ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय ३४ वा, स्वयंप्रभा-भेट

श्रीराम ॥ सुग्रीव आणिक सुमित्रासुत । मार्गीं वेगेंचि हाकित रथ । सत्वर येऊन पोंचले तेथ । श्रीरामाच्या निवासीं ॥ १ ॥ तेथ त्या गुहेच्या द्वारापुढती । एके शिलेच्या आसनावरती । श्रीराम, सीता सतीचा पती । निवांत होता बैसला ॥ २ ॥ मुखींचें तेज तें वेधी मन । आल्हादविती भव्य नयन । मस्तकीं जटा, वल्कल वसन । अंगीं शोभे जयाच्या ॥ ३ ॥ पशुपक्ष्यांचा वनविहार । पाहतां नयन जाहले स्थिर । अंतरीं लागून गेला घोर । सीता देवी निमित्तें ॥ ४ ॥ ऐसा श्रीराम निजसुंदर । दृष्टीस येतांचि दोघे वीर । उतरोनि साष्टांग नमस्कार । पायीं घालिती तयाच्या ॥ ५ ॥ तयीं त्या वानर-वीराप्रती । वेगें उठवोनि श्रीरघुपती । आलिंगून परम प्रीती । क्षेम विचारी तयाचें ॥ ६ ॥ तयीं तो तोषून अतिशयित । सुग्रीव भक्तिप्रेम-भरित- । होऊन ऐसी बोलला मात । क्षेम सांगूनि तयातें ॥ ७ ॥ देव! हे पहा कीं वानरवीर । केउते पसरले भूमीवर । वेगें येतात श्रीरघुवीर । तुझिया दर्शना कारणें ॥ ८ ॥ पाहतां जयांचा देहकार । जैसा मंदार पर्वत थोर । कपि हे देवचि या भूवर । जन्म घेऊन पातले ॥ ९ ॥ नाना पर्वत-शिखरांवरी । तैसेंच नाना सरिता-तीरीं । वीर हे अनेक द्वीपांतरीं । ठाण देऊनि राहती ॥ १० ॥ तयांची करिजेल कैची मिती । सारेच जाणती समर-गती । आणि नाना रूपेंहि धरिती ।

तीं तीं इच्छेनुसारें ॥ ११ ॥ एकेचि गजाचें बळ कोणेका । त्याचे दशगुण तें आणिका । कोण तो स्वबळें येई तुका । सहस्रांच्याहि निश्चयें ॥ १२ ॥ आणीक बळ तें कोणेकाचें । सीमाच पावूं न शके साचें । काळहि पुढती येतां काचे । ऐसें शौर्य जयांचें ॥ १३ ॥ कवण ते अंगें हेमासमान । कज्जलासमहि कोणी आन । आणीक कित्येकांचें वदन । रक्त वर्णानें रंजित ॥ १४ ॥ कोणी स्फटिका ऐसे श्वेत । कोणेकातें केसचि बहुत । परी जे पावतां समरांगणांत । राक्षसां ऐसे अघोर ॥ १५ ॥ ऐसे वीर हे थोर थोर । गर्जना करितात वारंवार । आणि होऊनि युद्धातुर । धावती कैसे पहा कीं ॥ १६ ॥ सर्व हे करितात वन्याहार । आणखी हातांत घेऊन शिर- । वर्ततां प्रभूच्या अज्ञेनुसार । सिद्धचि असती सदैव ॥ १७ ॥ यांतील अस्वल-सेनेवरती । जांबवान नामें सेनापती । वीर तो कौशल्यें आपुले हातीं । संख्या कोटीची वागवी ॥ १८ ॥ तैसाच विख्यात हा मारुती । पराक्रमीं जो सर्वांपुढती । तेजस्वी आणिक कुशाग्र-मती । वात हा तात जयाचा ॥ १९ ॥ तैसेच गवय गवाक्ष नीळ । गंधमादन शरभ नळ । मैंद्र गज आणीक प्रबळ । पनस हाही जयांत ॥ २० ॥ वलिमुख दधिमुख दोघे जण । तैसाच तार आणि सुषेण । केसरी हाहि समरनिपुण । तात वातात्मजाचा ॥ २१ ॥ ऐसे प्रधान सेनापती । कथिले तुजला मीं संप्रतीं । तयांच्या शौर्यास कैची मिती । इंद्राच ऐसे बळी हे ॥ २२ ॥ इया प्रत्येकाचिया हातीं । वानर एकेक कोटी असती । आणि हे सर्वहि श्रीरघुपती । तुझिया

आज्ञेतें उत्सुक ॥ २३ ॥ पहा हा अंगद वालीसुत । पराक्रमी जो सर्वश्रुत । तयातें कराया राक्षसघात । नलगे विलंब क्षणाचा ॥ २४ ॥ आणि प्रभो हे सारेच जण । युद्धार्थ सिद्धचि असती जाण । तुझ्याचसाठीं आपुले प्राण । अर्पायाच्या निश्चयें ॥ २५ ॥ घेऊन पर्वत थोरथोर । आतांचि घालतील शत्रूवर । आज्ञाचि एक श्रीरघुवीर । यांतें व्हावी कराया ॥ २६ ॥ यापरी बोलतां वानरनाथ । श्रीराम होवोनि संतोषित । तयातें आलिंगून त्वरित । अश्रुपूरित जाहला ॥ २७ ॥ मग म्हणे मित्रा ठावेंचि तूतें । कार्य हें कैंचें नि केउतें । म्हणोनि तुझ्याचि आतां मतें । शोध व्हाया प्रियेचा ॥ २८ ॥ ऐसें वच तें होतां श्रुत । सुग्रीवें आपुले वानरदूत । दशहि दिशांमाजी त्वरित । वेगें शोधार्थ धाडिले ॥ २९ ॥ मागुती दाक्षिण दिशेच्या देशीं । पाठवी अंगद-हनुमंतांसी । नल नील जांबवंतांनिशीं । सूक्ष्म शोधाच्या कारणें ॥ ३० ॥ त्यांसवें नल सुषेण मैंद । देऊन शरभ आणि द्विविद । बोलला, निश्चित ऐसेंचि पद । शोधून काढा सतीचें ॥ ३१ ॥ कार्य करणें आहे त्वरित । म्हणोन मासेंचि येणें परत । नातरी करून घेणें अंत । माझ्याचि हस्तें निश्चयें ॥ ३२ ॥ ऐसें सांगून सकाळिकांतें । निरोप देतां वानरनाथें । श्रीराम पाहून हनुमंतातें । वचन ऐसें बोलला ॥ ३३ ॥ मारुते, तूंचि या मत्कार्यांत । पावसी यशास हें निश्चित । बळ हें तुझें मी जाणत । अंगींचें नि मतीचें ॥ ३४ ॥ तरी ही मुद्रिका घेऊन सया । दाखवी भेटतां माझी प्रिया । तेणें प्रत्यया येईल तिचिया । कीं म्यांच तूतें धाडिलें ॥ ३५ ॥

माझिया नामाचीं अक्षरें । येथ कोरिलीं आहेत बा रे । तरी ही घेऊन आतां त्वरें । जाय बा शोधास सखीच्या ॥ ३६ ॥ मग ते सारेचि वानरवीर । पातले विंध्याचलाचे वर । आणि आयास करिती थोर । सीता दृष्टीस यावया ॥ ३७ ॥ तेधवां पर्वता ऐसा एक । राक्षस अत्यंत भयानक । गिळी जो गजादि मृग अनेक । दृष्टीस आला तयांच्या ॥ ३८ ॥ तैं हाचि रावण लंकेश्वर । ऐसें मानून वानरवीर । किलकिलाट करीत थोर । ताडूं लागले तयातें ॥ ३९ ॥ मागुती नोहे हा रावण । ऐशी ध्यानीं येतांचि खूण । सारेचि खिन्न होवोनि जाण । पुढती शोधार्थ निघाले ॥ ४० ॥ तया अरण्यांत करितां भ्रमण । तृषार्त होऊन सारे जण । कासावीस करिती प्राण । पाणी कोठेंचि मिळेना ॥ ४१ ॥ इतुक्यामाजी ज्याचिया द्वारीं । तृणें लगटूनि गेलीं भारी । ऐशिया एका गिरि-गव्हरीं । दृष्टि गेली तयांची ॥ ४२ ॥ आणि हंसादि क्रौंचादिक । पक्षीहि तेथून कांहींएक । आर्द्र करून आपुले पंख । बाहेर येतां देखिले ॥ ४३ ॥ तैं मग येथ आहेचि पाणी । आम्ही प्रवेश करितों झणीं । ऐसें बोलून तये ठिकाणीं । मारुती प्रविष्ट जाहला ॥ ४४ ॥ मागुती धरून त्याचा हात । सारेचि प्रविष्ट झाले आंत । आणि बहुत दूरपर्यंत । अंधारांतूनि चालले ॥ ४५ ॥ तंव तेथ सुंदर जलाशय । जयांचें स्फटिकाऐसें तोय । देखतां सर्वांलागीं विस्मय । उदंड चित्तीं वाटला ॥ ४६ ॥ वृक्षहि दाटून गेले थोर । जयांसी फळांचा आला भर । आणि द्रोणहि लाविले ज्यांवर । मधु संचित कराया ॥ ४७ ॥

तैसींच सकल-साधनयुत। गृहेंहि दृष्टीस आलीं तेथ। जयांत खाद्यपेयेंहि बहुत। सिद्धचि होतीं ठेविलीं ॥ ४८ ॥ रत्नें वसनेंहि कित्येक। परी आश्चर्य मात्र एक। कीं या इतुक्यांत मनुष्य एक। दृष्टीस येऊं शकेना ॥ ४९ ॥ तंव तेथ एके सुवर्णासनीं। बैसली कोणी स्त्री योगिनी। रंगली आपुले अंतर्ध्यानीं। तेज अद्भुत जियेचें ॥ ५० ॥ यापरी दृष्टीस येतांचि सती। भय, पूज्यता आणखी प्रीती। दाटून सकळिकांच्याहि चित्तीं। प्रणाम केला तयांहीं ॥ ५१ ॥ तंव तें पाहूनि ती योगिनी। बोलली त्या सर्वांलागुनी। रे कोण तुम्ही इये स्थानीं। कोठूनि किमर्थ पातलां ॥ ५२ ॥ तैं हनुमंतें तिजलागून। सर्वहि वृत्तांत निवेदून। म्हणितलें आम्ही सीताशोधन। करीत आलों वनीं या ॥ ५३ ॥ मग तृषार्त होतां फार। देखिलें एके गुहेचें द्वार। मग प्रवेश करितां सत्वर। पातलों येथें सर्वही ॥ ५४ ॥ देवि, तूंहि किमर्थ एथ। राहसी ऐसिया एकान्तांत। नामाभिधान तेंहि त्वरित। आम्हांतें सांगिजे एधवां ॥ ५५ ॥ तंव ती योगिनी अंतःकरणीं। तोषून बोलली बा रे झणीं। जाऊन जलाशयाचे ठिकाणीं। आहार तेथ करा जा ॥ ५६ ॥ तेथींचीं सेवून मधुर फळें। आणि शीतळ होऊन जळें। परतून येथ आलिया वेळे। वृत्तांत सर्व कळेल ॥ ५७ ॥ तेधवां तियेच्या आज्ञेनुसार। जाऊन सर्वहि वानर-वीर। तेथ संतोष पावून थोर। परतून आले तियेशीं ॥ ५८ ॥ मग जोडोनि आपुले कर। पुढती बैसतां ते वानर। योगिनी आपुलें वृत्तान्तसार। सांगूं लागली तयांतें ॥ ५९ ॥

विश्वकर्म्याची नंदिनी । होती हेमा नामें करोनी । विपुल सौंदर्याची खनी । नृत्यीं नैपुण्य जियेचें ॥ ६० ॥ एकदां तियेनें निज-नर्तन । दावून, महेश्वराचें मन । संतुष्ट करितां, तिजलागून । पुर हें तेणें अर्पिलें ॥ ६१ ॥ मग या स्थानीं ती सुंदरी । राहिली बहुत काळवरी । मागुती मजासि अर्पूनि पुरी । ब्रह्मलोकातें पावली ॥ ६२ ॥ माझा तियेशीं मित्र-पणा । स्वयंप्रभा मी नामें जाणा । हृदयीं चिंतीत वैकुंठराणा । येथ आनंदें राहतें ॥ ६३ ॥ तियेनें सांगितलेंसें मज । कीं तूं ऐसीच विष्णूस भज । येणें सर्वांचि तुझें काज । पूर्ण सिद्धीतें पाविजे ॥ ६४ ॥ तो देव भूभारहरणासाठीं । जन्मला कौसल्येचे पोटीं । आणि फिरतसे भूमीपाठीं । भार्याशोधानिमित्तें ॥ ६५ ॥ मग तोचि धरून हेत । फिरतां वानर येतील येथ । मग तूं जावोनि बाई, त्वरित । दर्शन घेई हरीचें ॥ ६६ ॥ ऐसें सांगून ती निजधामा । पातली सखी जी माझी हेमा । ते शब्द आजि माझिया कामा । कैसे आले पहा हो ॥ ६७ ॥ आतां पहाया तो श्रीमान । अत्यंत उत्सुक माझें मन । म्हणोनि करा जी आतां गमन । आपुले कार्यानिमित्तें ॥ ६८ ॥ नेत्र मिटोनि घेतांक्षणीं । पावाल आपुले पूर्व स्थानीं । यापरी बोलून ती योगिनी । निवांत झाली क्षणैक ॥ ६९ ॥ तंव ते त्याचि रीती नयन । झाकून पावले पूर्व वन । योगिनी तैशीच वेगें करून । रामासंन्निध पातली ॥ ७० ॥ श्रीराम, संन्निध लक्ष्मणवीर । तैसाच सुग्रीव मित्रप्रवर । पाहून साष्टांग नमस्कार । करिती झाली सती ती ॥ ७१ ॥ तेधवां शरीर रोमांचित । आणि कंठही सद्ग-

वित । होऊन तैसीच सीताकांत-। स्तवनीं सिद्ध जाहली ॥ ७२ ॥ म्हणे मी त्वत्पादांची दासी । पावलें दर्शन घ्यावयासी । करितें साष्टांग वंदनासी । स्वीकारावें दयाळा॥ ७३ ॥ ह्यां गुहेंत राहून थोर । तप जें केलें आजवर । तें आजि सफळ खरोखर । दर्शनयोगें तुझ्या या ॥ ७४ ॥ प्रभो तूं मायेच्याहि पार । तेणें जाणूं न शकती नर । परी तूं व्यापून सर्वांतर । निकट असती तयांच्या ॥ ७५ ॥ योगमायेचें आवरण । घेऊन दाविसी मनुष्य-पण । म्हणून वास्तवस्वरूपखूण । अज्ञानियांतें कळेना ॥ ७६ ॥ जे कां महान भागवत । तयांच्या प्रेमास सवर्धित । कराया तूं या भूलोकांत । प्रगटलासी श्रीरामा ॥ ७७ ॥ ऐसिया तुझी ओळखण । असेल कोठून मजकारण । जरी हें जाणूं शकेल कोण । तरी तो जाणो सुखेंचि ॥ ७८ ॥ मजसि विमूढ-बुद्धीसाठीं । नलगती आणीक नाना गोष्टी । एक श्रीराम श्रीजगजेठी । माझ्या चित्तीं वसावा * । ७९ ॥ प्रभो तुझें हें चरणद्वय । सर्व सौख्याचें आलय । तें आजि मजला प्रत्यक्ष होय । केउतें भाग्य हें माझें ! ॥ ८० ॥ येणें संसारमार्ग लोपे । आणि सन्मार्ग साधन सोपें । जोडून श्रीराघवाच्या कृपे । सहजीं मोक्षास पाविजे * ॥ ८१ ॥ परी जो दारा, द्रव्य, कुमार । हेंचि वैभव मानूनि थोर । त्यांतचि रंगून गेला नर । तो न या लाभा पाविजे * ॥८२॥ ऐसिया आसक्तांहीं देवा । काय स्पर्शावें तुझिया नांवा । जो तूं आनंदाचा ठेवा । विरक्त संत जनांचा * ॥ ८३ ॥ ऐसिया स्वात्मविश्रामभूता । वंदन तुजला श्रीरघुनाथा । आदिमध्यान्त-विवर्जिता । सर्व-

व्यापी श्रीनाथा ॥ ८४ ॥ तूंचि राघवा, त्रिगुणातीत । होऊन गुणांसी आश्रयभूत । रुद्रादि रूपांहीं आविर्भूत । होसी नाना प्रसंगें ॥ ८५ ॥ तूंचि कीं होसी पुरुष परम । वर्तसी सर्वत्रांसी सम । तुझें हें अवताराचें वर्म । कोणकातें कळेना ॥ ८६ ॥ प्रिय कीं अप्रिय कांहीं एक । तुझिया ठायीं न रघुनायक । परी हे मायामोहित लोक । तैसें तैसें भाविती ॥ ८७ ॥ जो तूं अज आणि अकर्ता । तो तूं जन्मून कोणाकरितां । झालासि कांहीं आचरिता । ऐसें कैसें म्हणावें ? ॥ ८८ ॥ परी हे सांगती कोणी जन । परमात्मा हा पावला जनन । कौसल नृपतीचें वरदान । सिद्धीस न्यायाकारणें ॥ ८९ ॥ जनांच्या चारित्रगानासाठीं । अज ऐसाही श्रीजगजेठी । पातला कौसल्येचे पोटीं । ऐसें कोणी बोलती ॥ ९० ॥ कोण ते हराया भूमिभार । विधीनें प्रार्थना केलियावर । देव हा जाहला आहे नर । ऐसेंच नेमें मानिती ॥ ९१ ॥ मग धरून त्वद्भक्तिपथा । गाऊन नाचती तुझिया कथा । तेणें सर्वही संसारव्यथा । निरस्त करिती सर्वेचि ॥ ९२ ॥ प्रभो तूं मायागुणां-अतीत । मी तों वर्ततें त्यांच्या-आंत । मग या स्तवनादिकांची मात । कैची आतां ये स्थानीं ॥ ९३ ॥ म्हणोनि आतां श्रीरघुराज । असो हा प्रणाम माझा तुज । संगती जयाच्या सुमित्रात्मज । आणि सुग्रीव शोभती ॥ ९४ ॥ यापरी स्तवन करितां सती । प्रसन्न होऊन श्रीरघुपती । बोलले, जे काय वांछा चित्तीं । वर तो मागें ये वेळीं ॥ ९५ ॥ तेधवां बोलली ती भामिनी । भक्तिच पाहिजे मजलागुनी । तीच निश्चल

जोडिल्या मनीं । जन्म कैसाही असो कीं ॥ ९६ ॥ बसती सदैव तव भक्तांत । न लगे आणिकीं ती संगत । आणि स्वन्नाम सदोदित । आवडी गावें मुखानें ॥ ९७ ॥ आणि सीतालक्ष्मणांसमत । ही तुझी सुरम्य सांवळी मूर्त । एतुली माझिया अंतरांत । ठसून राहो श्रीरामा * ॥ ९८ ॥ हस्तीं धनुष्य आणि शर । कासेस कसिला पीतांबर । आणि मुकुटही मस्तकावर । उज्वळ तेजें झळाळे ॥ ९९ ॥ अंगदें नूपुरें मुक्ताहार । शोभती ज्याच्या अंगावर । आणि कौस्तुभ कुंडलें थोर । शोभवितात जयाला ॥ १०० ॥ हेचि मूर्ति तेजोभरित । अंतरीं माझिया होवो स्थित । आणीक कांहींहि वांछित । मातें नाहीं वराया ॥ १०१ ॥ तेधवां दयाळें श्रीरघुवीरें । तियेस म्हणितलें, वत्से बरें । आतां जाऊन राही त्वरें । बदरीवनास सुखें तूं ॥ १०२ ॥ तेथ तूं चिंतीत असतां मज । जैं या सरेल तनूचें काज । तयीं तूं माझेचि रूपीं सहज । प्राप्त होशील निश्चयें ॥ १०३ ॥ ऐसी ऐकून श्रीरामवाणी । स्वयंप्रभा ती जाऊन झणीं । श्रीरामातें अंतःकरणीं । चिंतीत तेथें राहिली ॥ १०४ ॥ मग विशीर्ण झालिया शरीर । सोडूनि देहादि अहंकार । अनायासेंचि श्रीरघुवीर- । रूपीं जाऊन मिळाली ॥ १०५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०६ ॥ श्रीराम ॥



## अध्याय ३५ वा, सीताशोध.

श्रीराम ॥ इकडे वानरवीर सकळ । शोधून थकले रानोमाळ । परी त्या सीता सतीचें स्थळ । कोणाहि नाहीं लाधलें ॥ १ ॥ म्हणोन चिंता लागून अती । सारेच जाहले मूढमती । कोणेकातेंहि येथ पुढती । उपाय कांहीं सुचेना ॥ २ ॥ तेधवां वीरें अंगदें पुढती । होऊन म्हणितलें सर्वांप्रती । अहो ही एक मासाची मिती । संपूर्ण झाली; नव्हे का? ॥ ३ ॥ परी उदंडही शोध करितां । नाहीं गवसली देवी सीता । आज्ञा सुग्रीवाची आतां । जैशी तैशीच राहिली ॥ ४ ॥ आतां पावतां किष्किंधेस । नृप तो शिरचि घेईल खास । विशेषें मजला शत्रुसुतास । खळ तो सोडूं शकेना ॥ ५ ॥ तयासी केउतें माझें प्रेम । मजसि रक्षितसे श्रीराम । परंतु मज हें त्याचेंहि काम । साधिलें नाहीं ये वेळीं ॥ ६ ॥ म्हणोनि घ्यावया माझा प्राण । तयास निमित्त झालें जाण । अहो हा दुष्टबुद्धिच पूर्ण । भ्रातृभार्येसी भोगितो ॥ ७ ॥ म्हणोनि तयाच्या पुढती जातां । मजला उचित नाहींच आतां । मी तों येथेंच निज जीविता । अपाय कांहीं जोडितों ॥ ८ ॥ यापरी बोलतां अंगद वीर । आणि नयनीं देखून नीर । आणीकही ते सर्व वानर । दुःखी होऊनि बोलती ॥ ९ ॥ कां बा किमर्थ करिसी शिण? । तुझिया प्राणाचें संरक्षण । कराया आम्हीहि सारेच जण । येथेंचि पाहीं राहतों ॥ १० ॥ गुहेच्या अंतरीं करितां वास । मग ते

शिवूंच न शके खास । आणि स्वर्गाचि प्रत्येकास । होईल पाही गिरी हा ॥ ११ ॥ ऐसीं भाषणें परस्परांत । चालतां सर्वहि करोनि श्रुत । पुढती होवोनि समीरसुत । तयांतें ऐसें बोलला ॥ १२ ॥ अंगदा, तुवां ही केउती मात । आणिली एधवां निज-चित्तांत । सुग्रीवासी प्रियचि बहुत । होसी तारासुता तूं ॥ १३ ॥ आणि राघवाचेंहि प्रेम । तुजवरी असतां सर्वोत्तम । व्यर्थ कां बा पावसी श्रम । प्राणत्यागानिमित्तें ॥ १४ ॥ तैसेंच पाहतां गुहेचा वास । निर्भय कैंचा होणार यांस । अरे या श्रीरामाचिया शरास । अभेद्य काय त्रिलोकीं ? ॥ १५ ॥ तुजसि धावयालागीं भर । सिद्ध जे झालेत हे वानर । तेहि सांडून दारा कुमार । कैंचें राहती कळेना ॥ १६ ॥ म्हणोनि विचार जे हे तुझे । अविचारां-च्याच ऐसे समजें । सांगतों तोहि श्रवण कीजे । गुह्य वृत्तांत आणखी ॥ १७ ॥ श्रीराम साक्षात नारायण । सीता भगवती माया जाण । जी या विश्वाचें कारण । मोहिले लोक जियेनें ॥ १८ ॥ आणि त्रिभुवनाधारभूत । शेष तोचि हा सुमित्रासुत । विधीनें राक्षस-वधानिमित्त । विनविलें जेव्हां तयांतें ॥ १९ ॥ तयीं हे कराया लोकोद्धार । अवतीर्ण झालेत भूमीवर । आम्हीहि विष्णूचे अनुचर । वानररूपानें जन्मलों ॥ २० ॥ पूर्वी कष्ट जे साहून नाना । केली विष्णूची उपासना । तेणेंच तयाच्या पार्षदस्थाना । आजि हे आम्ही पावलों ॥ २१ ॥ आतां येथही तयाची सेवा । करून तोषवूं या माधवा । मग वैकुंठीं पावून, ठेवा । जोडून घेऊं सुखाचा * ॥ २२ ॥ यापरी देऊन आश्वासन । आणि

तोषवून त्याचें मन । सकळिकांतेंहि संगें घेऊन । वीर तो पुढती चालला ॥ २३ ॥ मग विंध्याद्रीचे वरती । जाऊन वीर ते शोध करिती । मग तेथेंहि न दिसतां सती । पुढती वेगें चालले ॥ २४ ॥ ऐसी शोधीत शोधीत वना । चालली असतां सारी सेना । दक्षिण-समुद्राचिया स्थाना । सर्वहि येऊन पोंचले ॥ २५ ॥ मग त्या समुद्र-तीरावरी । पाहोन महेंद्र नामें गिरी । सारेच तयाचे शिखरावरी । चढून पाहूं लागले ॥ २६ ॥ तंव तें दृष्टीस नलगे पार । ऐसें अगाध पसरलें नीर । देखोन सारेचि वानरवीर । चित्तीं स्तंभित जाहले ॥ २७ ॥ येथ काय करिजेल आतां । कैसी गवसेल देवी सीता । ऐशा विचारें भय आणि चिंता- । यांहीं व्यापून राहिले ॥ २८ ॥ मग जयांचें उद्विग्न मन । आणि जाहलें खिन्न वदन । कपि ते समुद्र-तीरावरून । सारेचि येऊन बैसले ॥ २९ ॥ मग अंगदादि सेनापती । म्हणती परस्परांप्रती । अहो, ही एक मास मिती । फिरतांचि पूर्ण जाहली ॥ ३० ॥ आम्हीं देखिली नाहीं सीता । रावण खळहि न आला हाता । अहो हा सुग्रीव निश्चयें आतां । प्राण घेणार आपुले ॥ ३१ ॥ म्हणून येथेंचि देऊन ठाण । त्यजावे स्वयेंचि आपुले प्राण । यापरी बोलोन सारेच जण । सिद्धता करिती तयाची ॥ ३२ ॥ बैसले आंथरूनि तृण । म्हणती ऐसेच सोडूं प्राण । शरीरें तीं तीं अन्नावीण । विलंब कैंचा पडाया ॥ ३३ ॥ ऐसी सिद्धता होतांचि तेथ । गृध्र एक पातला त्वरित । अंगें जैसा का पर्वत । गुहे आंतून गिरीच्या ॥ ३४ ॥ तेणें ते सर्व वानर-वीर । बैसले

देखोन तीरावर । चित्तीं संतुष्ट होवोन थोर । ऐसे उद्गार काढिले ॥ ३५ ॥ अहो हा कष्टल्यावांचून आज । उदंड आहार लाभला मज । यांतून एकेक घेतांहि काज । भागेल माझें निश्चयें ॥ ३६ ॥ तंव तें गृध्राचें भाषण । ऐकती जेधवां सारे जण । तयीं सर्वांचेंहि अंतःकरण । व्यापून गेलें भयानें ॥ ३७ ॥ म्हणती गृध्र हा सर्वत्रांसी । गट्टाचि करणार निश्चयेंसीं । अहो या जन्मून वानरवंशीं । वायांचि सारे चाललों ॥ ३८ ॥ सुग्रीवाचेंहि आज्ञापित । अथवा राघवाचाहि हेत । किंवा आम्हीं आपुलें हित । तेंहि नाहीं साधिलें ॥ ३९ ॥ अहो! तो जटायू भाग्यवंत । रामकार्यार्थ झाला मृत । तेणें साधिलें कीं हो खचित । श्रीराम-सायुज्य आपणा ॥ ४० ॥ यापरी खिन्न होवोन वीर । बोलत असतां परस्पर । जटायु ऐसा नामोच्चार । कानीं येतां तयाचे ॥ ४१ ॥ खग तो बोलला माझा भ्राता । जटायू नामें करून होता । तयाचें हें गोड नाम आतां । श्रुत केलेंत तुम्हीं जें ॥ ४२ ॥ तरी हे तुम्ही आहांत कोण । मजसि सारीच सांगा खूण । आतां माझियापासून जाण । पीडा होऊं शकेना ॥ ४३ ॥ तेधवां पुढती होऊन स्वतां । अंगदें सांगून सारी कथा । म्हाणितलें बा ही देवी सीता । हरून नेली रावणें ॥ ४४ ॥ सतीचा ऐकून आक्रोश थोर । धावला जटायू पक्षिप्रवर । आणि युद्धप्रसंग घोर । करिता झाला तयासी ॥ ४५ ॥ तेधवां घाय लागोन थोर । सांडिलें तेणें निज शरीर । मागुती रामेंचि येऊन सत्वर । दग्ध केलें तयातें ॥ ४६ ॥ ऐसें श्रीराघवाचें काज । करितां प्राण सांडोनि द्विज।

श्रीरामकृपेच्या योगें आज । मोक्षस्थानातें पावला ॥ ४७ ॥ मग आणीकहि वृत्तांत । सांगून म्हणे तो वालिसुत । सीतासतीच्या शोधानिमित्त । उदंड आम्ही कष्टलों ॥ ४८ ॥ परंतु लोटली पाहून मिती । ठाकलों ऐसिया मरणाप्रती । सती ती आतां कवणे रीती । गवसेल ऐसें दिसेना ॥ ४९ ॥ तूं ही जाणत अससी मात । तरी ती आम्हांस करवी श्रुत । यापरी सारेंच निवेदित । अंगदें केलें जेधवां ॥ ५० ॥ तयीं तो संतुष्ट होऊनि चित्तीं । बोलता झाला सर्वांपती । अहो हा जटायू माझा अती । प्रियकर बंधू असे कीं ॥ ५१ ॥ तयाची वार्ता बहु वर्षांहीं । मजसि श्रवण केलीत बा ही । आतां मीहि तुम्हांस कांहीं । सहाय होतों पहा कीं ॥ ५२ ॥ परी या बंधूस द्याया जळ । मजसि नेइजे तीरा-जंवळ । मागुती तुमचें कार्य सफळ । मार्ग सांगेन कराया ॥ ५३ ॥ तंव तें वचन होतां श्रुत । सारेचि होऊनि संतोषित । सुमुद्राचिया तीरीं त्वरित । नेते झाले तयातें ॥ ५४ ॥ मग स्नान करून जळीं । तेणें अर्पितां तीळांजुळी । सर्वही आपले पूर्व स्थळीं । सर्वेचि येऊन पातले ॥ ५५ ॥ तयीं तो संपाति जटायूभ्राता । सर्वांस सांगूं लागला स्वतां । कीं लक्ष देऊन आतां । वीर हो ऐका सांगतों ॥ ५६ ॥ लंका नामें नी एक पुरी । वर्तते त्रिकूट गिरीचे वरी । तेथ अशोक वनिके-अंतरीं । ठेविली आहे सतीला ॥ ५७ ॥ येथून शत योजनें दूर । सागरीं पहा तें लंकापुर । तेथ या सीतेच्या सभोंवार । राक्षसी आहेत ठेविल्या ॥ ५८ ॥ सती नी आहेच सुरक्षिता । हें मी प्रत्यक्ष पाहें आतां । गृध्रदृष्टीला

ऐसी दूरता । स्वभावें आहे लाभली ॥ ५९ ॥ शत योजनांचा हा सागर । लंघून जेणें जाइजे पार । तो या सीतेस भेटून वीर । परतून येईल निश्चयें* ॥ ६० ॥ मीहि या रावणाचा घात । कराया स्वभावें उत्कंठित । परंतु ऐसा पक्षरहित । तेणेंचि वाया जाहलों ॥ ६१ ॥ म्हणोनि यत्न करून थोर । आधीं उल्लंघा सागर । मग तो स्वयेंचि श्रीरघुवीर। प्राण घेईल खळांचा ॥ ६२ ॥ कोण या सिंधूस ओलांडून । करील लंकेमाजी गमन । कोण सीतेचें दर्शन । घेईल ऐसा बळाचा ? ॥ ६३ ॥ देवीशीं करून संभाषण । परतून गांठील आपुलें ठाण । ऐसा समर्थ आहे कोण । आपणांमाजी पहा हो ॥ ६४ ॥ संसाराचा सागर थोर । दाटून येतां आपणांवर । उड्डाण घेऊन पैल पार । साधील कोण महात्मा ? ॥ ६५ ॥ विषयसुखांचें जें अपार । भोंवतीं पसरून गेलें नीर । तयास तत्काळ करोनि दूर । जाईल कोण पुढारां ॥ ६६ ॥ चित्तवृत्तीच्या लंकेमाजी । कोण प्रवेशकर्ता गाजी । पहा हो शोधून; तोचि काजीं । येईल ऐसा निश्चयें ॥ ६७ ॥ आत्मदेवता सीतासती । आणील आपुल्या दृष्टिपथीं । ऐसा समर्थ जो निश्चितीं । तोचि वीर म्हणावा ॥ ६८ ॥ भेटून मागुती पूर्व स्थळ । पावावयाचेंहि व्हावें बळ । तेणेंचि योगें तुमचें सफळ । कार्य होईल जाणिजे ॥ ६९ ॥ यापरी सीता सतीची खूण । त्याच्यापासून होतां श्रवण । वीर ते सारे विचारप्रवण । होऊन एकाग्र जाहले ॥ ७० ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७१ ॥ श्रीराम ॥

## अध्याय ३६ वा, संपातिकथा.

श्रीराम ॥ मग 'संपाते आपुलें वृत्त । आम्हांस करी गा आतां श्रुत' । ऐसें वानरीं कारितां सूचित । खग तो बोलूं लागला ॥ १ ॥ मी आणि जटायू दोघेजण । पूर्वीं जेधवां होतों तरुण । तेधवां अंगींच्या बळें करून । दोघेहि गर्वें दाटलों ॥ २ ॥ मग कोणाचें सामर्थ्य किती । हें पाहाया आणून चित्तीं । दोघेहि सूर्यमंडळाप्रती । झेप घेवोनि उडालों ॥ ३ ॥ तेधवां कित्येक योजनें दूर । गेलिया रवीच्या प्रखरतर । किरणें जटायूचें शरीर । पोळून जाऊं लागलें ॥ ४ ॥ मग म्यां होवोनि स्नेहवश । पंखाखालीं घेतलें त्यास । परी त्यायोगें माझ्याहि नाश । जाहला पक्षद्वयाचा ॥ ५ ॥ तेधवां बळ तें होवोनि गलित । विंध्याद्रीचे ठायीं त्वरित । वेगेंचि जाहला माझा पात । आणि मी मूर्छित जाहलों ॥ ६ ॥ मग लोटतां दिवस तीन । मागुती होऊनि सावधान । पाहतों तंव हें कोण स्थान । कांहींच मातें कळेना ॥ ७ ॥ तैं मग एक आश्रमस्थान । दृष्टीस पडतां संतोषून । तैसा तैसाचि भूमीवरून । तेथें जाऊन पोंचलों ॥ ८ ॥ तेथ त्या आश्रमाचे स्थानीं । वसतसे चंद्रमा नामें मुनी । तेणें दशा ती अवलोकुनी । ऐसें मजला पूसिलें ॥ ९ ॥ बा रे तुज-लागीं ऐसी परी । लाभली कवणें योगें तरी । ज्या तूं पूर्वीं सर्वांहि वरी । पुष्टता होती जोडिली ॥ १० ॥ तयीं मीं आपुली सर्व कथा । तयाच्या घालून कर्णपथा । म्हणितलें

पावे स्मृतीतें । पूर्व जन्माच्या, कृतीच्या ॥ ३५ ॥ मग जठरानळाचा ताप । लागतां पावून पश्चात्ताप । जीव ह्या गर्भीच ऐसा विलाप । करीत राहे तेधवां ॥ ३६ ॥ अहो! म्यां भोगिल्या नाना योनी । पुत्र-दारादिक संपादुनी । परी या श्रीविष्णूच्या ध्यानीं । क्षणहि नाहीं वेचिला * ॥ ३७ ॥ आप्त तों मजसि झाले किती । गृहादिकांचीहि नाहीं मिती । परी तें सारेंचि जाऊन अंतीं । प्रसंग ऐसा पातला * ॥ ३८ ॥ न्याय अन्याय सांडून दूर । कुटुंबाचीच मीं केली भर । परी तो भक्तांचा करुणाकर । नाहीं पूजिला खळें म्यां ॥ ३९ ॥ सांडूनि ऐसा सीताकांत । धरिली दारासुतांची प्रीत । कृतकर्माचें-चि फळ निश्चित । मज हें आतां पातलें * ॥ ४० ॥ ऐसें दुःख हें परम घोर । नि-श्चयें पावेल तुझियावर । म्हणोनि सांगत असतांहि थोर । म्यां न चित्तांत आणिलें * ॥ ४१ ॥ आणि क्षणभंगुर जी काया । तीतेंचि शाश्वत मानुनियां । आशातृष्णाचि जो-डूनि वाया । काळ म्यां मूढें सारिला * ॥ ४२ ॥ करोनि निषिद्धही आचरणा । दुर-विला म्यां श्रीसीतारमण । अहो! मीं चांडाळें एकहि क्षण । सार्थकीं नाहीं लाविला! * ॥ ४३ ॥ ऐसा व्याकूळ होवोनि अती । मागुती म्हणे, जी हे श्रीपती । दयाळा! मज या गर्भापत्ती- । पासून वेगें सोडवीं ॥ ४४ ॥ मग तुझ्याचि सेवे आंत । गढून राहीन सदोदित । बा हे मज न साहवत । कष्ट हे येथील अरेरे ॥ ४५ ॥ ऐसें चिंतीत असतां मनीं । भारें आणीक निर्बुजोनी । जीव तो योनिद्वारा-आंतुनी । ह्या भूलोकीं पावतो

॥ ४६ ॥ जैसा कीटक जखमेंतून । किंवा पातकी नरकांतून । तैसेंच बा हें तयाचें जनन । योनि-अंतून निश्चयें ॥ ४७ ॥ ऐसें अत्यंत ओंगळवाणें । जनीं या शरीर संपादणें । मागुती बाल्यादिकांचे गुणें । दुःख आहेचि लागलें ॥ ४८ ॥ तें तों सकळिकांसी विदित । तुझ्याहि आहेचि अनुभवांत । म्हणोनि आणीक सुविस्तृत । करणें नलगे एधवां ॥ ४९ ॥ म्हणोनि 'मी देह' ऐशी मती । हीच या सर्वांची जन्मदाती । गर्भवास कीं नरकादि गती । एणेंचि जीवा पावती ॥ ५० ॥ म्हणोनि स्थूल कीं सूक्ष्म देहा- । पासून वेगळा बापा रहा । आत्मा प्रकृतीच्याहि पहा । परताचि आहे सदैव * ॥ ५१ ॥ 'हा मी' आणीक 'हें तें मम'। ऐसा सांडूनि सारा भ्रम । बा तूं आत्मयामाजींच रम । खूण जाणून तयाची * ॥ ५२ ॥ सुषुप्ति, स्वप्न कीं जागृती । जयाच्या अंगास नातळती । आणि जो सद्रूप ज्ञानमूर्ती । शांत निर्मल सदैव * ॥ ५३ ॥ ऐसी या आत्मयाची खूण । अंतरामाजी येतांच जाण । मोह आणि मोहाचें कारण- । अज्ञान जातें लयाला ॥ ५४ ॥ मग हें जावो वा राहो शरीर । यथेच्छ प्रारब्ध कर्मानुसार । तयाचा सुखदुःखादि भार । ज्ञानिया अंगीं नातळे ॥ ५५ ॥ म्हणोनि प्रारब्धाची दोरी । जोंवरी देहसांभाळ करी । तोंवरी कांतेच्या सर्पानुसारीं । काळ तूं बापा क्रमावा ॥ ५६ ॥ आणीक सांगतों एक कथा । कीं या त्रेतायुगांत स्वतां । लक्ष्मीनाथचि येणार आतां । रामरूपें जगीं या ॥ ५७ ॥ मग तुजसी एके वेळ । भेटेल तयाचें वानर-

बळ । तयीं तूं सीतासतीचें स्थळ । त्यास संपूर्ण निवेदी ॥ ५८ ॥ तैं हे कष्ट संपून तव । पंखहि उत्पन्न होतील नव । मग हें नुरेचि कांहीं लव । दुःख संपाते तुझें हें ॥ ५९ ॥ ऐसें चंद्रमा नामें मुनी । बोधिता झाला मजलागुनी । आणि तें तैसेंच आलें घडूनी । हें तों प्रत्यक्ष पाहतां ॥ ६० ॥ नूतन पक्षहि आतांचि मज । पातले पहा हे कैसे सहज । वीर हो आतां आपुलें काज । जाऊन साधा त्वरेनें ॥ ६१ ॥ पसरला अपार जो हा अब्धी । त्यातेंचि उल्लंघावें आधीं । मग ती व्हावया सर्व सिद्धी । विलंब नाहीं क्षणाचा ॥ ६२ ॥ आणि व्हावया समुद्रपार । समर्थचि आहांत तुम्ही वीर । अहो या लोकत्रयाच्या पार । श्रीरामभक्तें जाइजे*॥ ६३ ॥ पहा कीं ज्याच्या नामेंचि नर । घोर ऐसाही भवसागर । क्षणेंचि एकें लंघून सत्वर । चिरसौख्यातें पावतो ॥ ६४ ॥ तया श्रीरघुवीराच्या दासां । एतुला सागर तो कायसा । तयांहीं एकेच उडीसरसा । पैल प्रदेश पाविजे * ॥ ६५ ॥ ऐसिया परी देऊनि धीर । मग तो संपाति गृध्रवर । आकाशमार्गेंचि कीं सत्वर । निघून गेला स्वधामा ॥ ६६ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६७ ॥ श्रीराम ॥ ३६ ॥ ॥ ७ ॥



## अध्याय ३७ वा, हनुमदुड्डान.

श्रीराम ॥ संपाति निघून गेलियावर । कपि ते हर्ष पावून थोर । सीता भेटेल आतां सत्वर । म्हणूनि नाचूंचि लागले ॥ १ ॥ मग ते पाहती जंव सागर । तंव नलगेचि त्याचा पार । लाटा उसळूनि येती थोर । पर्वताऐशा प्रचंड ॥ २ ॥ तेणें भोंवरेहि नानापरी । फिरतां दिसती पृष्ठावरी । तैशाच प्रचंड ऐशा सुसरी । ठायीं ठायीं दिसती ॥ ३ ॥ ऐसें अपार पाहोनि नीर । वीर ते बोलती परस्पर । कीं येथ गांठील पैल तीर । ऐसा कोण बळाचा ॥ ४ ॥ मग तो अंगद वीरवर। बोलला होऊन सर्वांसमोर। वीर हो तुमचें सामर्थ्य थोर । हें मीं निश्चयें जाणतों ॥ ५ ॥ म्हणोनि आजि जो घेऊनि उडी । निधीची पावेल पैल थडी । तयानें प्राणाचीच जोडी । आम्हांस केली जाणिजे ॥ ६ ॥ अथवा सुग्रीव-सीतारमणा । यांतेंहि तेणेंचि रक्षिलें म्हणा । म्हणोनि ऐसा तो वीरराणा । आतांचि येवो पुढारां ॥ ७ ॥ यापरी वचन होतां श्रुत । वीर ते कांहींच न बोलत । परस्परांचीं वदनें पाहत । जैसे तैसेच राहिले ॥ ८ ॥ मग म्हणितलें वालितनयें । अहो प्रत्येकेंचि आतां स्वयें । आपुलें बळ तें कैसें काये । सांगून द्यावें त्वरेनें ॥ ९ ॥ मग हें कार्य साधील कोण । तयाची होईल ओळखण । तंव तें ऐकूनि सारेचि जण । स्वबळ सांगूं लागले ॥ १० ॥ तेधवां एक तो दश योजन । एक तो बोले शत योजन । ऐसे सारेचि

निज-उड्डान । शताआंतचि सांगती ॥ ११ ॥ तंव म्हणितलें जांबवंतें । कीं, बळ उदंड पूर्वीं मातें । म्यां त्रिविक्रम-पादांबुजातें । प्रदक्षिणा होत्या घातल्या ॥ १२ ॥ परी मी आजि तेणें मानें । राहिलों नाहीं वार्धक्यानें । म्हणून समुद्र उल्लंघणें । शक्य कीं अशक्य कळेना ॥ १३ ॥ अंगदेंहि म्हणितलें मज । लंघवेल हा सागरराज । परंतु भरंवसा नाहीं आज । परतून येईन तयाचा ॥ १४ ॥ तईं जांबवान म्हणे, बा तें । अनुचित आम्हां सकाळिकांतें । सैनिकांहींच सेनापतीतें । काज सांगावें कायसें ॥ १५ ॥ मग म्हणे अंगद ऐसें जरी । तरि सर्वांहींच पूर्वीपरी । बैसणें अवश्य दर्भावरी । प्राणत्यागाकारणें ॥ १६ ॥ कार्य जैं घडेना कोणेकाही । तरि मग प्राण वांचणें नाहीं । येथ आणीक विचारणा ही । किमर्थ आतां करावी ॥ १७ ॥ तैं म्हणितलें जांबवंतें । थांब गा, वीर मी दाावितों तूतें । जो कां आतांचि या कार्यातें । सिद्धि आणून दाखवी ॥ १८ ॥ मग पाहून हनुमंताकडे । जांबवान तो बोले पुढें । मारुते, बा तूं एकीकडे । राहसी कैसा एधवां ॥ १९ ॥ कार्य तों ऐसें पातलें थोर । आणि तूं मौनाचा अंगीकार । करोनि अज्ञाचे अनुसार । उगाचि कैसा कळेना ॥ २० ॥ अगा जें तुझिया अंगीं बळ । हीच तें दर्शवायाची वेळ । तूं तो साक्षात वायूचा बाळ । वायूऐसाचि बळाचा ॥ २१ ॥ बा तूं आलास याचे पोटीं । रघुनाथाच्याच कार्यासाठीं । म्हणोनि आतांचि बापा उठी । कार्य साधाया त्वरेनें ॥ २२ ॥ ज्या तूं जन्मासि येतें वेळ । उडोनि गांठिलें रविमंडळ । खावया योग्य हें पक्व फळ । ऐशा बालविचारें

॥ २३ ॥ म्हणोनि ऊठ बा दावी बळा । श्रीरामकार्य हें आणी फळा । आणि आम्हांहि इया सकळां । बंधूंस रक्षीं आपुल्या ॥ २४ ॥ तंव तें वचन होतांचि श्रुत । वीर तो होवोनि आनंदित । उठला सिंहा ऐसा गर्जत । ब्रह्मांड जेणें दणाणे ॥ २५ ॥ मग वाढूनि पर्वतासम । जाहला दुजाचि त्रिविक्रम । मग म्हणे अहो मी पराक्रम । कोणता दावूं तुम्हांतें ॥ २६ ॥ जाऊन, समुद्र उल्लंघून । सांगा, करूं कां लंका दहन? । अथवा दशाननातें वधून । सीतेस आणूं काय हो! ॥ २७ ॥ अथवा दोरी बांधून गळां । सांगा एथ आणूं का खळा । किंवा लंकाचि आणूं समूळा । पिळून एक्या करानें ॥ २८ ॥ ऐसें हनुमंताचें वचन । ऐकून बोलला जांबवान । बा रे सतीस अवलोकून । वृत्तांत आधीं आणिजे ॥ २९ ॥ मागुती जाऊन श्रीरघुराजा- । संगतीं दाखवी आपुल्या तेजा । जा बा, आतां साधूनि काजा । परतून येई सुखानें ॥ ३० ॥ रघुनाथाच्या कार्यासाठीं । चालत असतां, तुझिया पाठीं । वायुहि येवोन देवो पुष्टी । कार्यसिद्धीच्या निमित्तें ॥ ३१ ॥ आशीर्वचनें ऐशिया रीती । वीर ते तयातें निरोप देती । निरोप घेतांचि तो मारुती । प्रचंड धैर्यें दाटला ॥ ३२ ॥ पर्वता ऐसा देहाकार । महा भुजंगा ऐसे कर । यापरी प्रचंड तो वीर-वर । तेथून वेगें निघाला ॥ ३३ ॥ मग उड्डाण घ्यावयासाठीं । पावला महेंद्रशिखरा-पाठीं । संगें सकळिकांचीहि दृष्टी । ओढूनि नेली जयानें ॥ ३४ ॥ सुवर्णा ऐसा देदीप्य-मान । अंगें वीर तो श्रीहनुमान । आणि अरुणा वर्णासमान । शोभा ज्याच्या मुखाची

॥ ३५ ॥ ऐसा तो दिव्य श्रीरामदूत । श्रीरामाच्याच कार्यानिमित्त । समुद्रपार जावया उद्यत । होवोनि टेला पुढारां ॥ ३६ ॥ आणि गर्जोनि ऐसें म्हणे । कीं हा समुद्र उल्लंघणें । तरीच श्रीरामभक्त होणें । नातरी वायां वल्गना * ॥ ३७ ॥ ऐसा स्वभावें गर्जिनला । आणि कार्यार्थ सरसावला । वीर तो आदर्शरूप झाला । आम्हां भक्तांकारणें ॥ ३८ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ३९ ॥ श्रीराम ॥ ३७ ॥ ४ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

॥ किष्किंधाकांड समाप्त ॥





रघुवीरदासविरचित

# अध्यात्मरामकथा

भाग २, कांडें ५–७



# प्रकाशकाचे चार शब्द.



रघुवीरदासरचिता रघुवीरकथा करूनि ही श्रवण,
स्त्रीपुरुष भक्तजन हो! शीघ्र करा पूत आपुले श्रवण!

प्रस्तुत ग्रंथाचा पूर्वार्ध प्रसिद्ध करून आज जवळजवळ ४ वर्षें होत आलीं. कार्य श्रीसमर्थांचें, तेव्हां ते तें आपल्या इच्छेनुसार सिद्धीस नेतील, हा प्रथमपासूनच भाव होता. तेव्हां तें त्यांनीं या दिवशीं रूपास आणावयाचें योजून याप्रकारें आमचे हातून पूर्णत्वास आणिलें. ही त्यांची सेवा त्यांनीं करून घेते वेळीं या जीवास इतकें तरी निमित्तमात्र केलें, याबद्दल जीवभावानुसार आह्मांस अत्यंत समाधान होत असून श्रीसमर्थांची ही परम कृपाच होय, असें वाटत आहे!

मूळ ग्रंथाची महती किंवा या रूपांतरांतील माधुर्य, सुलभता, अथवा वाणींतील प्रसाद यासंबंधांत वाचकांना आतां पुन्हा सांगावयाचें कारण दिसत नाहीं. तेव्हां सर्व भाविक श्रीरामभक्तजनांनीं, मुमुक्षूंनीं, जे श्रीरघुवीराच्या प्रेमामृताच्या तृषेनें व्याकुळ झाले असतील, त्यांनीं संस्कृतभाषेच्या कपाटांत गुंतून राहिलेलें हें मोलवान रत्न—अध्यात्मरामायण—आतां शुद्ध मराठींत येऊन मुक्तद्वार झालेलें पाहून मनसोक्त सेवन करावें हेंच त्यांस विनवावयाचें. व श्रीरघुवीराच्या कृपेनें ते त्याचें असें मनमुराद सेवन करून आपली श्रीरामप्रेमाची दिवाळी करून घेतील अशी आम्हांस आशा आहे.

का. शु. १ श. १८४३
३७ शनवार, पुणें.

भगवद्भक्तांचा प्रेमाकांक्षी
**रा. ब. गोडबोले.**

## संकेतचिन्हें.

१ ग्रंथांतील चारित्रविषयापासून अध्यात्म निराळें ओळखूं यावें ह्मणून तेथें ओळींच्या आरंभास : अशी टिंबांची उभी ओळ दाखविली आहे.

२ अनुक्रमणिकेंत जे विषय विशेष वाचनीय वाटले त्यांवर × ही खूण केली आहे. त्यांवर तरी वाचकांनीं एकवार अवश्य दृष्टि द्यावीच.

—प्रकाशक.

## चित्रें.





# सुंदरकांड

## अध्याय ३८ वा; लंकाकपिप्रवेश.

श्रीराम ॥ शतयोजनांचा सागरराज । लंघून पार जाणें मज । येणेंचि योगें समीरात्मज । चित्तीं उत्साहें दाटला ॥ १ ॥ मग अंतरीं रघुनंदन । चिंतून ऐसें बोलला वचन । अहो, मी पहा हा गगनांतून । कैसा वेगें जातसें ॥ २ ॥ रघुनाथाचा विजयी शर । जैसा, तैसेंच उड्डान थोर । घेऊन पावेन आतां सत्वर । चरणीं सीतासतीच्या ॥ ३ ॥ दृष्टी देखून सीता सती । कृतार्थ होऊन मी निश्चितीं । परतून श्रीरामपायांप्रती । येणार वंदावयातें ॥ ४ ॥ अंतकाळीं जयाचें नाम । घेऊन, सर्व संसारश्रम । निरसून जन हे आनंदधाम । पावती ज्याच्या बळानें ॥ ५ ॥ त्या श्रीरघुनंदनाचा दूत । वरी तयाची मुद्रिका बेत । आणि अखंड हृदयीं ध्यात । सांवळी मूर्ति तयाची ॥ ६ । त्या मज हनुमंतातें येथ । एतुली समुद्रलंघन-मात । कायसी? ऐसें ह्मणोनि हात । वीर तो वेगें उभारी ॥ ७ ॥ आणि मान करूनि नीट । नयनें लक्षिला गगनपट । पाउलें घेऊनि सन्निकट । उड्डान केलें जवानें ॥ ८ ॥ तयीं तो प्रतापी श्रीहनुमान । वायुवेगास अनुसरून । चालतां समुद्र उलंघून । सुरांहीं दृष्टी देखिला ॥ ९ ॥ मग ते शंकित झाले चित्तीं ।

म्हणती बल तें यास किती । कपि हा लंकाप्रवेशाप्रती । योग्य कीं नोहे कळेना ॥१०॥ मग परीक्षा घ्यायाकारितां । उपाय ऐसा योजिती स्वतां । सुरसा नामें जी नागमाता । तिजशीं जाऊन बोलती ॥११॥ बाई, कपि हा आकाशपथें । चालला, त्वरें तूं जाईं तिथें । शोधिजे तयाच्या शक्तियुक्तीतें । विघ्न योजून एथवां ॥ १२ ॥ मागुती परतून येईं झणीं । यापरी सुर ते बोलतां वाणी । सुरसा हनुमाद्विघ्नकारणीं । सिद्ध होवोनि निघाली ॥ १३ ॥ मग मार्ग रोधून ह्मणे । अहा रे बानरा वीरमणे । आजि तूं भक्षाचि मजकारणें । योजिला अससी सुरांहीं ॥ १४ ॥ क्षुधेनें अत्यंत मी पीडित । मुखीं या प्रवेशें बापा त्वरित । तंव तें पाहून श्रीहनुमंत । बोलता झाला तियेशीं ॥ १५ ॥ ह्मणे मी माते, रामाज्ञया । जातसें सीतेस भेटावया । सतीचा कुशल-वृत्तांत तया । परतून आहे सांगणें ॥ १६ ॥ ह्मणोनि साधून कार्यभाग । मुखीं मी प्रवेश करीन मग । वंदितों, न धरीं अंतरीं राग । मार्ग दे आतां अंबिके ॥ १७ ॥ तंव ती सुरसा बोलली त्यासी । क्षुधा मज पीडिते अतिशयेंसी । ये मुखीं, नातरी मीच तुजसी । धरून येतें गिळाया ॥ १८ ॥ ऐसें बोलून, निज शरीर । तत्काळ वाढवी योजनभर । आणि येऊन ठेली समोर । कपीचें सत्व पहाया ॥ १९ ॥ तैं तो रघुनाथाचा दूत । बोलला, अवो तूं मुख त्वरित । उघडीं, प्रवेश करूनि आंत । जाईन वेगें पुढारा ॥ २० ॥ आणि स्वयेंहि निजतनूतें । वाढवी एक योजनमितें । मग तैसाच अग्रभागातें । ठाकला धैर्यें तियेच्या ॥ २१ ॥ तैं तें स्वरूप अवलो-

कून । सुरसा पसरती झाली वदन । पंच योजनें; तैं हनुमान । दशसंख्येनें वाढला ॥२२॥ मग वीस योजन मिती । करी ती आपुले वदनाप्रती । तवं तो प्रतापी श्रीमारुती । तीस योजनें वाढला ॥ २३ ॥ मग ती पन्नासापर्यंत । सुरसा मुखास वाढवीत । तयीं तो चतुर समरिसुत । अंगुष्ठाऐसा जाहला ॥ २४ ॥ आणि रिघून वदनाआंत । मागुती बाहेर आला त्वरित । मग ह्मणे माते, ऐकिली मात । येतों आतां नमस्ते ॥ २५ ॥ तेधवां पाहून शक्ति-मती । संतोष पावूनि सुरसा सती । ह्मणे तूं साधिशी कार्याप्रती । रघुरायाच्या निश्चयें ॥ २६ ॥ सुरांहीं याचि कारणें मज । धाडिलें होतें बापा आज । कीं या कपीच्या अंगीं तेज । केउतें आहे पहाया ॥ २७ ॥ यावरी वेगें जाऊन तुवां । सतीचा दर्शनलाभ घ्यावा । आणि परतून श्रीराघवा । भेटावयास पाविजे ॥ २८ ॥ ऐसें बोलून सुरसा सती । पावली स्वर्गलोकाप्रती । सर्वांचे धरून खगेंद्रगती । मारुती वेगें चालला ॥ २९ ॥ तेधवां समुद्रही तोषून । मैनाकाद्रीस बोले वचन । अगा हा पराक्रमी हनुमान । गगनीं पाहीं चालला ॥ ३० ॥ रघुनाथाच्या कार्यासाठीं । चालला पहा हा वीरजेठी । तयातें देऊन आपुली पाठी । साचिव्य कांहीं करीं तूं ॥ ३१ ॥ लोकीं सागर ह्मणती मज । सगरीं वाढविलों मी समज । सगरवंशींच श्रीरघुराज । जन्मला दाशरथि हा ॥ ३२ ॥ कपि हा त्याचेंच मनोगत । प्रतापें सिद्धीस पाववीत । भगांनि उत्थान पावें त्वरित । कपिविश्रामाकारणें ॥ ३३ ॥ तयीं तो मान्य करूनि हेत । मैनाक वाढला जल-

मध्यांत। आणि मानवरूपें बोलत। चालतां देखूनि कपीतें ॥ ३४ ॥ ह्मणे मी मैनाक नामें गिरी। सागरें धाडिलें मजला वरी। कपींद्रा, शिण हा दूर करी। बैसोनि येथें क्षणैक॥ ३५ ॥ आणि फळेंहि अमृतापरी। सेवूनि मग तूं मार्ग धरीं। यापरी बोलतां मैनाक गिरी। उत्तर दिधलें कपींद्रें ॥ ३६ ॥ ह्मणे बा श्रीरामाकारणें। चालतां केउतें खाणें पिणें। केउता सांग बा विश्राम घेणें। वेगेंचि जाणें अवश्य ॥ ३७ ॥ मग शिखरातें आपुले करीं। स्पर्शून तोषविला तो गिरी। आणि परम वेग करी। कार्यैकदृष्टी कपि तो ॥ ३८ ॥ पुढतीं कांहीं क्रमितां पथ। तयाची छायाचि अकस्मात। एकें छायाग्रहें स्वकरांत। धरून, वेगातें रोधिलें ॥ ३९ ॥ सिंहिका नामक निशाचरी। राहून समुद्रपृष्ठावरी। जीव जो अंबरीं गमन करी। ओढूनि खाय तयातें ॥ ४० ॥ तियेनें रोधितां समीरसुत। वीर तो विचारी निजचित्तांत। कोण हें ऐसें विघ्न आणीत। वेग रोधूनि अंबरीं ॥ ४१ ॥ पाहतां कोणीच न दिसे येथ। अहो ही आश्चर्याचीच मात। तंवचि जलपृष्ठासी त्वरित। दृष्टी गेली तयाची ॥ ४२ ॥ तेथ ती सिंहिका छायाग्राही। पसरली देखूनि लवलाही। त्वेषें उड्डान घेऊनि पाहीं। पायेंचि तेणें ताडिली ॥ ४३ ॥ मग पुनश्च उड्डान थोर। घेऊन प्रतापी तो वीरवर। सागराचें तें दक्षिण तीर। पावला तेजें आपुल्या ॥ ४४ ॥ नानापरींचे वृक्ष थोर। लगटले सर्व प्रदेशभर। सुगंधी पुष्पफळांचा भार। लगटून गेला जयांतें ॥ ४५॥ नाना वेली नाना फुलें। नाना पशुपक्ष्यां-

चीं कुळें । निकटचि नगरहि अवलोकिलें । त्रिकूटाद्रीचे मस्तकीं ॥ ४६ ॥ तेथ त्या हवेल्या आणि वाडे । कपींद्र पाहुनि चोहोंकडे । म्हणे हो प्रवेश कैसा घडे । न कळे नगरीं ऐशिया ॥ ४७ ॥ मग रात्रींच सूक्ष्मरूपें । येथ प्रवेश करणें सोपें । ऐसें तत्काळ मतिप्रतापें । तेणें चित्तीं योजिलें ॥ ४८ ॥ मग तो रात्र झालियावरी । प्रविष्ट होतां नगरद्वारीं । साक्षात् राक्षसी लंकापुरी । त्याचिया पुढती ठाकली ॥ ४९ ॥ आणि दापून बोले तया । कोण रे तूं चोर या समया । भीतरीं प्रवेश करावया । सिद्ध झालासी वानरा ॥ ५० ॥ मूढा, माझिये अनुज्ञेविना । प्रविष्ट होऊनि माझ्या भुवना । काय रे योजिलें आहे मना । ये रिती साधावयाचें ॥ ५१ ॥ यापरी बोलून क्रोधभरें । तयास स्वपदें हाणी त्वरें । तेधवां तीतेंहि वायुकुमरें । ताडिलें मुष्टिप्रहारें ॥ ५२ ॥ तयीं ती रक्त ओकीत तेथ । राक्षसी भूमीस पडली त्वरित । मागुती होऊनियां उत्थित । हनुमंतातें बोलली ॥ ५३ ॥ अगा, तूं जिंकिली लंकापुरी । सुखेंचि मार्ग तूं आतां धरीं । आजि ही होणार ऐशी परी । हें म्यां पूर्वींच ऐकिलें ॥ ५४ ॥ विधीनें निवेदिलेंसें मज । कीं या त्रेतायुगांत अज । परमात्मा हा श्रीरघुराज- । रूपें येईल भूवरी ॥ ५५ ॥ योगमाया ती होऊन सीता । येईल जनकसदनीं स्वतां । मग मी भूभारहाराकारितां । भावें विनवीन तयांतें ॥ ५६ ॥ तेधवां भ्रातया-भार्येसहित । देव हा जाईल अरण्यांत । तेथ हा रावण लंकानाथ । हरील सीतासतीतें ॥ ५७ ॥ मग सुग्रीव कपीसमेत । सख्य हा करील सीता-

कांत । सर्वेचि सीताशोधानिमित्त । दूत धाडील कपि तो ॥ ५८ ॥ मग त्यांआंतून एक निशीं । दूत गे येईल तुझियापाशीं । कपि तो हाणील मुष्टिघाताशीं । तूतें रोषें तेधवां ॥ ॥ ५९ ॥ तयीं तो घाय लागून थोर । तुजसि होईल पीडा घोर । तैंच जाण हा राक्षस-वीर । लंकेश पावे विनाशा ॥ ६० ॥ ऐसें सांगूनि पूर्वश्रुत । लंकापुरी ती मग बोलत । बा रे याचि कारणें येथ । विजय तुझा जाणिजे ॥ ६१ ॥ अगा या राक्षसनाथें देख । निर्मिलें क्रीडाकानन एक । त्यांत सुरम्य ऐसें अशोक- । नामें उपवन शोभतें ॥ ६२ ॥ तेथ ते नंदन-वनापरी । तरुवर शोभती नानापरी । त्यांआंत एक जो मध्यंतरीं । शिंशपा वृक्ष शोभतो ॥ ६३ ॥ तेथ ती रघुवीराची प्रिया । रावणें ठेविली आहे सया । भोंवतीं राक्षसी रक्षावया । नेमियेल्या कीं तयानें ॥ ६४ ॥ तेथ तूं वेगेंचि जाऊनि सती । नयनीं देखूनि बा मागुती । सांग बा जाऊनि रामाप्रती । क्षेमवृत्तांत तियेचा ॥ ६५ ॥ अहा, ही धन्यता माझी किती । कीं, मज राहिली रामस्मृति । जी या संसारपाशाप्रती । तोडून मोक्षातें पाववी ॥ ६६ ॥ आणि हा श्रीरामभक्तराज । मारुती तोहि भेटला मज । तरी यायोगेंचि श्रीरघुराज । प्रसन्न होवो मजसी ॥ ६७ ॥ यापरी तियेचें वाक्य श्रुत । करि-तसे जैसा श्रीहनुमंत । तंवाचि सीता नि लंकानाथ । खूण एक दोघे पावले ॥६८॥ वाम भुज आणि नयन । स्फुरले तयांचे वेगेंकरून । खळाचें आनन झालें दीन । सतीचें शोभूं लागलें ॥ ६९ ॥ आणि हेचि भुजनयन । दक्षिण उपपद संपादून । स्फुरतां श्रीमान

रघुनंदन । तोहि संतोष पावला ॥ ७० ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७१ ॥ श्रीराम ॥ ३८ ॥ ७

## अध्याय ३९ वा, सीता-असुरपीडा.

श्रीराम ॥ मग तो सूक्ष्म रूपेंकरून । नगरीं प्रवेशला हनुमान । सती ती दृष्टीस यावी म्हणून । सर्वत्र शोधूं लागला ॥ १ ॥ मग शिरून भूपागारीं । पाहता झाला सर्वभरीं । परी ती साध्वी कोणेहि परी । दृष्टीस येऊं शकेना ॥ २ ॥ मग लंका जी बोलली खूण । तियेची होऊन आठवण । वेगेंचि घेऊनिया उड्डाण । पातला अशोक वनातें ॥ ३ ॥ तेथ ते स्वर्गींचे तरुवर । दाटले सर्वहि वनिकेभर । उदंड फलपुष्पांचा भार । दाटून गेला ज्यांवरी ॥ ४ ॥ पाहतां वेंधून घेती चित्त । ऐशा वापिका शोभिवंत । पायऱ्याहि ज्यांच्या रत्नखचित । दाविती थोर झळाळी ॥ ५ ॥ भोंवतीं मृगहि नानापरी । क्रीडती आपुले इच्छेपरी । पक्षीहि उदंड वृक्षांवरी । नाना नादें कूजती ॥ ६ ॥ रिघून ऐशिया वनस्थळीं । कपि तो एकेक वृक्षातळीं । शोध घे, परी ती जनकबाळी । दृष्टीस ये ना तयाच्या ॥ ७ ॥ तंवचि सुवर्णमंदिर एक । देखता झाला कपिनायक । जेणें उभविलें निजमस्तक । नभ:-स्पर्शाकारणें ॥ ८ ॥ रत्नखचित स्तंभ शत । लाविले जयास आधारभूत । तयातें देखतां

श्रीहनुमंत । चित्तीं आश्चर्य पावला ॥ ९ ॥ सर्वांचि त्यातें सांडूनि दूर । वेगें पुढती चालला वीर । तै तो शिंशपा वृक्ष थोर । तेणें नयनीं देखिला ॥ १० ॥ रविकरांतें न मिळे द्वार । ऐशी पालवी दाटली थोर । आणि पक्षीहि अग्रावर । सुवर्णवर्णे शोभती ॥ ११ ॥ त्याचिया तळवटीं देवी सीता । जैशी स्वर्गींची देवता । तैशी तेथ त्या वायुसुता । दृष्टीस आली तेधवां ॥ १२ ॥ वेणी तैशीच विस्कळित । देहही वाळला अतिशयित । मुख कोमेजलेंसे बहुत । मलिन वस्त्र तनूचें ॥ १३ ॥ अंतरीं पीडली शोकभरीं । अंग तों टाकिलें भूमीवरी । हा राम हा राम येणेपरी । चालले शब्द मुखानें ॥ १४ ॥ जाहली सर्वथा आश्रयहीन । न करी अन्नाचें सेवन । राक्षसी बैसल्या भोंवताळून । भय घालीत जियेला ॥ १५ ॥ तियेचें वृक्षपर्णा-आंतून । कपीनें करितांच अवलोकन । आजि मी कृतार्थ झालों ह्मणून । धन्यता मोठी मानिली ॥ १६ ॥ ह्मणे म्यां रघुवीराचें काज । साधिलें कष्ट साहूनि आज । अहो, ही जगज्जननीच मज । साक्षात् येथें भेटली ॥ १७ ॥ इतुकियामाजी गजबज थोर । उठली देखून तो कपिवर । हें काय ह्मणोनि पाहे सत्वर । लपोनी पर्णाभीतरीं ॥ १८ ॥ तोंचि जयाचीं वदनें दश । आणि भुजाहि ज्यासी वीस । ऐसा खल तो लंकाधीश । येतां नयनीं देखिला ॥ १९ ॥ अंगींचा वर्ण काळामोर । भोंवतीं दाटला स्त्रीपरिवार । ऐसा रावण पाहोनि घोर । कपि विस्मित जाहला ॥ २० ॥ अंतरीं चिंतितसे रावण । कीं म्यां भार्याहि केली हरण । तरी तो युद्धार्थ सीतारमण । कां न

अद्यापि पातला ॥ २१ ॥ लागून राघवाचा शर । कई हें पडेल मच्छरीर । यापरी चिंता लागून थोर । ध्यातसे सीतापतीतें ॥ २२ ॥ मग एकदां झालिया रात । पहुडला असतां एकांतांत । स्वप्न एक ऐसें अकस्मात । तेणें दृष्टी देखिलें ॥ २३ ॥ राघवें धाडिला कोणी दूत । मग तो नगरीं येऊनि त्वरित । सूक्ष्म रूपेंचि वृक्षपर्णांत । लपून देखे सतीतें ॥ २४ ॥ ऐसें स्वप्न देखिल्यावरी । सावध होवोन विचार करी । ह्मणे हीं स्वप्नेंहि कांहीं खरीं । होतीं लोकीं पाहतां ॥ २५ ॥ ह्मणून जाऊनि वनांतरीं । सीतेस पीडितों वचनशरीं । मग तो वृत्तांत कर्णावरी । जाईल तिच्या पतीच्या ॥ २६ ॥ या रिती माझें मनोगत । श्रीराम सिद्धी आणील त्वरित । मग तें चित्तीं होतां निश्चित । खळ तो वेगें निघाला ॥ २७ ॥ तेधवां तयाचे आगमनीं । नूपुरशब्द येतांचि कानीं । सती ती भय पावूनि मनीं । अंग चोरूनि घेतसे ॥ २८ ॥ तत्काळ अश्रूंहीं दाटले नयन । चित्तीं उदेला रघुनंदन । ऐसिया सतीतें अवलोकून । लंकेश तीतें बोलला ॥ २९ ॥ ह्मणे हे सुंदरी, किमर्थ येथ । धरिसी धाक तूं मजनिमित्त । भ्रवे हा तुजला श्रीरघुनाथ । उपयुक्त कैंचा पहा कीं ॥ ३० ॥ आजि तो आपुल्या बंधूसहित । राहतों वनचरसंगतींत । केधवां कोणास दृष्टीस येत । आणि कोणाते न येचि ॥ ३१ ॥ तयातें यावया अवलोकून । मीं तों उदंड धाडिले जन । परी तो सर्वत्रही शोधून । भेटला नाहीं कोणेका ॥ ३२ ॥

तयाची प्रीति तुझियावरी । तिळहि नाहीं गे सुंदरी । मग किमर्थ तूं अंतरीं । चिंतसी त्यासी, कळेना ॥ ३३ ॥ असतां तो तुझिया संन्निधानीं । आणि त्वां धरितांहि आलिं-गुनी । प्रेम तें नाहींच उदेलें मनीं । आजपर्यंत जयाच्या ॥ ३४ ॥ सत्वादि तुझे जे रम्य गुण । आणि तूं भोगहि जे निर्माण । करिसी, त्यांतेंहि सेवूनि पूर्ण । पुरुष हा देख कोरडा ॥ ३५ ॥ उपकृतीची जाणीव तिळ । न होचि जयातें कोणे वेळ । ऐसा सर्व गुणांहीं केवळ । वाळिलासे जो सर्वदा ॥ ३६ ॥ पहा कीं म्यां तुज आणिली येथ । आणि तूं शोक करिसी नित । परी हा ऐसा प्रेमरहित । अद्यापि नाहीं पातला ॥ ३७ ॥ आपुलें परावें ऐसें जया । मूढास न येचि जाणावया । ऐसिया सत्वहीनास वायां । घेऊनि लाभ केउता ॥ ३८ ॥ तुजसि विमुख जो सदोदित । त्याचिया संगतीं कैचें हित । सेविजे तुवां हा लंकानाथ । तुज जो आसक्त तयातें ॥ ३९ ॥ अवो, तूं मजासि वरितां क्षणीं । होशील निश्चयें पट्टराणी । मग तुझिया सेवेकारणीं । धावती देवांगनाहि ॥ ४० ॥ यापरी बोलतां लंकानाथ । सती ती कोपूनि अतिशयित । मध्यें तृण एक करोनि स्थित । अधोदृष्टीनें बोलली ॥ ४१ ॥ अरे तूं भ्यालासि त्या रघुवीरा । आणि भिक्षूच्या रूपें त्वरा । करोनि हरिलीस त्याची दारा । जैसा श्वानें हवीतें ॥ ४२ ॥ परी त्या रघुवीराचे शर । भेदूनि आतांचि तव शरीर । तुज या दुष्कर्माचें घोर । फळ देतील पहारे ॥ ४३ ॥ मग या मानवी श्रीरामाचें । स्वरूप तुज कळेल साचें । जेधवां पाश या यमदूतांचे । पडती कंठीं

येउनी ॥४४॥ समुद्र शुष्क करोनि शरीं। अथवा बांधून दोहीं करीं। नाथ हे माझे तुज समरीं। आतांचि येती वधाया ॥४५॥ लक्ष्मणजींसवें येऊन त्वरें। तूतें समूळ निवटून शरें। मजसि पुरास साचोकारें। नेतील सत्य त्रिवाचा ॥ ४६ ॥ यापरी सीतेचे तीव्रतर। शब्द येतांच श्रवणावर। खळ संतप्त होवोनि थोर। खड्ग घेवोनि धांवला ॥ ४७ ॥ तेधवां साध्वी मंदोदरी। नित्य जी पतिहितचिंता करी। ती त्या पतिदेवास करीं। धरून वेगें निवारी ॥ ४८ ॥ मग ह्मणे देव-गंधर्व-यक्ष-। नागादिकांच्या कन्या लक्ष। मंदिरीं तिष्ठती, ज्यांचें लक्ष। वेधिलें आहे प्रभूनें ॥ ४९ ॥ ऐशा सकळ सौंदर्यराशी। उचित त्या होती प्रभुसेवेसीं। त्याज्य ही मानुषी अतिशयेंसी। दीन जी शोकें वाळली ॥ ५० ॥ तयीं त्या राक्षसनाथें मग। सांडुनी आपुला क्रोधावेग। ह्मणितलें मजविषयीं अनुराग। इजसी उत्पन्न करा हो ॥ ५१ ॥ दावून प्रेम अथवा भीति। वांच्छा उपजोन इच्या चित्तीं। वश ही सुंदरी मजप्रती। होईल ऐसें करावें ॥ ५२ ॥ येथून लोटती दोन मास। तोंवरी ही मज होईल वश। तरी मजसवें राज्यभोगास। लाहून सेवील सुखातें ॥ ५३ ॥ नातरी होतांहि मास दोन। माझिया शेजेस न धरी मन। तरि या मानुषीतें वधून। उपहार मातें करावा ॥ ५४ ॥ ऐसें बोलून, घेऊन स्त्रिया। अंतःपुरातें तो गेलिया। सीतेस भयभीत करावया। राक्षसी सिद्ध जाहल्या ॥ ५५ ॥ एक ते ह्मणे, गे तव यौवन। चाललें वायांची येणेंकरून। ह्मणोनि जोडूनि दशानन। साफल्य त्याचें करीं तू ॥ ५६ ॥ एक ते बोलली क्रोधावेगें।

विलंब कासया करिसी अगे। तरी मी आतांचि तुझीं अंगें। छेदून करितें वेगळीं ॥ ५७ ॥ तों एक घेऊनि खड्ग करीं। धांवली वेगेंचि सीतेवरी। एक ती पसरोनि वदनदरी। धांवली तीतें गिळाया ॥ ५८ ॥ ऐशा राक्षसी नानारिती। गांजितां देखूनि सीतेप्रती। त्रिजटा वृद्ध जी राक्षसी होती। ती त्या सर्वां बोलली ॥ ५९ ॥ शोकें गांजियली ही सीता। तीतें भय न दाविजे आतां। शब्द हे माझे श्रवणीं घेतां। हित पावाल सर्वथा ॥ ६० ॥ स्वप्न मीं आतांचि देखिलें एक। कीं हा श्रीमान रघुनायक। ऐरावतारूढ होऊनि देख। पातला इया पुरीतें ॥ ६१ ॥ संगतीं सुमित्रेचाहि सुत। येऊन पुर हें बाई समस्त। जाळून, समरांत लंकानाथ। तेणें भूमीस पाडिला ॥ ६२ ॥ मग मांडिये घेऊनि सती। पर्वतीं बैसला श्रीरघुपती। तो म्यां देखिला गे अवचितीं। स्वप्नामाजी एधवां ॥ ६३ ॥ आणि हा नग्नचि लंकेश्वर। तैलें माखूनि स्वशरीर। स्नान करीतसे सहपरिवार। गोमयगर्तेंभीतरीं ॥ ६४ ॥ बिभीषण तो रामापाशीं। चित्तीं तोषून आतिशयेंसीं। बैसून परम भक्तिभावेंसीं। सेवीत पादांबुजातें ॥ ६५ ॥ ह्मणून जाणिजे हें भाकित। कीं या बिभीषणातें त्वरित। राज्य हें अर्पून सीताकांत। स्वपुरीं नेणार सतीतें ॥ ६६ ॥ यापरी त्रिजटा बोलतां मात। राक्षसी दचकल्या अंतरांत। मग तैशाच होतां निवांत। निद्रावस्थेस पावल्या ॥ ६७ ॥ सीता तयांचा घेऊनि धाक। अखंड अंतरीं चालवी शोक। कीं मज येऊन कोणीएक। सोडवी ऐसें दिसेना ॥ ६८ ॥ दुःखें अत्यंत झाली चूर।

नयनीं चालला अश्रुपूर । अंतरीं चिंतीत वारंवार । मृत्यु येईल केउता ॥ ६९ ॥ प्रभातीं या दुष्ट निशाचरी । मनासि भक्षण करितील, परी । आतांचि जावया मृत्यूदरीं । उपाय कोण करावा ॥ ७० ॥ मग होतां निरुपाय-स्थिती । शोकास नाहीं उरली मिती । मग ती मुक्तकंठेंचि सती । आक्रोश करूं लागली ॥ ७१ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७२ ॥ श्रीराम ॥ ३९ ॥

## अध्याय ४० वा; सीता-कपिभेट.

श्रीराम ॥ मज अंतरला श्रीरघुनाथ । आतां कशास हें जीवित । वांचून या दुष्ट राक्षसीआंत । साफल्य कैचें तयाचें ॥ १ ॥ म्हणून फांसीं गोवून गळा । प्राण हा करितें तनूवेगळा । मजसी येईल आतां फळा । दीर्घ वेणी ही निश्चयें ॥ २ ॥ यापरी मरणार्थ कृतनिश्चया । देखून रघुपतीची जाया । वृत्तांत तीतें ऐकवावया । कपि उद्युक्त जाहला ॥ ३ ॥ अंगें अदृश्याचि राहून । पावला सतीचें संनिधान । मग संक्षेपें रघुनंदन- । चारित्र सांगूं लागला ॥ ४ ॥ अयोध्यावासी नृप दशरथ । तयाचे कुमार गुणमंडित । राम लक्ष्मण आणि भरत । चौथा शत्रुघ्न जाणिजे ॥ ५ ॥ तेथें ज्येष्ठ जो श्रीरघुनाथ । तेणें वन केलें स्वीकृत । भ्रातया-भार्येशीं समवेत । पितृआज्ञेच्या कारणें ॥ ६ ॥ तेथें गौतमी नदीचे

तिरीं। तयाची सुंदर सीता नारी। रावणें संधि पाहोनि बरी। हरून नेली पापियें॥ ७॥ तेधवां दुःख पावून थोर। निघाला शोधार्थ श्रीरघुवीर। तैं मग जटायु पक्षिवर। मार्गीं तेणें देखिला॥ ८॥ तयातें देऊनि स्वर्गलोक। पुढती गिरि जो ऋष्यमूक। त्यावरी मार्गक्रमीत देख। श्रीरामराणा पातला॥ ९॥ मग मित्रता करुनी सत्वर। जोडिला सुग्रीव वीरवर। आणि जो तयाचा भार्यापहर। वाली भूमीतें पाडिला॥ १०॥ मग राज्यपदाभिषेक। सुग्रीवातें केलिया देख। तेणेंहि आपुले कपि अनेक। सीताशोधार्थ धाडिले॥ ११॥ त्यांतून एक मी पातलों एथ। लंघून सागर सुविस्तृत। आणि लंकापुर समस्त। शोधिलें देवीकारणें॥ १२॥ अंतीं अशोक-वानिके येतां। देखिली म्यां ही देवी सीता। राघवासाठीं अति दुःखिता। शिंशपा वृक्षातळीं हो॥ १३॥ राजा रघुवीराची कांता। देखिली, जाहली सार्थकता। यापरी वचनें बोलून स्वतां। कपि निवांत बैसला॥ १४॥ तयीं तें श्रवण करितां सती। चित्तीं आश्चर्य मानी अती। ह्मणे हें काय कीं म्यां अवचितीं। गगनांआंतूनि ऐकिलें॥ १५॥ मी काय स्वप्न हें अवलोकित। अथवा चित्ताचि भ्रम पावत। किंवा साचीच आहे मात। जैशी श्रवणीं पावली॥ १६॥ दुःखें निद्रेस केलें हरण। ह्मणोनि स्वप्नाचें कारण। अथवा भ्रमाचाही गुण। मानितां येऊं शकेना॥ १७॥ ह्मणोनि हें गोड वचनामृत। जेणें मजसि केलें श्रुत। तो थोर सुकृती आतां त्वरित। प्रकटो येथें समक्ष॥ १८॥ यापरी सतीचें वचन श्रुत। होतां वृक्षाहूनि त्वरित। उतरून तो

श्रीसमीरसुत । ठाकला पुढती सतीच्या ॥ १९ ॥ शरीरें चिमणीऐसा सान । वर्णें पीत आणि रक्त वदन । कपि तो सीतेस नमस्कारून । हात जोडोनी राहिला ॥ २० ॥ तयीं तें स्वरूप अवलोकुनी । सीता भयभीत होय मनीं । कीं हा कपटरूपें करोनी । लंकेश आला छळाया ॥ २१ ॥ मग तैशाच भावेंकरून । सती ती राहतां अधोवदन । कपि ह्मणे अंबिके, शंकास्थान । तिळहि नाहीं ये स्थळीं ॥ २२ ॥ मी नव्हे खळ तो लंकेश्वर । रघुनाथाचाचि आज्ञाधर । आणि जो सुग्रीव कपीश्वर । सचिव मी त्याचा जाणिजे ॥ २३ ॥ वायु जो अखिल-प्राणभूत । माये, तयाचा हा मी सुत । ह्मणोनि देवी ही मद्गत । शंका सारी त्यजीं वो ॥ २४ ॥ तयीं तें ऐकून सीतासती । ह्मणे ही वानर-नर-संगती । घडावी कैची, जो संप्रती । दास तूं ह्मणसी प्रभूचा ॥ २५ ॥ तेधवां आणीक संतोषून । कपि तो बोलता झाला वचन । ऐक-जें हा श्रीरघुनंदन । ऋष्य-मूकातें पातला ॥ २६ ॥ तयीं तें दृष्टीस येतां त्वरित । अंतरीं दचकला वानरनाथ । ह्मणे हे वीरेश पातले येथ । कोण हेतूनें कळेना ॥ २७ ॥ मग तयांचें हृद्गत खरें । शोधून घ्यावयालागीं त्वरें । मजासि तेणें वानरवीरें । धाडिलें संनिध तयांच्या ॥ २८ ॥ तयीं म्यां बटूचें रूप धरून । त्यांचें जाणिलें शुद्ध मन । मग सख्यता दिधली करून । श्रीरामाची कपीची ॥ २९ ॥ मग जो सुग्रीवसहोदर । वाली, सुग्रीवभार्याहर । त्यातें राघवें करुनि ठार । सुग्रीव केला भूपती ॥ ३० ॥ तेधवां सुग्रीवानें झणीं । दूत ते आ-

पुढे नाना ठिकाणीं । धाडिले देवी, तुजलागूनीं । शोधोनी आणावयातें ॥ ३१ ॥ तेधवां शोधार्थ जातां मज । प्रेमें बोलला श्रीरघुराज । कपे हें सारेंचि माझें काज । तुजवरी आहे पातलें ॥ ३२ ॥ म्हणोनि प्रिया तीं भेटतां तुज । स्वयें मी आणिक सुमित्रात्मज । संपूर्ण कुशली आहोंत आज । ऐसें कळवीं आदरें ॥ ३३ ॥ मग ही नामांकित मुद्रिका । तीतें देऊन कपिनायका । अंतरा विश्वास येई निका । ऐसें बापा करीं तूं ॥ ३४ ॥ मग ती काढून हस्तांतून । मजला देतसे रघुनंदन । माते, म्यां ती बहु जपून । त्वदर्थ आहे आणिली ॥ ३५ ॥ मग मुद्रिका ठेवून पुढती । आणि वंदून पायांप्रती । दूर होऊनि तो मारुती । कर जोडूनि ठाकला ॥ ३६ ॥ तयीं ती श्रीरामनामांकित । मुद्रिका दृष्टीस येतां त्वरित । होऊनि अत्यंत आनंदित । सती तीं वंदी तियेतें ॥ ३७ ॥ सर्वांचि आनंदाश्रुभरित । आणि कंठहि रुद्धदित । होऊन सती ती बोले मात । येणें रीतीं तयातें ॥ ३८ ॥ अगा तूं अत्यंत शुद्धमती । राघवीं उदंड तुझी प्रीती । त्वां मज भेटून ही संपती । जोड प्राणांची दीधली ॥ ३९ ॥ तुजवरी प्रभूचा भाव थोर । तेणेंचि तुजासि मज-समोर । धाडिलें, नातरी आणीक नर । ऐसिया काजी न येता ॥ ४० ॥ मारुते, केउते माझें कष्ट । हें तूं आतांचि देखिलें स्पष्ट । तरी ती तैशीच सारी गोष्ट । श्रवणीं घाली प्रभूच्या ॥ ४१ ॥ आणि माझिया विषयीं दया । उपजेल माझ्या रघुराजया । ऐसें करीं तूं बापा सया । मारुतिराया कपींद्रा ॥ ४२ ॥ दोनाचि मासपर्यंत जाण । सखया, वांचती माझे

प्राण । तंवचि धांवुनि संरक्षण । राघवें माझें करावें ॥ ४३ ॥ नातरी लोटतां एतुला काळ । मग हे मारुते, सारे खळ । चिरून खावयालागीं पळ । जाऊं न देती निश्चयें ॥ ४४ ॥ म्हणूनि तांतडी करून थोर । सुग्रीवसेनेशीं रघुवीर । येऊन, वधून लंकेश्वर । मातें वेगें सोडवो ॥ ४५ ॥ मारुते, अवो तूं प्राणसखया । विनविते दीन मी या समया । तुज ही येवोनि माझी दया । कार्य हें माझें करावें ॥ ४६ ॥ निरोप हा माझा श्रीरघुराया । ऐकवी ऐशिया रीती सया । कीं तो श्रवणीं येतांच तया । तांतडी व्हावी दयेनें ॥ ४७ ॥ वृत्त हें श्रवणीं येतां क्षणीं । तेणें युद्धार्थ यावें झणीं । आणि रावण वधूनि रणीं । उद्धार माझा करावा ॥ ४८ ॥ मारुते, एतुलें माझें काज । करीं वो, क्षीण हा न समज । दयाळा ! तुजवीण कोण आज । आधार सांग मला बा ॥ ४९ ॥ माझिया कारणें शब्द दोन । खर्चून, अगा हें पुण्यधन । ठेव बा इतुकें संपादून । प्रार्थना हेचि तुजला ॥ ५० ॥ यापरी बोलोनि राहे स्थिर । तंवचि नयनीं अश्रुभर । येऊनि पावतां भूमीवर । देखला तेथें कपीनें ॥ ५१ ॥ तयीं तो प्राणाचा नंदन । आनंदवी जो सर्व जन । तो त्या सतीचें आश्वासन । करून ऐसें बोलिला ॥ ५२ ॥ देवी, सांडून देई शोक । आतांचि येऊन रघुनायक । वधून खल हे रावणादिक । तूतें नेईल पुरीतें ॥ ५३ ॥ मजसि अवलोकितांच त्वरित । सुग्रीव-सैन्याशीं समवेत । श्रीराम आणिक सुमित्रासुत । येतील येथें निश्चयें ॥ ५४ ॥ तंव सीता बोलली, थोर । पसरूनि राहिला जो सागर । त्यातें लंघून यावया

पार । कैचें साधेल तयांतें ॥ ५५ ॥ तयीं म्हणितलें श्रीहनुमंतें । स्कंधीं घेऊन मी उभयांतें । एके क्षणींच आणीन येथें । सौमित्र आणि श्रीरामा ॥ ५६ ॥ मग एर ते सारे वीर । सर्वेचि उड्डान घेऊन थोर । लंघून सर्वहि समुद्रनीर । येतील निज प्रतापें ॥ ५७ ॥ आणि या राक्षसांची होळी । करितील सर्व हे वीर बळी । संशय तिळहि ऐशा स्थळीं तुवां न माते, धरावा ॥ ५८ ॥ आतां निरोप देईं मजसी । वेगेंचि जाऊन अतिशयेंसी । आणितों श्रीरामचंद्रजीसी । विमुक्त तूतें कराया ॥ ५९ ॥ आतां ओळखीसाठीं आज । खूण ती कांहीं देइजे मज । जेणें मजवरी श्रीरघुराज । विश्वास ठेवील सर्वथा ॥ ६० ॥ तेधवां विचारून अंतःकरणीं । सतीनें सोडिली आपुली वेणी । आणि तींतील चिंतामणी । काढून देत कपीतें ॥ ६१ ॥ मग म्हणे मणि हा अवलोकितां । विश्वास येईल श्रीरघुनाथा । आणीकहि या ओळखीकारितां । वृत्तांत एक सांगतें ॥ ६२ ॥ राहतां चित्रकूटाद्रीवर । माझिया अंकीं ठेवूनि शिर । मारुते, एकदां श्रीरघुवीर । निद्रिस्त होते जाहले ॥ ६३ ॥ तेधवां इंद्राचा दुष्ट सुत । काकरूपें पातला तेथ । आणि मत्पाद अतिशायित । आरक्त देखोनी लोभला ॥ ६४ ॥ मग आमिषीं ठेवूनि मन । आपल्या चंचुघायें करून । तेणें मत्पाद-अंगुष्ठ फोडून । बहुत शोणित काढिलें ॥ ६५ ॥ तेधवां जागृत होवूनि नाथ । वाहतां पाहती तें शोणित । मग मजासि पुसती त्वरित । कोण हा नीच दुरात्मा ॥ ६६ ॥ तंवाचि वायस दृष्टीस येतां । वेगें तृण एक घेऊनि हातां । दिव्यास्त्राशीं बा हनुमंता ।

योजून देवें सोडिलें ॥ ६७ ॥ मग तें वायसापाठीं जंव । लागलें दाह करायास्तव । खळ तो इंद्रादिकांचा ठाव । शोधीत गेला भयानें ॥ ६८ ॥ मग त्रिलोकीं हिंडून, प्राण। रक्षील ऐसा न देखे कोण । ह्मणोनि परतून आला शरण । श्रीनाथपादांबुजातें ॥ ६९ ॥ अंतरीं व्याकुळ होऊनि फार । घालितां साष्टांग नमस्कार । भक्तवत्सल श्रीरघुवीर । दयार्द्र झाला तयातें ॥ ७० ॥ मग ह्मणे अस्त्र हें माझें देख । सफळ होणार निश्चयात्मक । ह्मणोनि त्यास तूं नेत्र एक । देवोनि जाईं आपुला ॥ ७१ ॥ तयीं तो देवोनि नेत्र एक । सवेंचि निघून गेला काक । मारुते, असा हा रघुनायक । वर्णनातीत प्रतापें ॥ ७२ ॥ मग आतांच किमर्थ मज । उबगला सखा श्रीरघुराज । यापरी बोल ते वातात्मज । परिसता झाला सतीचे ॥ ७३ ॥ मग ह्मणे देवी, तूं ही येथ । राघवाला हे न ठावी मात । नातरी असुरपुर हें क्षणांत । येऊन कीं तो जाळिता ॥ ७४ ॥ तंव जानकी बोले तया । युद्ध तूं करिशील कैचें सया । तनु तों पाहतां एतुलिया । सर्वांहि तुह्मां कपींच्या ॥ ७५ ॥ तंव तें ऐकतां श्रीहनुमंत । तियेचा संशय कराया हत । वाढला जैसा प्रचंड पर्वत । मेरु-मंदार ठाकला ॥ ७६ ॥ मग तें देखूनि बळ अद्भुत । सती ती होऊनि हर्षयुत । ह्मणे, रे आतां तुजसी येथ । विघ्न कारितील राक्षसी ॥ ७७ ॥ ह्मणोनि श्रीरामचंद्रापाशीं । जाय तूं आतांच बहु जवेशीं । तयीं तो कपींद्र बोले तिशीं । क्षुधित मी फार असें कीं ॥ ७८ ॥ तुझिया दृष्टीपुढें जीं फळें । असतीं, सेवोनिया तीं सकळें । मी

हें पारणें येणेंचि वेळे। फेडितों त्वद्दर्शनाचें ॥ ७९ ॥ मग तियेचें घेऊनि मत। वीर तो फळें तीं सेवी बहुत। मग वंदूनि अष्टांगयुत। चालला मार्गीं जवानें ॥ ८० ॥ मग गेलिया अल्पांतरीं। ह्मणे—तो अधमाचि दूत तरी। जो स्वामिकार्याच्या उपरी। आणिक कांहीं न जोडी ॥ ८१ ॥ ह्मणोनि राघवातें जी हित। ऐसी आणीक साधून मात। नयनीं देखूनि लंकानाथ। बोल बोलावे तयासी ॥ ८२ ॥ मग त्याच विचारें त्वरित। वृक्ष जे अशोक-वनिके आंत। ते उपडोनि तेणें समस्त। निर्वृक्ष केलें वनातें ॥ ८३ ॥ सतीच्या आश्रय-तरूवांचून। सर्वहि शून्य करितां वन। राक्षसी घोर त्या सीतेलागून। पुसती—कोण गे मूर्ख हा ॥ ८४ ॥ तंव ती त्यांसि बोले सती। अहो या ऐशा राक्षसकृति। कोठून कळाव्या मजप्रती। दुःखीं भाजून गेलिया ॥ ८५ ॥ मग त्या धावूनि साऱ्या जणी। वृत्तांत राक्षसेंद्राचे श्रवणीं। घालिती कीं दुष्ट पातला कोणी। नाशीत आहे वनातें ॥ ८६ ॥ वानर-रूपें सीतेजवळी। येऊन, गुज तो करूनि बळी। मागुती अशोक-वनस्थळी। नाशीत आहे राहिला ॥ ८७ ॥ प्रासाद, वृक्षहि मोडोनि थोर। रक्षकांलागीं करूनि ठार। देव, तो तैसाचि दुष्टवर। निर्धास्त बैसे ते स्थळीं ॥ ८८ ॥ तयीं तें परम प्रियहि वन। नाशिलें म्हणून होतां श्रवण। रावणें क्षोभून न लगतां क्षण। वेगें दूतांस धाडिलें ॥ ८९ ॥ इकडे मारुती पर्वताकार। बहु भयंकर आणि घोर। ऐसें हातीं लोह थोर। घेऊन होता बैसला ॥ ९० ॥ तेणें ते सर्व राक्षसवीर। येतां नयनीं देखिल्यावर। आवेशें हाक ठोकू-

नि थोर । गर्जना केली हरीची ॥ ९१ ॥ तयीं ते दचकले मूढमती । पुढती कपीस अव-
लोकिती । मग धीर धरोनि चित्तीं । ताडिती घायें कपीतें ॥ ९२ ॥ तेधवां हनुमंतानें करीं ।
घेतल्या लोहदंडेंचि सारीं । चिरडून टाकिलीं मशकापरी । एकेंचि घायें जवानें ॥ ९३ ॥
मग तो वृत्तांत रायाप्रती । पावतां, कोपोनि तेणें अती । आपुले पांच जे सेनापती ।
त्यांतें त्यावरी धाडिलें ॥ ९४ ॥ परी त्यांतेंहि श्रीहनुमंतें । रणीं निवटलिया लोहाघातें ।
रावणें आपुल्या मंत्रिसुतातें । परम क्रोधें धाडिलें ॥ ९५ ॥ परी त्या वीरासही मारुती ।
लोहाघातेंचि देऊनि गती । बैसला लक्षीत कीं मागुती । कोण येतात तयाच्या ॥ ९६ ॥
तेधवां अक्ष नामें त्वरित । राक्षसेंद्राचा प्रतापी सुत । पातला तेथ त्या युद्धानिमित्त ।
सैन्य घेवोनि जवानें ॥ ९७ ॥ तैं तो दृष्टीस येतां वीर । कपींद्रें उड्डाण करूनि थोर ।
लोह फेकून केलें चूर । सैन्यासमवेत कुमारा ॥ ९८ ॥ मग तो कुमार झाला ठार । ऐसें
ऐकोनि राक्षसेश्वर । पावोनि परम क्रोधभर । इंद्राजिताशीं बोलला ॥ ९९ ॥ पुत्रा, अरे
हा पातला कोण । तेणें घेतला अक्षप्राण । तरी मी जाऊन वधून जाण । कीं तो बांधून
आणितों ॥ १०० ॥ तयीं म्हणितलें त्या इंद्रजितें । तात, त्यजा जी या चिंतेतें । मी
येथ असतांहि अपाणांतें । कष्ट कां ऐसे शिवावे ? ॥ १०१ ॥ मीचि जाऊनि आतां
त्वरित । ब्रह्मास्त्रें त्यास बांधोनि येथ । आणितों, यापरी बोलोनि मात । रथ जोडोनि
निघाला ॥ १०२ ॥ संगतीं सेनाहि घेऊनि बहुत । पातला कपि तो वर्ते जेथ । तंव तो

प्रतापी श्रीहनुमंत । शब्द ऐकोनि ऊठला ॥ १०३ ॥ आणि त्या लोहस्तंभासहित । अंबरीं प्रचंड उड्डान घेत । ह्मणे हें घालूनि मस्तकांत । चुरितों आतां समस्तां ॥ १०४ ॥ तंवचि येरें फेकूनि बाण । विंधिलें तयाचें शीर्षस्थान । सर्वांचि हृदयीं विंधून पूर्ण । गंभीर हाक फोडिली ॥ १०५ ॥ तेधवां हनुमंतेंहि त्वरें । लोहस्तंभ तो घेऊनि करें । रथ अश्व सारथी ऐसे सारें । घायेंकरूनि चुरिले ॥ १०६ ॥ मग आणीक जोडूनि रथ । ब्रह्मास्त्र सोडीत इंद्रजित । आणि तो श्रीरामाचा दूत । तेणें बांधून घेतसे ॥ १०७ ॥ अहो, ही रघुवीराची लीला । भक्तजनांच्या संतोषाला । नातरी हनुमंत बद्ध झाला । साच हें कोणें म्हणावें ॥ १०८ ॥ जन जे श्रीराघवाचें नाम । जपती अंतरीं धरूनि प्रेम । ते हा समस्त अज्ञान-भ्रम । निरासिती कष्टावांचुनी ॥ १०९ ॥ आणि नामेंचि भवबंधन । तोडून पावती सुखाचें सदन । त्याचिया दूतास जें बंधन । तें तों मायिक निश्चयें ॥ ११० ॥ अखंड रघुवीराचें ध्यान । करितां मुक्त जो श्रीहनुमान । त्यास करितील काय हो आन । दृश्य हीं बंधें वाउगीं ॥ १११ ॥ ह्मणोनि हनुमंताचा धनी । हाचि चिंतिजे रात्रंदिनीं । भवाच्या समस्त बंधांतूनी । विमुक्त व्हावयाकारणें ॥ ११२ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ११३ ॥ श्रीराम ॥ ४० ॥

## अध्याय ४१ वा; लंकादहन.

श्रीराम ॥ कपीस ब्रह्मास्त्रीं गोवून । नेतां देखून नगरांतून । पुरीचे सारेही असुर-जन । भय आश्चर्य पावले ॥ १ ॥ नवल देखावयास पुढती । जाती, दचकून मागें येती। परस्परांतें मुष्टि हाणिती । कोपूनि दाटीनिमित्तें ॥ २ ॥ असो, अस्त्र तें हनुमंतातें । स्पर्शूनि तत्काळ झालें परतें । बांधूं न शकलें त्या वीरातें । विधीच्या वरप्रभावें ॥ ३ ॥ परी कायार्थीं ठेवूनि मन । त्या क्षुद्र रज्जूंसवें गोवून । पातला राक्षसेंद्राचें भुवन । कपि तो कुशल मतीचा ॥ ४ ॥ मग जो सभामंदिरीं स्थित । रावण, त्यापुढें सारी मात । सांगून बोलला इंद्रजित । पुढती नेऊन कपीतें ॥ ५ ॥ ह्मणे हा बांधून मीं वानर । आणिला ब्रह्मास्त्रें येथवर । येणें आमुचे बहुत असुर । ठार केलेत एधवां ॥ ६ ॥ यासी उचित ऐसें कांहीं । शासन अवश्य कीजे पाहीं । हरि हा सामान्य ऐसा नाहीं । हेंचि येविषयीं जाणिजे ॥ ७ ॥ तेधवां कपीस अवलोकून । लंकेश बोलता झाला वचन । प्रहस्ता, रे तूं मुख्य प्रधान । विचारी यासी, कोण हा? ॥ ८ ॥ कपि हा कोठून किंनिमित्तें । पातला आजी मन्नगरीतें । किमर्थ भंगून उपवनातें । मारिलें माझ्या जनातें ॥ ९ ॥ तयीं ती प्रहस्तें आज्ञा होतां । पुसिलें तैसेंच श्रीहनुमंता । आदरें, ह्मणे तूं अंतरीं चिंता । कांहींच वाहूं नको रे ॥ १० ॥ या राजराजेश्वराच्या चरणीं । सत्य तें सारेंचि

सांगे झणीं । मी तुज आतांचि येचि क्षणीं । सोडूनि देतों पहा कीं ॥ ११ ॥ यापरी प्रधानें बोलिल्यावर । अंतरीं तोषला हा कपिवीर । कीं हा सुयोग आतां सत्वर । पातला बोलावयासी ॥ १२ ॥ मग सन्मुख होऊनि तया । हृदयीं चिंतून श्रीरघुराया । श्रीरामगुणगान करावया । कपि तो सिद्ध जाहला ॥ १३ ॥ म्हणे हे देवजनांच्या अरे । ऐक मी सांगतों आतां सारें । सीतापती श्रीरघुनाथ जो रे । दूत मी त्याचा मारुती ॥ १४ ॥ सकळ त्रैलोक्याचा स्वामी । वसे जो सदा सर्वांतर्यामीं । त्याचिया सेवेकारणें हा मी । पातलों येथें एधवां ॥ १५ ॥ यज्ञाआंतून जैसें श्वान । हविर्भागातें नेई हरून । तेविं तूं स्वात्मनाशालागुन । भार्येस त्याच्या आणिली ॥ १६ ॥ राघवें मग त्या सुग्रीववीर । आपला करूनि मित्रवर । वालीस वधून, राज्यभार । दीधला त्याचा तयातें ॥ १७ ॥ आजि तो सुग्रीव वानरनाथ । आपुल्या प्रचंड सेनेसहित । प्रवर्षणासी वास करीत । क्रुद्ध होऊनि अंतरीं ॥ १८ ॥ लक्ष्मण आणि श्रीरघुराज । तेथेंचि निवास करिती आज । कपींद्रें वरियलें मित्रकाज । सीतेस शोधावयाचें ॥ १९ ॥ मग आपुले हजारों दूत । कपींद्रें दहाही दिशांस त्वरित । धाडिले, त्यांत मी समीरसुत । शोधितों एक सतीतें ॥ २० ॥ येथ येऊनि म्यां ती माउली । वृक्षच्छायेस अवलोकिली । सर्वोचि वनिका विध्वंसिली । कपिस्वभावें करूनि ॥ २१ ॥ तेथ मजसि कराया ठार । हातीं घेऊनि धनुष्य-शर । जयीं हे पातले राक्षसवीर । मारिलें त्यांतें रणीं म्यां ॥ २२ ॥

सांभाळावें निजजीवित । हे तों सर्वत्रांची रीत । शरीरीं प्रेमा अतिशयित । सर्व जीवांचा स्वभावें ॥ २३ ॥ त्यावरी मजसि इंद्रजितें । ब्रह्मपाशीं बांधूनि येथें । आणिलें, परी तें पूर्वीच मातें । अस्त्र सोडून पळालें ॥ २४ ॥ विधीच्या वरप्रभावें जाण । मजसि बांधूंच न शके कोण । परी मी करुणार्द्र अंतःकरण । होऊनि येथें पातलों ॥ २५ ॥ तुजसि तुझिया हिताची कथा । कांहीं घालावी श्रवणपथा । अगा या योजूनि मनोरथा । येथ मी आलों नृपेंद्रा ॥ २६ ॥ अंतरीं विवेक कांहीं करीं । देख या जगाची कैशी परी । राक्षसांच्याच बुद्धीवरी । जाऊन वर्तूं नको रे ॥ २७ ॥ दैवी भाव तो जोडीं मनीं । पावशी तेणेंच स्वसुखस्थानीं । सुटाया संसार-बंधांतूनि । उपाय हाचि जाण रे ॥ २८ ॥ पाहतां तूं तों ब्राम्हणजन । पौलस्त्य मुनीचा नंदन । कुबेर भ्राता तुजलागून । निर्मल वंश तुझा हा ॥ २९ ॥ म्हणोनि देहात्मबुद्धीनेंही । तुजला राक्षस-पदवी नाहीं । मग आत्मदृष्टया कांहीं । तूं न राक्षस निश्चयें ॥ ३० ॥ रे तूं चैतन्य निर्विकार । तुजसि दुःखादि कैचे विकार । सर्व हा देहादिकांचा भार । तूतें आकळूं शकेना ॥ ३१ ॥ आणि हे सुखदुःखांचे भाव । अज्ञानयोगेंचि धरिती ठाव । पाहतां विवेकें होती वाव । निद्रिता जग हें ज्यापरी ॥ ३२ ॥ अगा हा सिद्धांत साचा देख । कीं तूं अद्वय एकीएक । येथ नाहींच कीं आणीक । विकार तूतें कराया ॥ ३३ ॥ आणि सर्वांहि ठायीं गगन । असोनि सर्व-संगविहीन । तेवि तूं सूक्ष्म, या देहीं असून । सर्व संबंधावेगळा ॥ ३४ ॥

शरीर-प्राण-बुद्धि-आदिकीं । मी हा संगति पावलों निकी । ऐसें मानिल्यायोगेंचि लोकीं । बंध हे होती आत्मया ॥ ३५ ॥ परी मी केवल ज्ञानात्मक । मजला केउतें जन्मादिक । मी या सर्वहि विकारक- । भावांपासून वेगळा ॥ ३६ ॥ केवल आनंदाचें स्थान । तेंचि स्वरूप मजलागून । सुटिजे सर्वहि बंधांतून । ऐशाच एकें निश्चयें ॥ ३७ ॥ पृथ्वीपासून जो निर्माण । जाहला देह तो मी न जाण । आणि जो वायुरूप प्राण । तोहि मी आत्मा नव्हे कीं ॥ ३८ ॥ त्यापरी अहं या भावाआंत । मन बुद्धि ही उद्भवत । ह्मणोनि तें सर्व प्रकृतिगत । तें मी न आत्मा निश्चयें ॥ ३९ ॥ आत्मा केवल ज्ञानघन । अक्षय आनंदाचें स्थान । तयास मृत्यु-क्षयवर्धन । विकार होऊं शकेना ॥ ४० ॥ इया देहादि संघाताशीं । तो एक वेगळा अतिशयेंसी । तयास मळ हा कोणेहि विषीं । सर्वथा लागूं शकेना ॥ ४१ ॥ आणि सर्वहि उपाधी-आंत । आत्मा मुक्तचि मी निश्चित । भाव हा अंतरीं होतां स्थित । मोक्ष झालाचि जाणिजे ॥ ४२ ॥ ऐसें मोक्षाचें लक्षण । तुज म्यां केलें निरूपण । आतां तयाची साधनखूण । तीही गा तूतें सांगतों ॥ ४३ ॥ अंतरीं होऊनि सावधान । ऐक हें हिताचें मद्वचन । पाववी एतुलें उच्चस्थान । भक्तिच एक हरीची ॥ ४४ ॥ केलिया हरीचें आराधन । निर्मळ होऊन हृदयस्थान । मग तें आत्मरूपाचें ज्ञान । त्याचिया आंत ठसावे ॥ ४५ ॥ मग तें चैतन्य निरंजन । साक्षात् अंतरीं अनुभवून । पाविजे परम पदाचें स्थान । क्रम हा ऐसा तयाचा ॥ ४६ ॥ ह्मणोनि

प्रकृतीच्या जो पर। पुराणपुरुष श्रीरघुवीर। त्यासि हें अर्पूनि निजांतर। साधिजे स्वात्महितातें ॥ ४७ ॥ तयासी शत्रुत्व संपादणें। हें तों अत्यंत मूर्खपण। अगा हें सांडून जाईं शरण। भक्तवत्सल श्रीरामा ॥ ४८ ॥ साष्टांग नमन करूनि पायां। सीतेस नेऊन देईं तया। तरी तूं निर्भय होसी राया। पुत्रकलत्रासमेतें ॥ ४९ ॥ परात्मरूप जो आत्माराम। एकाचि अद्वय स्वानंदधाम। सकळिकांचें जें अंतर्याम। तयास केवि त्यजावें ॥ ॥ ५० ॥ तरंग दुःखाचे ज्याआंत। ऐसा भवाब्धि जो विस्तृत। तो मग तराया जींवांप्रत। उपाय कैचा त्रिलोकीं ॥ ५१ ॥ म्हणोनी भक्तीची कास धरीं। नातरी तुझा तूं होशी वैरी। आणि या अज्ञान दहनांतरीं। भाजून घेसी स्वतांतें ॥ ५२ ॥ मग स्वकीय दुष्कृत्यांहीं। आणीक खालतीं जाशी पाहीं। मग शंकाच नलगे कांहीं। मोक्ष नाहीं म्हणावा ॥ ५३ ॥ यापरी बोध तो सुधेसमान। त्यासि दे जेधवां श्रीहनुमान। तयीं तो सांडून असुरजन। परम संतप्त जाहला ॥ ५४ ॥ मग लोचनें करूनि लाल। बोलता झाला राक्षसपाळ। अरे तूं मर्कटा! कैसे बोल। बोलसी माझ्यापुढें हे ॥ ५५ ॥ नीच तूं सांडूनि लज्जा भीति। बोलसी तुच्छ ही मानवकीर्ति। कोण रे राम हा, क्षुद्रचि अति। वधीन तो मी एधवां ॥ ५६ ॥ प्रथम तूंतेंचि वधितों येथ। मग सीता नि सीतानाथ। वधून शेवटीं सुमित्रासुत। आणि सुग्रीव मारितों ॥ ५७ ॥ तेधवां ऐकूनि ती गर्वोक्ती। हनुमंत क्रोधेंचि असुराप्रती। बोलला, जाळील जाणों संप्रती। कोपाग्नीमाजी

तयातें ॥ ५८ ॥ अरे, मी श्रीरामाचा दास । नेणसी माझिया पराक्रमास । रावणें कोटि ही जुळतां खास । माझिया तुलने न येती ॥ ५९ ॥ तेधवां आणिक क्रोधभरें । दैत्य तो बोलता झाला त्वरें । दूत हो पाहतां काय अरे । तोडून काढा कपी हा ॥ ६० ॥ त्याचिया दुष्कर्माचें फळ । पाहोत आजि हे येथें सकळ । यापरी बोलून तो तत्काळ । स्वयेंचि वेगें उठिला ॥ ६१ ॥ तयीं त्या समस्त असुराआंत । एक तो बिभीषण नीतियुत । तेणें पुढती होवोनि त्वरित। निवृत्त केलें नृपाला ॥ ६२ ॥ ह्मणे हा परराजाचा दूत । वधास केव्हांहि बा अनुचित । भूप जे लोकीं सामर्थ्यवंत । दूषण त्यांतें यायोगें ॥६३॥ आणि ज्या रामास उद्देशून । तूं या दूताचें करिसी हनन । त्यास हा वृत्तांत निवेदन । करील कोण पहा कीं ॥ ६४ ॥ ह्मणोनि कांहीं वधसमान । तयास शासन कीजे आन । मग तो जाऊन वेगें करून । सांगील सर्व तयातें ॥ ६५ ॥ मग ते सुग्रीव-रघुनंदन । धांवून येतील वेगेंकरून । मग तूं त्यांसवें युद्ध करून । करणें जें तें करावें ॥ ६६ ॥ यापरी बिभीषणाचा विचार । केलिया श्रवण तो दैत्येश्वर । ह्मणे ही तुझीच खरोखर । गोष्ट उचित असे कीं ॥ ६७॥ तरी या मर्कटांचा अभिमान । लांगुलामाजीच आहे घन । ह्मणोनि वस्त्रांहीं तें वेष्टून । अग्नि लावा रे तयातें ॥ ६८ ॥ मग मिरवून नगरभरी। मागुती सोडून द्या हा हरी । एकदां विधि हा दृष्टीवरी। जावो सर्वही कपींच्या ॥६९॥ मग तो आदेश झालियावर। वेढिला सर्वांहीं तो कपिवीर । उदंड सतैल वस्त्रभार। लांगुलीं त्याचे वेष्टिला

॥ ७० ॥ मग तें अग्रासी पेटवून । कपीस रज्जूंहीं बांधून । समस्त लंका नगरांतून । मिरवीत त्यातें चालले ॥ ७१ ॥ जन हो पहा हा मोठा चोर । ह्मणोनि गर्जती वारंवार । सर्वेचि पाहूनि पृष्ठीवर । हाणिती लत्ता तयातें ॥ ७२ ॥ परी तें श्रीरामकार्यीं मन । ठेवून सोशीत श्रीहनुमान । मग ते पुढती असुरजन । पश्चिमद्वारीं पातले ॥ ७३ ॥ तेथें येतांचि तो हनुमान । निजांगीं सूक्ष्मत्व संपादून । निसटला सर्व त्या बंधांतून । आणि गोपुरीं उडाला ॥ ७४ ॥ मग पर्वताऐसा थोर । वाढूनि, स्तंभ घेवोनि थोर । समस्तही ते राक्षसवीर । चूर्ण करितां जाहला ॥ ७५ ॥ मग प्रासादांतून घरीं । आणि तेथून सदनावरी । यापरी उड्डानें नानापरी । घेऊन धावूं लागला ॥ ७६ ॥ तेणें समस्त लंकानगर । पेटून भडकून गेलें थोर । गच्च्या प्रासाद बहु सुंदर । नासून रक्षा जाहले ॥ ७७ ॥ हे तात, हे नाथ, हे नंदन । ह्मणोनि पुरींचे सारेचि जन । करिती अनिवार आक्रंदन । पोळतां अग्नीभीतरीं ॥ ७८ ॥ प्रासादाचिया गच्च्यांवरी । आरूढ होऊनि राक्षसनारी । रिघतां त्या घोर दाहांतरीं । देवीच ऐशा भासती ॥ ७९ ॥ यापरी समस्त लंकाभुवन । एकलें बिभीषण-गृह वर्जून । भस्म करून श्रीहनुमान । सागरामाजी उडाला ॥ ८० ॥ आणि लांगूल त्याचे आंत । विझवोनि मागुती स्वस्थ होत । जो कां कृपाळु, भक्तांस हात । देतसे दाहीं पोळतां ॥ ८१ ॥ अग्नि हा वायुदेवाचा स्नेही । सीता सतीनें प्रार्थितां पाही । अत्यंत शीतळ होऊनि राही । वातात्मजाच्या कारणें ॥ ८२ ॥ अहो !

ज्याचिया नामस्मरणें । समस्त पापांचें होय धुणें । आणि शीघ्राचि उद्धरणें । त्रिविधां तापां जनांहीं ॥ ८३ ॥ त्याचि श्रीमान रघुवीराचा । दूत जो अत्यंत विश्वासाचा । त्यासि सामान्य या अग्नीचा । केउता ताप घडावा ॥ ८४ ॥ म्हणोनि भजावें श्रीरघुराया । हेचि या लोकीं शीतळ छाया । आन ते उपाय सारे वायां । तापत्रयीं न रक्षिती ॥ ८५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८६ ॥ श्रीराम ॥ ४१ ॥ ७ ॥ ७ ॥

## अध्याय ४२ वा, सीतावृत्तनिवेदन.

श्रीराम ॥ यावरी सीता सतीच्यापाशीं । येऊन वंदून साष्टांगेंसी । कपि ह्मणे परतून जावयासी । माते, आज्ञा देइजे ॥ १ ॥ राघवासंनिध मी जाऊन । पावतां शीघ्रचि रघुनंदन । लक्ष्मणासमवेत तुजलागून । येईल भेटावयातें ॥ २ ॥ यापरी बोलून तिजलागून । प्रदक्षिणाही करून तीन । पुनरपि साष्टांगें वंदून । मार्गीं लागोनि बोलत ॥ ३ ॥ देवि ! चाललों; निर्भय राहीं । श्रीराम शीघ्राचि येईल पाहीं । लक्ष्मण सुग्रीव या दोघांही । घेऊन आतां त्वरेनें ॥ ४ ॥ तेधवां पुनरपि दुःखभर । येऊन सती ती बोले थोर । मारुते ! अगा तूं भेटल्यावर । दुःख जें होतें लोपलें ॥ ५ ॥ तें तूं येथून जातां सया । लागलें

मजसि गांजावया । यावरी काळ मी ऐसिया ठाया । कंठूं कैसी एकली ॥ ६ ॥ मजसि श्रीराघवाची मात । कोण सांगेल आतां येथ । तंव तें ऐकूनि श्रीहनुमंत । परतून तीतें बोलला ॥ ७ ॥ तरी तूं माझिया स्कंधावरी । बैसून चाल कीं तेथवरी । क्षणमात्रेंचि श्रीरावणारी । दावीन तूतें निश्चयें ॥ ८ ॥ तंव सती ती बोले, नाथ । समुद्र लंघून येऊन येथ । जेधवां करून स्वशराघात । वध करितील खळाचा ॥ ९ ॥ आणि घेऊन जातील मज । तैंच तें उचित होऊन काज । श्रीराघवाचें कीर्तितेज । फांकेल लोकीं निश्चयें ॥ १० ॥ ह्मणोन जाय तूं; मी कैसेही । प्राण हे धरून राहें पाहीं । तंव तें ऐकूनियां लवलाहीं । वंदिली देवी आणखी ॥ ११ ॥ मग लंघावया सागर । कपि तो पातला गिरीच्या वर । आणि उड्डान करून थोर । उतरोनि गेला तयातें ॥ १२ ॥ तयीं तयाचा पादाघात । लागून शिखर जें उंच बहुत । सर्व तें भूमीच्या उदरांत । जाऊन निःशेष जाहलें ॥ १३ ॥ मारुतिरायें गगना आंत । आवेशें करितां घनगर्जित । ऐकून कपि ते तीरस्थित । परमानंदित जाहले ॥ १४ ॥ मग तें हनुमंत-आगमन । जाणून गर्जती प्रेमें करून । ह्मणती, पहा रे कार्य साधून । वीर हा आला आपुला ॥ १५ ॥ यापरी बोलती जंव वानर । तंवाचि दूत तो कार्यकर । उतरूनि पर्वतशिखरावर । ठाकला सर्वांपुढारा ॥ १६ ॥ आणि म्हणे त्यां देखूनि सती । बोधिला मूढ तो असुरपती । सर्वांचि चातुर्यें लंकेप्रती । जाळिलें अभिप्रयोगें ॥ १७ ॥ आतां श्रीरामसुग्रीवांतें । चला रे सारेचि

सांगायातें । तंव तें ऐकतां हनुमंतातें । कपि ते आलिंगूं लागले ॥ १८ ॥ एक ते तयाचे पुच्छाग्रासी । चुंबिती प्रेमेंचि अतिशयेंसी । आणीक एक ते निःशंकेंसी । नाचूं उडूंचि लागले ॥ १९ ॥ मग ते हनुमंताच्या सहित । वीर तेथून निघून त्वरित । पातले सुग्रीव-मधुवनांत । प्रस्रवण गिरीवरींच्या ॥ २० ॥ तेधवां क्षुधार्त आम्ही जन । आणि फळेंही सुरस घन । तरी तीं सेवून, संतोषून । पुढती जाऊं वांछितों ॥ २१ ॥ ह्मणोनि समस्त ते कपिजन । विनविती सुग्रीवसुतालागून । तंव तो उदार, स्नेहेंकरून । अनुज्ञा देई तत्क्षणीं ॥ २२ ॥ ह्मणे हा यशस्वी झाला वीर । कृपा ही तयाची झाली थोर । वीर हो, आतां इच्छेनुसार । सेविजे इया फळांतें ॥ २३ ॥ यापरी लाहून अनुमोदन । कपि ते यथेच्छ मधूचें पान । करिती; तंव ते रक्षक जन । आडवे येती तयातें ॥ २४ ॥ परी ते विजयोन्मादें वीर । त्यांतें न गणिती तिळहि भर । सेविती यथेच्छ फलसंभार । हाणोनि लत्ता तयांतें ॥ २५ ॥ तयीं तेथ जो रक्षकाग्रणी । दधिमुख नामें होता कोणी । तेणें वृत्त तें घातलें श्रवणीं । सुग्रीवाच्या त्वरेनें ॥ २६ ॥ बोलला, देव ! जें बहुत दिन । पाळलें आवडी धरून वन । तें आज अंगद श्रीहनुमान । नाशिती कैसे पहा कीं ॥ २७ ॥ तंव तें ऐकून सुग्रीव ह्मणीं । कोपे न; तोषेचि अंतःकरणीं । निश्चयें देखून सीताराणी । वीर हे आलेत ह्मणोनी ॥ २८ नातरी दृष्टि फेकून वन । देखेल ऐसा कोण जन । निश्चयें आज हा श्रीहनुमान । कार्य साधूनि पातला ॥ २९ ॥ यापरी सुग्रीव जैं बोलत ।

तंव तें ऐकूनि सीताकांत । ह्मणे, गा सखया कायसी मात । बोलसी माझ्या प्रियेची ॥ ३० ॥ तंव सुग्रीव बोले, तात । जानकी दृष्टीस आली निश्चित । पहा कीं कपि हे मधुवनांत । सारेचि असती पातके ॥ ३१ ॥ आणि रक्षकां ताडून बळें । सेविती निःशंक मूळेंफळें । कार्य सफल केलियावेगळें । धैर्य हें कैचें तयांतें ॥ ३२ ॥ ह्मणोनि देखिली सीतासती । हाचि निश्चय श्रीरघुपती । रक्षका, अरे तूं न धरीं भीती । परतून जाईं बनातें ॥ ३३ ॥ आणि अंगद श्रीहनुमान । सर्वांस सांगून माझें वचन । तयांतें आतांचि वेगेंकरून । घेऊन येईं ये स्थळीं ॥ ३४ ॥ तंव तें ऐकून नृपवचन । दधिमुखादिक रक्षक जन । जाऊन तैसेंचि वर्तमान । सांगती सर्वां कपींतें ॥ ३५ ॥ कीं, हो सुग्रीव श्रीरघुनाथ । अंतरीं तोषूनि अतिशयित । तुम्हांस भेटूं वांछिती त्वरित । आतांचि वेगें चला हो ॥ ३६ ॥ तयीं तें वचन मानूनि श्रणीं । अंगद हनुमंत सेनाग्रणी । सर्वांसमवेत श्रीरामचरणीं । येऊनि नमिते जाहले ॥ ३७ ॥ मग हनुमंत सांगे कथा । देव, म्यां देखिली देवी सीता । अशोकवनांत शोकयुता । शिंशपा वृक्षातळाशीं ॥ ३८ ॥ राक्षसींहीं जी परिवेष्टित । आहाररहित, क्षीण बहुत । मलिन वस्त्रेंशीं शोक करीत । हा राम हा राम ह्मणोनि ॥ ३९ ॥ वेणी घातली जी कां पहिली । सती ती यापरी म्यां देखिली । देव, ती तुजलागीं बोलली । क्षेम सांगाया आपुलें ॥ ४० ॥ देव, म्यां सूक्ष्मरूपें करून । वृक्षशाखांतरीं बैसून । स्वकथा समग्र निवेदून । सांत्वन केलें सतीचें ॥ ४१ ॥ जन्मादि वृत्तांत

आरंभून । दंडकारण्यीं जें आगमन । आणि जें खळाचें सीताहरण । तोहि वृत्तांत बोलिलों ॥ ४२ ॥ पुढती सुग्रीववालीवृत्त । आणि कपि जे दशदिशांत । धाडिले सतीच्या शोधानिमित्त । तोहि वृत्तांत बोलिलों ॥ ४३ ॥ मग त्यांतील मी हा एक । श्रीरघुवीराचा सेवक । आणि सुग्रीवसाचिव देख । नाम हनुमंत जयाचें ॥ ४४ ॥ त्या मीं येवोनि इये वनीं । देखिली सती ही निजलोचनीं । भाग्य हें उदंड माझें जनीं । श्रमहि आले फळातें ॥ ४५ ॥ यापरी ऐकतां माझी वाणी । सती ती नयनें उघडूनि झणीं । म्हणे हें अमृत माझे श्रवणीं । कोणें घातिलें एधवां ॥ ४६ ॥ सर्व हें साच हो कां जरी । जन तो दृष्टीस येवो तरी । देव, तें ऐकूनि मी बाहेरीं । पातलों कपिस्वरूपें ॥ ४७ ॥ मग वंदन करून, दूर । ठाकलों जोडूनि दोन्ही कर । मग कोण तूं पुसतां सत्वर । कथिलें वृत्त तियेतें ॥ ४८ ॥ मग ती खुणेची आंगठी नाथ । काढूनि तियेतें देतां त्वरित । विश्वास पावूनि अतिशयित । तोषोनि देवी बोलली ॥ ४९ ॥ मारुते, तुवां ही माझी स्थिति । देखिली; येथ या नाना रीती । राक्षसी छळितात दिवसरातीं । सांग हें ऐसें प्रभूतें ॥५०॥ नलगोचि आणिक सांगावया । हेचि तूं सांगिजे एक सया । तंव तें ऐकोनि श्रीरघुराया । मीहि देवीतें बोललों ॥ ५१ ॥ देवी, रामहि तुजानिमित्त । अखंड आहे शोकग्रस्त । शोध लागेल कांहीं त्वरित । ऐशा चिंतेकारणें ॥ ५२ ॥ आतांचि जाऊनि मी हें वृत्त । श्रीराघवासी करितां श्रुत । प्रणतवत्सल श्रीरघुनाथ । धाव घेईल पहा कीं ॥ ५३ ॥ संगें घेऊनि-

या लक्ष्मण । आणि सुग्रीव वानरगण । देख आतांचि न लगतां क्षण । येईल नाथ आमुचा ॥ ५४ ॥ आणि खळ जो असुरेश्वर । परिवारेंसी करूनि ठार । देवि, तो आतांचि तुज सत्वर । नेईल निजपुरातें ॥ ५५ ॥ यावरी एक तूं कांहीं खूण । देवि, देइजे मजलागून । जियेनें श्रीमान रघुनंदन । विश्वास पावे मला वो ॥ ५६ ॥ यापरी बोलतां वेणींतील । रत्न हें काढूनि दे तात्काल । आणि काकाचें वृत्त सकळ । खुणेस सांगूं लागली ॥ ५७ ॥ तंव त्या साध्वीचे लोचन । दुःखाश्रूंहीं दाटले घन । मग ती तैसीच मजलागून । सद्गद कंठें बोलली ॥ ५८ ॥ कीं क्षेम सांगून श्रीरघुवीरा । विनवी लक्ष्मणा परमोदारा । देव, म्यां आपुल्या शुद्धांतरा । विंधिलें दुरुत्तरांहीं ॥ ५९ ॥ परी तें अज्ञानें भाषित । ह्मणूनि पोटीं ध्या जी तात । मजसी सोडवी श्रीरघुनाथ । ऐसें कीजे कृपेनें ॥ ६० ॥ ऐसें सांगून रुदन करी । व्यापून दुःखाब्धीच्या पुरीं । मग आश्वासलिया-वरी । निरोप देती जाहली ॥ ६१ ॥ मग म्यां सर्वोचि येतें वेळीं । विध्वंसिली ती वन-स्थळीं । आणि कित्येक राक्षसमंडळीं । धाडिली यमपुरातें ॥ ६२ ॥ सर्वोचि अक्ष जो रावणकुमर । तयातें वधून जी रघुवीर । सभेसी जाऊन लंकेश्वर । विवाद केला तया-सी ॥ ६३ ॥ मग शेवटीं जाळून पुर । एथें मी पातलों जी सत्वर । यापरी वृत्तांत श्रीरघु-वीर । ऐकता झाला तेधवां ॥ ६४ ॥ मग परम तोषून चित्तीं । ह्मणे गा सखया श्रीमारुती । नव्हे जें देवादिकांहिप्रती । तें तूं सिद्धी पाववीलें ॥ ६५ ॥ फेड या उपकाराची

तव । कोणेही परीनें न घडे लव । मारुते, अगा हा माझा जीव । अर्पण तूतें येथवां ॥ ६६॥ यापरी बोलून त्यासी धरून । दृढ आलिंगून रघुनंदन । पावला परम समाधान । नेत्रीं आसवें वाहतीं ॥ ६७ ॥ मग तो सद्भक्त करुणाघन । बोलला हनुमंतालागुन । अगा हें माझें आलिंगन । दुर्लभ जाण त्रिलोकीं ॥ ६८ ॥ ह्मणोनि जाण तूं मद्भक्तांत । अग्रणी होसी हें निश्चित । आवडी एतुली अतिशयित । नाहीं मातें दुजाची ॥ ६९ ॥ अहाहा ! ज्यांचें पदकमळ । पूजिजे वाहून तुळसीदळ । आणि सुखेंचि पाविजे फळ । लोकीं मुक्तित्रयाचें ॥ ७० ॥ तोच हा श्रीमान रघुनंदन । देतसे साक्षात आलिंगन । मग तो केउता भाग्यवान । श्रीहनुमंत म्हणावा ॥ ७१ ॥ ह्मणोनि रघुवीराचें प्रेम । हेंचि या सर्वां अति उत्तम । जन हो, जोडूनिया विश्राम । पाविजे हेचि प्रार्थना ॥ ७२ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७३ ॥ श्रीराम ॥ ५ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

---

सुंदरकांड समाप्त.





# युद्धकांड.

## अध्याय ४३ वा, युद्धसिद्धता.

श्रीराम ॥ यापरी हनुमंताचें वचन । ऐकून परम संतोषून । श्रीराम आनंदाचा घन । पुढती ऐसें बोलला ॥१॥ कार्य जें केलें हें हनुमंतें । देवादिकांहि अशक्य होतें । भूवरी कल्पूंच न शके त्यातें । कोणीहि जाणा मनानें ॥ २ ॥ अहो, हा शतयोजनविस्तीर्ण । सागर लंघील ऐसा कोण ? । आणि लंका जी राक्षसभुवन । कोण ध्वंसील तियेतें ॥ ३ ॥ सेवका जें जें उचित होतें । तें तें साधिलें या हनुमंतें । भृत्य हा ऐसा सुग्रीवातें । अपूर्व देखा लाभला ॥ ४ ॥ मजसि आणीक रघुवंशास । सुमित्रासुतास सुग्रीवास । प्राणदानचि केलें खास । जानकीवृत्तांतें तयानें ॥ ५ ॥ म्हणोनि शोधोनि सीतासती । वांचवूनि आम्हां सर्वांप्रती । येणें मोठीच पुण्यकृती । जोडिली माझ्या मतानें ॥ ६ ॥ परि हा समुद्र अवलोकून । खिन्नता धरितें माझें मन । कीं हा शतयोजन लंघून । जाइजे पार केउतें ॥ ७ ॥ केउतें शत्रूचें संहनन । घडेल एधवां मजलागून । आणि सतीचें प्रिय दर्शन । तेंहि कैसें घडावें ? ॥ ८ ॥ तेधवां सुग्रीव वानरराज । बोलला, देव ! ही चिंता त्यज । मी हा समुद्र लंघून आज । वधून येतों खळातें ॥ ९ ॥ पहा हे पुढती

माझे थोर । बलाढ्य बानर वीरवर । त्वदर्थ अग्नीमाजीहि घोर । घेतील उड्या जवें हे ॥ १० ॥ आधीं समुद्र-उल्लंघन । साधिजे बुद्धियोगें करून । मग तो नेमेंचि दशवदन । निमाला ऐसें जाणिजे ॥ ११ ॥ देव, मी तों न देखें कोण । कीं जो घेऊन धनुष्यबाण । तुजासि कराया येतां रण । क्षणभरी पुढती स्थिरावे ॥ १२ ॥ म्हणोनि सर्वथा श्रीरघुवीर । जय आपुलाचि हा होणार । चिन्हें तैशींच वारंवार । दृष्टीस येती माझिया ॥ १३ ॥ मग तें स्नेहभावभारित । भाषण शूरत्वसमन्वित । मान्य करोनि श्रीरघुनाथ । हनुमंतासी बोलला ॥ १४ ॥ मारुते, असो हा सरितापती । लंघून जाइजे कोणेहि रिती । परि मज एधवा लंकास्थिती । कैसी कैसी तें सांग बा ॥ १५ ॥ देवां दानवां जी दुस्तर । तियेचें जाणून अंतःसार । मागुती प्रवेशासाठीं द्वार । शोधूं येईल उपायें ॥ १६ ॥ तंव जोडूनि उभय हात । आणि होवोनि विनययुत । भृत्याग्रणी तो बोले त्वरित । जें जें जैसें देखिलें ॥ १७ ॥ त्रिकूटगिरीचे शिखरावरी । देव ! म्यां देखिली लंकापुरी । जलपूर्ण खंदकांचे माझारीं । स्वर्णप्रासादयुक्त जी ॥ १८ ॥ वनें उपवनें बहु शोभती । वापीहि सुंदर तेथें किती । गृहेंहि रमणीय सर्वत्र अती । रत्नस्तंभांहीं भासती ॥ १९ ॥ पश्चिमद्वारीं गजवाहक । तिष्ठती राघवा, सहस्र एक । तैसेच पत्ती—अश्वसैनिक । उत्तरद्वारीं तिष्ठती ॥ २० ॥ पूर्वद्वारासि अर्बुद एक । तिष्ठती वीर ते रघुनायक । तैसेच राक्षस ते कित्येक । दक्षिणद्वारीं वर्तती ॥ २१ ॥ मध्यभागींही चौकाआंत । गज अश्व रथ

पत्ती बहुत । तिष्ठती नगररक्षणानिमित्त । अस्त्रविद्येचे जाणते ॥ २२ ॥ तोफाहि तेथें ठेविल्या बहुत । ऐशी पुरी ती परमरक्षित । राघवा, परी म्यां तैशाहिआंत । दाविली मौज तयांतें ॥ २३ ॥ चतुर्थांश तें रावणदळ । निवटिलें न लगतां एक पळ । आणि लंकेचा करूनि जाळ । स्वर्णप्रासाद ध्वंसिला ॥२४॥ तोफा आणिक कित्येक पूल । तेही ध्वंसिले मीं तत्काळ । देव, तूं तों नेत्रेंचि केवळ । करिशील भस्म पुरीचें ॥ २५ ॥ म्हणोनि प्रस्थान आतां करा । जाइजे आतांचि समुद्रतिरा । संगें समस्त वानरवीरां । घेवोनि परम त्वरेनें ॥ २६ ॥ यापरी वचन ऐकिल्यावरी । श्रीराम बोलला येणेपरी । कीं बा सर्वांस सूचना करीं । आतांचि प्रस्थाननिमित्तें ॥ २७ ॥ आतांचि विजयमुहूर्त जाण । जाऊन गांठून लंका-ठाण । आंताचि मी त्या खळाचे प्राण । हरून घेतों मारुते ॥ २८ ॥ आणि ध्वंसून पुर समस्त । सीतेस घेऊन येतों येथ । माझा दक्षिण नेत्र स्फुरत । अधोभागासी एधवां ॥ २९ ॥ आतांचि समस्त वानरगण । चालवा स्वस्वपथें करोन । यूथपीं असावें चित्त देऊन । बाजूंस मागेंपुढेंही ॥ ३० ॥ हनुमंताचे स्कंधीं बसून । पुढें मी जाईन वेगेंकरून । अंगदें सुमित्रेचा नंदन । घेऊन संगें चलावें ॥ ३१ ॥ सुग्रीव पाहिजे माझ्यासवें । प्रमुख वीर जे तेहि यावे । गज, गवाक्ष, गवय, नांवें । मैंद, द्विविद, जयांचीं ॥ ३२ ॥ नल, नील, सुषेण आणि । जांबवानही वीराग्रणी । सर्वही आतांचि येच्च क्षणीं । सिद्ध होवोनि चला रे ॥ ३३ ॥ यापरी सर्वांस आज्ञा-

पून । निघाला श्रीमान रघुनंदन । लक्ष्मण सुग्रीव हर्षेंकरून । सारे वीर निघाले॥ ३४ ॥ श्रीराम मध्यें विराजत । भोंवती कपिगण ते चालत । इच्छित रूपें धरितां येत । जयांस, ऐसे बळी जे ॥ ३५ ॥ गर्जती, सर्वेचि उड्डाण घेती । भक्षिती फळेंहि मधुहि किती । बोलती श्रीरामाच्या पुढती । आतांचि हाणूं रावणा ॥ ३६ ॥ पुच्छीं उदंड आघात करिती । वृक्ष उपटोनि हातीं घेती । पर्वतांवरून ऐशा रीती । चालला सेनानिधि तो ॥ ३७ ॥ श्रीराम लक्ष्मण सर्वां आंत । जैसे रविचंद्र नक्षत्रांत । तैसे शोभले अतिशयित । कपींहि स्कंधीं वाहतां ॥ ३८ ॥ व्यापूनि उदंड भूमितळ । चाललें सुग्रीवाचें दळ । नेत्रीं पहावें जें जें स्थळ । ते तें हरिस्वरूपी ॥ ३९ ॥ सेना चालली रात्रंदिन । विश्रांति नेघेचि कोणी जन । नव नव काननें आक्रमून । सह्याद्रिपार जाहले ॥ ४० ॥ सर्वेंचि मलयाद्रि लंघून । वीर ते सर्वहि पातले स्थान । जो थोर विस्तीर्ण शतयोजन । सागर, त्याच्या तिराचें ॥ ४१ ॥ तेथ उतरोनि रघुनंदन । जलाच्या निकटस्थळीं जाऊन । बोलला–पुढती कराया गमन । उपाय नाहीं एधवां ॥ ४२ ॥ म्हणोन याचिया उल्लंघना । कीजेल कांहीं जंव योजना । तंववरी येथेंच पाहिजे सेना । राहिली तीरप्रदेशीं ॥ ४३ ॥ मग ते सर्वहि सैनिकगण । तेथेंच देते झाले ठाण । यूथप करिती संरक्षण । स्व स्व-अंगांहीं चमूचें ॥ ४४ ॥ अब्धि तो अगाध गगनाकार । नक्रादिकांहीं परम घोर । लाटाहि उसळती ऐशा थोर । देखिलें सर्व चमूनें ॥ ४५ ॥ मग दुःख, खेद,

भीती । यांहीं व्यापिलें सर्वांप्रती । म्हणती एतुला जलाधिपती । तरून जावें केउतें ॥४६॥ अहो, हा आतांचि दशवदन । आम्ही वधितोंचि नेमेंकरून । परी हा समुद्र येथें बघून । उपाय कांहीं न चाले ॥ ४७ ॥ यापरी होऊन चिंताक्रांत । राहिले सर्वेहि जेथें तथ । राम तों उदंड दुःख करीत । सीतासतीनिमित्तें ॥ ४८ ॥ ज्याचिया संगतीं नाहीं दुजा । ऐसा अद्वय श्रीरघुराजा । चिद्रूप एकीएक निजा- । नंदीं मग्न परात्मा ॥ ४९ ॥ तो हा स्वभक्तकाजास्तव । अंगें घेऊनि मानवभाव । वरिवरी शोकास देऊन ठाव । सीता सीता करितसे ॥ ५० ॥ परी जो तत्त्वदृष्टि नर । स्वरूपें जाणतो श्रीरघुवीर । त्यापुढें दुःखादिकें हीं चोर । पाहतां दृष्टी न येती ॥ ५१ ॥ मग जो आनंदाचा घन । आणि क्षयवृद्धींहीं हीन । तयास या क्षुद्र दुःखेंकरून । विटाळ कैंचा घडावा ॥ ५२ ॥ दुःख हर्ष, क्रोध, भीती । लोभमोहादि हीं केउतीं । चिद्रूपातें स्पर्शूं येती । अज्ञानचिन्हें सर्वही ॥ ५३ ॥ दुःख तों देहाभिमानियातें । चिद्रूपासि कैंचें हो तें । ह्मणून सर्वां झटून येथें । त्यास प्रसन्न करावें ॥ ५४ ॥ चिदात्मा प्रसन्न झालियावर । द्वयं हें तत्काळ होतें दूर । आणि सुखचि एक अपार । प्रतीत होतें जनांतें ॥ ५५ ॥ बुद्धयादि अहं-भावादिकें । तेथ न राहती कोणीएकें । ह्मणोनि बुद्धिसंगेंचि एकें । सुखदुःखभोग जीवातें ॥ ५६ ॥ राम तों सुखचि निरंतर । पुराण पुरुष परात्पर । तयास मायागुणांहीं नर । दुःखी ऐसें भाविती ॥ ५७ ॥ म्हणूनि साधूनि साधनराज । लोकीं भजावा श्री-

रघुराज । आणि पद जें अभंग अज । तें जोडावें तयाचें ॥ ५८ ॥ याहून जड जीवानिमित्त । संत आणिक शास्त्रमत । आन कांहीं न सांगती मात । श्रीराम एक भजा हो ॥ ५९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६० ॥ श्रीराम ॥ ४३ ॥ ॥ ॥

## अध्याय ४४ वा, बिभीषणबोध.

श्रीराम ॥ इकडे हनुमंताची कृती । जी कां देवादिकां न होती । नेत्रीं देखूनि लंकापती । चित्तीं खेदास पावला ॥ १ ॥ मग समस्त मंत्रिजन । सभेअंतरीं बोलावून । ह्मणे हो, हनुमंतें येऊन । कर्म जें केलें पहा कीं ॥ २ ॥ एतुल्या दुर्गम नगरीआंत । रिघून सीता देखून त्वरित । असुरांसमवेत माझा सुत । अक्षही तेणें मारिला ॥ ३ ॥ आणि तुम्हांस तुच्छ करून । पुरीहि देऊन पेटवून । पुनरपि समुद्र उल्लंघून । निश्चिंत गेला पहा कीं ॥ ४ ॥ काय कीजेल आतां येथ । केउतें साधेल माझें हित । तुम्ही विवेकी कुशल बहुत । विवेक सांगा एतुला ॥ ५ ॥ तंव तें वचन ऐकिल्यावर । राक्षस करिती प्रत्युत्तर । देव, तो केउता श्रीरघुवीर । भय तें काय तयाचें ॥ ६ ॥ इंद्र तो बांधून तुझिया सुतें । बंदींत ठेविला आहे येथें । तुवांहि जिंकून कुबेरातें । पुष्पक आहे जोडिलें

॥ ७ ॥ यमहि जिंकून, त्याची भीती । तुवां निवटली कीं संप्रती । तैसाच वरुण, आणिक किती । असुरेंद्रही त्वां जिंकिले ॥ ८ ॥ पहा कीं मय जो महासुर । तेणें स्वकन्या तुज सुंदर । अर्पिली आतां याहिवर । उरी कोणासी सांग बा ॥ ९ ॥ हनुमंतें जें विध्वंसिलें । तयास हेंचि कारण झालें । वानर म्हणोनि उपेक्षिलें । क्षुद्रत्वेंचि तयातें ॥ १० ॥ आमुचा पराक्रम ऐशापुढें । दाविजे हें तों सर्वथा कुडें । येणें आमुचें कीजे वांकुडें । हें तों अशक्य ह्मणोनी ॥ ११ ॥ या रिती आह्मां बलवंतां ही । एधवां फसगत झाली पाहीं । जाणतों तरी तो जिवंत कांहीं । येथून मागें न जाता ॥ १२ ॥ ह्मणोनी आज्ञा मात्र करीं । मग निश्चयें या भूवरी । नरवानरांतें न ठेवूं उरी । सांगून पाहीं कोणेका ॥ १३ ॥ तेधवां पुढती होऊन त्वरें । कुंभकर्ण या राक्षसवीरें । ह्मणितलें कर्म हें कारिसी कां रे । आत्मघाताचे निमित्तें ॥ १४ ॥ देवें राघवें जोंवरी तुज । न देखिलें तों भाग्य समज । देखतां जिवंत परतून आज । न येसी जाण रावणा ॥ १५ ॥ नर हा नव्हेचि सीतारमण । प्रगटला साक्षात् नारायण । सीता भगवती लक्ष्मीच जाण । आणिली जी तूं मराया ॥ १६ ॥ मत्स्यें विषाचा गिळून घास । मागुती पाविजे कासाविस । तेविं तूं आणिलें सीतासतीस । काय दैवीं तें कळेना ॥ १७ ॥ परंतु ऐक बा माझी मात । त्वां हें जरी न केलें उचित । तरी मी जमवूनि घेतों त्वरित । तुवां निश्चित रहावें ॥ १८ ॥ कुंभकर्ण ऐसें जों बोलत । तंवचि ऊठिला इंद्रजित । आणि ह्मणे हे राक्षसनाथ । अनुज्ञा देई मला

वो ॥ १९ ॥ राम आणीक लक्षुमण । सुग्रीव आणिक वानरगण । हरून सकाळिकांचे प्राण । आतांचि येतों पहा मी ॥ २० ॥ तंवचि भागवतप्रधान । जयाचें राघवीं रंगलें मन । बिभीषण तो सुबुद्धिमान । पातला सभास्थळातें ॥२१॥ आणि देखुनी लंकापती । मूढ जो व्यापिला कामें अती । कुंभश्रवणादि ज्या संगती । तयास ऐसें बोलला ॥ २२ ॥ रावणा, अरे हा इंद्रजित । अथवा निकुंभकुंभ होत । महापार्श्व-महोदरांत । कोण रे ऐसा बळाचा ॥ २३ ॥ अतिकाय किंवा कुंभकर्णाही । युद्धीं राघवापुढती पाहीं । ठराया अवसान नाहीं नाहीं । जाण तूं नेमें राजया ॥ २४ ॥ सीतानामक महाग्रहें । तुजासि ग्रासिलें निःसंदेहें । सुटाया हाच उपाय आहे । सती ती रामास देइजे ॥ २५ ॥ अरे, जोंवरी राक्षसाशिरें । तुटूं न लागलीं श्रीरामशरें । तोंवरी सीतेस नेऊन त्वरें । अर्पी अंगें राघवा ॥ २६ ॥ जोंवरी महाबळी ते हरी । आक्रांत करिती न पुरांतरीं । तोंवरी तूं ती सीता सुंदरी । अर्पी वेगें राघवा ॥ २७ ॥ एकदां श्रीराम संनिध येतां । जिवंत ऐसा न सुटशी ताता । इंद्र, विधि कीं शंभू स्वतां । पाठीं घालूं आलिया ॥ २८ ॥ परी हे बिभीषणाचे बोल । हितकर पवित्र बहु मंगल । तयातें मानवले न तिल । मरतया औषध ज्यापरी ॥ २९ ॥ कालप्रेरित तो रावण । करितसे ऐसें मग भाषण । अहो, हा माझेंच खाऊन अन्न । माझ्याचि वरती ऊठिला ॥ ३० ॥ सदैव संनिध राहून मम । येणें घातकी धरिला क्रम । मित्ररूपानें अरि उत्तम । मज हा झाला पहा हो ॥ ३१ ॥ ऐसिया नीच कृतघ्ना·

संगें । संबंध उचित कैसा सांगें । ज्ञाति ज्ञातीलागीं आंगें । अनिष्ट तें तें इच्छिते ॥३२॥ यावरी कोणीहि हो कां आन । बोलूं आलिया ऐसें वचन । तत्काळचि मी त्यातें वधीन । धिक्कार असो याजला ॥ ३३ ॥ ऐसें कटु शब्दें भाषण । केलिया कोपून बिभीषण । उड्डाण घेता झाला तूर्ण । गगनामाजी त्वरेनें ॥ ३४ ॥ आणि तेथून बोलला वाणी । हित सांगतांही धिक्कारणी । कारितां नांद तूं नीटपणीं । ज्येष्ठो भ्राता पितुः समः ॥३५॥ साक्षात् काळचि श्रीरघुनाथ । प्रकटला दशरथमंदिरांत । जनकनंदिनी ती निश्चित । भगवती काली जाणिजे ॥ ३६ ॥ उभय हे भूभार हरावया । पातले आहेत ठायीं इया । त्याच्याचि प्रेरणायोगें सखा । दुर्लक्ष तुझें हितासी ॥ ३७ श्रीराम प्रकृतीचिया पार । वर्तती निश्चित निरंतर । सर्व भूतांचे आंत बाहेर । संचला समस्वरूपें ॥ ३८ ॥ नामरूपादि भेदें करून । तसतसा होतसे भासमान । जैसा नाना वृक्षांआंतून । एकचि वायु खळाळे ॥ ३९ ॥ भेद जे पंचकोशादिक । त्यांहीं तोच कीं भासे अनेक । ज्यापरी अमल स्फटिक एक । संगें तद्वर्णी भासतो ॥ ४० ॥ तो नित्यमुक्त असतां जाण । मायागुणांत प्रतिबिंबून । काल, अव्यक्त, पुरुष, प्रधान । ऐशीं रूपें लेयिला ॥ ४१ ॥ प्रधान-पुरुषांपासूनि सारें । जग हें निर्माण कारितो बरें । मागुती कालस्वरूपें बा रे । उदरीं घेई गिळूनी ॥ ४२ ॥ तोचि कालस्वरूप हरी । विधीनें प्रार्थना केलियावरी । तुझिया वधार्थ या भूवरी । येऊनि आहे ठाकला ॥ ४३ ॥ मग तो सत्य-

संकल्प नाथ। किमर्थ अन्यथा करील हेत। तुजसि पुत्रकलत्रांसमेत। मारील ठार निश्चयें ॥ ४४ ॥ परी ते लोचनांपुढती हाल। घडतां मज न पाहवतील। ह्मणोनि श्रीरामपदयुगुल। संनिध कराया चाललों ॥ ४५ ॥ अगा तूं मग मी गेलियावर। सुखेंचि सदनीं आनंद कर। यापरी सांगतां तो भक्तवर। भक्त्यावेगें दाटला ॥ ४६ ॥ सर्वेचि गृहादिकांचे पाश। तोडून चालला सावकाश। सेवीन श्रीराम श्रीजगदीश। प्रेमानंदें ह्मणोनि ॥ ४७ ॥ ऐसें श्रीरामाचें प्रेम। वारितें पहा हो सर्व श्रम। आणि जें निश्चित आनंदधाम। तेथ नेऊन पाववी ॥ ४८ ॥ ह्मणोनि वांछित असती कवी। श्रीरामकथाचि सर्वीं गावी। आणि स्वरूपीं आवडी ध्यावी। अखंड सीतापतीच्या ॥ ४९ ॥ ऐशी अध्यात्मरामकथा। भाविकें ध्यावी श्रवणपथा। म्हणोनि लिहिलीसे सर्वथा। रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ५० ॥ श्रीराम ॥ ४४ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

---

## अध्याय ४५ वा, बिभीषणशरणागती.

---

श्रीराम ॥ तो श्रीबिभीषण पुण्यवंत। आपुल्या चारही मंत्र्यांसमेत। गगनीं येऊनि झाला स्थित। सन्मुख सीतापतीच्या ॥ १ ॥ आणि तेथून बोले वचन। देव हे स्वामिन्! सीतारमण। रावणानुज मी बिभीषण। तूतें शरण पातलों ॥ २ ॥ मीं तयास बोलिलों

मात । सीता रामास देई त्वरित । परी तें नेणोनि तेणें हित । मजचि बाहेरी काढिलें ॥ ३ ॥ कालपाशें जो गुंडाळला । तो सद्बोधास अंतरला । खड्ग घेऊनि धाविन्नला । बोधितां मजचिवरी तो ॥ ४ ॥ ह्मणोनि सचिवांसहित इयां । पातलों तुजसि मिळावया । मुमुक्षुभावें तुझिया पायां । विलीन व्हाया कारणें ॥ ५ ॥ तंव तें भाषण बीभीषणाचें । ऐकून सुग्रीव बोले वाचे । स्थळ हें नव्हेचि विश्वासाचें । राक्षस कपटी सर्वथा ॥ ६ ॥ सीता हारितया दशाननाचा । अनुज म्हणोनि बोले वाचा । तरी हा कपटेंकरून साचा । वधील आम्हां निश्चयें ॥ ७ ॥ म्हणोनि आज्ञा दे रघुवीर । हा मीं आतांच करितों ठार । नातरी तुज हा कैसा प्रकार । वाटतो सांग प्रभो तूं ॥ ८ ॥ तेधवां राघवें करूनि स्मित । म्हणितलें—आणीन निजमनांत । तरी ही त्रिलोकीं एके क्षणांत । नाशीन सर्वांसवेंही ॥ ९ ॥ अथवा सर्वेचि आणीन मनीं । तरी मग ठेवीनाहि निर्मूनी । ऐशिया ईश्वरा मजला-गुनी । कापटय कीजे केउतें ॥ १० ॥ म्हणोनि दिधलें अभय तया । येथ तूं घेऊन येई सया । आतां विलंब करावया । निमित्त नाहीं तुजला ॥ ११ ॥ मज जो शरण आलों म्हणे । तयास सर्वथा निर्भय करणें । व्रतचि हें ऐसें वीरमणे । जाणिजे माझें समस्तीं ॥ १२ ॥ मग तें रामोक्त होतां श्रुत । सुग्रीव जाहला संतोषित । आणि बिभीषणासी त्वरित । घेऊनि येई ते स्थळीं ॥ १३ ॥ तंव तो श्रीराम लक्ष्मणासहित । प्रसन्न-लोचन-वदन-युत । अंगें श्यामल सुशोभित । धनुर्बाणेंसी पाहतां ॥ १४ ॥ तेणें साष्टांग

प्रणिपात । तयास घालून जोडिले हात । आणि भक्तीच्या आवेशांत । स्तवनीं सिद्ध जाहला ॥ १५ ॥ वंदन तुजला श्रीरघुराया । वंदन तुजला सीताप्रिया । वत्सला सद्भक्त जनांचिया । वंदन तूतें धनुर्धरा ॥ १६ ॥ अनंत शांत सीताकांता । सुग्रीव-मित्रा श्रीरघुनाथा । तुझिया चरणीं माझा माथा । पावन व्हाया असो हा ॥ १७ ॥ जगाच्या उत्पत्तिनाशादिकां । कारण त्या तुज देवा एका । अनादि त्रैलोक्यनायका । वंदन माझें असो हें ॥ १८ ॥ सकळ जगतां मूळ होस । तूंच कारण तत्स्थितीस । अंतीं तुझ्याच ठायीं नाश । होतसे त्यांचा रवादिच्छे ॥ १९ ॥ चर अचर सकळां भूतां । व्याप्य व्यापक तूं अनंता । म्हणोनि आमुच्या दृष्टिपथा । तूंचि सर्वत्र भाससी ॥ २० ॥ लोक हे तुझिया मायेमुळें । अज्ञानाचीं होती स्थळें । आणि पापपुण्याच्या बळें । जन्म-मृत्यूंतें पावती ॥ २१ ॥ जोंवरी लाभलें नाहीं ज्ञान । तोंवरी या जगताचें भान । होइजे साचोकारें करून । शिंपी–रूप्यानुसारें ॥ २२ ॥ देव ! हें नेणून ज्ञान तव । जन हे धांवती विषयांस्तव । आणि दुःखचि नित्य नव । जोडिती दाराधनांहीं ॥ २३ ॥ इंद्र, अग्नि आणि वरुण । तूंचि कीं होसी सीतारमण । अनिल, कुबेर, रक्षोगण । रुद्रही तूंचि श्रीरामा ॥ २४ ॥ तूं तों स्थूलाहून स्थूल । अणूहूनहि अणु केवळ । तूंचि सर्व-त्रिलोकपाळ । माता धाता पिताही ॥ २५ ॥ आदि, मध्य आणि अंत । यांहीं विहीन तूं अच्युत । परिपूर्ण आणि सदोदित । अव्यय ऐसा परमात्मा ॥ २६ ॥ हस्त, पाद,

श्रवण, नयन। यांहीं विहीन तूं भगवान। ऐकसी, देखसी, करिसी गमन। आणि निर्लेप निःसंग ॥ २७ ॥ स्थूलादि पंचकोशांहून। प्रभो, तूं वेगळा, गुणविहीन। अंगें सर्वांस आश्रय होऊन। स्वयें आश्रयहीन तूं ॥ २८ ॥ आकारहीन विकारहीन। विकल्पहीन ईश्वरहीन। षड्भावहीन आदिहीन। पुरुष प्रकृतिदूर तूं ॥ २९ ॥ माया-दृष्टीनें पाहूं जातां। मनुजरूप तूं भाससी स्वतां। निर्गुण अज ही ओळखी होतां। भक्त मुक्तीतें पावती ॥ ३० ॥ मी तों त्वत्पादभक्तिपथें। चढाया ज्ञानप्रासादातें। वांछितों; ह्मणोनि नमो नमस्ते। सीतानाथा श्रीरामा ॥ ३१ ॥ नमस्ते देव करुणाघना। नमस्ते श्रीराम रघुनंदना। नमस्ते रावणारे, मज जनना-। मृत्यूपासून सोडवीं ॥ ३२ ॥ यापरी श्रवण करितां स्तव। तोषला भक्तवत्सल देव। मग ह्मणे अभीष्ट जें कां तव। माग; मी देतों वरातें ॥ ३३ ॥ तेधवां परमानंदभर। पावून बोलूं लागला असुर। अ-हाहा! धन्य मी या भूवर। श्रीरामकृपाप्रसादें ॥ ३४ ॥ आजि मीं समस्त कृत्यें केलीं। सर्व प्राप्तव्यें मिळविलीं। जाणावयाची तीहि झाली। गोष्ट संपूर्ण एधवां ॥ ३५ ॥ तुझिया दर्शनयोगें राम। आतां न कोणी माझिया सम। धन्यतम कीं पवि-त्रतम। त्रिलोकीआंत दुसरा ॥ ३६ ॥ राघवा, आतां तुझें ध्यान। आणि जें वास्तव भक्तिधन। तें मज देइजे संपादून। कर्मबंधातें हराया ॥ ३७ ॥ प्रसादें मागणें विष-यसुख। तें मज राघवा नावडे देख। मी तव भक्तिच मागें एक। तुझिया परमपदाची

॥ ३८ ॥ तेधवां आणीक होऊन तुष्ट । बोलला ऐसें श्रीरघुश्रेष्ठ । ऐक, मी रहस्य माझें स्पष्ट । तुजसि आतां सांगतों ॥ ३९ ॥ भक्त जे माझे अंतःशांत । ध्यानयोगी वैराग्य-युत । हृदयीं त्यांचिया मी राहत । सीतेसमेत निश्चयें ॥ ४० ॥ ह्मणून विकल्प करून दूर । ध्यानीं लावीं तूं निजांतर । मग हा समस्त भवसागर । उत्तीर्ण होशी निश्चयें ॥ ४१ ॥ आणि जो माझिये प्रीतीस्तव । स्तोत्र हें पठण करील नव । तो जन सरू-पतेचा ठाव । पावेल माझा जाणिजे ॥ ४२ ॥ यापरी राघवें बोलून बोल । म्हणितलें लक्ष्मणा, कैचें फल । माझिया दर्शनीं, तें तत्काळ । दाखवूं यातें पहा कीं ॥ ४३ ॥ मित्र हा लंका-राज्यावर । यावत् चंद्रादिवाकर । स्थापितों; जल आणीं सत्वर । जाऊन अंबुनिधीचें ॥ ४४ ॥ मग आणून समुद्रनीर । लक्ष्मण आणि श्रीरघुवीर । अभिषेक करिते झाले त्यावर । लंकाराज्यानिमित्तें ॥ ४५ ॥ तेधवां समस्त वानर वीर । तोषून बोलले परस्पर । गोष्ट ही केली अति सुंदर । राजा रघूत्तमानें ॥ ४६ ॥ सुग्रीवेंही आलिं-गून । ह्मणितलें हे मित्र बिभीषण । आह्मी श्रीरामभक्त जाण । समस्त आहों एतुले ॥ ४७ ॥ परी तूं सर्वांत शिरोमणी । तुझिया ऐशी प्रभुचरणीं । निष्ठा जोडिली नाहीं कोणीं । हेंचि निश्चित जाणिजे ॥ ४८ ॥ वधाया आतां राक्षसपती । साहाय्य तुझें नाना रीती । होणार श्रीरामचंद्राप्रती । आलिया युद्ध प्रसंगीं ॥ ४९ ॥ तेधवां बोलला बिभीषण । म्यां काय साहाय्य कीजे जाण । वांछितों एक तें सेवकपण । साधेल तैसें

कराया ॥ ५० ॥ इतुकियामाजी रावणदूत । शुक नामें तो येऊन तेथ । गगनांतूनि बोलला मात । सुग्रीवरायानिमित्तें ॥ ५१ ॥ रावणें निरोप ह्मणून तुज । ह्मणितलें अगा तूं वनचरराज । कुलवान तो तूं माझा अनुज । ऐसा शोभसी पहा कीं ॥५२॥ म्यां जी सुंदरी केली हरण । ती तुज सर्वथा नोहे कोण । मी तव अर्थाची बुडवण । नाहींच केली लेशही ॥ ५३ ॥ तुवां परतून जावें घरीं । अजिंक्य जाण ही लंकापुरी । केउतें बळ या नरवानरीं । देवही जेथें भागती ॥ ५४ ॥ यापरी निरोप जंव सांगत । तंवचि वानरीं धांवून तेथ । करून उदंड मुष्टि-आघात । ताडिलें फार तयातें ॥ ५५ ॥ तईं आक्रंदून बोलला शुक । निवारीं हरि हे रघुनायक । दूतास कोणी न मारिती देख । नृप नीतिज्ञ कदाही ॥ ५६ ॥ तयीं तें बोलणें दैन्यपूर्ण । श्रवणीं पावतां सीतारमण । तत्काळ करीत निवारण । न वधा यातें ह्मणूनी ॥ ५७ ॥ मग तो सुग्रीवास ह्मणे । परतून दशाननाकारणें । काय म्यां निरोप निवेदणें । सांग-जातों मी; न राहें ॥ ५८ ॥ तंव ह्मणितलें सुग्रीव वीरें । सांग तूं तयास ऐसें खरें । कीं तूं बंधुच माझा बा रे । वधार्ह वालीप्रमाणें ॥ ५९ ॥ अरे ! तूं मन्मित्राची दारा । हरून कोठें जाशी चोरा । तुजसि प्रयत्न करूनि सारा । वधूंचि पुत्रकलत्रीं ॥ ६० ॥ ऐसा निरोप निवेदलीया । धरिलें रामाज्ञेनें तया । आणि सुरक्षित ऐशा ठाया । वेगें नेते जाहले ॥ ६१ ॥ शार्दूल नामक कोणी दूत । पूर्वींच येऊन गेला येथ । तेणें कपींचें दळ समस्त । विदित केलें रावणा ॥ ६२ ॥ तेणें सचिंत लंकेश्वर ।

होऊन राहिला निरंतर । दीर्घ सुस्कारे वारंवार । टाकीत कंठी दिनांतें ॥ ६३ ॥ इकडे देखून सागर थोर । चित्तीं क्षोभला श्रीरघुवीर । ह्मणे हा लक्ष्मणा गर्विष्ठ फार । मजसि मेणे दुरात्मा ॥ ६४ ॥ दर्शनालाही नाहीं आला । मदें जाणिजे बहु मातला । नर हा जमवोनि वनचरांला । काय करणार ह्मणतसे ॥ ६५ ॥ तरी तूं पहा मी न लगतां पळ । शोषितो तयाचें सारें जळ । पायींच माझे वीर सकळ । पार जातील एथवां ॥ ६६ ॥ आणि दाटून क्रोधभर । धनूस तत्काळ जोडी शर । सर्वेचि आकर्ण ओढिल्यावर । गर्जून ऐसें बोलला ॥ ६७ ॥ राघवाचें या शरसंधान । करोत सारेचि अवलोकन । आतां टाकितों शुष्क करून । इया सरितापर्तातें ॥ ६८ ॥ ऐसें बोलतां भू कंपित । जाहली वरिच्या पर्वतांसहित । आकाश अष्टदिशांसमेत । अंधकारेंचि व्यापिलें ॥ ६९ ॥ सागर निजमर्यादा देख । सोडून सरकला योजन एक । तेणें कित्येक मीनादिक । जीव व्याकुळ जाहले ॥ ७० ॥ तंवचि दिव्यस्वरूपधर । सागर प्रगटला पृष्ठावर । तनूचें तेज आणि अलंकार । उजळिती सर्व दिशांतें ॥ ७१ ॥ तेणें सुंदर रत्नें करून । अंजली पूर्ण ऐशी भरून । श्रीरामपायांस उपायन । ह्मणोनि भावें अर्पिलें ॥ ७२ ॥ आणि साष्टांग वंदी पदें । मागुती विनतपणें वदे । देव ! आपुलिया आशीर्वादें । रक्षिजे आह्मां जडांतें ॥ ७३ ॥ देवें जगदुत्पत्ति करितां । मजसि जडचि निर्मिलें स्वतां । देवनिर्मित स्वभाव आतां । अन्यथा कोण करी गा ॥ ७४ ॥ स्वभावें स्थूल हीं पंचभूतें । तुवांचि

जड घडविलीं हातें । म्हणून लंघून तव आज्ञेतें । कोणीच जाऊं शकेना ॥ ७५ ॥ राम, या भूतांस आहे जनन । तामस अहंकारांतून । तेणें मूळास अनुसरून । जडत्व अंगीं तयांच्या ॥ ७६ ॥ देव, तूं निर्गुण, आकारहीन । असून, मायेस आश्रयस्थान । होसी जेधवां लीलें करून । तैं तूं विराट बोलिजे ॥ ७७ ॥ मग त्या विराट रूपांतून । सत्त्वें देव पावती जनन । रजोगुणें कीं कमलासन । प्रगटती रुद्र तमोंशें ॥ ७८ ॥ मायया स्वरूप आच्छादित । करून नर तूं शोभसी येथ । त्या तुज मीं तों जड अत्यंत । केउतें जाणूं शकावें ॥ ७९ ॥ मूर्ख तो सन्मार्गासि याया । दंडचि साधन आहे राया । पशुच ऐसें जाणिजे, जया । बुद्धि नाहींच तिळाची ॥ ८० ॥ प्रभो, मी विनम्र तुझे चरणीं । मजसि अभय देइजे झणीं । लंकापुरींत जायालागुनी । मार्ग मी तूतें देतसें ॥ ८१ ॥ तेधवां बोलला रघुनंदन । करींचा शर हा विसर्जन । कराया दाखवीं आधीं स्थान । शर हा परतूं शकेना ॥ ८२ ॥ तयीं तें ऐकून, आणि शर । आकर्ण ओढिला धनुष्यावर । देखून, तो दिव्यरूपधर । सागर बोले तयातें ॥ ८३ ॥ देव ! द्रुमकूल्य नामें देश । वर्ततो येथें उत्तरेस । तेथील लोक मज बहुवस । रात्रंदिन पीडिती ॥ ८४ ॥ म्हणोनि तेथ तूं सोडी शर । यापरी बोलतां प्रत्युत्तर । क्षणांत जाऊन राघवशर । निःशेष करी तयांतें ॥ ८५ ॥ मागुती येऊन तूणीरांत । पूर्वीं ऐसा झाला स्थित । त्यावरी सागरें परम नीत । होऊन ऐसें बोलिलें ॥ ८६ ॥ नळ जो विश्वकर्म्याचा सुतु । तेणें

मजवरी रचावा सेतु । तो येथ समर्थ बुद्धिवंतु । वरहि तैसा तयातें ॥ ८७ ॥ राघवा ! या रीती तुझी कीर्ति । पसरेल सर्व त्रिलोकीवरती । ऐसें सांगून, घालून प्रणती । सागर अदृश्य जाहला ॥ ८८ ॥ मग नळातें सीतानाथ । तैशाच रीती आज्ञापीत । कीं गा, येथ तूं सेतु त्वरित । उभवीं पृष्ठीं जलाच्या ॥ ८९ ॥ तयीं ते पराक्रमी संपूर्ण । एकत्र जाहले वानरगण । मग तयांस संगें घेऊन । नळ कार्यातें लागला ॥ ९० ॥ आणि पर्वत तरुवर थोर । आणून घालून अपरंपार । सेतु तो तेणें तेथें सत्वर । निर्माण केला प्रतापें ॥ ९१ ॥ मज गमे-प्रसन्न श्रीरघुवर । व्हावया एतुला पाहिजे धीर । ह्मणोनि बोधाचि जणुं हा वीर । रूपें ऐशा सांगतसे ॥ ९२ ॥ मुमुक्षु जे कां पुण्यशीळ । त्यांहीं जाणून हें तत्काळ । श्रीरामभेटीस मनास बळ । देइजे ऐशा परीचें ॥ ९३ ॥ ऐशी अध्यात्म-रामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणून लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ९४ ॥ श्रीराम ॥ ४५ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

---

## अध्याय ४६ वा, शुककृत बोध.

श्रीराम ॥ सेतूस आरंभ करितां जाण । राघवें रामेश्वराचें स्थान । प्रथमचि निर्मून, मग पूजून । वर देऊन ठेविला ॥ १ ॥ कीं या सेतूचें दर्शन । सर्वेचि शिवास अभिवंदन ।

करिती जन ते मत्कृपेकरून । ब्रह्महत्यादि वारिती ॥ २ ॥ आणि येथें करून स्नान । शिवाचें घेऊन मग दर्शन । मागुती काशीस करून गमन । जल गंगेचें आणिजे ॥ ३ ॥ मग तेणें या शिवावर । अभिषेक करूनि उरलें नीर । सागरीं सांडील जो कां नर । पाविजे ब्रह्मपदीं तो ॥ ४ ॥ प्रथम दिवशीं चतुर्दश । दुसरे दिवशीं योजन वीस । मग तेथून प्रतिदिवसास । आधिक्य एकें योजनें ॥ ५ ॥ यापरी पांच दिवसां आंत । नळें तो निर्माण केला सेत । मग तेणोंचि मार्गें समस्त । समुद्रपार जाहले ॥ ६ ॥ मग ते सैनिक असंख्यात । सुवेलाद्रीस चढून जात । श्रीराम आणि सुमित्रासुत । तेही त्यांसंगें पातले ॥ ७ ॥ मग ते तेथून अवलोकन । करिती दशाननाचें स्थान । पुरी ती अत्यंत विस्तृत घन । मंडित नाना ध्वजांहीं ॥ ८ ॥ वाडे प्रचंड उंच थोर । सुवर्णतोरणें लाविलीं वर । भोंवतीं खंदक सर्वभर । मध्यें तोफा रोंखिल्या ॥ ९ ॥ भीतरीं पूल तैसेच बहुत । ठायीं ठायीं केले स्थित । ऐसें पुर सर्वांहीं समस्त । निजदृष्टींहीं देखिलें ॥ १० ॥ सर्वोचि मंदिरीं लंकानाथ । बैसला मंत्रिजनांच्या सहित । किरीट-दशकें सुशोभित । नीलाद्रीचे सारिखा ॥ ११ ॥ रत्नदंडाचीं छत्रें श्वेत । त्यावरी लटकत होतीं बहुत । आणि वर्णं जो तुळिजे खचित । कालमेघाचे स्वरूपीं ॥ १२ ॥ त्यासि राघव अवलोकीत । तंवचि शुक तो आला दूत । मुष्टिपूजेचा मान बहुत । घेवोनि अंगें कपींचा ॥ १३ ॥ तेधवां हांसोनि राक्षसनाथ । बोलला वानरीं तुजला तेथ । पूजिलें ना रे ? तंव तो वृत्त । संपूर्ण

सांगूं लागला ॥ १४ ॥ कीं मी निरोप बोलूं जातां । वानरीं धावोनि धरिलें ताता । परी मी बाहतां सीताकांता । त्यां हातून सुटलों ॥ १५ ॥ परी तो सेनासागर थोर । पसरला पाहून भूमीवर । मी भयभीत होवोनि सत्वर । वेगें आलों ये ठायीं ॥ १६ ॥ देव, या राक्षस हरिगणांत । न घडे सख्यत्वाची मात । हरि हे आतांच वेशीपर्यंत । येऊन देखा ठेपले ॥ १७ ॥ आतां वायां न घालवी क्षण । सीतेस नेऊन देईं जाण । नातरी रामासि कराया रण । सिद्धता वेगें करी हो ॥ १८ ॥ मजसि बोलला श्रीरघुनाथ । रे तूं नृपास सांगे मात । ज्यावरी विश्वास सुनिश्चित । धरून हरिली प्रिया तूं ॥ १९ ॥ बळ तें आतां दावीं त्वरित । नातरी लंकापुर हें समस्त । उदईक देख तूं विध्वंसित । संपूर्ण माझ्या शरानें ॥ २० ॥ परमक्रोधें मीं मद्वीर । धाडितों रे तव सैन्यावर । आणि विध्वंस करून थोर । उद्यांचि भूमीतें पाडितों ॥ २१ ॥ मातेंहि वाटतें—असुरेश्वर । श्रीराम लक्ष्मण सुग्रीव वीर । आणि बिभीषण हे तों चार । पुरुषसिंहाचि निश्चयें ॥ २२ ॥ ह्मणोनि कपि ते राहोत दूर । हे चाराचि पुरुषवीर । क्षणेंचि जाळून लंकापुर । निःशेष करितील सर्वहि ॥ २३ ॥ अथवा म्यां जें रूप बळ । देखिलें शस्त्रादि-कौशल । तेणें एकचि कोणी सकळ । पुर हें वधील वाटतें ॥ २४ ॥ पहा ही केउती वानरसेना । न कीजे कदापि यांची गणना । ह्मणोनि मुख्य ते दशानना । वीर मी तूतें सांगतों ॥ २५ ॥ पहा तो सुग्रीवसेनाधिप । नील, केउता भव्यरूप । भोंवतीं वेष्टून ज्या यूथप । बैसले

लाख एक कीं ॥ २६ ॥ आणि हा पर्वतशिखराकार । अंगद देख कीं वालीकुमर । चित्तीं संतप्त होऊन थोर । पुच्छास वेगें हालवी ॥ २७ ॥ देख तो हनुमान सुविख्यात । जेणें लंघून समुद्र, येथ । सीतेस भेटून, केला घात । प्रिय अक्षाचा तुझिया ॥ २८ ॥ आणि हा सुग्रीवाच्यापाशीं । जाऊन परतला बहु वेगेसीं । कीं जो आजिंक्य तव सेनेसी । हाचि नामें श्वेत कपि तो ॥ २९ ॥ हा तों प्रतापें सिंहासम । महा बलाढ्य रंभनाम । हाचि एकला आहे क्षम । लंका नाशावयातें ॥ ३० ॥ हा तों शरभ नामें नृप । देखिजे केउता पावूनि कोप । पाहतो प्रत्यक्ष अग्निरूप । कोटि यूथपां पाळिता ॥ ३१ ॥ देख ते ऐसेच समरधीर । मैंद, द्विविद, पनस वीर । नळ तो विश्वकर्म्याचा कुमर । रचिला सेतु जयानें ॥ ३२ ॥ यापरी वर्णितां सारेचि जण । अथवा गणितांहि अशक्य जाण । परि ते सारेचि कराया रण । परमोत्सुक दिसती ॥ ३३ ॥ देव, हे समस्त राक्षसवीर । आणि हें चूर्ण कराया पुर । सर्वांसहि या सामर्थ्य थोर । आहेचि, शंका न घे तूं ॥ ३४ ॥ नऊ, पांच आणि सात । कोटी हजार संख्या होत । शंकुसहस्र अर्बुदशत । आणिक शेष मोजितां ॥ ३५ ॥ एतुलें सुग्रीवसचिव-बळ । देख तूं एकदां असुरपाळ । मी न समर्थ, गणना सकळ । आणिकांची या कराया ॥ ३६ ॥ प्रभो ! हा मनुष्य नोहे जाण । श्रीराम साक्षात नारायण । सीता जगताची कारण । चिच्छक्ति कीं निश्चयें ॥ ३७ ॥ त्या उभयांचे पासून जग । प्रकटलें आहे ऐसें उमग । ह्मणोनि मातापिताचि मग । रामसीता

हीं जगाचे ॥ ३८ ह्मणोनि त्यांसवें कीजे वैर । केउतें पहा हे असुरेश्वर । खास हा आहे तव अविचार । गृहीं जें सीतेस आणिलें ॥ ३९ ॥ अरे, क्षणभंगुर ही जगती । देहही तैशीच पावे गती । घडिला भूम्यादि पंचभूतीं । आणि जो सांचा मळाचा ॥४०॥ अस्थि, मांस आणि शोणित । यांहीं सदैव दुर्गंधित । तयाची केउती आस्था येथ । सुज्ञें वायां करावी ॥ ४१ ॥ हें तों अहंकृतीचें स्थान । निश्चयें तुजहून आहे आन । मग या जडाची कराया धन । कष्टसी कां गा वृथा तूं ॥ ४२ ॥ ज्यास्तव तुवां हीं आजवर । ब्रह्महत्यादि पापें थोर । केलीं, देह तो या भूवर । पडून राहे शेवटीं ॥४३॥ पुण्यपाप हें जीवाचिया । संगतीं सदैव येई सया । देहीं गोवून भोग द्याया । त्यासि दुःख-सुखाचे ॥ ४४ ॥ जोंवरी मी देह, हा मी कर्ता । भ्रम हा वर्ते आत्मयावरता । तंव हा जन्ममृत्यूचा गुंता । पाविजे जीवें निजांगीं ॥ ४५ ॥ नातरी विशुद्ध, मलविहीन । आत्मा निश्चल ज्ञानघन । तयास केउतें जन्मनिधन । निःसंगरूपा अव्यया ॥ ४६ ॥ केवळ अज्ञानाच्या वशें । जन्मादि बंध तो निर्मितसे । मग त्या वृथाचि मोहासरिसें । दुःखभोगातें पावतो ॥ ४७ ॥ ह्मणोनि विशुद्ध भावेंकरून । प्रभो, तूं जोडून आत्म-ज्ञान । पुत्रदारादि आणि धन । आसक्ति यांची त्यजीं वो ॥ ४८॥ इंद्रियांचे हे भोग बा रे । नरकामाजींहि असती सारे । आपणां ऐशींच श्वानसूकरें । भोगिती स्पर्शरसांतें ॥ ४९ ॥ परी या मानव-जन्माआंत । विवेक अंतरीं उदया येत । विशेषें ब्राह्मण्य हें

तों बहुत । पाविजे पुण्येंकरूनी* ॥ ५० ॥ त्यांतही या कर्मभूमीप्रती । जन्मणें हें तों दुर्लभ किती । मग ही समग्रही संपत्ति । भाग्यें लाभेल ज्यातें ॥ ५१ ॥ कोण तो विवेकी विद्वज्जन । देहचि मी ऐसें मानून । या क्षुद्र भोगीं गोवी मन । कासविसी पावण्या ॥ ५२ ॥ ह्मणोनि देव, तूं पौलस्त्यसुत । ब्राह्मण असूनि सुनिश्चित । विषयांपायींच किंनिमित्त । कष्टसी मूढाप्रमाणें ॥ ५३ ॥ सोड तूं बा ही आतां रीत । राघवीं होऊन शरणागत । भक्तिभावेंचि परिपूरित । भज या जन्मीं आलिया ॥ ५४ ॥ सीता अर्पून रघुनायका । त्यास तूं सेवीं भावें एका । मग तूं पावसी विष्णुलोका । धुवून पापें समस्तें ॥ ५५ ॥ नातरी अधोगतीचा पथ । तुजसि सिद्धचि लंकानाथ । ह्मणोनि बोधिलें जें मीं हित । तेंचि तूं अंगीकारिजे ॥ ५६ ॥ श्यामळ सुकुमार श्रीरघुनाथ । प्रभु तो सेवी सीताकांत । शोभतें शरधनु ज्या हस्तांत । दुष्टांस नष्ट कराया ॥ ५७ ॥ लक्ष्मण, बिभीषण कीं सुग्रीव । ज्यावरी ठेवूनि दृढ सद्भाव । भजती, आणीक पावती ठाव । अखंड सर्व सुखाचा ॥ ५८ ॥ ऐसा श्रीराम सीताराम । सकळ मंगळाचें धाम । भज रे, भज रे तूं निष्काम । पूर्ण विश्रामाकारणें ॥ ५९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६० ॥ श्रीराम ॥ ४६ ॥

॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

## अध्याय ४७ वा, इंद्रजितपराक्रम.

श्रीराम ॥ यापरी शुकाचें ज्ञानभरित । भाषण ऐकतां राक्षसनाथ । क्रोधें अत्यंत संतापित । होऊन त्यातें बोलला ॥ १ ॥ मूढा, स्वोदर-भरणासाठीं । राबसी सदैव माझ्या पाठीं । आणि या सांगसी तत्त्वगोष्टी । मजपुढें साधूप्रमाणें ॥ २ ॥ मी या त्रिभुवनाचा पती । शासितों एतुली सारी जगती । त्या मज वर्तायाची रीती । सांगसी निर्लज्जपणें तूं ॥ ३ ॥ तुझा आतांचि घ्यावा प्राण । परी तूं पूर्वोपकारी जाण । म्हणोनि वधाई असतां पूर्ण । सोडितों तूतें एधवां ॥ ४ ॥ मूर्खा, येथूनि जाईं झणीं । शब्द हे पुनः न मी घे श्रवणीं । यापरी बोल तो असुरमणी । बोलला क्रोधें शुकातें ॥ ५ ॥ तेधवां उदंड झाली कृपा । ऐसें पुनश्च बोलून नृपा । शुक तो गृहाचा मार्ग सोपा । करिता झाला त्वरेनें ॥६॥ शुक हा पूर्वीं ब्रह्मज्ञानी । ब्राह्मण राहत असे वनीं । दक्ष स्वधर्मकर्माचरणीं । वानप्रस्था-श्रमींच्या ॥ ७ ॥ तेणें व्हावया देवहित । आदरें यज्ञ केले बहुत । तैं ते तयासी असुर समस्त । विरोधें वागूं लागले ॥ ८ ॥ त्या आंत वज्रदंष्ट्रासुर । संधि पाहत होता चतुर । शुकास हानिकारक थोर । प्रसंग आणावयातें ॥ ९ ॥ मग एकदां अगस्त्यमुनी । पातले द्विजाश्रमाचे स्थानीं । शुकें तयातें सन्मानुनी । भोजनीं निमंत्रिलें पैं ॥ १० ॥ मग तो स्नानास जातां मुनी । खळें या तद्रूप स्वीकारोनी । शुकास म्हणितलें मज भोजनीं । मांस

छागाचें असावें ॥ ११ ॥ तंव तें मुनिमानस जाणून। शुकें तो छागांश संपादून। मुन्यर्थ मांसाचें भोजन। सिद्ध केलें आदरें ॥ १२ ॥ मग स्नान करूनि येतां। अगस्त्य भोजनीं बैसले स्वतां। तयीं हा असुर शुकाची कांता। होऊन तेथें पातला ॥ १३ ॥ आणि क्षणभरी शुक्रपत्नीस। कपटें करूनि मोहवश। स्वयेंचि मुनीस मानुषमांस। वाढिलें सिद्ध करूनी ॥ १४ ॥ आणि गुप्त जाहला त्वरित। तों तें मुनीच्या दृष्टी येत। मग तो क्षोभ पावोनि बहुत। शुकास ऐसें बोलला ॥ १५ ॥ अरे, हें अशुद्ध मनुजमांस। मज तूं वाढिलें भोजनास। दुष्टा, तरी तूं हो राक्षस। नरांसि भक्षावयातें ॥ १६ ॥ तेधवां शापित होतां द्विज। बोलला, तुवांचि आतां मज। येऊन म्हणितलें व्हावें आज। मजला मांस अजाचें ॥ १७ ॥ मग हा शाप द्याया तुज। कारण केउतें झालें आज। तंव तें ऐकतां तो मुनिराज। क्षणैक ध्यानीं स्थिरावे ॥ १८ ॥ मग तें असुराचें दुष्कृत। चित्तीं येतांचि मुनि त्वरित। बोलला, असुरें हा तव घात। साधिला ऐशा परीनें ॥१९॥ विप्रा तुज हा निष्कारण। शाप मजमुळें झाला जाण। तथापि माझें हें भाषण। साच होणार निश्चयें ॥ २० ॥ तरी तूं राक्षसदेहा आंत। राहून दशाननाचें हित। करावें; मग श्रीसीताकांत। पावेल लंकेसंनिधीं ॥ २१ ॥ मग तो दूत म्हणोनि तुज। त्याकडे धाडील राक्षसराज। तयीं या शापापासून सहज। तूं मोक्षातें पावसी ॥ २२ ॥ तेथ तूं तत्वज्ञानकथा। सांगसी सुबोध राक्षसनाथा। मग तूं सर्वेचि मोक्षपथा। पावसी परमात्मयाच्या

॥ २३ ॥ यापरी बोलतां अगस्ति देव । शुक तो पावला राक्षसभाव । तो आज श्रीराम-दर्शनास्तव । शापनिर्मुक्त जाहला ॥ २४ ॥ मग ब्राह्मण्य पूर्ववत । लाहून पातला निज-वनांत । आणि तपस्वीजनांसहित । काळ क्रमीत राहिला ॥ २५ ॥ यावरी नीतिज्ञ बुद्धि-मान । वृद्ध राक्षस माल्यवान । पातला पहाया उपदेशून । नृपास, आजा तयाचा ॥२६॥ आणि अत्यंत शांतपणें । बोलला--एतुलीं मजकारणें । गोष्ट तूं ऐकून राक्षसमणे । माने तैसें करीं वो ॥२७॥ पहा ही जानकी आली घरीं । तैंहून चिन्हें न होतीं बरीं । वाटतें ही सर्व लंका पुरी । शीघ्राचि पावेल विनाशा ॥ २८ ॥ पहा कीं गर्जती हे अंबरीं । मेघ गर्दभाऐशा स्वरीं । आणि रक्ताचि नगरभरी । वर्षती नीरासारिखें ॥ २९ ॥ देवमूर्ति तों रुदन करिती । घर्मे निथळती, स्थळ सोडिती । कालिका ती तों येऊन पुढती । हांसते श्वेत द्विजांहीं ॥ ३० ॥ गाईंस पोटीं येती खर । सर्प ते गरुडाबरोबर । मार्जाराशीं मूषक थोर । झगडती येथें पहा कीं ॥ ३१ ॥ काळपुरुष तो भयंकर । फिरतसे नगरांत घरोघर । यापरी अद्भुत आणि घोर । चिन्हें होतां दिसतीं ॥३२॥ ह्मणोनि कुलसंरक्षणा-कारितां । त्वां रे शांति करावी स्वतां । सत्त्वर नेऊन देईं सीता । बनसत्कारें राघवा ॥३३॥ राम हा जाणूनि नारायण । द्वेष तूं सोडीं रे रावण । भज हा अवश्य सीतारमण । अंतरीं वास जयाचा ॥ ३४ ॥ याच्याचि पादाश्रयें हे जन । विशुद्ध करोति घेती मन । आणि जोडून आत्मज्ञान । तरती भवांबुधीतें ॥ ३५ ॥ तूं दुराचारी अतिशयित । परी

या भावेंचि होसी पूत । अगा ! हें ऐक तूं येणें हित । निश्चयें तुझ्या कुळाचें ॥ ३६ ॥ परी तो सुदुष्ट राक्षसेश । काळें गोवून केला वश । तो हें ऐसें वचन सुरस । तुच्छ करून बोलला ॥ ३७ ॥ राम हा केवळ क्षुद्र नर । वृक्षीं वनचरीं तयाचा भर । ऐशासि केउता ह्मणसी थोर । पिताहि नाहीं जयाला ॥ ३८ ॥ तेणेंचि तुजासि धाडिलें येथ । ह्मणोनि वच हें विसंगत । जल्पसी, अगा तूं वृद्ध बहुत । ह्मणोनि म्यां हें साहिलें ॥ ३९ ॥ नातरी ऐसें दुरुक्त वच । कर्णीं आग जें ओती साच । ऐसें मजसि ऐकवेनाच । सहसा कोण्या मुखींचें ॥ ४० ॥ मग तेथून सचिवांसहित । उठूनि निघाला राक्षसनाथ । आणि सर्वांस आज्ञापीत । युद्धास सिद्ध व्हावया ॥ ४१ ॥ इकडे रामेंही चाप करीं । घेऊन, देखून पुढती अरी । सोडिला शर एक त्याचेवरी । अर्धचंद्राकृति जो ॥ ४२ ॥ तेणें शिरींच्या छत्रांसहित । दहाही किरीट केले पतित । तयीं तो अंतरीं राक्षसनाथ । परम लज्जित जाहला ॥ ४३ ॥ मग वेगेंचि निजमंदिरीं । शिरून प्रधानां आज्ञा करीं । कीं या वानरसेनेवरी । आतांचि चाल करा रे ॥ ४४ ॥ तेधवां रेडे, उंट, खर । सिंह-गजादिकांच्या वर । पुरींचे समस्त राक्षसवीर । आरूढ होते जाहले ॥ ४५ ॥ एकें हातीं घेतला शूळ । एकें खड्ग कीं धनु केवळ । यष्टि तोमर शक्ति सकळ । कित्येक घेते जाहले ॥ ४६ ॥ सर्वेचि भेरी-मृदंगादिक । गोमुख आणीक पणवानक । वाद्यें ऐशीं ते सकाळिक । काढिती बाहेर त्वरेनें ॥ ४७ ॥ यापरी सर्व ते असुरवीर । युद्धार्थ सज्जता

करूनि थोर । पुरींच्या चारहि द्वारांवर । एकत्र होऊं लागले ॥ ४८ ॥ रामेंही आपुले सैनिकगण । युद्धार्थ प्रवृत्त केले जाण । वीर ते सर्वेचि लंकाठाण । वेढून नेटें बैसले ॥ ४९ ॥ पर्वत आणीक वन्य तरुवर । हींच तयांचीं अस्त्रें थोर । घेऊन चढून तटावर । देखिती सेना अरीची ॥५०॥ वृक्ष, पर्वत, मुष्टि, यांहीं । युद्धक्रीडा कीजे ज्यांहीं । सहस्र, कोटी, शतकोटीही । सेना हातीं जयांच्या ॥ ५१ ॥ गर्जती, उड्डाण घेती थोर । करिती राघव-जयजयकार । सर्वेचि सुग्रीव लक्ष्मणवीर । यांच्या नांवें गर्जती ॥ ५२ ॥ यापरी गर्जत असतां जवें । युद्ध ते करिती शत्रूंसवें । हनुमान, अंगद, कुमुद, नांवें । नल-नीलादि जयांचीं ॥ ५३ ॥ शरभ, मैंद, द्विविद तीन । दधिवक्त्र आणि जांबवान । केसरी तार, जे स्वबळेंकरून । अजिंक्य होती रिपूंतें ॥ ५४ ॥ त्यांहीं उड्डाण घेऊन सारीं । द्वारें रोधिलीं जाऊन पुरीं । आणि तरुवर-पर्वतशिखरीं । वीर ते हाणूं लागले ॥ ५५ ॥ कित्येक होऊन आवेशयुत । नखदंतांहींच करिती मात । यापरी वर्ततां नगरा आंत । असुरसेनाहि क्षोभली ॥ ५६ ॥ मग ते देहेंचि प्रचंड थोर । राक्षस भीम भयंकर । सारेचि तत्काळ वेशीबाहेर । क्रोधावेशें पातले ॥ ५७ ॥ आणि खड्ग, परशु, शूल । तैशा गोफणीही बहुसाल । घेऊन, वेंचून सर्व बल । वानरांमागें लागले ॥ ५८ ॥ तेधवां घोडे, हत्ती, रथ । यांचे ध्वनि ते अतिशयित । वेगें पसरून दश दिशांत । आकाश कोंदूं लागलें ॥ ५९ ॥ तयीं ते प्रचंड राक्षसवीर । ऐसें तुंबळ करिती समर । उभयतांचेही

परम घोर । घाय ते वर्णू न येती ॥ ६० ॥ राक्षस आणीक कपीश्वर । असंख्य प्रतिपक्षाचे वीर । यापरी करिते झाले ठार । आपुलालिया प्रहारें ॥ ६१ ॥ युद्धीं राघवें वानरवीर । निजदृष्टीनें देखिल्यावर । तयांस आवेश ये अनिवार । अमृत सेविल्यासारिखा ॥ ६२ ॥ म्हणून त्यांहीं राक्षस सारे । रणांत निःशेष केले त्वरें । मग एक चतुर्थांशाचि पुरें । सैन्य अवशेष राहिलें ॥ ६३ ॥ जयांचा स्वामीच पापी घोर । तयांस रणास कैंचा धीर । म्लानता तयांच्या मुखांवर । आधींच होती उदेली ॥ ६४ ॥ असो, ते राक्षस पाहून मृत । उद्विग्न जाहला इंद्रजित । मग ब्रह्मवरेंचि त्वरित । अंगें अदृश्य जाहला ॥ ६५ ॥ आणि ब्रह्मास्त्राच्या सवें । नानाशस्त्रें प्रेरून जवें । टाकिता झाला, येणें नांवें । कपि निःशेष व्हावया ॥ ६६ ॥ तेधवां घनघोर झालें समर । अनिवार वर्षू लागले शर । ज्यांहीं समस्तही अंबर । व्यापून जाणों टाकिलें ॥ ६७ ॥ ब्रह्मास्त्राचा कराया मान । क्षणैक तें देखे रघुनंदन । तंवचि असंख्य वानरजन । भूमीस लोळूं लागले ॥ ६८ ॥ मग तो क्रोध पावून थोर । बोलला—आण रे चापशर । केउता पराक्रमी रघुवीर । तें मी यातें दावितों ॥ ६९ ॥ यापरी बोलतां श्रीरघुनाथ । ऐकता झाला इंद्रजित । मग त्वरेंचि नगराआंत । ससैन्य जाऊन पातला ॥ ७० ॥ इकडे वानरसेना पतित । देखून होऊन चिंतायुत । हनुमंतातें श्रीरघुनाथ । आज्ञा करिता जाहला ॥ ७१ ॥ कीं तूं जाऊन क्षीराब्धीवरी । तेथून सत्वर द्रोणगिरी । आणून ऊठवीं सेना सारी । तयाच्या दिव्यौ-

षधींहीं ॥ ७२ ॥ या गुणें कीर्ति तुझी थोर । होणार निश्चयें या भूवर । तंव तो तत्काळ वायुकुमर । 'आज्ञा प्रमाण' बोलला ॥ ७३ ॥ मग जाऊन गिरि आणून । करूनि वानरसंजीवन । पुनश्च स्वस्थळीं पाववून । वेगें सेनेंत पातला ॥ ७४ ॥ तेधवां उठोनि वानरवीर । तत्काळ गर्जना करिती थोर । तंव तें ऐकूनि लंकेश्वर । बहुत विस्मय पावला ॥ ७५ ॥ ह्मणे हा मोठाच शत्रु मज । देवीं उभविला श्रीरघुराज । पातला मानवरूपें आज । मत्प्राण ध्यायाकारणें ॥ ७६ ॥ तरी जे माझे बांधवजन । करिती जे मम हितचिंतन । ऐशा सर्वांच वेगें करून । युद्धालागीं चलावें ॥ ७७ ॥ जे कां प्राणलोभें कोणी । न येती युद्धालागीं रणीं । तयांतें मीं या खड्गेंचि झणीं । धाडीन यमपुरातें ॥ ७८ ॥ तैं धाक पावोनि सारेजण । निघाले वेगें कराया रण । प्रहस्त, अतिकाय, आणि जाण । महानाद, महोदर ॥ ७९ ॥ देवशत्रु, निकुंभ देख । देवांतक कीं नरांतक । आणीक बलाढ्य जे कित्येक । सर्वचि युद्धार्थ पातले ॥ ८० ॥ मग ते हजारों राक्षसवीर । धावले वानरसेनेवर । आणि आवेश करूनि थोर । पायीं घालीत चालले ॥ ८१ ॥ खड्ग, परशु आणि बाण । भुशुंडी शस्त्र आणि गोफण । यांहीं निःशंक हरिती प्राण । सेनानींचे कपींच्या ॥ ८२ ॥ कपि ते झाडें पर्वत थोर । उपडोनि घालिती असुरांवर । नखदंतीं आणीक मुष्टीवर । कित्येक भूमी पाडिती ॥ ८३ ॥ स्वयेंचि राघवें कित्येकांतें । पाडिलें भूमीस सुमित्रासुतें । कित्येक सुग्रीवें हनुमंतें । तेणेंचि पंथें

लाविले ॥ ८४ ॥ श्रीरामाच्याच शक्तीवर । हरि हे बलाढ्य झाले थोर । नातरी सांडितां श्रीरघुवीर । बळ ये ऐसें केउतें ॥ ८५ ॥ प्रभु हा चैतन्य आनंदघन । मायया स्वरूप आच्छादून । मनुष्यरूपेंचि जन मोहून । युद्धादि लीला दाखवी ॥ ८६ ॥ ह्मणोनि प्रार्थना वारंवार । भजावा एक श्रीरघुवीर । मग कळिकाळाच्याहि वर । निर्धास्त चाल करावी ॥ ८७ ॥ जन जे होती सुकृतवंत । त्यांस हे गोष्टी मान्य होत । मग ते श्रीरामभक्तिपथ । सेविती प्रीतिभरानें ॥ ८८ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८९ ॥ श्रीराम ॥ ४७ ॥

## अध्याय ४८ वा, लक्ष्मणमूर्च्छा.

श्रीराम ॥ समरीं पतन पावलें दळ । अतिकायादि वीर सकळ । वृत्त हें ऐकतां राक्षसपाळ । दुःखक्रोधांहीं दाटला ॥ १ ॥ मग रक्षणार्थ लंकेआंत । ठेवूनि सुत तो इंद्रजित । स्वयेंचि रणांत युद्धानिमित्त । चालला लंकापती तो ॥ २ ॥ सकल शस्त्रास्त्रांहीं युत । जोडून एक तो दिव्य रथ । लक्षून श्रीराम सीतानाथ । चालून गेला जवानें ॥ ३ ॥ आणि विषाचे सोडून शर । कपि ते कित्येक केले ठार । सुग्रीवादिक वानरवीर । त्यांतेंही खालीं पाडिलें ॥ ४ ॥ पुढती बिभीषण अवलोकिला । तंवचि अधिक क्रोध आला ।

मग त्यावरी फेकिता झाला । शक्ति, जी दिधली मयानें ॥ ५ ॥ तेधवां अस्त्र तें गगनांतून । येतां लक्ष्मणें अवलोकून । म्हणितलें राघवें अभयदान । यातें आहे दिधलें ॥ ६ ॥ म्हणोनि या शक्तीचा पात । यावरी होणें नाहीं उचित । मग स्वयेंचि त्यापुढें स्थित । जाहला मेरूप्रमाणें ॥ ७ ॥ तंव ती शक्ति विजयशाली । लक्ष्मणाआंगींच प्रवेशली । तत्काळ वीर तो पहुडे खालीं । दुर्धर घायें करूनी ॥ ८ ॥ त्रिभुवनीं जे जे शक्ति वसे । ती तीस आधार ज्याचा असे । त्याचि प्रभूच्या अंगीं घुसे । अस्त्र तें ऐसें केउतें ॥ ९ ॥ परंतु धरिलिया मानवपण । वर्तणें तैसेंचि योग्य जाण । ह्मणून शेषांशही लक्ष्मण । मूर्छा पावोनि पडियेला ॥ १० ॥ तेधवां तयास घ्यावें रथीं । ह्मणोनि पाहे लंकापती । परी तो न चळे एक रती । तंव तो विस्मित जाहला ॥ ११ ॥ अहो, जो समस्त विश्वाधार । विराटरूपी परमेश्वर । तयास क्षुद्र हा असुरवर । स्वबळें चाळील केउता ॥ १२ ॥ तेधवां लक्ष्मणजींच्या पाशीं । कष्टता देखूनि असुरेशासीं । तयातें मुष्टि ती वज्राचिऐशी । मारुती मारिता जाहला ॥ १३ ॥ तंव त्या प्रहारें राक्षसवीर । पडला जाऊन गुडघ्यांवर । सवेंचि ओकूं लागला रुधिर । दहाही वदनें करूनी ॥ १४ ॥ नयनीं अंधार झाला दाट । फिरवूं लागला लोचनपट । मग तैसाच चढून नीट । बैसला रथावरी तो ॥ १५ ॥ मग हनुमंतें लक्ष्मणवीर । उचलून घेऊन स्कंधावर । आणून श्रीरामचंद्रासमोर । ठेविलें त्यातें त्वरेनें ॥ १६ ॥ तयाची निष्ठाच ऐशी खरी । देव तो

तत्काळ लघुता धरी । सर्वांही गुरूंचो गुरुता सारी । अंगापासून जयाच्या ॥ १७ ॥
शक्तिही हा वीर सुमित्रासुत । जाणून नारायणांशभूत । तयास सोडून रावणरथांत ।
स्वस्थळीं जाऊन पातली ॥ १८ ॥ असुर तो होऊन सावधान । घेऊन आपुलें बाणा-
सन । पुनश्च विशेषें क्रोधावून । राघवावरती धावला ॥ १९ ॥ रामेंहि तत्काळ हनुमत्-
स्कंधीं । आरूढ होऊन परमक्रोधीं । पुढती देखून हा दुर्बुद्धि । चाल केली त्यावरी
॥ २० ॥ मग जो वज्रहि करील चूर । ऐसा धनूचा शब्द घोर । करून बोलला श्रीरघु-
वीर । रक्षोधीशाकारणें ॥ २१ ॥ नीचा! येथेंचि माझ्यापुढती । थांब; तूं जाशील कोठें
किती । अपराध करून, मी रघुपती । समदर्शी जो तयाचा ॥ २२ ॥ पंचवटींत जेणें
शरें । छेदिले राक्षस तुझे सारे । तेणेंचि तूतेंहि तोडितों अरे । क्षणैक तिष्ठ पुढारां ॥ २३ ॥
तयीं तें ऐकत असतां वच । रावणें शरांचा करून खच । राघववाही मारुतीसीच ।
ताडन केलें विशेषें ॥ २४ ॥ परी त्या ताडनें वायुसुत । तेजें अधिकचि कीं वाढत ।
आणि आवेश भरूनि आंत । गर्जना करिता जाहला ॥ २५ ॥ देखून हनुमंताचे व्रण ।
संतप्त जाहला सीतारमण । मग तत्काळ शर दारुण । काढून मारी अरीतें ॥ २६ ॥
आणि घोडे, रथ कीं सूत । ध्वज, धनुष्य, शस्त्रांसहित । छत्र, पातका ऐसें समस्त ।
छेदून टाकिता जाहला ॥ २७ ॥ आणीक वज्राऐसा घोर । रावणावरीच सोडी शर । तैं तो
मूर्च्छित झाला असुर । गळलें चाप करींचें ॥ २८ ॥ मग आणीक सोडूनि शर । छेदिला

तयाचा किरीटवर । मग बोलला—रे सत्वर । जाय तूं आतां गृहातें ॥ २९ ॥ शरांहीं व्याकुळ केलें तुज । तो तूं विश्राम घेईं आज । उदईक माझें कैसें तेज । तें तूं रणीं देखसी ॥ ३० ॥ तेधवां उतरून गर्वज्वर । राक्षस लज्जित झाला फार । मग तांतडी करून थोर । लंके भीतरीं पातला ॥ ३१ ॥ इकडे पुढती सुमित्रासुत । देखून निश्चेष्ट मूर्च्छायुत । श्रीराम दुःखित झाला बहुत । मनुष्यभावानुसारें ॥ ३२ ॥ मग तो हनुमंतासि बोलत । सख्या तूं जाऊन पूर्ववत । ऊठवी माझा सुमित्रासुत । सर्वेचि सारे कपि ते ॥ ३३ ॥ तयीं तो वायुवेगेंचि वीर । चालला क्षीराब्धितीरावर । तोंचि लंकेश्वराचे हेर । वृत्त तें त्यातें सांगती ॥ ३४ ॥ तेधवां कपि हा आतां त्वरित । लक्ष्मणा उठवील हें निश्चित । चित्तीं जाणून राक्षसनाथ । चिंतापूर्ण जाहला ॥ ३५ ॥ मग तो राक्षसांचा स्वामी । मित्र जो आपुला कालनेमी । तयाच्या रात्रींच गेला धार्मी । साहाय्य घ्याया-कारणें ॥ ३६ ॥ तेधवां लंकापुरीचा पती । आला देखून सदनाप्रती । कालनेमी तो करून प्रणती । तयासी बोलूं लागला ॥ ३७ ॥ हे नाथ ! यावया येथवरी । निमित्त जाहलें कोणे परी । चिंता एतुली तुझिया अंतरीं । कोणती सांग उदेली ॥ ३८ ॥ तेधवां बोलला राक्षसनाथ । अरे, मी एतुला वैभवयुत । परी त्या मजसीहि आपत्तींत । राहणें प्राप्त जाहलें ॥ ३९ ॥ आज मी युद्धांत सुमित्रासुत । शक्त्यस्त्र फेंकूनि केला हत । परी तो दिव्यौषधींहीं त्वरित । उठवीताहे मारुती ॥ ४० ॥ ह्मणोनि कपि तो क्षीराब्धीस ।

चालला द्रोणाद्रि आणायास । तरी तूं मदर्थ या समयास । त्यातें विघ्न करीं बो ॥ ४१ ॥ मुनीचा वेष घेऊनि तुवां । मार्गीं आश्रम प्रगटवावा । आणि कपीस घालून गोवा । परतून यावें सुखानें ॥ ४२ ॥ यापरी कराया कपटकृति । जेधवां सांगे लंकापती । तैं तो राक्षस ऐशा रीती । तयास बोधूं लागला ॥ ४३ ॥ रावणा, ऐक बा माझें वच । मी तंव आपुले प्राण पांच । वेंचीन त्वदिच्छेसाठीं साच । विश्वास तुझा असूं दे ॥ ४४ ॥ परी तूं निश्चयें ऐसें मानी । जैसा मारीच पूर्वीं रानीं । परतला पराभव पावूनी । तैसाच मीही संप्रती ॥ ४५ ॥ मग तूं बांधव ऐसे सारे । निवटून एतुश्या युद्धप्रकारें । कोण्या लाभास पावसी बा रे । असीं वांचून एकला ॥ ४६ ॥ देह हा, राज्य हें अथवा सीता । तुजसि कोणत्या येईल हिता । सती ती देऊन श्रीरघुनाथा । राज्यीं बिभीषण बैसवी ॥ ४७ ॥ आणि देहसार्थक व्हाया । वनास जाई राक्षसराया । मुनींहीं पावित्र्य आलें जया । आणि रम्यता निसर्गें ॥ ४८ ॥ तेथें करून प्रातःस्नान । आदरें संध्यादि उपासन । साधून, एकांत संपादून । आसन स्थिर करावें ॥ ४९ ॥ मग जो विषयानुराग मनीं । राहतो तयास दूर करोनी । कल्पनांतेंही अंतःस्थानीं । आश्रय देऊं नये कीं ॥ ५० ॥ इंद्रियें तींहि अंतर्मुख । आदरें जपून कीजे देख । मग जें आत्मस्वरूप एक । त्याचिये शोधीं शिरावें ॥ ५१ ॥ आत्मा प्रकृतीपासून आन । स्वरूपभूत प्रेमस्थान । असंग सर्वत्र सनातन । नातळे वृद्धिक्षयांतें ॥ ५२ ॥ आणि हें जितुकें दृष्टी येत । अथवा जें

कां होई श्रुत । सर्व आब्रह्मस्तंबपर्यंत । प्रकृति ऐसें जाणिजें ॥ ५३ ॥ हीच जगाच्या सर्ग-स्थिति- । विनाशांतेंही कारण होती । ही या जीवांस उपजविती । देव मानव ति-र्यक्षां ॥ ५४ ॥ तियेचे कामक्रोधादि सुत । हिंसा-तृष्णादि कन्या बहुत । शुद्धात्मयातें मोहाआंत । गोविती स्वस्वगुणांहीं ॥ ५५ ॥ कर्ता-भोक्तादि ऐशीं सारीं । लक्षणें लादून त्याच्यावरी । प्रकृति ही त्यास ठेवी करीं । आणखी क्रीडे तयाशीं ॥ ५६ ॥ ह्मणूनि तियेच्या संगें देख । देव हा होऊन बहिर्मुख । स्वरूप विशुद्ध निखळ चोख । त्यातें विसरून राहतो ॥ ५७ ॥ मग जेधवां सद्गुरुराव । भेटून, निरसून सारी माव । तयास तयाचा दावी ठाव । ज्ञानसूर्यप्रकाशें ॥ ५८ तेधवां दृष्टि वळून आंत । तयास आपुली भेटी होत । मग तो देहींच जीवन्मुक्त । होऊन राहे सुखानें ॥ ५९ ॥ मग हे प्रकृतीचे गुण । तयास मोहविती न जाण । मग तें कर्तृत्वभोक्तृत्वपण । तयास लागूं शकेना ॥ ६० ॥ रावणा, अगा तूं ऐशा रीती । इंद्रियें आणोनि बापा हातीं । सदैव आत्मस्वरूपाप्रती । शोधीत ध्यात रहावें ॥ ६१ ॥ मग प्रकृतीपासून आन । आत्मा चिद्रूप अनुभवून । तूं या संसारबंधांतून । मोक्ष पावशी निश्चयें ॥ ६२ ॥ आतां एतुलें कराया ध्यान । जरी तूं होसी सामर्थ्यहीन । तरी हा सगुण रघुनंदन । देव तूं ध्यानीं धरावा ॥ ६३ ॥ ध्यातां भाव तूं ऐसा धरीं । कीं हा हृदयकमलांतरीं । बैसला सुवर्णपीठावरी । संगें सीता लक्ष्मण ॥ ६४ ॥ वस्त्र कटींचें चमके छान । विशाल लोचन, वीरासन ।

मस्तकीं किरीट, कंठांतून । हार आणीक वनमाळा ॥ ६५ ॥ बाहुभूषणें, कौस्तुभ सुंदर । हातीं कडीं नि पायीं नूपुर । धनुष्य शोभतें स्कंधावर । ऐशी मूर्ति साजिरी ॥ ६६ ॥ यापरी सर्व हृदयंगत । आत्माराम हा परिपूरित । भक्तिभावें जो हृदयीं ध्यात । तो निर्गुणत्वा पाविजे ॥ ६७ ॥ संगतीं घेऊन भक्तजन । कीजे श्रीरामचरित्रगान । तेणें कापांस अनिलेंकरून । तैशीं जळतीं पातकें ॥ ६८ ॥ ह्मणूनि भज रे या रघुनाथा । सांडूनि आणीक नाना पथा । वैरही सोडून देईं आतां । निजभक्तीच्या बळानें ॥ ६९ ॥ देव हा अंगें अनामरूप । भावना तैसें धरितो रूप । पुराणपुरुष त्रिलोकाधिप । भज तूं बापा एधवां ॥ ७० ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७१ ॥ श्रीराम ॥ ४८ ॥ ॥ ॥

## अध्याय ४९ वा, कालनेमिवध.

श्रीराम ॥ ऐसे अमृतासमान बोल । परिसून तो मूढ राक्षसपाळ । तयाचें रहस्य नेणोनि तिळ । क्रोधेंचि तप्त जाहला ॥ १ ॥ ह्मणे तूं होसी परम दुष्ट । तुजसि आतांचि करितों नष्ट । मदाज्ञा भंगिसी, तो तूं स्पष्ट । वश झालासी अरीतें ॥ २ ॥ तैं तो कालनेमि ह्मणे । अगा, हें अनुचित रागेजणें । बोध हा तुझ्या अंतःकरणें । अमान्य केला जरी

वैं ॥ ३ ॥ तरी मी तुझें करितों काज । आतांचि जाऊन राक्षसराज । मग या क्रोधास बापा तुज । निमित्त कांहीं असेना ॥ ४ ॥ ऐसें बोलून तो राक्षस । सत्वर गेला हिमालयास । आणि आश्रम बहुत सुरस । उभविता झाला ते स्थळीं ॥ ५ ॥ मुनिवेष घेतलासे सुंदर । भोंवतीं शिष्यांचा परिवार । ऐसी सिद्धता करून थोर । मार्ग रोधून राहिला ॥ ६ ॥ मग त्या मार्गें जातां त्वरित । वन तें देखून अकस्मात । कपि तो विचारी निज चित्तांत । स्थळ हें येथें केउतें ॥ ७ ॥ पूर्वीं न देखिलें म्यां हें धाम । मग काय असे हा चित्तभ्रम । अथवा चुकोनि मार्गक्रम । येथ मी आलों काय कीं ॥ ८ ॥ असो, हा आश्रम अवलोकून । मुनींस भेटून, जल सेवून । मागुती करावें मार्गगमन । द्रोणाद्रीच्या निमित्तें ॥ ९ ॥ मग त्या विचारें आश्रमांत । प्रवेशला तो समीरसुत । तंव तेथ दाटूनि गेले बहुत । तरुवर पुष्पाफळांहीं ॥ १० ॥ केळीं, नारळ आणि खजूर । फणसही लगडून आला भर । आणि सर्वत्र शांतिच थोर । नांदे संतोषदायिनी ॥११॥ ऐशा सुरम्य तपोवनांत । कालनेमि तो होता स्थित । इंद्रयोगानें शिव पूजित । मुनीच्या वेषें करोनी ॥ १२ ॥ तेथ हा वायूचा नंदन । रिघून तयास अभिवंदून । बोलला–मुनिराज, हा मी जन । श्रीरामदूत मारुती ॥ १३ ॥ कराया श्रीरामाचें काज । तांतडी चाललों आहें आज । तोंच तृषेनें पीडिलें मज । म्हणून आलों भीतरीं ॥ १४ ॥ म्हणून प्यावया उदंड नीर । वर्ततें कोठें जी मुनिवर । यापरी पुसतां वायुकुमर । दैत्य सांगे तयातें ॥ १५ ॥ गा, या कमंडलूंतील

जला । सेवी, चिंता न कांहीं तुला । मग या सेवून मधुरफलां । विश्राम घेईं सुखें तूं ॥ १६ ॥ गमनीं न करीं बापा त्वरा । मी भूतभविष्यज्ञानी खरा । तव गमनाचा उद्देश सारा । मजला आहे ठाउका ॥ १७ ॥ तरी तूं जाण ही माझी मात । राघवें लक्ष्मणाच्या समवेत । उठविलेच कपि समस्त । निजदृष्टीच्या सुधेनें ॥ १८ ॥ तंव तें ऐकून श्रीहनुमंत । चित्तीं जाहलासे शंकित । मग म्हणे—परी हें जल किंचित् । तृषेस वारूं शकेना ॥ १९ ॥ म्हणोनि जलाशयचि मज । सत्वर दावा जी मुनिराज । यापरी बोलतां वातात्मज । दैत्य तो ठीक म्हणे पैं ॥ २० ॥ मग बटु एक मायाकृत । निर्मून त्यातें आज्ञापीत । कीं या कपीश्वरास त्वरित । दाखवी स्थान जलाचें ॥ २१ ॥ मग आणीक कपिलागून । बोलला रे तूं नेत्र मिटून । करावें ते स्थळीं जलसेवन । आणि परतावें त्वरेनें ॥ २२ ॥ मग मी तूतें उपदेशीन । नाना मंत्र सांगून छान । जेणें वनस्पतींचें ज्ञान । सहजें तूतें घडावें २३ तेधवां तयास म्हणून ठीक । सलिलीं जाऊन कपिनायक । जल तें सेवीत राहे देख । झांकुनि नेत्रद्वयातें ॥ २४ ॥ तेधवां मगरी एक तया । धरून लागली ग्रासावया । मग तें देखतां मारुतिराया । तत्काळ क्रोध उदेला ॥२५॥ मग वदन धरून करीं । तीतें वीर तो तत्काळ चिरी । तैं तिजपासून गगनांतरीं । अंगना एक उदेली ॥ २६ ॥ धान्यमाली या नामेंकरून । स्त्री ती कपीस बोले वचन । कपे, मी त्वत्कृपें शापांतून । विमुक्त झालें एधवां २७ ॥ आतां ऐक तूं माझी मात । आश्रमीं मुनि जो आहे स्थित । तो तुज विघ्न कराया येथ ।

रावणें आहे धाडिला ॥ २८ ॥ दैत्य तो कालनेमि म्हणून । बैसला दंभें मुनि होऊन । तरी तूं तयातें आधीं वधून । जाइजे पुढती गिरीतें ॥ २९ ॥ आजि त्वत्स्पर्शें कपीश्वर । चालले मी ब्रह्मलोकावर । यापरी बोलून ती सुंदर । तेथेंच अदृश्य जाहली ॥३०॥ मागुती कपि येतां आश्रमीं । तयास तो दैत्य कालनेमी । बोलला—तुज या ऐशा कामीं । विलंब कां बा लागला ॥ ३१ ॥ असो, तूं मंत्र घे मजपासून । मग मज देईं दक्षिणादान । तंव तें ऐकतां श्री हनुमान । मुष्टि वळून धावला ॥ ३२ ॥ आणि आवेशें हाणोनि म्हणे । घे ही दक्षिणा तुजकारणें । तैं तें मुनित्व सांडून तेणें । असुररूप प्रकटविलें ॥३३॥ मग नाना मायाप्रकार । योजून त्याशीं झगडला थोर । परी तो श्रीरामाचा वीर । आटोपेना तयातें ॥३४॥ शेवटीं हनुमंतानें मूठ । तयाचे मस्तकीं मारिली नीट । तयीं तो तत्काळ असुर दुष्ट । गतप्राण जाहला ॥ ३५ ॥ मग तें कपींद्रें इष्टस्थळ । पावून उचलून द्रोणाचळ । वायुवेगेंचि रामाजवळ । आणून देखा ठेविला ॥ ३६ ॥ मग ह्मणे—उपाय जो समुचित । देव, तो कीजे आतां त्वरित । तयीं तें देखून सीताकांत । परम संतोषी जाहला ॥३७॥ मग त्या औषधी सुषेणमतें । घेऊन योजिल्या श्रीरघुनाथें । योजितां सांडूनि जणुं निद्रेतें । लक्ष्मण वेगें उठिला ॥ ३८ ॥ आणि गर्जोनि बोले झणीं । थांब, तूं जातोसि कोठें रणीं । तयीं ती ऐकून लक्ष्मणवाणी । राम सद्गद जाहला ॥ ३९ ॥ मग तयास आलिंगून । कपीस बोलला रघुनंदन । मारुते, तुझियाचि कृपेकरून । मज बंधु हा लाभला ॥ ४० ॥ ऐसें

बोलून मग त्वरित। युद्धास सर्वांस आज्ञापीत । तयीं ते सुग्रीवादि समस्त । वीर तत्काळ उठिले ॥ ४१ ॥ पाषाण आणीक वृक्ष थोर । गिरिहीं घेऊन स्कंधावर । कपि ते कराया युद्ध घोर । समरस्थानीं चालले ॥ ४२ ॥ तेधवां युद्ध होऊन थोर । लागून श्री रामाचा शर । गरुडें घेरिल्या सर्पानुसार । रावण व्याकुळ जाहला ॥ ४३ ॥ मग परतून नगरीआंत । जाऊन होऊन पदस्थित । घेऊन आपुले वीर समस्त । त्यांसि बोलूं लागला ॥ ४४ ॥ पूर्वींच मजसि कमलासन । बोलला—बा रे तुझें निधन । मानवा हातींच आहे; तैंहुन । मानव तो मी पाहतों ॥ ४५ ॥ परी एतुलें बळ कोणाही । मानवा अंगीं सर्वथा नाहीं । ह्मणून साक्षात विष्णुच पाहीं । मानवरूपें पावला ॥ ४६ ॥ तोच हा राम दशरथसुत । माझिया वधार्थ आला येथ । अहो, तें अनरण्याचें उक्त । सत्यते आलें एधवां ॥ ४७ ॥ कीं मद्वंशांत देवेश्वर । प्रकटून तुजसि सहपरिवार । समरामाजी करील ठार । कपींच्या साह्येंकरोनी ॥ ४८ ॥ शाप जो तेधवां तेणें दिला । तो मज फळास देखा आला । आतां धावेल मज साह्याला । ऐसा कोण बळाचा ॥ ४९ ॥ कुंभकर्ण तो मूढानुसार । झोंपाचि घेतसे निरंतर । अहो, तो तरी येथें वीर । जागृत करोनि आणवा ॥५०॥ तयीं तें असुरेशाचें वचन । ऐकतां धावले सेवकजन । आणि नाना उपायेंकरून । जागृत करिती तयातें ॥ ५१ ॥ मग तो आणितां सभास्थळीं । नृपास नमिता झाला बळी । मग आसनीं नृपाच जवळीं । नेमून देतां बैसला ॥ ५२ ॥ तेधवां खळ तो विनीतपणें ।

विशेषें तयास ऐसें ह्मणे । बंधो! पहा गा, कोण्या गुणें । संकट मज हें उदेलें ॥ ५३ ॥ राघवें माझे बांधव सुत । सारेचि समरीं केले हत । मजहि तैशीच आणिली गत । उपाय नाहीं सुटाया ॥ ५४ ॥ सुग्रीवादिक वानर थोर । घेऊन, लंघूनही सागर । पातला तो हा श्रीरघुवीर । मूळ खाणील पहा कीं ॥ ५५ ॥ थोरथोरही माझे बळी । कपींहीं पाडिले भूमितळीं । आणि कपींच्या नाशार्थ मुळीं । उपाय एक न चाले ॥५६॥ बंधो, तूं तरी मजकारण । अद्‌भुत कांहीं करोनि रण । हरी या कपीश्वरांचे प्राण । उठविलें तूतें यास्तव ॥ ५७ ॥ तंव तो दैन्यंगत रावण । देखून हांसून कुंभश्रवण । बोलला–अरे मी हेच खूण । पूर्वीं होतों बोललों ॥ ५८ ॥ त्वां जीं जोडिलीं पापें अती । तीं हीं तुजासि फळास येती । अरे, मीं बोधितांही तुझी मति । बोधास अंगीं धरीना ॥५९॥ आतांहि तेंच मी तुजप्रती । सांगतों–राम हा त्रिलोकीपती । आणि सीता ही त्याची शक्ति । आदिमायाच जाण तूं ॥ ६० ॥ एकदां रात्रीस अरण्यांत । सहज मी बैसलों असतां, तेथ । देखिले नारद म्यां साक्षात । दिव्यज्ञानी मुनी ते ॥ ६१ ॥ मग ‘करोनी ऐशी त्वरा । जातसां कोठें मुनीश्वरा । ’ ह्मणोनि पुसतां तेणें सारा । वृत्तांत कथिला मला जो ॥ ६२ ॥ तो मी तुजसि करितों श्रुत । मुनि तो बोलला–सुर समस्त । तुह्मांपासून अतिशयित । आजवरी पीडा पावले ॥ ६३ ॥ मग ते जाऊन विष्णूपाशीं । प्रार्थना करिते झाले ऐशी । कीं, तूं दुष्ट हा आधीं नाशी । लंकानाथ रावण ॥ ६४ ॥

अवघी त्रिलोकी पावे क्षीण । ऐसा हा खळ-नायक जाण । तयाचें नेमिलें आहे मरण । मानवा हातीं विधीनें ॥ ६५ ॥ ह्मणोनि प्रभो, तूं मानवरूप । घेवोनि निवटी हा असुर-नृप । तयीं तें श्रीहरी सत्यसंकल्प । मान्य करिता जाहला ॥ ६६ ॥ तोचि हा आतां रघुवंशांत । अवतीर्ण झाला लक्ष्मीकांत । तो तुह्मां सर्वांसही निश्चित । वधील युद्धीं शरांहीं ॥ ६७ ॥ यापरी मुनीनें कथिलें मज । ह्मणून अवो, तूं राक्षसराज । वैर हें सांडूनि त्यातें भज । साक्षात ब्रह्म राम हा ॥ ६८ ॥ भावें भजतां सीताकांत । भक्तांसि शीघ्र प्रसन्न होत । ज्ञान जें मोक्षास पाववीत । भक्ति ही जननी तयाची ॥ ६९ ॥ लीलानुकारी भगवंताचे । अवतार उदंड असती साचे । परी या चिद्रूप श्रीरामाचे । तुळने शतांश सर्वही ॥ ७० ॥ ह्मणोनि मनसा वाचा सदा । भले ते भजती याचे पदा । आणि भवसर्पाची बाधा । वारिती विनाप्रयत्नें ॥ ७१ ॥ जे या रामास सदोदित । ध्याती, गातीहि त्याचें चरित । ते सर्व-सौख्यार्थसारभूत । श्रीरामपदातें पावती ॥ ७२ ॥ मग ते भवसर्पाचा पाश । तोडून मुक्तचि अहर्निश । तयांच्या साम्यास देवदेवेश । इंद्रहि येऊं शकेना ॥ ७३ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७४ ॥ श्रीराम ॥ ४१ ॥ ॥ छ ॥

---

    

# अध्याय ५० वा, कुंभकर्णवध.

श्रीराम ॥ कुंभकर्णाचेंही बोधवचन । मधुरहि परिसून दशानन । विषासमान वांकडें वदन । करून क्रोधें बोलला ॥ १ ॥ अरे, हा उपदेश सांगायास । तुज म्यां आणिलें नाहीं खास । मान्यता देऊन मत्कृत्यास । युद्धास जाईं त्वरेनें ॥ २ ॥ नातरी जा, लोळ शय्येवर । निद्रा तुजसि आली थोर । यापरी बोलतां असुरेश्वर । मौनेंचि येणें ऐकिलें ॥ ३ ॥ मग तयाच्या रोषभयें । सर्वेचि युद्धास निघे स्वयें । पर्वताऐसा आपुल्या कायें । भय दावीत कपींतें ॥ ४ ॥ रणगर्जना करितां थोर । ध्वनि तो पसरला समुद्रावर । सर्वेचि उचलूनि वानरवीर । मुखांत लोटूं लागला ॥ ५ ॥ वर्तनीं केवळ कालांतक । आणि दर्शनीं गिरिच एक । अशा त्या पुढती वानर देख । उभे राहूंच न शकती ॥ ६ ॥ मुद्गर हातींचा फिरवीत । चालला निःशंक हरिसेनेंत । वानर जे जे येती करांत । घास करीत तयांचा ॥ ७ ॥ कित्येक घालून पायांतळीं । कित्येक हातेंचि चुरगळी । असा तो कुंभश्रवण बळी । देखिला बिभीषणानें ॥ ८ ॥ तेधवां ज्येष्ठ भ्रात्यास तया । साष्टांग वंदून बोले—सया । मी हा बिभीषण, असावी दया । मजसि, अनुज म्हणोनि ॥ ९ ॥ देव, म्यां त्या अग्रजवीरा । बोधिलें करूनि नानातऱ्हा । परी तें तिळहि तदंतरा- । माजी नाहीं मीनलें ॥ १० ॥ तयीं तो खड्ग घेऊन त्वरें । मजवरी धावला क्रोधभरें । आणि

' धिक् तुज; मूढा जा रे ' । म्हणूनि पायें लोटिलें ॥ ११ ॥ मग मी आपुल्या मंत्र्यांसहित । जाहलों रामास शरणागत । तयीं तें ऐकूनि बिभीषणोक्त । वीर तो संतोष पावला ॥ १२ ॥ मग प्रीतीनें आलिंगून । बोलला–वत्स, तूं तनु रक्षून । रहा श्रीरामाश्रयेंकरून । वंशस्थितीकारणें ॥ १३ ॥ तूं तों महान भागवत । म्हणोनि पूर्वींच मातें श्रुत । नारदें मज हा सर्व वृत्तांत । सांगून पूर्वीं ठेविला ॥ १४ ॥ तरी तूं एधवां दूरचि राहीं । रणमर्दें मी मूढ झालों पाहीं । पर कीं आपुला, ऐसा कांहीं । भेद मी आतां न जाणें ॥१५॥ तंव ते कुंभकर्णाचे बोल । ऐकतां लोचनीं आलें जल । मग वंदून चरणयुगुल । बिभीषण दूर जाहला ॥ १६ ॥ सवेंचि तो कुंभकर्णासुर । उन्मत्त गजेंद्राचे अनुसार । हस्तपादांहीं वानरवीर । चुरडीत वेगें चालला ॥ १७ ॥ मग तें देखून श्रीरघुवीर । वायव्यास्त्राचा सोडी शर । तेणें तयाचा दक्षिण कर । छेदिला मुद्गरासवें पै ॥ १८ ॥ तंव तो असुर भयंकर । गर्जना करिता झाला थोर । करहि तो पडतां भूमीवर । रगडी कित्येक कपींतें ॥ १९ ॥ तेधवां समस्त वानरवीर । धाकें पळोनि गेले दूर । आणि राक्षस-श्रीरघुवीर । लढतां आश्चर्यें देखती ॥ २० ॥ कर तो तुटोनि जातां असुरें । तरु एक उपडोनि दुज्या करें । धावोनि राघवाअंगीं त्वरें । फेकिला थोर बळानें ॥ २१ ॥ तेधवां ऐंद्र शर सोडून । तोहि कर छेदी रघुनंदन । मग तो तैसाच मुख पसरून । धावोनि येऊं लागला ॥ २२ ॥ मग आणीक दोन शर । काढून सोडी श्रीरघुवीर । आणि पायहि दोन्ही सत्वर ।

छेदिता झाला तयाचे ॥ २३ ॥ तेधवां जाहला मोठा ध्वनि । आणि पाय ते त्याचे दोन्ही । लंकाद्वारांत मध्यस्थानीं । जाऊन आदळले पैं ॥ २४ ॥ मग त्या करचरणांहीं रहित । असुरें करोनि घनगर्जित । मुख जें विकराळ अतिशयित । वडवानळासारिखें ॥ २५ ॥ तेंचि पसरून केली त्वरा । गिळाया रघुवंशींचा हिरा । तयीं तो राहुचि रजनीवरा । ग्रासूं आला वाटलें ॥ २६ ॥ परी राघवें निजशरांहीं । मुख तें तत्काळ भरिलें पाहीं । तयीं तो विलक्षण ऐसा कांहीं । आक्रोश करिता जाहला ॥ २७ ॥ त्यावरी प्रखर जो रविच्या सम । शर एक काढून अत्युत्तम । ओढून सोडीतसे श्रीराम । निःशेष निवटावयातें ॥ २८ ॥ तयीं तो वज्राऐसा शर । तत्काळ तयाचें उडवी शिर । मग तें पुरीच्या द्वारावर । पडून रोधी तयातें ॥ २९ ॥ सर्वांचि देहही जलधीवरी । पडून नक्रादिकांतें चुरी । खळ तो बलाढ्य महाशरीरी । या रिती अंतीं निमाला ॥ ३० ॥ तेधवां आनंद पावूनि देव । ऋषि, पन्नग, खग, गंधर्व । सिद्ध, यक्ष, गुह्यक सर्व । सुमनें वर्षूं लागले ॥ ३१ ॥ तेधवां भेटावें रघुवीरास । ऐसी अंतरीं धरून आस । मुनिवर नारद त्या स्थानास । स्वर्गांतूनी पातले ॥ ३२ ॥ मग किंचित ताम्रनयन । धनुर्धारी तो रघुनंदन । कपिसेनेचें अवलोकन । करितां तेणें देखिला ॥ ३३ ॥ शरांहीं जाहले व्रण देखून । दयार्द्र जाहलें ज्याचें मन । प्रभु तो देखतां मनमोहन । दाटलें हृदय मुनीचें ॥ ३४ ॥ मग ह्मणे–देवेश त्रिजगन्नाथ । तूं या सर्वांस आश्रयभूत । पर-

मात्मा श्रीलक्ष्मीकांत । नमोस्तु तूतें परेशा ॥ ३५ ॥ केवळ चिद्रूप तूं ईश्वर । लोकीं दाविसी मनुजाकार । सुखदुःखांचाहि मिथ्या भार । वाहतां दाविसी मायया ॥ ३६ ॥ तेणेंच निजरूप आच्छादून । सर्वांतरीं त्वां केलें स्थान । परी तूं केवल प्रकाशघन । ठाउका शुद्धान्तरांतें ॥ ३७ ॥ प्रभो, तूं उघडिसी जें लोचन । तेधवां सृष्टि ही पावे जनन । आणि ते घेतलिया झांकून । प्रलय होय तियेचा ॥ ३८ ॥ ज्या तुजपासून जगदुत्पत्ती । ज्या तुज अंगीं जगाची स्थिति । त्या तुज अद्वयरूपाप्रती । प्रणाम एकात्मयातें ॥ ३९ ॥ प्रकृति, पुरुष, आणि काल । व्यक्त, अव्यक्त, तूं जगपाल । मुनींद्र जयाचें जाणती मूळ । नमन त्या ब्रह्मस्वरूपा ॥ ४० ॥ ब्रह्म हें विकाररहित शुद्ध । प्रगटलें जगदाकारें सिद्ध । यापरी जीवांस सांगे बोध । श्रुतिमाता ही दयेनें ॥ ४१ ॥ परी हें श्रुतीचें निवेदित । जनांस भासे विरोधयुत । देव, तयांतें श्रुतिसिद्धांत । त्वत्कृपेवीण कळेना ॥ ४२ ॥ परंतु देव, हें तुझें चरित । मायागुणांहीं रूपा येत । ह्मणूनि विरोध श्रुतिमतांत । तिळहि येऊं शकेना ॥४३॥ ज्यापरी रवीच्या किरणांवरी । भासतें मृगजळ वनांतरीं । देव, तैसें त्वद्रूपावरी । विश्व हें भासे भ्रमानें ॥ ४४ ॥ देव, तें तुझें निर्गुणपण । मनास विषयचि नोहे जाण । मग भजाया उपाय कोण । अव्यक्त तुझ्या स्वरूपा ॥ ४५ ॥ म्हणोनि अवतारस्वरूपें तव । भजती मतिमान ते मानव । आणि हा भवाचा महार्णव । तरून जाती तयानें ॥ ४६ ॥ परी येथ कामक्रोधादि अरी । गोवून

पीडिती वारिचेवरी । मूषकां मार्जार तेणेंपरी । भिवविती नित्य मनातें ॥ ४७ ॥ परी जे तुझें स्मरती नाम । आणि तुज ध्याती सीताराम । चारित्र गाऊन, शुद्ध प्रेम । ठेवूनि तूतें पूजिती ॥ ४८ ॥ ऐसिया जनांस हा भव नेमें । गोष्पद ऐसाचि देवा गमे । जयांचा सर्वहि काळ क्रमे । भक्तजनांच्या संगतीं ॥ ४९ ॥ ह्मणोनि याचि त्वद्रूपाप्रत । ध्यात मी विहरतों त्रैलोक्यांत । मुक्त मी तेणेंचि पूज्य होत । स्वर्गीय देवादिकांतें ॥ ५० ॥ प्रभो, तूं कार्य हें अत्यद्भुत । केलेंसे देवजनांनिमित्त । भूभार मोठाचि केला हृत । कुंभकर्णाच्या वधें त्वां ॥ ५१ ॥ उदयीक सुमित्रेचा सुत । करील इंद्रजितातें हत । आणि दशाननाचा घात । परवां घडेल त्वत्करें ॥ ५२ ॥ सर्व तो प्रकार गगनांतून । सिद्धांसह मी अवलोकीन । देव, मी स्वर्गास कारितों गमन । मजवरी कृपा असों दे ॥ ५३ ॥ यापरी स्तवन करून मुनी । नारद चालले गगनांतूनी । इकडे दशाननाचे कानीं । वृत्त बंधूचें पातलें ॥ ५४ ॥ तंव तो तत्काळ भूमीवरी । मूर्छित होऊनि पडला भारी । सावध झाल्याहि नानापरी । विलाप करूं लागला ॥ ५५ ॥ तयीं तो निःसीम दुःखाक्रांत । देखूनि बोलला इंद्रजित । देव, मी जिवंत या लोकांत । तंव किमर्थ दुःख हें ॥ ५६ ॥ शोक हा सोडून ऐसा सारा । निश्चिंत व्हा जी असुरवरा । रिपूस विनटूनि येण्या पुरा । हा मी समर्थ एकला ॥ ५७ ॥ निकुंभिलेसि वेगें करून । जाऊन, अग्नि हा वश करून । करितां रथादि संपादन । अजिंक्य मी या जगाला ॥ ५८ ॥ मग

बोलून ऐसें त्वरित । इष्टस्थळासि इंद्रजित । जाऊन हवनास आरंभीत । अग्निप्रसादाकारणें ॥ ५९ ॥ रक्तमाळा, रक्त वसन । रक्त गंधाचें अनुलेपन । आणिक मौनही स्वीकारून । खळ तो व्रतस्थ जाहला ॥ ६० ॥ इकडे बिभीषणें ती कथा । ऐकून कळविली श्रीरघुनाथा । ह्मणे—होम हा संपूर्ण होतां । देव, हा कोणा नावरे ॥ ६१ ॥ ह्मणोन जाऊन लक्ष्मणासहित । आतांच त्यासि मी करितों हत । आह्मां उभयांस देवें त्वरित । आज्ञापावें कृपेनें ॥ ६२ ॥ तेधवां बोलला रघुनंदन । रे, मीच करितों तेथें गमन । आणि तत्काळ त्यातें वधीन । अग्निअस्त्रप्रयोगें ॥ ६३ ॥ तेधवां पुनश्च बिभीषण । बोलला—तयाचें देवा, मरण । विधीनें लक्ष्मणाहातींच जाण । नेमून आहे ठेविलें ॥ ६४ ॥ द्वादशवर्षें निद्राहार । जेणें नेमेंचि केला दूर । तेणेंचि खळ हा किजे ठार । ऐसा नेम विधीचा ॥ ६५ ॥ आणि लक्ष्मणें हेंचि व्रत । पाळिलें तितुकें दिनपर्यंत । देव, या तुझिया सेवेनिमित्त । मज हें आहे ठाउकें ॥ ६६ ॥ शेष हा प्रत्यक्ष धराधर । हाचि या खळास निवटी वीर । ह्मणोनि देव श्रीरघुवीर । द्या जी आज्ञा त्वरेनें ॥ ६७ ॥ प्रभो तूं नारायण साक्षात । आणि हा शेषाचि सुमित्रासुत । अवतीर्ण झालांत या जगतांत । भूभारहाराकारणें ॥ ६८ ॥ ह्मणोनि तुमचिया अंगीं देव । सकळहि सामर्थ्याची ठेव । तुमचिया अधीन सारे जीव । जडहि तैसे सर्वथा ॥ ६९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृती ॥ ७० ॥ श्रीराम ॥ ५० ॥

## अध्याय ५१ वा, इंद्रजिद्वध.

श्रीराम ॥ बिभीषणाच्या वचनावर । बोलता झाला श्रीरघुवीर । साच हा दशाननाचा कुमर । नाना-मायाप्रयोगी ॥ १ ॥ आणि ब्रह्मास्त्र त्याच्यापाशीं । प्रखर तें वर्तते अहर्निशीं । लक्ष्मणहि तैसाच तपाचा राशी । आणि योद्धाही प्रचंड ॥ २ ॥ सर्व हें पूर्वींच मज ठाउकें । परी मी बोललों नाहीं मुखें । कार्यमाहात्म्य जें कां निकें । ध्यानीं आणूनि तयातें ॥ ३ ॥ मग लक्ष्मणास संबोधून । बोलला--वत्स तूं वेगें करून । करावा इंद्रजिताचें हनन । निघावें हनुमंतासंगतीं ॥ ४ ॥ ऋक्षराजा हा जांबवंत । आपुल्या संपूर्ण सेनेसहित । आणि बिभीषणहि खचित । येतील साह्यानिमित्तें ॥ ५ ॥ ज्या देशीं कीं ज्या विवरांत । एथवां वर्तती इंद्रजित । हवनस्थळ तें यातें ज्ञात । राक्षसभावेंकरूनि ॥ ६ ॥ तयीं तें ऐकतां सुमित्रासुत । धनुष्य आपुलें घेऊन त्वरित । बोलला होऊन आनंदित । स्पर्शून रामपदांतें ॥ ७ ॥ आजि हे माझे विजयी शर । छेदून इंद्रजिताचें शिर । स्नानार्थ भोगावतीचे वर । जाणार पाताळांतरीं ॥ ८ ॥ यापरी बोलून, प्रदक्षिणा । घालून तीन त्या सीतारमणा । वीर तो पराक्रमाचा राणा । चालला वेगें रणातें ॥ ९ ॥ मग चालली त्याच्या पाठीं । हनुमंताची सेना मोठी । बिभीषणही आपुली दृष्टी । मार्गीं लावून चालला ॥ १० ॥ जांबवंतहि चालला सवें । ऐसे वीर ते सारे जवें । पावले निकुंभिलेच्या नांवें । प्रसिद्ध

तया स्थळातें ॥ ११ ॥ तेथ ते नयनीं असुरगण। देखतां तत्काळ तो लक्ष्मण। वेगें तयांशीं कराया रण। सिद्धता करिता जाहला ॥ १२ ॥ तंवचि तो बोले बिभीषण। हाचि तत्समस्त सैनिकगण। याचेंचि एधवां निराकरण। पाहिजे केलें शरांहीं ॥ १३ ॥ मग तो राक्षसेंद्राचा सुत। दृष्टीस येईल इंद्रजित। त्यातेंहि मग त्वां सुमित्रासुत। ऐसेंच वेगें वधावें॥ १४ ॥ दुष्ट हा परपीडातत्पर। शीघ्रचि केला पाहिजे ठार। जंव हा होमप्रकार थोर। सिद्धीस नाहीं पावला ॥ १५ ॥ तंव तें ऐकतां लक्ष्मण वीर। दशाननाच्या कुमरावर। उदंड सांडिता झाला शर। पर्जन्यवृष्टीप्रमाणें ॥ १६ ॥ कपिही तत्काळ वृक्ष-गिरी। उचलून घेती आपुले शिरीं। आणि गर्जून, असुरांवरी। धांवूनि फेकूं लागले ॥ १७ ॥ असुरहि मग ते खवळून फार। हातीं शस्त्रें घेऊन थोर। धावले सारेहि कपींच्यावर।। आणि झोडूंचि लागले ॥ १८ ॥ तेधवां परस्परांचे वीर। उदंड पडिले भूमीवर। युद्ध तें ऐसें होऊन घोर। तुंबळ संज्ञा पावलें ॥ १९ ॥ यावरी आपुले सैनिक सारे। पळतां देखूनि रावण-कुमरें। होमादि कर्म तें तत्काळ पुरें। करून वेगें उठिला ॥ २० ॥ मग पाऊन क्रोधभर। तत्काळ चढला रथावर। आणि हाक फोडूनि थोर। बोलला रामानुजातें ॥ २१ ॥ वीरा, अरे तूं सुमित्रासुत। देख मी साक्षात इंद्रजित। आतां येथून तुज जिवंत। सुटका होऊं शकेना ॥ २२ ॥ तंवचि आपुला पितृव्य तेथ। बिभीषण देखूनि बोले मात। अवो तूं बंधुचि कीं साक्षात्। होऊन माझ्या पित्याचा ॥ २३ ॥ जन्मूनि वाढलासी ज्यां घरीं।

त्या स्वजनांशीं झालासि वैरी । आणि या शत्रूची चाकरी । करिसी निर्लज्जपणानें ॥२४॥ अवो, द्रोह हा मज पुत्रासी । करिसी सांडूनि कुलरीतीसी । तो तूं महान् पापी होसी । धिक्कार तूतें खळातें ॥ २५ ॥ यापरी बोलून तेणें त्वरित । पुढती देखिला सुमित्रासुत । मग धनूतें घालून हात । टणत्कार केला तयाचा ॥ २६ ॥ आणि समस्त कपींलागून । गर्जून ऐसें बोले वचन । अहो हें तुमचें प्राणधन । हरिलें जाणा शरें या ॥२७॥ तंवचि सुमित्रासुतहि थोर । खवळून धनूस जोडी शर । आणि ओढून असुरावर । नेमें सोडिता जाहला ॥ २८ ॥ मग तो खळ जों संतापून । देखे, तंवाचि वेगेंकरून । लक्ष्मणें हजारों शर सोडून । विंधिलें सर्वांग तयाचें ॥ २९ ॥ तेधवां तो वीर इंद्रजित । नावेक मूर्छित पडिला तेथ । मागुती सावध झाला त्वरित । मुहूर्तमात्रेंकरोनी ॥ ३० ॥ मग संताप पावून थोर । धावला लक्ष्मणवीरावर । आणीक धनूस जोडोनि शर । तयास ऐसें बोलला ॥ ३१ ॥ अरे तूं युद्धांत दिवशीं पहिले । मत्तेज नाहींस अवलोकिलें । तरी तुज दावितों आतां वहिलें । थांब नावेक एधवां ॥ ३२ ॥ यापरी बोलून बाण सात । सोडून विंधी सुमित्रासुत । आणी दहांहीं श्रीहनुमंत । खळ तो विंधी त्वरेनें ॥ ३३ ॥ मग आणीक क्रोधभर । येऊन काढून शंभर शर । सोडून विंधिलें तेणें सत्वर । पितृव्य बिभीषणातें ॥ ३४ ॥ सुमित्रासुतेंही शत्रूवर । हजारों शरांचा केला मार । आणि तोडून केलें चूर । सुंदर चिलखत तयाचें ॥ ३५ ॥ सवेंचि दशाननाचा कुमर । क्रोधें आणीक चढून

वर । विंधिता झाला लक्ष्मण वीर । एक सहस्र शरांहीं ॥ ३६ ॥ लक्ष्मणा अंगींचें चिलखत । यापरी तेणेंहि भंगिलें त्वरित । वीर ते ऐसे उसनें त्वरित । फेडिती परस्परांचे ॥ ३७ ॥ धांवूनि झोडिती एकमेकांस । टाकिती सर्पाऐसे श्वास । घाय लागून सर्वांगास । न्हाले रक्तें करोनी ॥ ३८ ॥ या रिती उदंड काळवरी । वीर ते आपुल्या प्रखर शरीं । झगडती, परी ती जयाची बारी । कोणास येतां दिसेना ॥ ३९ ॥ यावरी लक्ष्मणें पांच शर । काढून सोडिले शत्रूवर । आणि रथाचा केला चूर । सारथ्या-अश्वांसवें पैं ॥ ४० ॥ तैसेंच धनुहि तोडून शरें । दाविलें स्वतेज त्यातें पुरें । तेणें आणीक घेतां करें । तेंहि तत्काळ तोडिलें ॥ ४१ ॥ मग त्या धनुष्यहीनावर । तैसेच कित्येक सोडी शर । तंव तो असुरेशाचा कुमर । धनु आणीक घेतसे ॥ ४२ ॥ मग रविसमान दिव्य शर । सोडून विंधी लक्ष्मण वीर । सर्वेचि शरांचा करून पूर । कपिहि तेणें विंधिले ॥ ४३ ॥ मग त्या लक्ष्मणें ऐंद्र शर । काढूनि लाविला धनुष्यावर । आणिक स्मरूनि श्रीरघुवीर । शर तो आकर्ण ओढिला ॥ ४४ ॥ मग म्हणे जरि या भूमीवर । एकला श्रीराम हो कां वीर । आणि सत्यप्रतिज्ञ थोर । धर्मशालीही जरी हो ॥ ४५ ॥ तरी हा तत्काळ माझा शर । उडवील इंद्रजिताचें शिर । यापरी बोलून तेणें सत्वर । बाण तो वेगें सोडिला ॥ ४६ ॥ तंवचि तो लक्ष्मणाचा बाण । कुंडलें आणखी शिरस्त्राण । यांसवें शिर तें छेदून पूर्ण । पाडिता जाहला भूवरी ॥ ४७ ॥ तेधवां संतुष्ट झाले सुर । आणि

प्रीतीनें राघवावर । सुमनवर्षाव करिती थोर । गुणही गाती आवडी ॥ ४८ ॥ परम तो संतोषला देववर । प्रभुतें स्तविती मुनिप्रवर । दुंदुभी झडूनि, गगनभर । नाद तो कोंदे सारिखा ॥ ४९ ॥ सर्व निर्मल झालें गगन । धराही पावली स्थैर्य घन । तोषलें समस्तांचेंहि मन । निधन ऐकूनी खळाचें ॥ ५० ॥ लक्ष्मणाचाही श्रमपरिहार । जाहला, पडतांचि हा भूवर । मग तो दाटून विजयभर । फुंकिला शंख तयानें ॥ ५१ ॥ तंवचि सिंहनाद थोर । करीत धनूचा टणत्कार । ध्वनि तो ऐकून वानरवीर । सर्व विश्राम पावले ॥५२ ॥ मग ते समस्त विजयभरें । तोषून परतले मार्गें त्वरें । स्थळास येतांच लक्ष्मणवीरें । वंदिलें श्रीरामपदांतें ॥ ५३ ॥ सर्वेचि हनुमंत-बिभीषण । वंदिती श्रीरामाचे चरण । सकळांचेंही अंतःकरण । भक्तिभावानें दाटलें ॥ ५४ ॥ वंदितां बोलिला सुमित्रासुत । त्वत्प्रसादेंचि श्रीरघुनाथ । समरीं वीर हा झाला हत । इंद्रही जेणें जिंकिला ॥ ५५ ॥ तयीं तें बोलणें होतां श्रुत । परम संतोषें श्रीरघुनाथ । हृदयीं तयास धरून त्वरित । स्नेहें करोनी बोलला ॥ ५६ ॥ लक्ष्मणा ! तुवां हें केउतें काज । जाणिजे मोठेंचि केलें आज । आतां कोणीच शत्रु मज । उरला नाहीं पाहतां ॥ ५७ ॥ त्रिरात्र आणि तीन दिवस । झगडून अंतीं त्या वीरास । तुवां जें मेळविलें भूमीस । साधलें सारें तयानें ॥ ५८ ॥ आतां पुत्रनिधनाच्या घोर । दुःखें शीघ्र तो असुरेश्वर । येईल मजसि कराया समर । मग मी निवटीन तयातें ॥ ५९ ॥ यापरी बोलला श्रीरघुवीर । वृत्त तें इकडे

असुरेश्वर । ऐकून मूर्छित पडला सत्वर । पर्वताऐशा संकटें ॥ ६० ॥ मग उठून, दीन फार । होऊन विलाप चालवी घोर । ध्यानीं आणोनि वारंवार । गुणकर्मेंही सुताचीं ॥ ६१ ॥ म्हणे हो आजि देवगण । महार्षि, लोकापालादि जाण । ऐकून इंद्रजिताचें मरण । पहुडतील सुखें पैं ॥ ६२ ॥ मग त्या पुत्रनाशें करून । शूर तो जाहला क्रोधाधीन । आणि सीतेस खड्ग उपसून । मारायातें धांवला ॥ ६३ ॥ तयीं तो खड्ग घेऊनि खळ । क्रोधें येतांचि राक्षसपाळ । भयशोकांहीं परमाकुल । जाहली सीता सती ती ॥ ६४ ॥ इतुकियांतचि सुपार्श्व नाम । असुरेशाचा सचिवोत्तम । पुढती होऊन विशुद्ध काम । असुरेशाशीं बोलला ॥ ६५ ॥ देव, तूं उत्कृष्ठ वेदज्ञानी । स्वकर्मीं निष्ठा धरिसी मनीं । वैश्रवणाचा अनुज होवोनी । मंडित नाना गुणांहीं ॥ ६६ ॥ तो तूं स्त्रियेचा कराया घात । झालासि कैसा वो उद्यत । अरे त्वां जाऊन आम्हांसहित । श्रीराम आधीं वधावा ॥ ६७ ॥ मग सुखेंचि ही जानकी । पट्टराणी त्वां कीजे निकी । यापरी सुपार्श्वे बोधितां शेखीं । खळ तो निवृत्त जाहला ॥ ६८ ॥ मग तैसाच शोक करित । परतून आला निज सदनांत । मग तेथून सभेस येत । मित्रांसमवेत आपुल्या ॥ ६९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥७०॥ श्रीराम ॥५१॥

## अध्याय ५२ वा, रावणहोमध्वंस.

श्रीराम ॥ मग आपुल्या मंत्र्यांसहित । विचार पाहून राक्षसनाथ । शेष जे राक्षस त्यांच्या समेत । राघवावरती निघाला ॥ १ ॥ पतंगें पतंग घेऊन सर्वे । पेटल्या दीपावरती जवें । धाविजे तैशीच कृति ही भावे । पाहतां लंकेश्वराची ॥ २ ॥ असो, ते राघवें राक्षस सारे । निवटिले स्वशरें करूनि त्वरें । आणि त्या खळास एकें शरें । विंधिले वक्षःस्थळीं पै ॥ ३ ॥ तयीं तो विशेषें होऊनि व्यथित । परतून गेला लंकेआंत । हनुमान आणीक सीताकांत । पौरुष देखूनि तयांचें ॥ ४ ॥ मग शुक्राचेपाशीं सत्वर । जाऊन घालून नमस्कार । कर जोडून लंकेश्वर । प्रार्थिता झाला तयातें ॥ ५ ॥ देव, या राघवें सारें पुर । आणि आंतील असुरवर । पुत्रपौत्रादि केले ठार । पहा जी समरनिमित्तें ॥ ६ ॥ देव, हा ऐसा दुःखगिरी । आपणांसमक्ष माझियावरी । लोटला; अहो ही केउती परी । नवलाईची पहा कीं ॥ ७ ॥ यापरी गुरूतें विज्ञापितां । शुक्राचार्य तो सांगे स्वतां । बा होम तूं एक कीजे आतां । जाऊन गुप्तस्थळातें ॥ ८ ॥ निर्विघ्नपणें हा होम पूर्ण । समाप्त होतांच तूतें तूर्ण । होमाग्नींतून चापबाण । रथहि लाभेल निश्चयें ॥ ९ ॥ मग तूं अजिंक्य सर्वां वीरां । सर्वथा होशील लंकेश्वरा । ह्मणून होमास कीजे त्वरा । मंत्र मी तूतें देतसें ॥ १० ॥ तंव तें ऐकून लंकेश्वरें । आपुल्या गृहींच अत्यादरें ।

विवर एक निर्मिलें त्वरें । पाताल लोकासारिखें ॥ ११ ॥ मग लावूनि नगरद्वारें । होमद्रव्यहि जोडून सारें । अघोर कर्म तें असुरेश्वरें । भीतरीं आरंभिलें पै ॥ १२ ॥ त्यावरी धूम तो उसळून वर । येतां देखून बिभीषण वीर । चिंता उपजोनि दावी सत्वर । सर्व तें श्रीराघवातें ॥ १३ ॥ ह्मणे हा लंकेश करितो होम । ह्मणून उसळला ऐसा धूम । कर्म हें समाप्त होतां राम । खळ तो कोणा नावरे ॥ १४ ॥ ह्मणोनि विघ्न कराया तेथ । पाठवी कपीश्वरातें त्वरित । तंव तें मानूनि श्रीरघुनाथ । सुग्रीवातें निवेदी ॥ १५ ॥ मग सुग्रीव आज्ञा करी । तंव ती वानरसेना सारी । सत्वर शिरून लंकेमाझारी । मंदिरीं त्याच्या पावली ॥ १६ ॥ आणि मंदिररक्षकें सारीं । उडविलीं तत्काळ त्या कपिवीरीं । गज-अश्व तेही क्षणाभीतरीं । मेळविले पंचात्मतेला ॥ १७ ॥ तैं तेथ सरमा नामें सती । बिभीषणाची भार्या होती । तिणें त्या होमस्थानाप्रती । हस्तसंज्ञेनें दाविलें ॥ १८ ॥ तेधवां तत्काळ वालिकुमर । ते स्थळीं जाऊन, शिला जी वर । ठेविली, तियेचा करून चूर । भीतरीं प्रविष्ट जाहला ॥ १९ ॥ तेथ तो आसनीं लंकानाथ । नयनें मिटूनि होता स्थित । तंव तो देखतां कपि समस्त । तेथ येऊन ठाकले ॥ २० ॥ मग कल्लोळ करिती थोर । झोडिती धरून तत्किंकर । होमद्रव्यही भूमीवर । फेकून देती तयाचें ॥ २१ ॥ माळ जी तयाचे होती करीं । तीच त्या वातजें ओढून बरी । तैशीच तयाचे पाठीवरी । मारिली नाना परींहीं ॥ २२ ॥ कोणी द्विजांहीं चावा घेती । कोणी काष्ठेंचि

झोडपिती । परी तो जयेच्छु लंकापती । न सोडी ध्यान कदापि ॥ २३ ॥ मग अंगदें अंतःपुरीं । जाऊन धरून केशांवरी । तयाची राणी मंदोदरी । आणिली पुढती तयाच्या ॥ २४ ॥ तंव ती सनाथा अनाथवत् । विलाप करूं लागली तेथ । अंगदें तियेची रत्नखचित । चोळी फाडून काढली ॥ २५ ॥ सवेंचि कमरपट्टाहि थोर । तोडून पाडिला भूमीवर । तैं तीं मोतीं रत्नें सुंदर । भूवरी सर्वत्र फांकलीं ॥ २६ ॥ लुगडियाची ग्रंथि सुटून । खालीं घसरलें तिचें वसन । भूषणें सर्वही तटतटून । भूमीस गोळा जाहलीं॥२७ ॥ ऐशी मंदोदरीची परी । करून मग त्या वानरवीरीं । आणीक ज्या ज्या त्याच्या नारी । त्याहि तेथें आणिल्या ॥ २८ ॥ तंव ती सुंदरी मंदोदरी । पतिचिया पुढती दीनापरी । दुःखें आक्रंदे, रुदन करी । सवेंचि बोले पतीतें ॥ २९ ॥ अवो, तूं निर्लज्ज होसी किती। भार्या तुझीच तुझिया पुढती । खळ हे गांजिती ऐशा रीती । आणि तूं नयनें देखसी ॥ ३० ॥ अहो! समक्षचि ज्याची नारी । पीडिती निःशंक त्याचे अरी । तेणें तेथेंचि मरावें परी । मुख तें दावूं नये कीं ॥ ३१ ॥ अहा, रे बाळा इंद्रजिता । तुझी ही वानरें छळिती माता । जैं तूं असतास या भूवरता । तरी ही वेळा न येती ॥ ३२ ॥ अहा रे दैवा, हा पतिराज । येणें सोडिली सारी लाज । यासि स्त्रीचेंहि नुरलें काज । एका स्वदेहाकारणें ॥ ३३ ॥ यापरी तियेचा दुःखाक्रोश । ऐकतां क्षोभून तो असुरेश । सोड रे मर्कटा या देवीस । ह्मणतां वेगें उठिला ॥ ३४ ॥ सवेंचि कटिप्रदेशावरी । अंगदालागीं

प्रहार करी । व्रत तें भंगतांच ऐशिया परी । कपि ते सारे पळाले ॥ ३५ ॥ मग तो भार्येस दशानन । बोधिता झाला तत्वज्ञान । शोक सांडून जेणेंकरून । सांत्वन व्हावें मनाचें ॥ ३६ ॥ ह्मणे हे प्रिये, तूं ऐसें पाहीं । दैवचि बलाढ्य कोणेकाही । जग हें सदैव अधीन राही । निश्चयें देख तयाच्या ॥ ३७ ॥ सुखदुःखें हा दैवाधीन । जाणून शोक तूं दे सांडून । आणि आत्मज्ञानेंकरून । चित्तविश्रामा वरी वो ॥ ३८ ॥ शोक हा अज्ञानाअंतरीं । प्रगटून ज्ञान तें सारें हरी । आणि या अज्ञानें देहावरी । अहंता वाटूं लागते ॥ ३९ ॥ याचि अहंभावनेनिमित्त । पुत्रदारांशीं संबंध येत । आणि येणेंचि नाना योनींत । जीवास लागे भ्रमाया ॥ ४० ॥ हर्ष, भय, मोह, शोक । काम, क्रोध, लोभादिक । सर्व हें अज्ञानयोगेंचि देख । जन्म मृत्यु जराहि ॥ ४१ ॥ आत्मा सकळ संगविहीन । आणखी भिन्न या सर्वांहून । आनंदरूप ज्ञानघन । सर्व भावांहीं वर्जित ॥ ४२ ॥ त्या सद्रूप आत्मतत्वाला । संयोग वियोग कोणें केला । ऐशा अशक्यतेच्या बोला । श्रवणीं घेऊं नको तूं ॥ ४३ ॥ यापरी विशुद्ध स्वरूप निज । जाणून प्रिये तूं शोक त्यज । आतांचि जाऊन मी रघुराज । मारुन येतों त्वरेनें ॥ ४४ ॥ अथवा स्वशरें श्रीरघुनाथ । समरीं करील माझा घात । तरी मी त्याचिया पदाप्रत । जाईन नित्यनिवासा ॥ ४५ ॥ मग तूं करून माझी क्रिया । निवटी श्रीरामाची जाया । मग तूं पावकीं प्रवेशावया । येई संगें माझिया ॥ ४६ ॥ यापरी पतिवच श्रवणीं येतां ।

सती ती होऊन अतिदुःखिता । ह्मणे–हो श्रवणीं ध्या जी नाथा । गोष्ट माझी एतुली ॥ ४७ ॥ देव, हा श्रीराम कोणेकाहीं । जिंकूं येईल ऐसा नाहीं । साक्षात भगवान तो हा पाहीं । प्रधानपुरुष ईश्वर ॥ ४८ ॥ पूर्वकल्पीं हा परमेश्वर । अंगें धरून मत्स्यशरीर । सकळ संकटांपासून सत्वर । मनूस रक्षिता जाहला ॥ ४९ ॥ येणेंचि समुद्रमंथनकालीं । कनकाचलास पाठी दिली । कूर्म होऊन महाबली । लक्ष योजन विस्तरें ॥५०॥ येणें वराहरूप धरून । काढिलें महीस वरि ओढून । आणि हिरण्याक्ष ह्मणून । दैत्य तो कोपें मारिला ॥ ५१ ॥ मग नारसिंह शरीर । धरून हाचि परमेश्वर । कौशलें करिता झाला ठार । हिरण्यकशिपूकारणें ॥ ५२ ॥ मग वामनरूप धरून । त्रिपदेंकरून बळीचें दान । घेऊन देवेंद्राचें स्थान । येणेंचि देखा रक्षिलें ॥ ५३ ॥ पुढती क्षात्रिय आसुर वीर । माजून भूमीस झाला भार । तो सर्व परशुरामावतार । धरून येणें वारिला ॥ ५४ ॥ तोचि हा अनादि परमेश्वर । सध्यां होवोन श्रीरघुवीर । पातालासे या भूमीवर । नाथ, आपुल्या निमित्तें ॥ ५५ ॥ सीता तत्प्रिया अरण्यांतुनी । आणिली कां वो, माझ्या भुवनीं । मत्पुत्राच्या नाशालागुनी । आणि वधार्थ आपुल्या ॥ ५६ ॥ नाथ, आतांहि तयाची राणी । तयास नेऊन भेटवा झणीं । आणि राज्यपदाचे ठाणीं । बैसवा बिभीषणातें ॥ ५७ ॥ मग सकळसंगविहीन । होऊन दोघेही सेवूं वन । आणि निःसंगतेचें धन । जोडून पावूं सुखातें ॥ ५८ ॥ यापरी बोलत असतां सती । तियेस बोलला लंकापती ।

प्रिये, ही सांगसी ऐसी रीती । उचित कैशी आपणां ॥ ५९ ॥ समरीं पुत्र-बांधव-वीर । राघवाकरवीं करून ठार । आजि मीं सेवून वनांतर । प्राण रक्षावे केउते ॥ ६० ॥ ह्मणून रामाशीं करीन रण । अंगीं सेवीन त्याचे बाण । आणि त्यांहीं साधून मरण । जाणार विष्णु-पदीं मी ॥ ६१ ॥ श्रीराम साक्षात नारायण । सीता लक्ष्मीच ऐशी खूण । जाणुन मग मीं केली हरण । भार्या त्याची बळानें ॥ ६२ ॥ राघवा हातून यावें मरण । मग पावावें पद निर्वाण । ऐसाचि भाव हें अंतःकरण । तैंहून धरून राहिलें ॥ ६३ ॥ म्हणुनी प्रिये, मी तुझियासहित । समस्त पातकें करून धूत । रामबाणानें होवोनि मृत । जाणार मोक्षपदातें ॥ ६४ ॥ क्लेशादि नाना लाटा ज्यांत । आणि युग हे भोंवरे होत । तैसेंच स्त्री-पुत्रादि गोत । मत्स्य आंतील जयाच्या ॥ ६५ ॥ आणि जयांत मदनें पाश । टाकिला जीवांस गोवायास । तो भवसमुद्र तरून खास । चाललों रामाकडे मी ॥ ६६ ॥ यापरी अंतरंगींचा भाव । प्रियेस सांगत असतां राव । क्षणैक विसरून जगाची माव । परमानंदांत मीनला ॥ ६७ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६८ ॥ श्रीराम ॥ ५२ ॥ ७ ॥

    

अ. रा. २४

## अध्याय ५३ वा, रावणवध.

श्रीराम ॥ यापरी निजपत्नीशीं बोल । बोलून तो सर्व--राक्षसपाल । रामाशीं युद्ध कराया तत्काल । समरांगणासी निघाला ॥ १ ॥ सकळ शस्त्रास्त्रांहीं युत । जोडिला षट्चक्रांचा रथ । आणि चढून झाला स्थित । संगें राक्षस चालले ॥ २ ॥ रथास जोडिले होते खर । जयांचीं वदनें परम घोर । पिशाचाऐशींच भयंकर । विचित्र शोभा तयाची ॥ ३ ॥ यापरी लंकेश्वराची स्वारी । चालली समरांगणाचे वरी । तंव तें देखूनि सेना सारी । कपींची चित्तीं धाकली ॥ ४ ॥ एक तो हनुमंत वीराग्रणी । धावून पुढती झाला झणीं । आणि राक्षसेंद्रातें हाणी । मुष्टिप्रहार जबानें ॥ ५ ॥ तंव त्या प्रहारें असुरेश्वर । तत्काळ पडला भूमीवर । मूर्च्छा पावोनि मुहूर्तभर । मागुती वेगें उठिला ॥ ६ ॥ मग ह्मणे--शूर तूं वातात्मज । योद्धा, मान्य मी करितों तुज । तंव हनुमंत बोलला--मज । धिक्कार असो ऐशिया ॥ ७ ॥ कां कीं सेवून मम मुष्टीला । रे तूं अद्यापि नससी मेला । तरी तूं रावणा, स्वयेंचि मला । मुष्टिप्रहार करीं वो ॥ ८ ॥ मग मी ताडन करून तुज। भूमीस द्यावया लावितों निज । प्रत्यक्षचि तूं राक्षसराज । प्रत्यय पाहीं एकदां ॥ ९ ॥ मग तो ठीक म्हणून खळ । हनुमंताचें वक्षःस्थळ । लक्षून, उदंड करून बळ । मुष्टीनें हाणी तयातें ॥ १० ॥ तेधवां क्षणमात्र संमूर्छित । होऊन नेत्रें फिरवी त्वारित । मागुती

तो वीर श्रीहनुमंत । उठोनि मुष्टि वळीतसे ॥ ११ ॥ तैं तो भिऊन असुरेश्वर । तांतडी करून गेला दूर । मग तयातें सोडून, वीर । मारुती सैनेंत पातला ॥ १२ ॥ मग नळ, नीळ, अंगद तीन । चवथा वीर तो श्रीहनुमान । सर्व हे एकत्र सैन्यें करून । राक्षसांवरती धावले ॥ १३ ॥ मग अग्निवर्ण नामें एक । दुसरा सर्परोमा देख । वृश्चिकरोमक खड्गरोमक । तृतीय चतुर्थ क्रमानें ॥ १४ ॥ ऐसे चार ते महासुर । पराक्रमें जे सर्वांवर । तयांस धरून केलें ठार । नीलादि चार कपींहीं ॥ १५ ॥ मग गर्जना करीत सारे । राघवापार्शी आले त्वरें । तंव तो असुरेश क्रोधभरें । धावून येतां देखिला ॥ १६ ॥ दांत खातसे करकरून । भयंकरचि फिरवी नयन । ऐशिया खळें त्या वज्रासमान । शर वेगानें सोडिले ॥ १७ ॥ राघवासहित कपींद्रांवर । जैसा पयोद सांडी नीर । त्यापरी असंख्य सोडून शर । जर्जर केलें तयानें ॥ १८ ॥ तेधवां अग्निऐसे बाण । जयांस कांचनाचें भूषण । काढून तत्काळ सीतारमण । त्यावरी वर्षिता जाहला ॥ १९ ॥ तेधवां खल तो रथावरी । आणि श्रीराम पादचारी । देखून स्वर्गीं शक्रांतरीं । खोंचली गोष्ट विशेषें ॥ २० ॥ मग मातलीस बोलावून । ह्मणे त्वां सत्वर रथ घेऊन । भूवरी आतांचि कीजे गमन । माझिया कार्याकारणें ॥ २१ ॥ मग तो मातली देवसूत । रथास जोडून हय ते त्वरित । रघूत्तमाच्या विजयानिमित्त । वेगें करून निघाला ॥ २२ ॥ आणि राघवापुढती रथ । उभा करून बोले मात । रथ हा सुरेशें आपणांनिमित्त । धाडिला आहे

राघवा ॥ २३ ॥ खड्ग कवचहि बहु चांगलें । ऐंद्र धनुहि आहे दिलें । रथीं या बैसून देवा, वहिलें । असुरेशातें वधावें ॥ २४ ॥ ज्यापरी सुरेशें वृत्राप्रत । मजसवें जाऊन केलें हत । तैसाच देव तूं बैसें येथ । सारथ्य करीन स्वयें मी ॥ २५ ॥ यापरी तेणें सांगतां मात । रथास वंदून श्रीरघुनाथ । त्यावरी आरूढ झाला त्वरित । लोककल्याणाकारणें ॥ २६ ॥ तेधवां श्रीराम आणि रावण । उभय वीरांहीं केलें रण । परम अद्भुत आणि दारुण । तुळूं न येई कदा जें ॥ २७ ॥ खळाच्या आग्नेय अस्त्रावरी । रामहि आग्नेयास्त्र प्रेरी । तेणें इंद्रास्त्र सोडिल्यावरी । ऐंद्रेंचि रामें भंगिलें ॥ २८ ॥ यापरी राघवें रावणावरी । आणि रावणें रामावरी । प्रेरिलीं परम क्रोधभरीं । अस्त्रें नानापरींचीं ॥ २९ ॥ त्यावरी सर्पास्त्र परम घोर । योजून रावणें सोडून शर । समस्त वानरसेनेवर । सर्पचि असंख्य ओतिले ॥ ३० ॥ त्या सर्पांच्या वदनांतून । आग ती विषाची वेगें निघून । दशदिशाहि तेणेंकरून । व्यापून जाऊं लागल्या ॥ ३१ ॥ तंव तें देखून श्रीरघुवीरें । सौपर्ण अस्त्रचि योजून त्वरें । सोडिलें; तंव ते सर्प सारे । तत्काळ विच्छिन्न जाहले ॥ ३२ ॥ या रितीं राघवें लंकानाथ । अस्त्रयुद्धांत केलिया हत । खळ तो शरचि अतिशयित । कोपें वर्षित राहिला ॥ ३३ ॥ तईं त्या शरांहीं मातलीसहित । विंधिला विशेषें श्रीरघुनाथ । सर्वांचि रथाचें सुवर्णयुत । निशाण खालीं पाडिलें ॥ ३४ ॥ मग रथींच्या चारी हयां । झोडून, जर्जर केलें तयां । तंव ते देखून श्रीरघुराया । क्षणैक चिंता उदेली

॥ ३५ ॥ तयीं तो सचिंत रघुनायक । देखून गंधर्व देवादिक । महर्षि आणिक पितर देख । समस्त चित्तीं धाकले ॥ ३६ ॥ सेनेंत समस्त वानरवीर । चिंता लागून झाले चूर। अहो हें मनचि नसतां स्थिर । गात्रीं उत्साह केउता ? ॥ ३७ ॥ असो; त्या रणीं तो दशवदन । आपुल्या प्रचंड देहेंकरून । शोभला मैनाक गिरीसमान । दश मुखीं वीस करांहीं ॥ ३८ ॥ मग राघवें पावून कोप । घेतलें प्रचंड इंद्रचाप । आणि शर एक कालाग्निरूप । काढून त्यातें जोडिला ॥ ३९ ॥ आणि असुरेश तो बिंधिला । सर्वेचि कपिगण आनंदला । स्वर्गामाजीही देवादिकांला । आधार आला विशेषें ॥ ४० ॥ तैं तो कालांतकाचे समान । कोपला देखून रघुनंदन । सर्व भूतेंही भय पावून । भूहि कापूं लागली ॥ ४१ ॥ तेधवां पहावया तें समर । सिद्ध, गंधर्व, किन्नर, सुर । विमानीं बैसून आले वर । गगनामाजी कौतुकें ॥ ४२ ॥ मग ऐंद्रास्त्रें श्रीरघुवीर । असुरेशाचें छेदी शिर । तेधवां तयाचे अंगीं रुधिर । खळखळ वाहूं लागलें ॥ ४३ ॥ आणि उडून, गगनांतून । मस्तकें पावूं लागलीं पतन । जणूं तालाच्या वृक्षावरून । फळेंच पडतीं भूवरी ॥ ४४ ॥ न कळे रात्र, न कळे दिन । न कळे संध्याकाळ म्हणून । न कळे दिशाहि, कीं तो महान । खळहि कोणा दिसेना ॥ ४५ ॥ तेधवां एकशें एक शिरें । छेदून पाडिलीं श्रीरघुवीरें । तरीही भूवरी असुरेश्वरें । टाकिला देह दिसेना ॥ ४६ ॥ मग विस्मय पावून थोर । अंतरीं विचारी सीतावर । परी तो सर्वास्त्र-विद्यावर । उपाय नेणे कोण तो ॥ ४७ ॥

ह्मणे—जे राक्षस मोठे भले । तेहि ज्या शरीं म्यां धुडकाविले । ते आज सारेचि निष्फळ झाले । वधकार्यी या खळाच्या ॥ ४८ ॥ ऐसा सचिंत सीतारमण । देखून तयास बिभीषण । बोलला—प्रभो हा, वर, रावण । पावला आहे विधीचा ॥ ४९ ॥ त्याचीं मस्तकें आणि कर । छेदून पडतील जे भूवर । तितुके तत्काळ अंगावर । उद्भूत होतील तयाच्या ॥ ५० ॥ ऐसा वर या असुरेश्वरा । विधीचा झाला श्रीरघुवीरा । ह्मणोनि खळ हा तुझिया शरां । साहूनियांही बांचला ॥ ५१ ॥ प्रभो, तयाच्या नाभिस्थानीं । अमृत वर्ततें रात्रंदिनीं । तेंचि तूं पावक-अस्त्रें करोनी । शोषून घ्यावें एधवां ॥ ५२ ॥ अमृत शोषण होतां साच । अनायासेंचि मग हा नीच । पडेल, ऐसें बिभीषणवच । राघवें श्रवणीं घेतलें ॥ ५३ ॥ मग तत्काळ धनु घेऊन । पावक अस्त्रें आभिमंत्रून । राघवें खळाचें नाभिस्थान । विंधिलें शीघ्र शरानें ॥ ५४ ॥ मग तयाचीं छेदी शिरें । करहि तोडून काढी शरें । तेधवां अंतीं एकचि सारें । शिर तें त्यातें राहिलें ॥ ५५ ॥ तंव तें बिभीषणाचें सारें । कापट्य जाणून लंकेश्वरें । कोपून त्यावरी परम त्वरें । शक्ति—अस्त्रासी सोडिलें ॥ ५६ ॥ परी तें देखतां श्रीरघुनाथ । तोडून काढिता झाला त्वरित । यापरी खळाचे उपाय समस्त । भंगून व्यर्थ जाहले ॥ ५७ ॥ तेधवां म्लान झाला मुखीं । तेज तें निघून गेलें शेखीं । परी ती वैरभावाची निकी । बैसली ग्रंथी ढळेना ॥ ५८ ॥ मग आणीक क्रोधभरें । धनुष्य उचलूनि घेई करें । आणि वर्षाव करूनि शरें । रामास विंधूं लागला ॥ ५९ ॥

मग रामही तैशा परी । त्यावरी शरवर्षाव करी । तैं त्या रणास तुमुलता भारी । येतां भासूं लागली ॥ ६० ॥ तंव तो मातली सुरांचा सूत । रामास सांगता झाला मात । देव, ब्रह्मास्त्र आतां त्वरित । सोडून खळ हा वधावा ॥ ६१ ॥ विधीनें आतांचि याचें मरण । नेमून ठेविलें आहे जाण । ह्मणोनि देव, जी सीतारमण । एधवां त्वरा करावी ॥ ६२ ॥ परी हा मस्तकीं छेदावया । सर्वथा अयोग्य आहे राया । म्हणून मर्मींच हाणून तया । देवें निर्मूळ करावें ॥ ६३ ॥ तयीं तें जाणून सीतारमण । ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण । करून, चापीं लावून बाण । आकर्ण ओढी तयातें ॥ ६४ ॥ त्या अस्त्राच्या पार्श्वीं पावन । फलास रवि आणि हुताशन । निश्वास भासती सर्पासमान । दीप्तिहि तैशी निस्तुला ॥ ६५ ॥ मेरुमंदारा ऐसें थोर । शरीर गगनात्मक निर्भर । आणिक प्रत्येक पर्वावर । वसती लोकेश्वरांची ॥ ६६ ॥ अंगें अत्यंत प्रज्वालित । भास्कराऐसेंच सुशोभत । अस्त्र तें अत्युग्र अत्यद्भुत । निवारी भय जें जनांचें ॥ ६७ ॥ तयातें धनूस योजूं जातां । पृथ्वीच कंपित झाली स्वतां । आणि समस्त भूतजातां । अत्यंत धाक वाटला ॥ ६८ ॥ यापरी अस्त्र तें परम घोर । राघवें सोडितां असुरावर । तयानें शतधा केलें चूर । विशाल वक्ष तयाचें ॥ ६९ ॥ मग तो विशाल देहाकार । जवें आदळला भूमीवर । सवेंचि चाप तें परम घोर । तेंहि हातून गळालें ॥ ७० ॥ रघुनाथाचा विजयी बाण । घेऊन असुरेशाचा प्राण । परतून तूणीरामाजी जाण । रिघून जागीं बैस-

ला ॥ ७१ ॥ असो, तो लंकेश भूमीवर । पडतां शेष जे कोणी असुर । ते भयाकुल होवोनि फार । दशदिशा पळूंचि लागले ॥ ७२ ॥ सर्वेचि आनंदाचा पूर । येऊन गर्जती वानरवीर । असुरा निवटोनि श्रीरघुवीर । विजयी झाल्याकारणें ॥ ७३ ॥ रावण समरीं झाला ठार । विजयी राजा श्रीरघुवीर । यापरी गाणें करोनि रुचिर । नाचूं उडूंचि लागले ॥ ७४ ॥ गगनाआंतून रामावरी । पुष्पवर्षाव केला सुरीं । दुंदुभी त्याहि रम्य स्वरीं । अंबरीं वाजूं लागल्या ॥ ७५ ॥ सिद्ध, चारण, ऋषि, मुनी । परम संतोष पावले मनीं । अप्सरा त्याहि जय ऐकोनी । नर्तनीं प्रेमें रंगल्या ॥ ७६ ॥ त्या असुराच्या देहांतून । तेज तें परम देदीप्यमान । निघून राघवा अंगीं जाण । मीनलें सर्वां देखतां ॥ ७७ ॥ तेधवां स्वर्गीं सुर बोलती । अहो ! या खळाचें भाग्य किती । सर्वांसमक्ष श्रीरघुपति- । रूपीं कीं हा पावला ॥ ७८ ॥ आह्मी सात्विक जे कां सुर । हरीची करुणाहि आम्हां- वर । परी या संसारचक्रावर । फिरतों, दुःखांतें पावतों ॥ ७९ ॥ पारि हा तामसी क्रूर अती । परस्त्रीवरती ठेवी मती । मुनींतें वधून जो संप्रती । हरीशीं द्वेषें वागला ॥ ८० ॥ तोचि हा आम्हां सर्वांपुढतीं । पावला रामस्वरूपाप्रती । यापरी नवलचि येथें अती । सुरांस वाटूं लागलें ॥ ८१ ॥ तेधवां नारदें केलें स्मित । म्हणितलें तुम्हांस अतिशायित । तत्वार्थाची आवडे मात । म्हणोनि ऐका सांगतों ॥ ८२ ॥ असुरेश्वर हा द्वेषेंकरून । सदैव ध्यातसे रघुनंदन । आणि भृत्यांचे वदनांतून । चारित्रही ऐकतसे ॥ ८३ ॥ राघवा-

हातून आपुलें निधन । ऐकून अत्यंत भय घेऊन । सर्वां ठायींच रघुनंदन । दृष्टी देखत राहिला ॥ ८४ ॥ निद्रेमाजीहि हा श्रीराम । देखून तयास व्हावा श्रम । यामुळें उपासनेचा क्रम । सहजीं त्यातें लाभला ॥ ८५ ॥ अहो, या खळास द्वेषचि एक । झाला सद्गुरु-बोधाधिक । तेणें तयास रघुनायक-। पद हें अंतीं पावलें ॥ ८६ ॥ समरीं राघवें कारितां हत । समस्त-पातक-विवर्जित । होऊन सायुज्य मुक्तीप्रत । पावला श्रीरामकृपेनें ॥ ८७ ॥ हो कां पातकी कोणी बहुत । परधन-परदारेशीं रत । परी तो सदैव राहील ध्यात । रामास प्रेमें भयें वा ॥ ८८ ॥ तरी तो शिघ्रचि शुद्धांतर । होऊन शतजन्मींचें थोर । पातक जाळून श्रीरघुवीर-। पद पावेल निश्चयें ॥ ८९ ॥ यापरी नारदमुनीश्वर । सुरांस श्रीरामभक्तिसार । सांगून, संशय करून दूर । स्वयेंचि ध्यानीं रंगला ॥ ९० ॥ त्रिभुवनकंटक असुरेश्वर । रणांत जेणें केला ठार । टेकून मग चाप भूमीवर । विश्राम घेत उभा जो ॥ ९१ ॥ एके करांत धरिला शर । दुसरा कर तो चापावर । व्रणहि कित्येक अंगावर । शरांहीं केले शोभती ॥ ९२ ॥ अंगीं वीरश्री अतिशयित । आरक्त दिसती नेत्रप्रांत । प्रभु हा परम दीप्तिमंत । कोटि सूर्यांचे सारिखा ॥ ९३ ॥ सुरेंद्रें करून ज्याची स्तुति । तोषविला जो सीतापती । पावन करो तो आम्हांप्रती । ध्यानें वीरराम हा ॥ ९४ ॥ यापरी स्मरतां रघुनंदन । तेथेंच रंगलें मुनीचें मन । सुरहि तैंहून श्रीराम-भजन । सार जाणून राहिले ॥ ९५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवण-

पथा । म्हणून लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ९६ ॥ श्रीराम ॥ ५३ ॥

## अध्याय ५४ वा, सीताभेट.

श्रीराम ॥ लंकेश रणांत होतां हत । श्रीराम तोषून अतिशयित । आपुल्या समस्त वीरांप्रत । ऐसें बोलता जाहला ॥ १ ॥ हे हनुमंत, बिभीषण । प्रिय सुग्रीव, कीं लक्ष्मण । अंगद, जांबवंत, सारे जण । मित्र हो धन्य तुमची ॥ २ ॥ तुमच्याच बाहुबळावर । रणीं हा रावण झाला ठार । कीर्ति ही तुमची त्रिलोकीवर । अक्षय होणार जाणिजे ॥ ३ ॥ तुमची त्रैलोक्यपावन कथा । जन हे स्वमुखें गाऊन आतां । सर्वही पातकें जाळून स्वतां । पावती परमा गतीतें ॥ ४ ॥ यापरी बोलला सीतावर । तंव इकडे तो राक्षसवर । मृत झाल्याचें वृत्त तें घोर । स्त्रियांत त्याच्या पावलें ॥ ५ ॥ तेथवा मंदोदर्यादिक । स्त्रिया त्या रणांत येऊन देख । पाहवेनासा करिती शोक । अंगें टाकुनी भूवरी ॥ ६ ॥ बिभीषणही भूमीवरी । पडून तैसाच शोक करी । प्रेमास स्मरून वरचेवरी । हा हा बंधो ह्मणतसे ॥ ७ ॥ तेधवां लक्ष्मणालागीं राम । ह्मणे गा, तयाचा वारीं श्रम । असुरेश्वराचें अंत्य कर्म । करणें आहे तयातें ॥ ८ ॥ स्त्रियाहि ज्या या शोकेंकरून । कंठ फोडून करती रुदन । त्यांचेंहि येणेंचि सांतवन । पाहिजे केलें एधवां ॥ ९ ॥ तंव तें ऐकून सुमित्रासुत । त्या

शवापाशीं जाऊन त्वरित । देखे, तंव तो प्रेतवत । बिभीषण भूवरी पडियेला ॥ १० ॥ तयीं तो एतुला शोकाकुल । पाहून लक्ष्मण बोले बोल । अगा, तूं होऊन विवेकशील । रडसी कैसा कळेना ॥ ११ ॥ शोक हा करिसी तूं ज्यासाठीं । तो या तव जन्माच्या पाठीं । होता कोण ? तें विवेकदृष्टि । सांग पां मजला एकदां ॥ १२ ॥ अथवा हा तव लंकापती । तुझिया या जन्माच्या अंतीं । कोण कीं असेल तें संप्रती । भल्या तूं चित्तीं विचारीं ॥ १३ ॥ अरे, हे प्रवाहीं जैशा रीती । सिकताकण एकमेकांप्रती । भेटती सवेंचि दुरी जाती । तैशीच गति या जनांची ॥ १४ ॥ सर्व भूतें हीं परस्परें । मायया प्रेरिलीं देवेश्वरें । तूं मी आणीक जन हे सारे । आधीन आहों तयाच्या ॥ १५ ॥ जन्ममरण हें जेव्हां ज्याचें । नेमिलें देवें घडावयाचें । तेव्हां तयाचें तें तें साचें । घडे चि, न टळे सर्वथा ॥ १६ ॥ बालक ज्यापरी स्वभावतां । अंगीं क्रीडतें हेतु नसतां । तैसींच अजें या देवें स्वतां । जाण हीं भूतें निर्मिलीं ॥ १७ ॥ मग त्या भूतांपासून आन । भूतें निर्मितो हा भगवान । ह्मणून सर्वथा त्या आधीन । राहणें लागे समस्तां ॥ १८ ॥ तनु ही एका तनुपासून । लोकीं पहा कीं पावे जनन । जैसें तरूंच्या बीजापासून । बीज आणीक उद्भवे ॥१९॥ आणीक गोष्ट ही ऐके राया । देहदेही हा विभाग वाया । अविवेकेंचि लोकीं इया । प्रवृत्त आहे जाहला ॥ २० ॥ जन्मास येणें अथवा मरणें । झिजणें, वाढणें, कर्में करणें, । कर्मकळांचा अनुभव घेणें । भाव जे ऐसे भ-

वींचे ॥ २१ ॥ तैशीच बहुविध जी ही सृष्टी । पाहतां आपुल्या येते दृष्टी । गा, या साव्याही दृश्य गोष्टी । द्रष्ट्या अंगीं नातळती ॥ २२ ॥ पेटलें काष्ठ जीं कार्यें करी । तीं सर्व लोकांत अग्नीवरी । आरोपितात, तैशा परी । भाव हे व्यर्थ आत्मया ॥ २३ ॥ पाहतां सर्व हें कार्यजात । देहादि पदार्थांकरवीं होत । परी तें अज्ञानदोषानिमित्त । आत्मया अंगीं बोलती ॥ २४ ॥ आणि अंतरीं जो कां भाव । तोचि अनुभवीं सावयव । भावेंचि वस्तूस पाविजे नांव । सत्य कीं मिथ्या यापरी ॥ २५ ॥ मूळ या समस्त संसारास । अहंभावचि जाणा खास । पहा कीं निद्रेंत कोणेकास । द्वैत हें भावूं शकेना ॥ २६ ॥ ह्मणून मुक्त जे ज्ञानी जन । तयांस न शिवे जगाचें भान । कां कीं अहंतेलागीं स्थान । उरविलें नाहीं तयांनीं ॥ २७ ॥ ह्मणोनि अहं आणि मम । भाव हे मनाचा मिथ्या भ्रम । जाणून, सांडून, सीताराम । रे तूं चित्तीं सांठवीं ॥ २८ ॥ देव हा सर्वांतरांत स्थित । चिद्धन परमात्मा भगवंत । भक्तप्रियार्थ नररूपांत । प्रगटला मायागुणानें ॥ २९ ॥ त्याचिया आनंदरूपीं मन । लावीं अभ्यासयोगें करून । विषयसुखाच्या गर्तेतून । काढून मोठ्या प्रयत्नें ॥ ३० ॥ बंधु, माता आणि पिता । पुत्र, मित्र अथवा कांता । सर्व हीं देहात्मबुद्धीकारितां । आपणा अंगीं लागतीं ॥ ३१ ॥ परी मी देहादि कोणी नोहें । असंग आत्माचि नेमें आहें । जाणतां मातृसुतादि ते हे । संबंध वाया सर्वही ॥ ३२ ॥ कन्या, पुत्र, कीं स्त्री सुंदर । संपदा, सुखभोग तेही थोर ।

बळ कीं, रूप किंवा अधिकार । सन्मान किंवा जनींचा ॥ ३३ ॥ सर्व या वस्तु क्षणभंगुर । मनाचें धरून बसती घर । मिथ्या ज्ञानेंचि हा संसार । भासतो साचा जिवातें ॥ ३४ ॥ ह्मणून ऊठ तूं, सांडी शोक । ध्यात जा हा श्रीरघुनायक । आणि निर्भय पद जें एक । तें तूं जोडी सुखाचें ॥ ३५ ॥ मग प्रारब्ध-भोगानुसार । आलिया राज्यादि कार्यभार । चालवीं; तुज तो हानिकर । सर्वथा होऊं शकेना ॥ ३६ ॥ भूत भविष्य-काल-विचार । मनीं तूं नाणींच लेशभर । एकल्या प्राप्त कार्यावर । दृष्टि ती नीट धरीं रे ॥ ३७ ॥ मग यथान्यायें वर्तूं जातां । सर्वथा अलिप्त होशी स्वतां । मग या भवबंधाची वार्ता । तुझिया श्रवणीं न येचि ॥ ३८ ॥ ह्मणोनि परंपरानुगत । कार्य जें शास्त्रास आहे विहित । ऊठ, तें करोनि घेईं त्वरित । श्रीरामवाक्यानुसारें ॥ ३९ ॥ स्त्रिया ज्या शोकें रडती रणीं । तयांचें सांत्वन करून क्षणीं । परतून लंकेंत निज ठिकाणीं । ऊठ, या वेगें पोंचवी ॥ ४० ॥ यापरी बोलतां सुमित्रासुत । बिभीषण संतुष्ट झाला बहुत । मग शोकमोहादिकांतें त्वरित । सांडून वेगें उठिला ॥ ४१ ॥ मग बहुत कालवरी । बोल तो ध्यायी निजांतरीं । प्रत्यय पाहोनि मग सत्वरीं । राघवापाशीं पातला ॥ ४२ ॥ मग कर्मास अनुमोदन । घ्यावया रामास बोले वचन । देव, हा पातकी धर्मविहीन । परस्त्रीसक्त नृशंसी ॥ ४३ ॥ ऐशा देवद्वेषकालागुन । संस्कार कराया माझें मन । प्रवृत्त न होय रघुनंदन । दोषसंसर्गाकारणें ॥ ४४ ॥ तेधवां बोलला सीतारमण । अगा,

हें संपलें वैरीपण। आमुचें कार्यही झालें पूर्ण। मृत्युयोगें या रिपूच्या ॥ ४५ ॥ आतां शव तें दोषयुत। अथवा निर्दोष, ऐशी मात। बोलणें सर्वथा नाहीं उचित। मेलिया वैर न राहे * ॥ ४६ ॥ आतां ज्यापरी हा त्वद्भ्राता। तैसाचि मजहि आहे स्वतां। ह्मणोनि संस्कारकर्म करितां। शंका चित्तीं न घे तूं ॥ ४७ ॥ यापरी बोलतां सीतारमण। शिरसा वंदून बिभीषण। तैसाच स्त्रीजनांमाजी तूर्ण। जाऊन सांतवूं लागला ॥ ४८ ॥ मग त्या मंदोदर्यादिक। स्त्रियांचा दूर करून शोक। आपुले बांधव ते सकळिक। बोलवी कर्मानिमित्तें ॥ ४९ ॥ मग शव तें चितेवरी। ठेवून पितृयज्ञाचे परी। आहिताग्नीचें कर्म करी। सर्वही शास्त्रानुसारें ॥ ५० ॥ मागुती स्नान करून, तिल-। दर्भही घेऊन देई जल। मग स्त्रिया ज्या त्याच्या सकल। त्यांतें नगरीं पोंचवी ॥ ५१ ॥ मग राघवीं येवोनि परत। विनम्रभावें झाला स्थित। श्रीराम तोहि विजयानिमित्त। संतोष होता पावला ॥ ५२ ॥ मातली, देवेंद्राचा सूत। तेणें वंदून श्रीरघुनाथ। अनुज्ञा घेवोनि जाणें त्वरित। केलें गगनपथानें ॥ ५३ ॥ मग श्रीराम सुमित्रासुता। ह्मणे मी पूर्वीं बोललों स्वतां। ह्मणोनि बिभीषण हा आतां। राज्यीं नेऊन बैसवी ॥ ५४ ॥ तंव तें ऐकून सुमित्रासुतें। जाऊन लंकेमाजी त्वरितें। अभिषेक करूनि बिभीषणातें। लंकाराज्यीं बैसविलें ॥ ५५ ॥ तयीं तो अभिषेक झाल्यावर। हस्तीं घेऊन नानोपहार। बिभीषण तो श्रीरघुवीर-। भेटीकारणें पातला ॥ ५६ ॥ मग साष्टांग घाली नमन। पुढती ठेवून उपा-

यन। तयीं त्या मित्रास अवलोकून। श्रीराम चित्तीं तोषला ॥ ५७ ॥ मग सुग्रीवातें त्वरित। जवळीं घेऊन श्रीरघुनाथ। ह्मणे गा, खळ हा तुजनिमित्त। समरीं ठार जाहला ॥ ५८ ॥ आणि बिभीषण हा सखा। राज्यीं स्थापितां आला निका। हें सर्व बा हे कपिनायका। तुझ्याच योगें जाणिजे ॥ ५९ ॥ मग बाजूस श्रीहनुमंत। देखूनि तयास बोले मात। सख्या तूं जाऊन लंकेआंत। भेट रे माझ्या प्रियेला ॥ ६० ॥ आणि रावणवधादि सारी। कथा ही घालून कानावरी। तियेचे बोल ते मज सत्वरी। परतून येथें ऐकवी ॥ ६१ ॥ तंव ती आज्ञा होतां वीर। तत्काळ पावला लंकापुर। आणि रावणमंदिरीं सत्वर। जाऊन देखे सतीतें ॥ ६२ ॥ तंव ती साध्वी राक्षसी-आंत। बैसली परम शोकाक्रांत। दीन, कृशहि अतिशयित। अंतरीं ध्यात राघवा ॥ ६३ ॥ ऐशिया सतीतें अवलोकून। साष्टांग घालिता झाला नमन। तंव तो देखून श्रीहनुमान। सती हर्षास पावली ॥ ६४ ॥ तयीं तें सतीचें आनंदमुख। देखुनि कपिहि पावला हारिख। मग कुशली रघुनायक। ह्मणून तीतें निवेदी ॥ ६५ ॥ मग ह्मणे पुत्रमित्रांसहित। राघवें निवटिला लंकानाथ। आणि बिभीषण सिंहासनस्थ। जाहला श्रीरामकृपेनें ॥ ६६ ॥ हेंच तुजासि कराया श्रुत। देवें मजासि धाडिलें येथ। यापरी बोलून श्रीहनुमंत। निवांत पुढती टाकला ॥ ६७ ॥ तंव तें श्रीरामक्षेमवृत्त। ऐकतां सती ती अतिशयित। आनंदें जाहली सद्गदित। मग कपींद्रा बोलली ॥ ६८ ॥ बा रे, गोष्ट ही सांगून भली। मज

तूं साचचि जीवविली । सखया त्वां जी उपकृति केली । तुळितां न ये तियेतें ॥ ६९ ॥ तुझिया या शब्दांची सरी । त्रिभुवनीं न येचि कोणेपरी । नाना भूषणें रत्नें सारीं । वायांचि बापा मारुते ॥ ७० ॥ तेघवां बोलला श्रीहनुमंत । नयनीं साक्षात सीताकांत । पाहतों, याहून त्रिभुवनांत । लाभ तो कोण आगळा ? * ॥ ७१ ॥ इंद्राचेंहि वैभव येथ । आह्मां अपूर्णसें भासत । मग ही रत्नादिकांची मात । कायसी माते, आमुतें * ॥ ७२ ॥ तेघवां जानकी बोले वचन । अगा, तूं सुस्वभावाचें धन । उदंड जोडून, तेणेंकरून । शोभसी थोर एघवां ॥ ७३ ॥ आतां मजसि श्रीरघुवीरें । भेटीस यावयालागीं त्वरें । आज्ञापावें, मग मी बा रे । देखेन पाय तयाचे ॥ ७४ ॥ तंव तियेस बोलून 'ठीक' । आणीक करून वंदन एक । वेगेंचि तो वीर कपिनायक । पावला रामासंनिधीं ॥ ७५ ॥ मग ते जानकी जें बोलली । तें सर्व त्याचे श्रवणीं घाली । मग म्हणे देवी श्रीमैथिली । परम शोकांत असे हो ॥ ७६ ॥ तरी तूं बोलावून तिज । कृपेनें देख कीं श्रीरघुराज । ज्यालागीं त्वां एतुलें काज । कष्ट घेवोनि साधिलें ॥ ७७ ॥ तंव तें ऐकून श्रीरघुपती । पावकीं स्थित जी सीतासती । तियेतें प्रगटवावयाप्रती । क्षणैक ध्यानस्थ जाहला ॥ ७८ ॥ मग बिभीषणासि म्हणत । सीतेस स्नान घालूनि त्वरित । येथ तूं घेवोनि येईं सहित-। वस्त्रालंकारभूषणां ॥ ७९ ॥ मग त्या कपींद्रासंगें असुरें । जाऊन राक्षसींचिया करें । सीतेस न्हाऊं घालून त्वरें । भूषणें ल्याया दीधलीं ॥ ८० ॥ मग तियेस पालखीआंत ।

बैसवून आणिती मार्गें त्वरित । यष्टिधारी ते संगें बहुत । राहून तीतें रक्षिती ॥८१॥ तंव त्या सतीच्या दर्शनास्तव । उदंड वानरीं घेतली धांव । परी ते वेत्रधारक बाव । न देती लेश तयांतें ॥ ८२ ॥ मग कल्लोळ झाला बहुत । तंवचि दुरून श्रीरघुनाथ । सीता बैसून शिबिकेआंत । येतां देखता जाहला ॥ ८३ ॥ मग बिभीषणास ह्मणे । कपींतें वारितां कोण्या गुणें । सर्वही निःशंक मातेप्रमाणें । पाहोत देवी जानकी ॥ ८४ ॥ आणि पायींच चालत आतां । माझिया पुढती येवो सीता । यापरी राघवें आज्ञापितां । तत्काळ शिबिका ठाकली ॥ ८५ ॥ मग उतरूनि सीता सती । पायींच पातली रामापुढती । येतांचि निंदून नानारीती । धिक्कारिली ती राघवें ॥ ८६ ॥ तेधवां तें श्रीरघुनाथोक्त । परम असह्य होऊनि त्वरित । सीता ह्मणे, जीं ! अग्निनाथ । प्रत्यय दावील एधवां ॥ ८७ ॥ म्हणोनि तोच कीं प्रदीस करा । मग प्रचीती श्रीरघुवीरा । आणि विश्वास येईल पौरां । माझिया शीलाव्रताचा ॥ ८८ ॥ मग तो विचार रामाप्रत । संमत देखून सुमित्रासुत । प्रचंड अग्नीस प्रज्वाळीत । काष्ठसंभारें करूनी ॥ ८९ ॥ मग ती साध्वी, महासती । समस्त देवांस ब्राह्मणांप्रती । भक्तिआदरें करून प्रणती । अग्निसंनीध ठाकली ॥ ९० ॥ आणि बोलली जोडूनी हात । अहो, मी सांडून श्रीरघुनाथ । चित्तीं कदाहिं कोणती मात । आणिली नसेचि सर्वथा ॥ ९१ ॥ तरी हा साक्षात हुताशनु । पावन करील माझी तनु । यापरी बोलून परिक्रमून । भीतरीं प्रविष्ट जाहली ॥ ९२ ॥ निर्भय अंतःकरणें थोर । प्रवेशतां

त्या अग्नींत घोर । सती ती देखिली नयनीं सुर- । असुर-वानर-नरांहीं ॥ ९३ ॥ तंव ते परम उद्वेगभरें । बोलती ऐसें परस्परें । अहो, ही लक्ष्मीच श्रीरघुवीरें । त्यजिली कैंची गृहींची ॥ ९४ ॥ सकळ ज्ञानियांमाजी ज्ञानी । राम हा ऐकत आलों जनीं । मग ही सकळ सौख्याची खनी । केउती येणें त्यजावी ॥ ९५ ॥ ऐसे अज्ञपणाचे बोल । बोलती, पाहूं न शकती खोल । अहो ही श्रीराघवाची भूल । आणिकां कैंची कळावी ॥ ९६ ॥ जो एक श्रीरामकृपांकित । तोचि या रिघून सर्वांआंत । शाश्वत स्वरूपाची मात । जाणून विराम पावतो ॥ ९७ ॥ आणिकें कष्टतीं नानापरी । तपादिकांच्या भरती भरीं । तयांतें माव ही या भूवरी । न कळे ऐसें निश्चयें ॥ ९८ ॥ म्हणोनि रघुनाथभक्तिपथ । हाचि समस्तीं केला मत । सुज्ञ ते जाणूनि परम त्वरित । कांसे लागती तयाच्या ॥ ९९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणून लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०० ॥ श्रीराम ॥ ५४ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

## अध्याय ५५ वा, ब्रम्हेंद्रकृत स्तव.

श्रीराम ॥ यावरी रघुनाथसंदर्शन । ध्यावया पातले स्वर्गींहून । इंद्र, यम, कीं वृषवाहन । शिवही थोर तपी जे ॥ १ ॥ तैसाच ब्रह्मनिष्ठ-अग्रगण । कमलोद्भव तो, आणि

वरुण । कुबेर, मुनि सर्व, कीं चारण । सिद्धही आले त्वरेनें ॥ २ ॥ पितरही, तैसेच साध्यगण । अप्सरा, नागहि आले जाण । विमानीं करून आरोहण । गंधर्व तेही धावले ॥ ३ ॥ मग आदरें जोडूनि हात । स्तविती यापरी प्रीतिभरांत । प्रभो, तूं त्रिलोकींचा या नाथ । निर्मिसी विश्व स्वयें तूं ॥ ४ ॥ सर्वसाक्षी तूं ज्ञानघन । राहसी सर्वत्र सम भरून । परी हें नेणती अज्ञजन । सूक्ष्म बुद्धीच्या अभावें ॥ ५ ॥ मग ते तुझिया विभूतींप्रती । सेविती आवडी धरून अती । अंतीं त्वत्पदातें पावती । तुझिया कृपाप्रसादें ॥ ६ ॥ अष्ट वसूंत हे रघुनाथ । आठवा तो तव विभूति होत । प्रभो, तूं समस्त रुद्रां आंत । शंकर अससी विशेषें ॥ ७ ॥ सकळ सृष्टीचा जो निर्मिता । ब्रह्मदेव तूं अससी स्वतां । अश्विनीकुमार पाहूं जातां । नासिका होत तुझिया ॥ ८ ॥ चंद्रसूर्य जे तेजोराव । उभय ते नेत्रचि होती तव । आणि विभो तूं या स्वयमेव । विश्वास आद्यंत अससी कीं ॥ ९ ॥ राघवा, तूं एक सनातन । सदैव सर्वत्र वर्तमान । ज्ञानस्वरूप द्वंद्वविहीन । शुद्ध निर्गुण असंग ॥ १० ॥ परी जे मायामोहित नर । त्यांस तूं भाससी मनुजाकार । त्वन्नाम जपतयां निरंतर । चिद्रूप तूं हें जाणवे ॥ ११ ॥ रावणें आमुचा पराक्रम । समस्त ग्रासिला होता राम । परीं त्वां तयाचा करून शम । स्वपदीं आह्मांस स्थापिलें ॥ १२ ॥ यापरी चाललें असतां स्तवन । पुढती जाहला कमलासन । आणि साष्टांग करून नमन । आणीक स्तविता जाहला ॥ १३ ॥ ह्मणे हें वंदन तव

पदास । जो तूं रक्षिता सर्व जगास । योगी जयाचा घेती ध्यास । चित्तैक्याच्या बळें
पै ॥ १४ ॥ वंदन तुजला परमात्मया । इष्टानिष्टादि न शिवे जया । देव जो सद्रूप
सर्वांचिया । अंतरीं द्रष्ट्रूपें राहतो ॥ १५ ॥ प्रभो, ज्या तुजला योगाभ्यासी । प्राणापा-
नांस सुनिश्चयेंसीं । रोधून, सांडून विषयगणांसी । ध्याती परम श्रमानें ॥ १६ ॥ मग
ते संशय मोह दुरी । लोटून, देखती तुज अंतरीं । त्या तुज वंदन माझें हरी । रविसा
जो तूं शोभसी ॥ १७ ॥ मायातीत जो लक्ष्मीकांत । जगदुत्पत्तीस कारण होत ।
अमेय, जो सर्व मोहांप्रत । दुरवी स्वबळें करूनी ॥ १८ ॥ मुनिवंद्य जो तूं श्रीरघुराय ।
होसी योगिजनांचें ध्येय । स्वरूपें अत्यंत तूं रमणीय । वंदन माझें तुजला ॥ १९ ॥
अस्ति-नास्ति हे प्रत्यय दोन्ही । न लगती ज्याच्या स्वरूपस्थानीं । योगींद्र शिवहि
ज्याच्या ध्यानीं । सदैव आहे रंगला ॥ २० ॥ आणि जो वर्तती चिरंतन । ओंकार-
रूप श्रीरघुनंदन । निर्मल, अनंत, ज्ञानघन । पावक असुरवनींचा ॥ २१ ॥ ऐसिया
श्रीरामाच्या पदा । असो हा प्रणाम माझा सदा । भक्तजनांच्या सर्वापदा । वारितो कृपे
स्वयें जो ॥ २२ ॥ देव, तूं आमुचा होसी नाथ । संकटीं आम्हांस देसी हात । चराच-
रांतें आधारभूत । तूं एक होसी रमेशा ॥ २३ ॥ भक्तियोगें तूं येसी करा । सर्वेचि
कारिसी भवसंहारा । रूपें उदंड धरिसी ईश्वरा । भावानुसार जनांच्या ॥ २४ ॥
चित्त जें योगाभ्यासीं रत । त्यासि त्वत्संगति सदोदित । त्या तुजला मी सद्भाव-

सहित । वंदन देवा, करीतसें ॥ २५ ॥ तूं सर्व सृष्टींचा आदि अंत । परमात्माचि श्रीभगवंत । लौकिकीं उपायीं तुमची गत । नेणवे लोकां समस्तां ॥ २६ ॥ भक्ति-भावें जो भजावा जनीं । तो हा श्रीराम कैवल्यदानी । आमुचा वंदाव्रयाचा धनी । तोचि हा सीतानायकू ॥ २७ ॥ रमेशा, तुजासि जाणावया । समर्थ कोण गा, लोकीं इया । सर्वांस गोवून घेई माया । न सोडी तुझी कदाही ॥ २८ ॥ ऐसिया तुझिया पायीं शिर । असो हें माझें निरंतर । वृंदावनांत पदाब्जभ्रमर । जाहल्या गोपी जयातें ॥ २९ ॥ समस्त वेद कीं शास्त्रें तशीं । वर्णिती जयास अहर्निशीं । नित्यानंद जो निर्विशेषी । केवल ज्ञान स्वरूपें ॥ ३० ॥ तो तूं आमुच्या काजासाठीं । नररूप झालास कीं जगजेठी । नीलकांतीची शोभा मोठी । वंदन माझें तयातें ॥ ३१ ॥ स्तव हा पठण जो कां करी । मूर्तिही ठेवून हृन्मंदिरीं । तो सर्व मळांस सारून दुरी । पाविजे ब्रह्म-पदातें ॥ ३२ ॥ असो, याउपरी जनकात्मजा । अंगीं भूषणें लेवून वोजा । परम सुंदर, जी अरुणतेजा । लाजवी आरक्तपणानें ॥ ३३ ॥ तियेतें अंकास पावकें देवें । घेऊन रामास म्हणितलें भावें । प्रभु जो उरूंचि नेदी नांवें । आपदा शरणगतांची ॥ ३४ ॥ कीं हे श्रीरघुनंदन हरी । जानकी सती तूं पदरीं धरीं । पूर्वीं वनांत मजमाझारीं । ठेविली होती तुवां जी ॥ ३५ ॥ योजून दशाननाच्या घाता । तुवां जी निर्मिली मायासीता । कार्य तें जाहलें याकरितां । तिज तू स्वरूपीं पाववी ॥ ३६ ॥ पहा कीं दशास्य झाला

ठार । उतरला भूवरिचाहि भार । यापरी बोलतां पावक सुर । मायासीता लोपली ॥३७ ॥ मग जी परमानंदयुता । सीता त्रैलोक्याची माता । तियेस अंकीं झाला घेता । अति संतोषें श्रीराम ॥ ३८ ॥ तयीं ते सीता आणि राम । शोभले कैसे परमोत्तम । अवलोकितांचि जनांचे काम । सर्व संपूर्ण जाहले ॥ ३९ ॥ तेधवां अंतरीं परमादर । दाटून स्तवनार्थ देववर । जाहला सिद्ध, दों जोडून कर । सद्गद कंठेंकरूनी ॥ ४० ॥ म्हणे मी भजेन सदोदित । ह्याचि देवेश श्रीरघुनाथ । जो कीं दावानल म्हणतात । संसारमहावनाचा ॥ ४१ ॥ जो या जन्ममृत्यूंतें हरी । ध्यातसे जयास उमा सुंदरी । आनंदरूप जो सर्वांतरीं । धूर्जटी शरण जयातें ॥ ४२ ॥ सर्व सुरांचा दुःखविनाश । कराया सिद्ध जो श्रीजगदीश । निराकारीही मनुष्यवेष । घेऊनि वर्ते महीं या ॥ ४३ ॥ तोचि हा परेश आनंदघन । मनीं मी भजेन चिरंतन । तोचि हा भवभार दूर करून । सुखवी निज जनांतें ॥ ४४ ॥ कीं जे तपस्वी योगीश्वर । तेहि ज्या ध्याती निरंतर । हनुमंतीं जयाचें प्रेम फार । राम तो प्रेमें भजें मी ॥ ४५ ॥ जो कां भोगियांपासून दुरी । आणि योगियां राहे करीं । तो सच्चिदानंद रावणारी । भजेन भावादरें मी ॥ ४६ ॥ प्रभो, तूं योगमायागुणें । भाससी आह्मांस मनुष्यपणें । आणि लीलाचरित्रश्रवणें । परम संतोषविसी कीं ॥ ४७ ॥ मीं या कीर्तींत वैभवाआंत । गढून तूतें न जाणिलें नाथ । दुरभिमानें म्यां साधिला घात । विसरून तूतें प्रभो जी ॥ ४८ ॥ आजि तव पायांचि-

या कृपा- ॥ प्रसादें मद तो सारा बापा । लोपला, ह्मणवूनि धरिला सोपा । मार्ग ग्यां भक्तिसुखाचा ॥ ४९ ॥ बाहुभूषणीं रत्नें थोर । चमकती, स्कंधीं शोभला हार । शारद चंद्राच्या ऐसें सुंदर । मुखकमलही शोभतसे ॥ ५० ॥ नयनें विराजती पद्मासम । ऐसा प्रभु हा सीताराम । भजाया मजसि अत्युत्तम । लाभला कैसा पहा वो ॥ ५१ ॥ अंगीं नीलमेघांची कांति । पाहतां मनास वाटे शांति । जयानें भूभार हरून अंतीं । नित्रस्त केलें जनांतें ॥ ५२ ॥ विराधादिकांस उद्धरून । शोभला वीर जो रघुनंदन । शंकरांचें जो सौख्यनिधान । तो हा स्वामी आमुचा ॥ ५३ ॥ अंकीं परम सुंदरी सीता । सुवर्णाऐसी तेजोयुता । चमकते जैसी विद्युल्लता । तैसी शोभे जयाच्या ॥ ५४ ॥ ऐसा श्रीराम सीतानाथ । सुदिव्य आसनीं जो संस्थित । भजेन मी त्यासि सदोदित । कंद जो सर्व सुखाचा ॥ ५५ ॥ यापरी देवेंद्राचें स्तवन । ऐकून तोषले रघुनंदन । मग पार्वतीसहवर्तमान । शंकर झाले पुढारां ॥ ५६ ॥ मग ते ह्मणती हे रघुवीर । आह्मी तुजसवें येऊं सुर । राज्याभिषेक तव सुंदर । देखून परतूं समस्त ॥ ५७ ॥ मग ह्मणे दशरथ तव जो पिता । देख या विमानामाजी आतां । वच तें ऐकतां श्रीरघुनाथा । परम आनंद जाहला ॥ ५८ ॥ मग देखून पितयाप्रती । रामें साष्टांग केली प्रणती । सवेंचि सुमित्रासुतहि पुढती । होऊन नमिता जाहला ॥ ५९ ॥ तयीं त्या सुतांस आलिंगून । नृप तो ऐसें बोलला वचन । वत्स, तूं संसारदुःखांतून । मजसि सोडविलें कीं

॥ ६० ॥ मग आणीक आलिंगून । केलें पूजन स्वीकारून । नृप तो पुढती करीत गमन । विमानांतून तेधवां ॥ ६१ ॥ मग जे वानर युद्धीं मृत । तयांस कराया संजीवित । स्वयेंचि श्रीराम इंद्राप्रत । आज्ञा देता जाहला ॥ ६२ ॥ तैं सुरनाथें कपि ते सारे । सर्वेचि जिवंत केले त्वरें । सावध होतांचि हर्षभरें । वीर ते गर्जों लागले ॥ ६३ ॥ परी जे समरीं असुरजन । पडिले खळ ते सावधान । न होती अमृतहि तैं शिंपून । कैसें आश्चर्य पहा कीं ॥ ६४ ॥ मग बिभीषण इयावरी । रामास साष्टांग नमस्कारी । ह्मणे हे प्रभो, या भक्तावरी । दृष्टि प्रेमाची असूं दे ॥ ६५ ॥ आजि लक्ष्मण-सीतेसहित । मंगळस्नान त्वां कीजे येथ । मग भूषणांहीं सुमंडित । होऊन पुरीस चलावें ॥ ६६ ॥ तेधवां बोलला सीताराम । भक्त जो माझा सर्वोत्तम । भरत, माझिया मार्गास परम । नेत्रें लावूनि बैसला ॥ ६७ ॥ राज्यादि सांडून सारें सुख । वनींच काळ कंठीत एक । त्यावीण अगा, म्यां स्नानादिक । केउतें कीजे ये स्थळीं ॥ ६८ ॥ ह्मणोनि सुग्रीवमुख्यांप्रत । तुवां सत्कारावे हें उचित । कपिवरांचिया सत्कारांत । माझा सत्कार जाणिजे ॥ ६९ ॥ मग तें ऐकून बिभीषणें । कपिश्रेष्ठांसीच जीवप्राणें । अर्पिलीं सुवर्ण-वस्त्रें रत्नें । पर्जन्य-वृष्टीसारिखीं ॥ ७० ॥ मग त्या कपिसत्कारेंकरून । चित्तीं तोषला रघुनंदन । मागुती सर्वांस नांवाजून । निरोप देता जाहला ॥ ७१ ॥ मग पुष्पक नामें एक । विमान बिभीषणानें देख । आणितां त्या आंत रघुनायक । अंगें आरूढ जाहला ॥ ७२ ॥ संगतीं दिव्य धनुष्यधर ।

बैसला बंधु सुमित्राकुमर । जानकी बैसली अंकावर । लज्जाभावें करूनी ॥ ७३ ॥ मग सुग्रीव, हनुमान वीर । आणि अंगद, बिभीषण थोर । त्यांसि बोलला श्रीरघुवीर । विमानांतून समस्तां ॥ ७४ ॥ वीरहो, तुह्मींच करून कष्ट । कार्य हें सिद्धीस नेलें स्पष्ट । आतां मार्ग जो ज्यातें इष्ट । तेणें तेणें चलावें ॥ ७५ ॥ बिभीषणा, त्वां लंकेआंत । रहावें जाऊन राज्य करीत । तुजसि देव ते आतां खचित । कोणी पीडूं न येती ॥ ७६ ॥ मित्र सुग्रीव, वा तूं आतां । किष्किंधापुरीस जावें स्वतां । आह्मीहि आपलया लागू पंथा । आतांच अयोध्यापुरीच्या ॥ ७७ ॥ यापरी बोलतां सीतापती । कपि ते प्रार्थिती ऐशा रीतीं । कीं देव, आह्मीहि अयोध्येप्रती । एथवां येऊं वांछितों ॥ ७८ ॥ तेथ जो तुजसि राज्याभिषेक । होईल, अवलोकूं तो एक । मग कौसल्यामातेस देख । वंदून येऊं गृहांतें ॥ ७९ ॥ तयीं तो विचार श्रीरघुवीरें । मान्य केलियाउपरी त्वरें । पुष्पकीं आरूढ झाले सारे । सुग्रीव-बिभीषणादि ॥ ८० ॥ मग तें पुष्पक कुबेरासन । राघवानुज्ञेस अनुसरून । चाललें आकाशपथें करून । तीव्र वेगानें तेधवां ॥ ८१ ॥ विमान तेजस्वी सुंदर । त्यावरी शोभे हंसवर । भीतरीं रघुनाथ सीतावर । तेजोराशी प्रभु हा ॥ ८२ ॥ तेणें जैसें दिनकराचें । बिंब आकाशीं चमके साचें । तेसेंच यान तें रघुवीराचें । अंबरीं चमकूं लागलें ॥ ८३ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । ह्मणून लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८४ ॥ श्रीराम ॥ ५५ ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥

## अध्याय ५६ वा, अयोध्यागमन.

श्रीराम ॥ मग चालतां विमानांतून । सर्वत्र विलोकी रघुनंदन । सर्वांचि सीतेस समजावून । वृत्त तें सांगे तेथलें ॥ १ ॥ ह्मणे या त्रिकूटशिखरावरी । प्रिये पहा ही लंकापुरी । पहा ही रणभूमी, जीवरी । मांसशोणित दाटलें ॥ २ ॥ येथ या जागीं कपिराक्षस । लढिले घनघोर रात्रंदिस । येथ तो पडिला रक्षोधीश । रावण माझ्या शरांहीं ॥ ३ ॥ येथ ते कुंभकर्णादिक । असुर म्यां सुंदरी, पाडिले देख । सेतु हा सागरीं अलौकिक । बांधिला पहा प्रिये मीं ॥ ४ ॥ हें तों देख तूं सागरतीर्थ । सेतुबंध या नामें ख्यात । येथ म्यां स्थापिला कैलासनाथ । परम पवित्र स्थलीं या ॥ ५ ॥ येथें मज हा आला शरण । रावणबंधु बिभीषण । ही किष्किंधा नगरी जाण । माझ्या सुग्रीवसख्याची ॥ ६ ॥ तंव तें येतां किष्किंधापुर । आपुल्या तारादि राण्या थोर । घेऊन येतसे सुग्रीववीर । सीतासंतोषाकारणें ॥ ७ ॥ मग आणीक पुढती यान । चालूं लागलेंसें देखून । सीतेस श्रीमान रघुनंदन । तैसेंच सांगूं लागला ॥ ८ ॥ ह्मणे हा पर्वत ऋष्यमूक । येथ म्यां मारिला वाली देख । ही तों पंचवटी, आणिक । येथ म्यां राक्षस मारिले ॥ ९ ॥ येथ हे आश्रम पाहे दोन । अगस्त्य–सुतीक्ष्ण यांचें स्थान । प्रिये, पहा हे तापसी जन । दृष्टीस येती येथुनी ॥ १० ॥ देखिजे हा चित्रकूट गिरी । येथचि मजलागीं सुंदरी । भरतें भेटून परतून पुरीं । यावया-

लागीं प्रार्थिलें ॥ ११ ॥ येथ हा यमुनातीरावर । भरद्वाजांचा आश्रम थोर । पहा ही भागीरथी, भूवर । पाववी समस्त जनांतें ॥ १२ ॥ देख ही सरयू सरिता सीते । सर्वेंचि पहा वो अयोध्यापुर तें । येथून समस्त दृष्टीस येतें । प्रणाम त्यातें करीं वो ॥ १३ ॥ मग यापरी मार्ग क्रमून । चतुर्दशवर्षीं रघुनंदन । पातला भरद्वाजाचें स्थान । पांचव्या दिवशीं तेधवां ॥ १४ ॥ मग साष्टांग नमन करून । पुसतसे विनयें रघुनंदन । मुनींद्र ! भरत कीं शत्रुघन । क्षेम तयांचें असे ना ? ॥ १५ ॥ अयोध्यापुर असे कां सुखी । सांगा मज ही गोष्टी निकी । माता माझिया सुखिया लोकीं । असती ना हो मुनींद्रा ! ॥ १६ ॥ यापरी पुसतसे सीताराम । तैं तो भरद्वाज द्विजोत्तम । आहे सकळिकांचें क्षेम । ऐसें सांगून बोलला ॥ १७ ॥ राघवा, भरत हा नेमें जाण । महात्मा, राहिला धरून प्राण । एक्या तव भेटीकारण । सांडून आस आणिकीं ॥ १८ ॥ जटा-वल्कलें स्वीकारून । वनींचीं फळमूळें सेवून । राहिला, राज्यादि सारें धन । वाहून त्वत्पादुकांतें ॥ १९ ॥ राघवा, तुवां जें दंडकवनीं । असुरसंघास निर्दाळूनी । अगाध चरित्र केलें भुवनीं । तें मी जाणतों त्वत्कृपे ॥ २० ॥ तूं तों साक्षात् परब्रह्म । तुज न आदिमध्यांतक्रम । तूंच या सृष्टीस दिधलें जन्म । स्वयोगमायाबळानें ॥ २१ ॥ तेथ तूं आधीं जळ निर्मून । त्यावरी केलेंस देवा, शयन । तेणेंचि नारायण ह्मणून । तुजसि बोलूं लागले ॥ २२ ॥ प्रभो तूं सर्व जनांच्या आंत । राहसी विश्वात्मक-रूपांत । ब्रह्मदेव जो त्रिलोकतात । तव

नाभींत जन्मला ॥२३॥ ह्मणोनि समस्त जनवंदित। तूं या जगाचा होसी तात। तूं देव विष्णु लक्ष्मीकांत। जानकी लक्ष्मी असे ही ॥ २४ ॥ लक्ष्मण हाचि माझ्या मतें। शेष होऊन आला येथें। देव, तूं स्वांगींच या जगतातें। निर्मिसी मायाबळानें ॥ २५ ॥ परंतु सर्वदा गगनासम। अलिप्त राहसी तूं श्रीराम। सर्वसाक्षी तूं होसी, परम। चिच्छक्तीनें आपुल्या ॥ २६ ॥ तूं या भूतांस बहिरंतरीं। तूं परिपूर्ण सर्वग हरी। मूढ ते तरीहि तुजमाझारी। भाग झालेसें कल्पिती ॥ २७ ॥ पाहतां जगही तूंच हरी। तयास आधारही त्यापरी। आणि जगाचें पालन करी। तोही तूं होसी श्रीराम ॥ २८ ॥ सर्व भूतांचा भोक्ता देख। तूंचि कीं होसी रघुनायक। आणि भोग्य जें तेंहि एक। तूंचि होसी परेशा ॥ २९ ॥ जें जें दिसतें, श्रवणीं येतें। कीं जें अंतरंगीं आठवतें। तें सर्व तूंच कीं सीतापते। आन नाहींच सर्वथा ॥ ३० ॥ इया जगांच्या उत्पत्तीस। माया कारण आहे खास। परी त्वच्छक्तिच प्रेरी तीस। म्हणून माया तूंच पैं ॥ ३१ ॥ ज्यापरी चुंबक संनिध येतां। लोह तें चळण पावे स्वतां। तैशीच तुवां अवलोकितां। माया वी या जगातें ॥ ३२ ॥ विराट् हे तव स्थूल तनू। सूत्र तें सूक्ष्म ऐसें ह्मणूं। अदेह ऐसाहि सीतारमणू। जगत्स्थित्यर्थ देहवान् ॥ ३३ ॥ विराट स्वरूपासून सारे। अवतार जगांत होती बा रे। कार्य संपूर्ण करून त्वरें। तेथेंच लय पावती ॥ ३४ ॥ त्या तव अवतारांची कथा। जगीं जे घेती श्रवणपथा। ते मग जोडून अनन्यता। पा-

वती मोक्षपदातें ॥ ३५ ॥ तुजसि भूभारहरणासाठीं । प्रार्थिलें विधीनें श्रीजगजेठी । ह्मणोनि देव, तूं रघूच्या पोटीं । जन्मा आलासि राघवा ॥ ३६ ॥ आजि तें देवकार्य तुवां । सिद्धीस नेलेंस हे राघवा । यावरी तूं या मनुष्यभावा । धरून लोकीं राहसी ॥ ३७ ॥ मग बहु वर्ष-सहस्रांवरी । करणी करून अद्भुत भारी । यश पसरिशील दिशांस चारी । स्वर्गभूलोकहितार्थ ॥ ३८ ॥ ऐसा महिमा तव अद्भुत । कविजन गाताति सदोदित । आणि तो पातक दग्ध करीत । श्रवणमात्रेंच जनांचें ॥ ३९ ॥ ह्मणोनि प्रार्थितसें मी तुज । गृह हें पाववी श्रीरघुराज । येथें भोजन करून आज । उदईक जाणें पुरीतें ॥ ४० ॥ यापरी बोलतां तो मुनिनाथ । संतुष्ट झाला सीताकांत । मग तें पुरवाया वांछित । तेथ ते दिवशीं राहिला ॥ ४१ ॥ मग त्या मुनिकृत सत्कारातें । स्वीकारूनि श्रीरघुनाथें । क्षणैक विचार पाहून चित्तें । ह्मणितलें समीरसुतातें ॥ ४२ ॥ मारुते, जाय तूं आतां पुरीं । क्षेम घे जाणून नृपमंदिरीं । सर्वांचि गुहास शृंगवेरीं । जाऊन वृत्तांत सांग हा ॥ ४३ ॥ सर्वांचि जाऊन नंदिग्रामीं । वृत्त हें सांगे--आलोंसें मी । जानकी-लक्ष्मणांसंगें क्षेमी । वना आंतून एथवां ॥ ४४ ॥ आणि सीताहरणादि कथा । घालून तयाच्या श्रोतृपथा । रावणवधादि सारी वार्ता । बा तूं तयास निवेदी ॥ ४५ ॥ मग मी ऐसा विजयें येथ । पातलों ऋक्षकपींद्रांसहित । ऐकून केउती होते मात । ती मज येऊन कथीं तूं ॥ ४६ ॥ मग तें ऐकून श्रीहनुमंत । जाहला गमनातें उद्यत । गरुड

तो ज्यापरी भुजंगाप्रत । धांवूनि झेप घालितो ॥ ४७ ॥ तैसा तो वीर समीरगती । पातला शृंगवेराप्रती । आणि गुहास परमप्रीती । भेटून ऐसें बोलला ॥ ४८ ॥ सखा जो तुझा श्रीरघुनाथ । तेणें तुज ही कथिली मात । कीं मी सीतालक्ष्मणांसहित । सुखरूप आहे एधवां ॥ ४९ ॥ आणि तो भरद्वाजाश्रमांतूनी । आजि येईल तुझे सदनीं । यापरी निरोप समजावुनी । कपि तो पुढती निघाला ॥ ५० ॥ मग रामतीर्थ अवलोकून । सरयू नदीस ओलांडून । नंदिग्रामास तो हनुमान । क्षणमात्रेंचि पोंचला ॥ ५१ ॥ तेथ तो आश्रमीं कैकेयीसुत । अखंड श्रीरामचिंता करीत । देखिला तेणें भाक्तियुत । भरत दीन कृशांग ॥ ५२ ॥ काषाय-वल्कल-अजिनांबरीं । फलमूलांच्या वन्याहारीं । मुनि तो महीचें शासन करी । पादुका ठेवून पुढारां ॥ ५३ ॥ नेणों धर्मचि मूर्तिमान । पातला भूवरी देह घेऊन । यापरी मुनि तो अवलोकून । कपि संतोष पावला ॥ ५४ ॥ मग बोलला जोडूनि हात । जो तूं चिंतिसी स्वांतरांत । त्या राघवें तुज कथिली मात । मी सुखरूप असें कीं ॥ ५५ ॥ तुज मी सांगतों वार्ता प्रिय । त्यजीं तूं शोक आणिक भय । आतांचि येईल श्रीरघुराय । तुज भेटायाकारणें ॥ ५६ ॥ समरीं वधून रक्षोधीश । सोडवूनिया सीतासतीस । लक्ष्मणासमवेत तो जगदीश । संनिध आला असे कीं ॥ ५७ ॥ यापरी बोलतां श्रीहनुमंत । दाटून थोर आनंदें भरत । क्षणैक होऊन भानरहित । पूर्ण निश्चेष्ट जाहला ॥ ५८ ॥ मग सावध होऊन प्रीतीं । भेटला श्रीहनुमंताप्रती । आणि

आनंदाश्रूंहीं अती । न्हाणिता झाला तयासी ॥ ५९ ॥ ह्मणे–तूं देव कीं होसी नर ? । चालून येऊन येथवर । मज हा अत्यंत कर्णमधुर । वृत्तांत निवेदिला त्वां ॥ ६० ॥ त्या तुज गाई सहस्र शत । आणीक ग्रामेंही तैशीं बहुत । दासीहि रूपालंकारयुत । अर्पण करितों एधवां ॥ ६१ ॥ मग ह्मणे आह्मांस श्रीरघुनाथ । सोडून गेल्यास वर्षें बहुत । लोटलीं, तूं आज सांगसी मात । ऐसी परम सुखाची ॥ ६२ ॥ तेधवां उक्ति जे आहे लोकीं । ती मज आतां गमते निकी । कीं शतवर्षींही सुख लाभे कीं । नर जैं जिवंत तयातें ॥ ६३ ॥ असो, तरी तूं सांगें मातें । मग मी पावेन विश्वासातें । कपींशीं संगति श्रीरघुनाथें । किमर्थ केव्हां जोडली ॥ ६४ ॥ ऐसें भरतें पुसलियावर । तो श्रीहनुमंत वायुकुमर । श्रीरामकथा ती सुमनोहर । समग्र सांगे तयातें ॥ ६५ ॥ मग अत्यंत संतोषित । होऊन तो भक्त श्रीभरत । शत्रुघ्नासी आज्ञापीत । ऐशा रीती त्वरेनें ॥ ६६ ॥ ह्मणे–जीं दैवतें या नगरांत । तीं आजि साद्यंत पूजावींत । नाना उपहार आणि बहुत । बळीही अर्पून तयांतें ॥ ६७ ॥ आणि राजया श्रीरघुवीरा । भेटून, घेऊन याया घरा । अयोध्यावासी जन हा सारा । वेगेंकरून निघों दे ॥ ६८ ॥ सूत, वैतालिक, वंदीजन । गांवोत रघुनाथाचें गान । वारांगनाहि संघें करून । पुढती आधीं चालवा ॥ ६९ ॥ गज, अश्व, रथ आणि पायदळ । ऐसी चतुरंग सेना सकळ । तैसेंच अमात्यजनमंडळ । संगें राजस्त्रियाही ॥ ७० ॥ नृप जे आलेत येथें आज । तेही पहाया श्रीरघुराज । निघोत,

सांडूनि सारें काज । परम प्रेमें त्वरेनें ॥ ७१ ॥ रघुनाथमुखचंद्र मनोहर । पहाया हें सर्व अयोध्यापुर । निघों दे, अगा हा श्रीरघुवीर । सौख्यखाणीच समस्तां ॥ ७२ ॥ या-परी भरतें कथितां त्वरित । शत्रुघ्न झाला कार्योद्यत । मग सर्वांस आज्ञापीत । पुर शृंगारायास्तव ॥ ७३ ॥ मग नगरजनांहीं त्वरित । नाना सुवर्ण-रत्नखचित । पताका तोरणें अतिशयित । सर्वत्र उभविलीं तेधवां ॥ ७४ ॥ मग श्रीरामदर्शनासाठीं । निघाली जनांची मांदी मोठी । सकळिकांच्या अंतरीं गोष्टी । एक श्रीरामसुखाची ॥ ७५ ॥ अश्व ते चाकिले सहस्र शत । गजहि निघाले देखा अयुत । रथहि सुवर्णसूत्रयुत । दश सहस्र निघाले ॥ ७६ ॥ राजस्त्रियाहि शिबिकेआंत । बैसूनि चालल्या उत्कंठित । भरतें जोडूनि दोन्ही हात । पादुका शीर्षीं घेतल्या ॥ ७७ ॥ मग शत्रुघ्नासमवेत । चालिला पायींच पंथ क्रमीत । तंव तें अत्यंत दीप्तिमंत । विमान गगनीं देखिलें ॥ ७८ ॥ तेधवां बोलिला वायुकुमर । अहो हा देखा श्रीरघुवीर । संगें जानकी लक्ष्मण वीर । सुग्रीव तेही पहा हो ॥ ७९ ॥ तैं मग आबालवृद्ध जन । गर्जूंचि लागले आनंदून । पहा हो पहा हो रघुनंदन । सीताराम पहा हो ॥ ८० ॥ मग रथ-गज-अश्वांवरून । खालती उतरले सर्व जन । मग गगनीं नेत्र लावून । देखती सीतापतीतें ॥ ८१ ॥ तो श्रीरघुनाथजयजयकार । पसरला सर्वत्र भूमीवर । आणि भेदूनिया अंबर । स्वर्गामाजी प्रवेशला ॥ ८२ ॥ मग विमानें-अग्रावर । बैसला देखूनी श्रीरघुवीर । उदयाचळींचा तो दिनकर । भरतें साष्टांगें

वंदिला ॥ ८३ ॥ मग श्रीराम-आज्ञेनुसार । उतरलें विमान भूमीवर । सर्वांचि अनुजास घेई वर । भक्तप्रेमी श्रीराम ॥ ८४ ॥ तंव परम प्रेमभरें । रामास आलिंगून त्वरें । भरतें आणीक नमस्कारें । धरिले पाय प्रभूचे ॥ ८५ ॥ मग उठवूनि आपुल्या करें । अंकीं घेऊनि श्रीरघुवीरें । तयास प्रेमाश्रूंच्या नीरें । पोटीं धरून न्हाणिलें ॥ ८६ ॥ त्यावरी सुमित्रासुतें, आणखी । भरतें वंदिली श्रीजानकी । गातसे श्रीरामनाम मुखीं । प्रेमें व्याकुळ अंतरीं ॥ ८७ ॥ सर्वांचि सुग्रीव जांबवान । अंगद मैंदादि वानरजन । तयांस तो वीर आलिंगन । देतसे प्रेमें आदरें ॥ ८८ ॥ सुषेण-नळनीळादि सारे । मैंद-द्विविदही अत्यादरें । शरभ पनसही भरतें वीरें । सर्वां आलिंगन दिधलें ॥ ८९ ॥ तेही समस्त वानरवीर । ज्यांहीं घेतले मनुजाकार । ते त्यास क्षेमादि समाचार । प्रेमें पुसूं लागले ॥ ९० ॥ तेथ सुग्रीवास बोले भरत । सख्या त्वां साहाय्य केलें बहुत । रावणा वधून श्रीरघुनाथ । तेणेंचि जयो पावला ॥ ९१ ॥ तो तूं आमुचा कीं निःशंक । भ्राताचि पांचवा होसी एक । तुजऐसा श्रीरघुनायक- । भक्त या लोकीं असेना ॥ ९२ ॥ यावरी शत्रुघ्नें रघुवीर । पायीं घालून नमस्कार । सर्वांचि सुमित्रेचा कुमर । सीतेसहित वंदिला ॥ ९३ ॥ मग जी आपुली माता सती । म्लान जी शोकें विव्हळ अती । त्या कौसल्येस करून प्रणती । रामें तीतें तोषविलें ॥ ९४ ॥ सर्वंच कैकेयीतें वंदून । सुमित्रेलाही केलें नमन । मागुती त्यातेंच अनुसरून । लक्ष्मणें त्यांतें वंदिलें ॥ ९५ ॥ मग पादुका दोन्ही

करें । घेऊन भरतें अत्यादरें । श्रीरामपायींच भक्तिभरें । नेऊन देला योजिल्या ॥ ९६ ॥ मग ह्मणे, प्रभो मी तुज परतून । आलिया करितसें अवलोकन । येणेंचि सफळचि मी जन्मून । अभीष्ट माझें साधलें ॥ ९७ ॥ आतां प्रभो, तव राज्यश्री ही । मीं तुज-आधीन केली पाहीं । आतां तुवां ही पाळिजे मही । स्वतेजोबळें करूनी ॥ ९८ ॥ ऐसें भरतोक्त करूनि श्रुत । कपिवर तोषले अतिशयित । आनंदाश्रूंही दाटूनि बहुत । वर्णिती त्याच्या गुणांतें ॥ ९९ ॥ मग रघुनाथानें प्रेमभरीं । अनुज तो घेऊनि अंका-वरी । पुष्पक यान तें आश्रमद्वारीं । आणिलें तत्काळ तयाच्या ॥ १०० ॥ मग उत-रोनि खालीं जवें । यानास ह्मणितलें ऐसें भावें । बा तुज आतां कुबेरसेवे । जावया माझी अनुज्ञा ॥ १०१ ॥ मग श्रीवसिष्ठगुरूंप्रती । रामें साष्टांग केली प्रणती । आणि महार्ह आसनावरती । बैसविलेंसे तयांतें ॥ १०२ ॥ मग मागुती त्यांसनिधीं । बैसला श्रीराम सद्गुणनिधी । जो कां सर्वही आधिव्याधी । वारितो भक्तजनांच्या ॥ १०३ ॥ ऐसा श्रीराम सीताराम । सकळ जीवांचा जो विश्राम । जयाचें चरित्र पुरवी काम । श्रवणमात्रें हें जनांचे ॥ १०४ ॥ ह्मणोनि तयाचें पादप्रेम । धरावें हेंचि परमोत्तम । आणिक मार्ग ते जाणा श्रम । जे या प्रेमावेगळे ॥ १०५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०६ ॥ श्रीराम ॥ ५६ ॥

## अध्याय ५७ वा, रामराज्याभिषेक.

श्रीराम ॥ मग कैकेयीपुत्रें भरतें । कर जोडूनि रघुनाथातें । म्हणितलें, राज्य हें आतां येथें । स्वीकारावें प्रभोजी ॥ १ ॥ पूर्वीं मम मातेची गोष्टी । आदरें पूर्ण करायासाठीं । जें मज दिधलें तें शेवटीं । तुझें मीं तूतें देतसें ॥ २ ॥ यापरी बोलूनि तो सत्वरीं । निजाग्रजाचे पाय धरी । आणि विनवी नानापरी । राज्यस्वीकाराकारणें ॥ ३ ॥ तैं ती विनंती स्वीकारून । राज्य तें स्वकरीं रघुनंदन । घेतसे भरताच्या हातून । देव जो लीलाविग्रही ॥ ४ ॥ नातरी साक्षात जो सुखरूप । स्वाराज्यानुभव ज्यासि अमूप । आणि ज्यास हा सुखदुःखताप । सर्वथा बाधूं शकेना ॥ ५ ॥ ऐसिया परमात्मयाला कैंची । मानवी राज्याधिकाररुचि । भुवयी वक्र होतांच जयाची । त्रिलोकी दग्ध होतसे ॥ ६ ॥ यत्कृपालेशेंचि या जगतींत । सर्वही वैभवें होतीं प्राप्त । लीलया जो ही सृष्टि रचीत । त्यास हें राज्य कायसें ॥ ७ ॥ परंतु भक्तजनांचा भाव । सर्वही सिद्धीस न्यायास्तव । देव हा धरून मनुष्यभाव । तैसा तैसा वर्ततसे ॥ ८ ॥ असो, यावरी श्रीरघुनाथ । शत्रुघ्नशब्दें स्मश्रु करीत । तंवचि जनांहीं अभिषेकार्थ । सिद्धता केली सर्वही ॥ ९ ॥ मग भरतें केलें स्नान । मागुती करीतसे लक्ष्मण । सुग्रीव आणीक बिभीषण । तेही करिती मागुती ॥ १० ॥ मग जटा सोडुन रघुनंदन । स्नान करून

नेसे वसन । बहुमोल आणीक देदीप्यमान । तेजें चमकूं लागला ॥ ११ ॥ यापरी श्रीरामलक्ष्मणांप्रती । भूषणें लेववी भरत प्रीती । राजस्त्रियाहि तैशाच रीती । सीतासतीस भूषविती ॥ १२ ॥ मग तारादि वानर-नारी । भूषणीं शोभवी नानापरी । वृद्ध कौसल्या, स्वीयांतरीं । पुत्रस्नेहें भरूनी ॥ १३ ॥ मग शत्रुघ्नवचनें रथ । सुमंत आणिता झाला तेथ । मग त्यावरी श्रीरघुनाथ । सर्वांचि आरूढ होतसे ॥ १४ ॥ मागुती स्नान—वस्त्रालंकारें । मंडित वीरहि चालिले त्वरें । सुग्रीव, मारुति, बिभीषण सारे । सेनेसमवेत आपुल्या ॥ १५ ॥ तारा रुमाहि सीतेसहित । चालल्या बैसून याना आंत । यापरी निघाला सीताकांत । समारंभेंसीं पुरीतें ॥ १६ ॥ सारथि होऊन भरतें करीं । धरिली देख हयांची दोरी । शत्रुघ्नें रत्नदंडाचें वरी । छत्र स्वकरें धरियलें ॥ १७ ॥ पंखा धरिला सुमित्रासुतें । सुग्रीव आणीक राक्षसनाथें । चामरें धरिलीं आपुले हातें । वारिती त्यांहीं प्रभूतें ॥ १८ ॥ सुरवर आणीक सिद्धजन । ऋषिहि जे तैसे ज्ञानघन । करिती रघुवीराचें गान । ध्वनि तो सर्वत्र कोंदला ॥ १९ ॥ भेरी मृदंग पणवानक । ऐशीं वाद्यें तीं कपिनायक । वाजविती नररूपें देख । बैसूनि अंगीं गजांच्या ॥ २० ॥ यांपरी राजा श्रीरघुनाथ । एतुल्या समारंभेंसी सहित । पातला आपुल्या समलंकृत । अयोध्यापुरीस तेधवां ॥ २१ ॥ तयीं ती श्यामल सुकुमार तनु । सुंदर आरक्त पद्मनयनु । किरीटरत्नालंकारें करून । शोभतां लोकीं देखिली ॥ २२ ॥ तयीं तें सर्व सौख्याचें घर ।

देखून सर्वही नारीनर । अंतरीं आनंदाचा पूर । येवोनि प्रेमें दाटले ॥ २३ ॥ कांसेसी सुदिव्य पीतांबर । त्यावरी कटिसूत्र चमके थोर । परम तेजस्वी मौक्तिकहार । वक्षावरती झळकतसे ॥ २४ ॥ अंगीं लाविलेंसें चंदन । कस्तूरिकाहि तैसी घन । कंठीं माळही लंबायमान । कल्पवृक्षाच्या फुलांची ॥ २५ ॥ भोंवती सुग्रीवादि जन । सेवेस तिष्ठती प्रेमें-करून । भूपाळनाथ तो रघुनंदन । तेजें तुळिजे रवीशीं ॥ २६ ॥ तो श्रीराम सीतेसहित । पातला संनिध, हा वृत्तांत । नारीजनांत होतां श्रुत । आनंद त्यांचा न समाये ॥ २७ ॥ विकसलीं कमळाऐसीं मुखें । राहिलीं कार्येंही सकळिकें । आणि भूषणें ल्यावया देखें । तांतडी झाली तयांतें ॥ २८ ॥ मग गच्चीवरतीं चढून । मूर्ति ती प्रभूची मनमोहन । देखून, अंतरीं उचंबळून । वर्षिलीं पुष्पें तयांहीं ॥ २९ ॥ मग आणीक होऊन पुढें । देखती प्रभूच्या वदनाकडे । आणि नेत्रसुखाचे घडे । सेविती उदंड तेधवां ॥ ३० ॥ ऐसेचि सर्वही प्रजाजन । परम प्रफुल्ल वदनेंकरून । पुढतपुढतीच अवलोकन । करूं धावती प्रभूचें ॥ ३१ ॥ रामेंहि ते स्वीय प्रजाजन । देखिले प्रेमार्द्र नयनेंकरून । मग त्या परम शोभायमान । पितुर्गृहांत प्रवेशला ॥ ३२ ॥ मग आपुल्या मातेस नमून । आणिकांतेंही केलें नमन । मग भरतास संबोधून । ऐसें सांगता जाहला ॥ ३३ ॥ हा मम सुग्रीव मित्र-वर । तयास निवासालागीं थोर । देइजे ऐसें गृह सुंदर । सर्व सामग्रीयुक्त जें ॥ ३४ ॥ आणिकांतेंही सुखवासासी । देइजे स्थानें तैशीं तैशीं । माझिया लोकांस कोणेहि

विषीं । न्यूनता राहूं न दीजे ॥ ३५ ॥ मग त्या आज्ञेनुसारें भरत । तयांस तैशीं तैशीं देत । सदनें, मागुती बोले मात । ऐसी सुग्रीवाकारणें ॥ ३६ ॥ कीं या रामाभिषेकास्तव । गांठून चतुःसिंधूंचे ठाव । जल आणाया तूं पाठव । दूत गा वेगें आपुले ॥ ३७ ॥ तंवचि सुग्रीवें मरुत्सुत । जांबवंत, अंगद वालीसुत । चौथा सुषेण ऐसे त्वरित । दूत जलार्थ धाडिले ॥ ३८ ॥ त्यांहीं तत्काळ तें तें नीर । आणिलें भरून कुंभ चार । सर्वोंचि कित्येक तीर्थांवर । जाऊन जल तें आणिलें ॥ ३९ ॥ मग शत्रुघ्न मंत्र्यांसहित । वंदूनि मुनि वसिष्ठांप्रत । ती सर्व सिद्धता केली श्रुत । अभिषेकाची प्रभूच्या ४० ॥ मग संगती ब्राह्मणजन । घेवोनि मुनि तो ज्ञानघन । वसिष्ठ, सामग्री संपादून । कार्यार्थ वेगें लागला ॥ ४१ ॥ मग रत्नमय आसनावर । बैसवी प्रेमें श्रीरघुवीर निकटाचि सीतादेवी सुंदर । तीहि बैसविलीसे ॥ ४२ ॥ मग स्वयें तो श्रीवसिष्ठ । वामदेव, जाबालि श्रेष्ठ । तैसाचि वाल्मीकि कविवरिष्ठ । समस्त तेथें मीनले ॥ ४३ ॥ आणि दर्भाग्र तुळसीदळ । यांहीं सुगंधी केलें जल । घेऊन तो श्रीभूमिपाळ । सिंचिला विध्युक्त तयांहीं ॥ ४४ ॥ सर्व ऋत्विज ब्राह्मण थोर । कन्यका आणीक मंत्रिवर । चतुर्लोकपाल आणीक सुर । इतुक्यांसमवेत तेधवां ॥ ४५ ॥ सुग्रीव-बिभीषणांहीं करीं । चामरें धरिलीं देखा वरीं । आणि शत्रुघ्न वरतीं धरी । श्वेतच्छत्र प्रभूचें ॥ ४६ ॥ तेधवां सुवर्णवर्णी माला । रामासि समीर देता झाला । देववरें जो आज्ञापिला । श्रीरामसेवेकारणें ॥ ४७ ॥ स्वयेंही तो श्रीशचीचा

नाथ । हार घेवोनि रत्नखचित । श्रीराघवाच्या कंठीं घालीत । परम प्रेमें आदरें ॥ ४८ ॥ तेधवां गंधर्व करिती गान । अप्सरा करिती कीं नर्तन । दुंदुभी वाजती गगनांतून । वर्षाव होय सुमांचा ॥ ४९ ॥ तयीं तो नव दूर्वांच्या समान । श्यामल अंगें शोभायमान । कमलनयन रघुनंदन । देखूनि उमेश तोषला ॥ ५० ॥ कोटि रविसा तेजोयुत । मस्तकीं किरीट विराजत । मदनशतांस लाज आणीत । ऐसें लावण्य तनूचें ॥ ५१ ॥ कांसे झळके पीतांबर । दिव्यालंकार अंगावर । कस्तुरीसुगंध फांकला थोर । लेपाकारणें भोंवतीं ॥ ५२ ॥ वामांकावरी देवी सीता । बैसली सर्व-भूषण-भूषिता । शोभते सुवर्णकांतियुता । स्कंधीं हात प्रभूचा ॥ ५३ ॥ यापरी परम दीप्तिमंत । देखूनि तो श्रीसीताकांत । भक्तिभावें श्रीकैलासनाथ । स्तवनीं सिद्ध जाहले ॥ ५४ ॥ मग ह्मणती हे श्रीसीतावरा । किरीट-अंगद-हार-धरा । सिंहासनस्था श्रीरघुवीरा । सुंदरा, तूतें नमोस्तु ॥ ५५ ॥ प्रभो, तूं अनादि, अनंत, एक । निपजविसी हें त्रैलोक्य-पीक । दावूनि कांहीं क्रीडा कौतुक । मागुती अंगीं लोपविसी ॥ ५६ ॥ परी ही पाहतां माया सारी । ह्मणून तूं या सर्वांभीतरीं । अलिप्त राहसी कीं श्रीहरी । नित्य निमग्न स्वरूपीं ॥ ५७ ॥ प्रभो, तूं गुणांहीं आवृत होसी । नाना चरित्रलीला करिसी । सुरनरांमाजी अवतार घेसी । भक्तप्रेमाकारणें ॥ ५८ ॥ परी या त्वदनुभवाचें सुख । जाणती ज्ञानीच लोकीं एक । तयांस दर्शन तुझें देख । सदैव सर्वांभीतरीं ॥ ५९ ॥ निजांशेंचि तूं जग निर्माण ।

करून शेषस्वरूपें पूर्ण । शिरीं तें करिसी कीं धारण । रक्षणासाठीं तयाच्या ॥ ६० ॥ तैसाचि भानुरूपें वर । देव तूं तळपसी सीतावर । चंद्र कीं, पर्जन्य किंवा समीर । तूंचि तद्रक्षणा होसी पैं ॥ ६१ ॥ तूंचि या जीवांभीतरीं आंच । होऊन राहसी देवा, सांच । आणि भुक्तान्न पचविसी पांच । प्राणवायूंच्या निमित्तें ॥ ६२ ॥ अथवा रविचंद्रीं जें तेज । तैसेंच अग्नींत जें रघुराज । कीं जें सर्वांत चैतन्यबीज । तें सर्व तुझें सत्व पैं ॥ ६३ ॥ जनांत जें थोर धैर्य दिसे । कीं जें शौर्यही अंगीं विलसे । तो सर्व तुझाचि देवा असे । सत्त्वांश पूर्ण निश्चयें ॥ ६४ ॥ प्रभो, तूं एकाचि देवाधिदेव । भाससी विधि, विष्णु आणि शिव । काल-कर्मादि सारे भाव । तूंच कीं मायाविलासा ॥ ६५ ॥ नाना मतांचे नाना जन । तयांस नाना रूपेंकरून । भाससी, परी तूं सच्चिद्घन । एक परब्रह्म पैं ॥ ६६ ॥ प्रभो, तूं मत्स्यादि रूपें दश । घेऊन जगीं या अवरतलास । ऐसें श्रुतिशास्त्रें सर्वांस । सांगती जैशीं निश्चयें ॥ ६७ ॥ तैसीच या सर्व विश्वभर । वस्तु जी लहान अथवा थोर । ती एक तूं सर्व परमेश्वर । ऐसाचि निश्चय आमुचा ॥ ६८ ॥ इष्ट कीं अनिष्ट, सारे भाव । तूंच मज गमसी सीताधव । भीतरीं प्रविष्ट व्हायास्तव । आन तो कोणी असेना ॥ ६९ ॥ या सर्व अनंत विश्वाआंत । जें सर्व वर्ततें पदार्थजात । वर्तेल पुढती, तेंही समस्त । रूप तुमचेंच श्रीरामा ॥ ७० ॥ चराचरांत तुजवांचून । माझ्या दृष्टीस न दिसे आन । ह्मणून देव, तूं सच्चिद्घन । आनंदरूप परेशु ॥ ७१ ॥

देवा, त्वत्स्वरूपाची खूण । जनीं या बहुधा नेणे कोण । यास ही आहे गा, कारण । माया तुझी एकली ॥ ७२ ॥ परी जे त्वद्भक्तिसेवापथ । धरून निर्मल करिती चित्त । त्यांस हें निश्चयें प्रतीत होत । ईश्वरी तत्त्व गूढ जें ॥ ७३ ॥ हें दिव्य चैतन्यतत्त्वामृत । ब्रह्मादिकही नेणती खचित । बाह्य दृष्टीच्या जनांची गत । ऐसीच होणें सर्वथा ॥ ७४ ॥ ह्मणूनि व्हावया अंतर्वृत्ति । बुध ते साधून तुझी भक्ती । अंतीं सुखेंचि पावती मुक्ति । पापें जाळून सर्वही ॥ ७५ ॥ मी नित्य तुझीं नामें गात । राहें काशीस अंबेसहित । आणि या मर्त्यांस नामामृत । मुक्त्यर्थ तुझें पाजितों ॥ ७६ ॥ असो, देव मी अंतीं एक । विनवितों तूतें रघुनायक । जन जे राहून अनन्यभाक । स्तव हा गातील तुमचा ॥ ७७ ॥ ते सर्व सौख्यार्थ संपादून । अंतीं पावोत तुझें स्थान । तुझिया कृपा प्रसादें-करून । वर हा तुझा असों दे ॥ ७८ ॥ या परी आपुले मनींचा भाव । प्रकट करून देव शिव । राहतां निवांत शचीचा धव । स्तवार्थ पुढती जाहला ॥ ७९ देव, या लंका-धीशें खळें । आमुतें हैराण होतें केलें । परी त्वां आह्मांस स्वास्थ्य दिलें । वधून त्यातें दयाळें ॥ ८० ॥ मग बोलले देवगण । प्रभो, हा दुष्टाग्रणी रावण । आमुचे यज्ञांश करीत हरण । द्विजीं जे आम्हां अर्पिलें ॥ ८१ ॥ परी त्वां हरून त्याचा प्राण । आह्मांस निर्भय केलें जाण । आतां आह्मांस पूर्वप्रमाणं । यज्ञांश पावूं लागती ॥ ८२ ॥ यावरी पितरीं प्रार्थिलें, देव । त्वां दुष्ट वधिला राक्षसराव । आह्मांस पिंड जे देत मानव । ते हा खातसे

बळानें ॥ ८३ ॥ परी या संकटापासून आतां । आह्मी सर्वही सीताकांता । सुटलों, आह्मांस नुरली चिंता । पिंड सेवाया कारणें ॥ ८४ ॥ यावरी यक्ष सांगती गोष्टी । देव, हा आह्मांस लावी वेठी । परी त्वां वधून त्यातें शेवटीं । विमुक्त केलें आमुतें ॥ ८५ ॥ ही तव कृपाचि आह्मांवर । जाहली राघवा, परम थोर । आह्मांस कांहींच आतां घोर । नुरला तुझ्या कृपेनें ॥ ८६ ॥ मग ते गानकला-निपुण । गंधर्व करिताती भाषण । प्रभो, हे आह्मी त्वन्नामगुण । निःशंक पूर्वी गातसूं ॥ ८७ ॥ तेणें आम्हांस सदोदित । लाभे परमानंदामृत । परी हा खळ जो राक्षसनाथ । तेणें आम्हां जिंकिलें ॥ ८८ ॥ मग त्या-च्याच आराधनीं । गुंतलों आह्मीं रात्रंदिनीं । परी त्वां तयास निर्दाळूनी । रक्षिलें आम्हां कृपेनें ॥ ८९ ॥ ऐशाच रीती उरगादिक । सिद्ध किन्नर मारुत देख । अष्ट वसु आणि गाई गुह्यक । स्तविते झाले प्रभूतें ॥ ९० ॥ ब्रह्मदेवेंही स्तवन केलें । अप्सरांनींही गुण गायिले । समस्तीं अत्यंत वाखाणिलें । उपकार देवा, ह्मणोनी ॥ ९१ ॥ मग सर्वांस श्रीरघुवीरें । वंदन केलें बहु आदरें । मग ते निरोप घेती सारे । जावया स्वस्थळातें ॥ ९२ ॥ परी ते चालतां, जातां घरीं । वर्णिती रामास परोपरी । आणि मूर्ति ती अति साजिरी । ध्याती चित्तीं आवडी ॥ ९३ ॥ अभिषेकानें आर्द्र तनु । संगतीं सीता, सुमित्रासूनु । ऐसा गोड तो रघुनंदनु । ध्यानीं धरिला तयांहीं ॥ ९४ ॥ सुरवर संतोष पावूनि फार । करिती सर्वत्र जयजयकार । प्रेमें सुमनें वर्षती अपार । श्रीरामाच्या मस्तकीं ॥ ९५ ॥

गर्जती वाद्यें गगनीं घन । मुनींद्र आदरें करिती स्तवन । भीतरीं जें दिव्य सिंहासन । त्यावरी मूर्ति प्रभूची ॥ ९६ ॥ प्रसन्न वदनीं शोभे स्मित । तेजें झळके अतिशयित । कोटि सूर्यांच्या ऐशी निश्चित । देदीप्यमान प्रभा हीं ॥ ९७ ॥ संगें सीता सुमित्रासुत । मारुती आणीक वानरनाथ । तिष्ठती ज्याच्या सेवेनिमित्त । ऐसा सुंदर राम हा ॥ ९८ ॥ हा मज आवडे ध्यानासाठीं । न लगे मज या वायां गोष्टी । जन हो करा ही प्रेमलुटी । धांव घेऊन त्वरेनें ॥ ९९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १०० ॥ श्रीराम ॥ ५७ ॥ ७ ॥ ७ ॥

## अध्याय ५८ वा, सेवकवरदान.

श्रीराम ॥ श्रीराम आनंदाचें धाम । सहजें पुरवी सकळ काम । भक्तजनांचा निज-विश्राम । सीतादेवीवल्लभू ॥ १ ॥ तो हा अभिषेक झालियावर । जाहला सिंहासनाधी-श्वर । तेव्हां पर्वचि आलें थोर । सर्वांस पूर्ण सुखाचें ॥ २ ॥ तेधवां धान्यादिकांहीं मही । सदैव संपन्न राहे पाहीं । फलपुष्पांची वृक्षांवरीही । न्यूनता केव्हां असेना ॥ ३ ॥ निर्गंध पुष्पेंही सुगंधित । जाहलीं त्या श्रीरामराज्यांत । अहो, हा जैसा वर्ते कांत । तैशीच वर्ते महीही ॥ ४ ॥ असो, श्रीराघवें अभिषेकांतीं । जनांस दानें केलीं अती ।

अश्व, धेनु नि गाई किती । आर्पिल्या प्रेमें द्विजांसी ॥ ५ ॥ तीस कोटी सुवर्णदान । केलें द्विजवर्यांलागून । वस्त्राभरणेंही संतोषून । दिधलीं भारी तयांसी ॥ ६ ॥ सुग्रीवासी प्रीतिभरें । माला अर्पिली श्रीरघुवीरें । खचिली जी कां सर्व प्रकारें । दिव्य रत्नांहीं रवि-ऐशा ॥ ७ ॥ अंगदालागीं अंगदें दोन । प्रेमें अर्पून देदीप्यमान । दिव्य रत्नांचा हार बघून । सीतेलागीं अर्पिला ॥ ८ ॥ तयीं तो कंठाआंतून हातीं । हार घेऊन सीता सती । पाहे श्रीरामवदनाप्रती । आणि कपींकडेही ॥ ९ ॥ तयीं तियेचा अंतर्हेत । जाणून बोलला सीताकांत । जानकी, हार हा तव मनांत । देणें आहे कोणेका ॥ १० ॥ तरी त्वां अर्पण कीजे तया । शंका न घ्यावी ठायीं इया । तंव ती हार तो मारुतिराया-। लागीं अर्पिती जाहली ॥ ११ ॥ मग तो हारें भिभूषित । मारुती आदरें जोडूनि हात । पुढती देखून सीताकांत । प्रेमें त्यातें बोलला ॥ १२ ॥ मारुते, प्रसन्न हा मी तुज । वर तूं मागून घेईं आज । सिद्धीस नेईन तुझें काज । हो कां दुर्लभ सुरां जें ॥ १३ ॥ तेधवां संतुष्ट होवोनि फार । घालून साष्टांग नमस्कार । बोलता झाला तो कपिवीर । विनम्रभावें राघवा ॥ १४ ॥ प्रभो, मी तुझें नामस्मरण । करितां तृप्ति न पावे जाण । ह्मणून हा हेत व्हाया पूर्ण । मज दे वास्तव्य जनीं या ॥ १५ ॥ आणि जोंवरी या भूलोकीं । त्वन्नाम, तोंवरी तनु ही निकी । राहावी, याहून मज आणिकीं । आस सर्वथा असेना ॥ १६ ॥ तेधवां ठीक ह्मणून देव । बोलला, तूं मुक्त मारुतिराव । नामस्मरणोंचि माझा

ठाव । तूं कल्पांतीं वरीं वो ॥ १७ ॥ सर्वेचिं बोलली सीताबाई । मारुते, वर हा आणीक घेईं । राहतां तुजला कोणे ठाईं । लाभोत सौख्यें सर्वही ॥ १८ ॥ यापरी वर ते मिळतां दोन । परम तोषून तो हनुमान । साष्टांग पायीं घाली नमन । सीतारामांतें तेधवां ॥ १९ ॥ मग परम संकटें करून । तेथून निघून, तप आचरण । करायालागीं तो हनुमान । हिमगिरीतें पावला ॥ २० ॥ मग गुहास श्रीरघुनाथ । ह्मणे- तूं आपुल्या शृंगबेरांत । जाऊन अंतरीं मातें ध्यात । भोग भोगीत रहा वो ॥ २१ ॥ अंतीं माझिया ठायीं वास । पावसी, मित्रा जाणे खास । यापरी बोलून देवें त्यांस । आत्मविज्ञान बोधिलें ॥ २२ ॥ मग वस्त्राभरणेंकरून । तयास आणीक संतोषवून । अंगें देऊन आलिंगन । त्यास मार्गीं लाविलें ॥ २३ ॥ मग जे कपिवर आले होते । अभिषेकोत्सव पाहायातें । तयांस ऐशींच आपुल्या हातें । वस्त्रें भूषणें अर्पिलीं ॥ २४ ॥ सुग्रीव विभीषण मित्र दोन । तेहि तन्मानास अनुसरून । राघवें पूजून प्रेमेंकरून । निरोप दिधला तयांतें ॥ २५ ॥ मग तो कपींद्र गेला घरा । असुर पातला लंकापुरा । आणि निर्भय होऊन पुरा । राज्य चालवी पुरीचें ॥ २६ ॥ मग तो श्रीराम सीताकांत । अयोध्येमाजी राज्य करीत । एक प्रजाजनांचें हित । केवळ चित्तीं धरूनी ॥ २७ ॥ आपुल्या युवराजपदावर । बैसवी प्रेमें सुमित्राकुमर । जो नित्य श्रीरामसेवापर । न अपेक्षितांहि तयानें ॥ २८ ॥ राम हा परमेश्वर निश्चयें । सर्व कर्मांचा साक्षी स्वयें । कर्तृत्वादि धर्मांतें जयें । स्पर्शिलें नाहीं कदापि ॥ २९ ॥

आनंदघन जो निर्विकार । तेणें धरून मनुजाकार । लीला केल्या नाना मधुर । लोकोद्धाराकारणें ॥ ३० ॥ अश्वमेधादि यज्ञ करून । संतुष्ट केले देवजन । आणि दक्षिणेनिमित्त धन । उदंड दिधलें द्विजांतें ॥ ३१ ॥ श्रीरामराज्यांत कोणे स्त्रीला । वैधव्याचा न अनुभव आला । सर्पांहि कोणास दंश केला । ऐसें नाहीं जाहलें ॥ ३२ ॥ नाहीं रोगादिकांची भीति । चोरांचीहि न कोठें गति । कोणहि अनर्थ कवणे रीति । कोणास कोठें नाढळे ॥ ३३ ॥ वृद्ध नांदत असतां लोकीं । बाळक न जाय मृत्युमुखीं । मेघ ते वृष्टि करिती निकी । यथाकालेंच भूवरी ॥ ३४ ॥ लोकही सारे स्वधर्मपर । वर्तती वर्णाश्रमानुसार । आणि अंतरीं निरंतर । ध्याती सीतापतीसी ॥ ३५ ॥ रामही अंगें धर्मज्ञ थोर । प्रजापालनीं अति तत्पर । प्रेम जयाचें सर्वांवर । कन्यापुत्रांसारिखें ॥ ३६ ॥ यापरी राजा श्रीरघुवीर । जनांस देऊन सौख्यभर । दश सहस्र वर्षांवर । नांदला भूलोकावरी ॥ ३७ ॥ ऐशी परमपावन ही कथा । शंकरें कथिली त्रिलोकहिता । धनधान्य-ऐश्वर्यारोग्याकारितां । जनांस येई फळातें ॥ ३८ ॥ जो नर भावें श्रवण करीं । तयाचीं पातकें पळतीं दुरी । आणि तयाचीं वांछितें सारीं । तींहि सिद्धी पावती ॥ ३९ ॥ रामाभिषेक श्रवण करी । तो नर धनाभिलाषी जरी । शीघ्रचि उदंड धन तें घरीं । जोडील श्रीरामकृपेनें ॥ ४० ॥ अथवा पुत्रास वांछीत कोण । तेणें सर्व हें रामायण । पठण केलिया तयास जाण । पुत्र होईल गुणी जो ॥ ४१ ॥ भूपति कोणी, आध्या-

तिमिक । कथा ही श्रवण करील देख । तरी तो लाभेल वैभवसुख । राज्यहि वाढेल तयाचें ॥ ४२ ॥ तयाचे शत्रुहि होती जित । राज्य तो करील निष्पीडित । आणि विजयाचि तो निश्चित । पावेल रामभक्त जो ॥ ४३ ॥ स्त्रियाहि ग्रंथ हा श्रवणीं घेती । तरी जीं तयांस बाळें होतीं । तीं दीर्घ आयुष्य आणि कीर्ति । पावती देखा निश्चयें ॥ ४४ ॥ वंध्येलागींहि सुंदर सुत । प्राप्त होईल हें निश्चित । जी प्रेम ठेवून अंतरंगांत । श्रवण करील कथा ही ॥ ४५ ॥ साधकजन जो भावें कोणी । ग्रंथ हा ठेवी श्रवणपठणीं । क्रोधादिकांस अंतःकरणीं । ठाव नेदून निश्चयें ॥ ४६ ॥ तो मग समस्त संकटांलागीं । तरून निर्भय होई जगीं । आणि भक्तिहि निजांतरंगीं । जोडून सेवी सुखातें ॥ ४७ ॥ सर्वही देवता संतोषती । विघ्नेंहि अवघीं विलया जातीं । अध्यात्मरामकथा ही प्रीति । पठतां लक्ष्मी घरा ये ॥ ४८ ॥ कोणी रजस्वलाही नारी । कथा ही भावें श्रवणीं धरी । तरी तियेच्या येई उदरीं । पुत्र दीर्घायु ख्यात जो ॥ ४९ ॥ अथवा पूजन करून प्रीती । करील ग्रंथास जो या प्रणती । सर्व पातकें निरसून अंतीं । पावेल विष्णुपदीं तो ॥ ५० ॥ येणें प्रसन्न श्रीरघुनाथ । होऊन, सद्भक्त-मनोरथ । धर्मार्थकामही पुरवीं त्वरित । अंतीं मोक्षहि देतसे ॥ ५१ ॥ नित्यनेमें हें अखंडित । जनांहीं पुराण कीजे श्रुत । मग निरसून पापें समस्त । आयुरारोग्यातें पाविजे ॥ ५२ ॥ श्रवणीं तत्पर जो कां नर । तो देव, ऋषि आणि पितर । यांच्या ऋणांचा फेडून भार । तो-

षवी येणेंचि तयांतें ॥ ५३ ॥ ऐसी परम सुंदर ही कथा । वैराग्य-भक्ति-ज्ञान-युता । वाचितां ऐकितां यद्वा लिहितां । नर संसारीं न ये तो ॥ ५४ ॥ आलोडूनियां वारंवार। समस्त वेदराशींचें सार । काढिता झाला श्रीशंकर । तारक ब्रह्म श्रीराम ॥ ५५ ॥ मग तें निजांगें संपादित । रहस्य गूढ जें अतिशयित । प्रियेस सांगे, तेंचि येथ । बोलिलें रामायणीं पैं ॥ ५६ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ५७ ॥ श्रीराम ॥ ५८ ॥ ६ ॥ ❀ ॥

---

॥ युद्धकांड समाप्त ॥






# उत्तरकांड.

## अध्याय ५९ वा, राक्षसकुलवृत्त.

श्रीराम ॥ जयोस्तु श्रीराम श्रीरघुवीर । कौसल्याहृदयानंदकर । कमलनेत्र जो सीतावर । निवटिलें जेणें खळांतें ॥ १ ॥ असो, ही इतुकी रामकथा । ऐकून पार्वती आपुले नाथा । बोलली, देव! हें अमृत पितां । तृष्णा वाढे विशेषें ॥ २ ॥ ह्मणोनि आणीक श्रीरामवृत्त । कृपया मजासि कीजे श्रुत । राज्यीं झालिया अधिष्ठित । केलें काय जें राघवें ॥ ३ ॥ रावणादिकांस स्वपराक्रमीं । वधून, परतून आपुले धामीं । अयोध्यापुरास येऊन, स्वामी । सीतासमेत प्रभूनें ॥ ४ ॥ अंगीकृत तो मानवभाव । कोठपर्यंत सीताधव । कवणे रीती पाळी देव । तें सर्व मातें निवेदा ॥ ५ ॥ अंतीं तनु ती कोणे रीतीं । त्यागिता झाला सीतापती । वृत्त श्रवण कराया चित्तीं । थोर उत्कंटा वाटते ॥ ६ ॥ तेधवां श्रीरामभक्तिचतुर । बोलते झाले श्रीशंकर । कथा ती श्रवणमनोहर । ऐकिजे भक्तजनांहीं ॥ ७ ॥ श्रीराम सिंहासनाधिष्ठित । झालियाचें तें वृत्त श्रुत । होतांच मुनींद्र संतोषित । होऊन भेटीस धावले ॥ ८ ॥ विश्वामित्र कण्व असित । दुर्वास अंगिरा भृगु सन्मत । कश्यप नामदेव ऐसे बहुत । अड्यादि सप्तऋषिही ॥ ९ ॥ अगस्ति तोहि शिष्यांसहित । पातला

श्रीरामभेटीनिमित्त । मग भीतरीं पोंचवी मात । द्वारपाळाच्या साहाय्यें ॥ १० ॥ तंव ती द्वारपाळाच्या मुखें । गोष्टी ऐकून रघुनायकें । ह्मणितलें, तरी त्या सर्वांस सुखें । वेगें धाडावें भीतरीं ॥ ११ ॥ मग ते भीतरीं येतां मुनी । राघवें उठोनि झडकरोनी । पाद्यार्घ्याद्युपचारें करूनी । पूजिलें त्यांतें आदरें ॥ १२ ॥ मग वंदून, आसनांवर । बैसवून ते मुनींद्र थोर । कुशल कीं ? म्हणून सीतावर । पुसता झाला तयांसी ॥ १३ ॥ तेधवां सांगून स्वीय क्षेम । मुनि ते बोलले हे श्रीराम । तुवां हा वधूनि असुरोत्तम । गोष्ट मोठीच साधिली ॥ १४ ॥ ह्मणूनि हाचि हे सीतावर । आम्हांस आनंद झाला थोर । पाहतां देव, हा लंकासुर । तुजला भारी नव्हे कीं ॥ १५ ॥ तुवां एकदां हातीं धनु । धरिलिया सर्व हें त्रिभुवनु । जिंकावयास एक क्षणु । विलंब लागूं शकेना ॥ १६ ॥ परी या सर्वांत इंद्रजित । निवटिला हें तों अत्यद्भुत । परमप्रतापी तूं रघुनाथ । निवटिलें सर्वासुरां तूं ॥ १७ ॥ येणें अभयदक्षिणा तुवां । आह्मांस दिलीस सीताधवा । कृतकृत्य ऐसा तूं एधवां । शोभसी अतीव पाहतां ॥ १८ ॥ तंव तें मुनींचें वाक्य श्रुत । होतांचि श्रीराम सुविस्मित । होऊन पुनश्च जोडून हात । ऐसें पुसे तयांतें ॥ १९ ॥ त्रिलोकविजयी रावणवीर । कुंभकर्णही तैसा घोर । यांसि सांडून, इंद्रजित् पोर । वर्णितां कैसें तयांतें ॥ २० ॥ तेधवां अगस्ति तेजोघन । रामास बोलता झाला वचन । राघवा, ऐक तूं वृत्त गहन । त्यांचिया जन्मादिकांचें ॥ २१ ॥ पूर्वीं कृतयुगीं विधिनंदन । होता पुल-

स्त्य नामेंकरून । तेणें एकदां तपोनुष्ठान । कराया चित्तीं आणिलें ॥ २२ ॥ मग तृणबिंदूचा आश्रम । असे जो मेरूपाशीं, राम । ते स्थळीं राहून आपुला क्रम । तेणें आरंभिलासे ॥ २३ ॥ परी त्या रम्याश्रमीं संतत । देवगंधर्व-कन्या बहुत । येऊन नाचत हासत गात । स्वमनःक्रीडेकारणें ॥ २४ ॥ त्यांहीं तपास केलें विघ्न । तेणें मुनि तो तपोधन । होऊन परम क्रोधायमान । ऐसी वाणी बोलला ॥ २५ ॥ कीं हो माझिया दृष्टीसमोर । कन्यका येईल कोणी जर । तरी ती होईल गरोदर । ऐसें नेमें जाणिजे ॥ २६ ॥ तंव त्या शापभयेंकरून । कोणीं न ते स्थळीं कीजे गमन । परी तें कानीं न आलें वचन । तृणबिंदूच्या मुलीच्या ॥ २७ ॥ मग ती निर्भयचित्तें सुता । क्रीडतां तयाचे दृष्टिपथा । येऊन सवेंचि गर्भयुता । जाहली वाक्यानुसारें ॥ २८ ॥ मग अंगास पांडुरता । देहवैवर्ण्यादि चिन्हें होतां । सुता ती अंतरीं होऊन भीता । पितयापाशीं पातली ॥ २९ ॥ तेधवां राजर्षीनें तेणें । ध्याननिविष्ट अंतःकरणें । वृत्त तें जाणूनी, मुनीकारणें । अर्पिली कन्या विधीनें ॥ ३० ॥ मग ती कन्या अतिशयित । पतिसेवेसी निष्ठावंत । देखून मुनि तो संतोषित । जाहला तीतें एकदां ॥ ३१ ॥ मग ह्मणे वंशवर्धन-हेत । जाणून तुज मी देतों सुत । त्यावरी काळ तो यथोचित । लोटतां, ऐकें राघवा ॥ ३२ ॥ पुलस्त्यापासून त्या कन्येला । विश्रवा नामें नंदन झाला । पुढें तो विश्रवा जामात केला । भरद्वाजांहीं आपुला ॥ ३३ ॥ मग त्या विश्रव्यापासून सुत । कुबेरनामें अतिविख्यात । भरद्वाजांच्या कन्येस

होत । प्रिय जो कमलासनातें ॥ ३४ ॥ तो मग तप करून अती । जाहला अंगें धनाधिपती । विधीच्या प्रसादें शीघ्रगति । पुष्पक तेंही पावला ॥ ३५ ॥ मग तप तें समाप्त होतां । पातला, जेथें होतां पिता । मग त्यापुढें जोडुनि हातां । आदरें ऐसें पुसे त्या ॥ ३६ ॥ कीं मज पावून कमलासन । निवासा तेणें न दिधलें स्थान । ह्मणूनि दाखवा मजलागून । स्थळ एकादें निवासा ॥ ३७ ॥ तेधवां विश्रवा बोले—तरी । सागरींची ती लंकापुरी । तुजसि निवासा आहे बरी । तेथ तूं राहीं सुखानें ॥ ३८ ॥ पूर्वीं विश्वकर्म्यानें पुर तें । राक्षसनिवासा केलें होतें । परी श्रीविष्णूच्या भयानिमित्तें । त्यांहीं त्यातें सांडिलें ॥ ३९ ॥ दैत्य ते श्रीविष्णूच्या धाकें । पळाले रसातळातें देखें । ह्मणून पुर तें आहे निकें । नित्रस्त तूतें वसाया ॥ ४० ॥ तेधवां पितृआज्ञेनुसार । तेणें मग तें लंकापुर । साधून आपुलें केलें चिर- । निवासस्थान धनेशें ॥ ४१ ॥ मग सुमाली नामें असुर । एकदां पातला या भूवर । रसातलाहून दुष्टवर । संगें कन्या कैकसी ॥ ४२ ॥ तेणें पुष्पकविमानांतुनी । फिरतां कुबेर अवलोकुनी । असुरहितार्थ कांहीं मनीं । विचार केला नेटका ॥ ४३ ॥ मग कन्येस बोले बोल । वत्से, तव हा यौवनकाल । वरसंप्राप्तीवांचून फोल । चालला आहे एधवां ॥ ४४ ॥ तुझिया अमान्यतेच्या भयें । तुजसी न वरी कोणी स्वयें । तरी तूं या विश्रव्यासीं तनये । वरावें ब्रह्मकुळींच्या ॥ ४५ ॥ मग या धनदाऐसे थोर । बलाढ्य होतील तूतें कुमर । यापरी बोधितां ती सुंदर । विचार ठीक

ह्मणे तो ॥ ४६ ॥ मग ती जाऊन त्या मुनीपुढती । अधोमुख, लज्जायमान अती । पादांगुष्ठें भूपृष्ठावरती । रेखीत उभी ठाकली ॥ ४७ ॥ तेधवां मुनि तो बोले तिला । सुंदरी, कवणाची तूं बाला । आणि ये स्थळीं या वेळेला । आलीस कोण्या निमित्तें ॥४८॥ तंव हें माझें सारें मन । देवें जाणिजे ध्यानेंकरून । ऐसें आदरें प्रतिवचन । त्या कन्येनें दिधलें ॥ ४९ ॥ मग तें तियेचें हृदयंगत । ध्यानें जाणून तो मुनिनाथ । बोलला, वो तूं वांछिसी सुत । मजपासून व्हावया ॥५०॥ परी या दारुण वेळीं जाण । तूं भोग मागसी ज्याकारण । तरी तैसेच अति दारुण । पावसी पुत्रांस निश्चयें ॥ ५१ ॥ तेधवां ह्मणे ती–देव, तुह्मी । परम सत्वाढ्य, नेमी, धर्मी । मग ऐशाहि संगें स्वामी । फल हें कैचें निघावें ॥ ५२ ॥ तेधवां मुनि बोले, मागुती । सुत एक होईल शुद्ध अती । जयाची श्रीरामचंद्रीं प्रीति । परम जडून राहिली ॥५३॥ ऐसें जाहलें संभाषण । पुढें ती पावतां प्रसवक्षण । सुत तो प्रसवे अति दारुण । रावण नाम जयाचें ॥ ५४ ॥ दश शिरें आणि वीस हात । ऐसा विचित्र अतिशयित । खळ तो जन्मास येतां त्वरित । भूमि कंपित जाहली ॥ ५५ ॥ अनिष्टसूचक चिन्हें सकळ । प्रकटुनि व्यापितीं भूमंडळ । यावरी मग तो जन्मला बाळ । नामें कुंभकर्ण जो ॥ ५६ ॥ मागुती जन्मली जी कन्यका । तियेचें अभिधान शूर्पणखा । भगिनी बंधुद्वयाशीं देखा । साजिरी रूपागुणांहीं ॥ ५७ ॥ मग सत्वाढ्य बिभीषण । तियेचे उदरीं आला जाण । जो कां स्वधर्मपरायण । स्वाध्यायशील नेमक

॥ ५८ ॥ कुंभकर्ण तो दुष्टप्रवर । द्विज ते धरून थोरथोर । गट्टचि करीत निरंतर । फिरतसे देखा भूवरी ॥ ५९ ॥ तैसाचि रावण महाखळ । सकळिकांचा जाणा काळ । रोगाचिऐसा, भूमंडळ । वाढिला ग्रासावयातें ॥ ६० ॥ यापरी सांगून सारी कथा । अगस्ति ह्मणती श्रीरघुनाथा । तूं तों जाणसी या सर्वार्था । सर्वहृदयस्थ प्रभू तूं ॥ ६१ ॥ तूं नित्य उदित, मळविहीन । सर्वसाक्षी तूं ज्ञानघन । लीलया मनुजाकार धरून । क्रीडसी मायागुणांहीं ॥ ६२ ॥ प्रभो, तूं अचिंत्य शक्तिमंत । केवळ चिद्रूप अनादिअंत । आत्मस्वरूप-ज्ञानवंत । व्ययविरहित परात्मा ॥ ६३ ॥ त्वां ही कुळकथा सांगावया । आज्ञापिलें जें श्रीरघुराया । तेणें मियां हें कथिलें वायां । तुज सर्वज्ञासंनिधीं ॥ ६४ ॥ देव, मी तुजपुढें परम मूढ । स्वरूप तुझें परम गूढ । परी त्वत्कृपेचा आसरा वाड । ह्मणोनि नांदें जगीं या ॥ ६५ ॥ यापरी मुनीचें वचन श्रुत । करून राघवें केलें स्मित । ह्मणे हें मुनींद्र, मिथ्याभूत । मायाश्रयित्वाकारणें ॥ ६६ ॥ स्थिति जी सर्वत्र एकत्वाची । मुनींद्रा, तीच यामाजी साची । परी येथ पाहिजे कीं बुद्धीची । शुद्धता संगें तीव्रता ॥ ६७ ॥ परी या मतिशुद्धीस बघ । निरासिलें पाहिजे सारें अघ । तयास साधन व्हावें मग । माझिया भक्तिपथाचें ॥ ६८ ॥ त्यांत मत्कीर्तनाचा गुण । सर्वांत वरिष्ठ ऐसें जाण । मुनिवर, हेच तुजसि खूण । एकली सांगावयाची ॥ ६९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें द्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७० ॥ श्रीराम ॥

## अध्याय ६० वा, रावणपूर्ववृत्त.

श्रीराम ॥ श्रीरामाचें वचनामृत । ऐकून मग तो सन्मुनिनाथ । पुढती असुरांचें त्या वृत्त । आणीक सांगूं लागला ॥ १ ॥ एकदां मग तो धनाधिपती । आरूढ होऊन पुष्पकावरती । सहजीं आपुल्या पितयाप्रती । भेटायातें पातला ॥ २ ॥ तेधवां तयाचें अतिशयित । तेज देखून कैकसी तेथ । आपुल्या पुत्रांस बोले मात । ऐशी रावणादिकांतें ॥ ३ ॥ पुत्रहो, पहा हा धनाधिपती । तेजें झळाळे कैसा अती । ऐशीच तेजस्विता संप्रतीं । तुह्मीं जोडावी प्रयत्नें ॥ ४ ॥ तंव तें ऐकतां रावणें घोर । प्रतिज्ञा करून तिजसमोर । ह्मणितलें, कुबेराहूनि थोर । बलाढ्य होईन निश्चयें ॥ ५ ॥ ऐशी तियेस बोलून वाणी । गोकर्णासी जाय ह्मणीं । आणि दुष्कर तपआचरणीं । अति निष्ठेंसी लागला ॥ ६ ॥ तैसाचि तद्बंधु कुंभकर्ण । तप आरंभीं बहु दारुण । दश सहस्र वर्षें जाण । निष्ठा धरूनी फळासी ॥ ७ ॥ बिभीषणही स्वधर्मपर । तपाची निष्ठा धरून थोर । एके पायींच शरीरभार । धारण करून राहिला ॥ ८ ॥ दशाननें त्या एक हजार । वत्सरें राहून निराहार । अंतीं आपुलें एक शिर । तोडून अग्नीस वहावें ॥ ९ ॥ यापरी वाहून नवहि शिरें । दहावें चिराया दशकंधरें । सिद्धता कारितां तेथ त्वरें । धावूनि आला विधाता ॥ १० ॥ मग ह्मणे, प्रसन्न मी तुजवर । तूं हें न तोडीं दशम शिर । माग, जो तूतें

इच्छित वर । तो मीं तूतें दीधला ॥ ११ ॥ तेधवां तो दुष्ट असुर ह्मणे । अमर करा जी मजकारणें । सुरासुर, गंधर्व, यक्ष, कोणें । मजसि वधूं न शकावें ॥ १२ ॥ आणि मानवें तीं तों सारीं । मजसि तृणाचिऐसीं करीं । प्रार्थितां तो देव ऐशापरी । तथास्तु ऐसें बोलला ॥ १३ ॥ मग आणीक एक भला । विधीनें वर त्यातें दिधला । कीं तुझीं नवहि शीर्षं तुला । होतील पूर्वीप्रमाणें ॥ १४ ॥ यापरी वर देऊन पुढें । विधि तो बिभीषणाच्याकडे । येऊन तयातें बोले कोडें । वत्स, तूं माग वरातें ॥ १५ ॥ तेधवां साष्टांग वंदून पदा । धर्मज्ञ तो वर मागे तदा । देव, ही माझी बुद्धि सदा । स्वधर्म-तत्पर असों दे ॥ १६ ॥ कोणेहि वेळीं अधर्माप्रती । नातळो, देवा ही मन्मती । यापरी वर तो ऐकतां चित्तीं । परम तोषे विधाता ॥ १७ ॥ मग ह्मणे, गा तूं स्वधर्मनिष्ठ । देखून जाहलों मी संतुष्ट । वरें या मागसी तेचि गोष्ट । मीं ही तूतें दिधली ॥ १८ ॥ आणि न मागतांही तुज । अमरत्वही म्यां दिधलें आज । ऐसें सांगून तो सुरराज । कुंभकर्णाकडे ये ॥ १९ ॥ तंव तो मागता झाला वर । मज दे देवा, निद्रा घोर । भोज-नालागीं जागृतीवर । एकदां यावें षण्मासीं ॥ २० ॥ वाग्देवीनें त्याच्या मुखीं । राहून त्यास हें बोलविलें कीं । कार्य साधून मग ती शेखीं । बाहेर ये वदनांतुनी ॥ २१ ॥ तो मग कुंभकर्ण चिंतायुत । होऊन अंतरीं विचार घेत । कीं हें कोठून अनपेक्षित । मन्मु-खीं वाक्य निघालें ! ॥ २२ ॥ असो, मग खळ ते वर जोडून । जाहले बलाढ्य अवलो-

कून । सुमाली पाताळ लोकींहून । भूपृष्ठासी पातला ॥ २३ ॥ मग दशाननासी त्वरें । आलिंगन दे प्रेमभरें । मग ह्मणे वत्सा, आतां सारें । मनोगत सिद्धी पावलें ॥ २४ ॥ आह्मांस श्रीविष्णूची भीति । आतां नुरेचि कवणे रीती । पूर्वीं जयानें आह्मांप्रती । पळविलें लंकेआंतुनी ॥ २५ ॥ ती ही आमुची लंकापुरी । वित्तेश्वरें या आजवरी । सेविली, ती तूं घेईं करीं । तुज कर्तव्य असे हें ॥ २६ ॥ सामें अथवा बळ दावून । कार्य हें साधींच दशानन । राजयां बंधु किंवा स्वजन । कैचे कोण सांग बा ॥ २७ ॥ तेधवां बोलला रावणराज । हे बोल येथें अनुचित तुज । आमुचा वित्तेश हा अग्रज । पूज्यचि पितयासारिखा ॥ २८ ॥ तेधवां सुमालीचा सांगाती । प्रहस्त नामें दुष्ट अती । तेणें रावणालागीं, पुढती । होऊन ऐसें बोधिलें ॥ २९ ॥ गा, तूं मद्वच श्रवण करीं । तुजला मति ही नोहे बरी । राजनीति त्वां कोणे परी । अधीन केली नसे कीं ॥ ३० ॥ वेड्या, शूरास कैचा कोण । आप्त कीं इष्टादि सारेजण । जगाची रीत ही पोरा जाण । नेत्र उघडूनि एकदां ॥ ३१ ॥ देव-राक्षस हे कश्यपसुत । परी ते लढती परस्परांत । तीव्र शस्त्रांहीं करिती घात । बंधुभावातें त्यजूनी ॥ ३२ ॥ आणि हा आतांचि त्यांहीं द्वेष । धरिला ऐसें नाहीं खास । यापरी प्रहस्ताचा उपदेश । रावणें श्रवणीं घेतला ॥ ३३ ॥ मग तत्काळ क्रोधांकित । होऊनि त्रिकूटगिरीस जात । आणि पुढती धाडूनि दूत । बाहेर काढी धनेशा ॥ ३४ ॥ मग ती लंका आक्रमून । साचिवादिक असुरजन । संगें

घेऊन, सौख्यें करून । तेथें जाऊन राहिला ॥ ३५ ॥ धनेशें पित्याचे मतानुसार । सुखें तें सांडिलें लंकापुर । आणि जाऊन कैलासावर । तप एक आरंभिलेंसे ॥ ३६ ॥ सर्वेचि शिव संतुष्ट करून । विश्वकर्म्याच्या साह्येंकरून । अलका नामक पुर निर्मून । ते स्थळीं राहूं लागला ॥ ३७ ॥ इकडे राक्षस-मेळियांत । रावण आपणा अभिषेकीत । आणि लंकेचा राजा होत । जन पीडायाकारणें ॥ ३८ ॥ निजभगिनी जी शूर्पणखा । विद्यु-ज्जिव्हास अर्पी देखा । आपुल्यासाठीं मयकन्यका । मंदोदरी ते वरी तो ॥ ३९ ॥ मयें त्या आपुल्या जामातातें । परम सुंदरा निजकन्या ते । अर्पून वरि एक संतुष्ट चित्तें । अमोघ शक्ति दीधली ॥ ४० ॥ वैरोचनाची निजकन्यका । वृत्रज्वाला नामें जी कां । ती कुंभकर्णास केली देखा । राक्षसनाथें तेधवां ॥ ४१ ॥ शैलूष गंधर्वराजा, त्याची । कन्या सरमा, नामें साची । ती मग तेणें बिभीषणाची । भार्या केली विधीनें ॥ ४२ ॥ सुत एक मंदोदरीतें झाला । मेघनाद ह्मणती त्याला । जो जन्म घेतांच गर्जिन्नला । मेघगर्जने-सारिखा ॥ ४३ ॥ कुंभकर्णास निद्रा घोर । येऊन ह्मणे तो असुरवर । मज एक निर्वेध शयनागार । निर्मून देणें एधवां ॥ ४४ ॥ मग तयास शयनासाठीं । गुहाचि नेमून दि-धली मोठी । मग तो मूर्ख स्थळ तें गांठीं । वेगें निद्रा घ्यावया ॥ ४५ ॥ यापरी तो खळ निद्रावश । होतां इकडे रक्षोधीश । जनांचा चालवी प्राणनाश । निर्भयपणें करूनी ॥ ४६ ॥ ब्राह्मण, ऋषिवर, तैसे देव । अप्सरा, किन्नर कीं दानव । तैसेच तृणसम ते

मानव । निःशंक वर्धीत चालला ॥ ४७ ॥ तयीं तो अनर्थ परम घोर । ऐकून धर्मज्ञ वित्तेश्वर । न करीं ऐसें कर्म क्रूर । म्हणून बोधी तयातें ॥ ४८ ॥ तंव तयाच्या दूता-प्रती । धिक्कारून त्या असुरें अती । चालून जाऊन त्याच्यावरती । हरितलें त्याच्या पुष्पका ॥ ४९ ॥ मग यमास, वरुणासही । तेणें युद्धांत जिंकिलें पाहीं । मग स्वर्गास तो लवलाहीं । पातला विजयाकारणें ॥ ५० ॥ तेधवां सुरवर आणि सुर । यांहीं रण केलें दुर्धर । अंतीं धरून असुरप्रवर । सुरेशें बंदीं टाकिला ॥ ५१ ॥ तंव तें वृत्त येतां कानीं । मेघनाद जो प्रतापखनी । तेणें तत्काळ स्वर्गीं रिघूनी । रण चालविलें सुरांशीं ॥ ५२ ॥ आणि पितयास सोडवून । इंद्रास केलें बंदीवान । सर्वेचि आणिलें स्वपुरा-लागून । प्रबळ-प्रतापैकरूमी ॥ ५३ ॥ मग विधातयानें तेथ । जाऊन, वर देऊन बहुत । सोडविला तो सुरांचा नाथ । हातून तया खळाच्या ॥ ५४ ॥ यापरी जिंकून सारे लोक । विजयी होऊन खळनायक । स्वबाहुबळें करून देख । हालवी कैलासा एकदां ॥ ५५ ॥ तेधवां तयास श्रीशंकरें । शापिलें ऐसें क्रोधभरें । कीं तूं विनाश पावें त्वरें । हस्तें नरवानरांच्या ॥ ५६ ॥ परी तो परम दुष्टाग्रणी । न गणीच ती शापाची वाणी । सर्वेचि जिंकावयास रणीं । निघाला सहस्रार्जुनानें ॥ ५७ ॥ परी तो बलाढ्य सहस्रार्जुन । तेणें तत्काळ यातें धरून । ठेविलें कोंडून, बंदीं घालून । कित्येक काळवरी पैं ॥ ५८ ॥ तेधवां पुलस्त्यें मध्यें पडून । तयाचें केलें विमोचन । सर्वेचि मूढ तो बळ

घेऊन । किष्किंधेसी चालिला ॥ ५९ ॥ तेथ तो वाली वानरनाथ । जिंकावयाचा याचा हेत । परी त्या कपींद्रें निज कक्षेंत । घातिला याला तत्क्षणीं ॥ ६० ॥ मग चारही समुद्रांवरी । त्यास तो गरगर फिरवी हरी । मग 'हे क्षुद्रा जाईं घरीं' । ह्मणून सोडी तयातें ॥ ६१ ॥ मग तयासी सख्यभाव । करीतसे हा राक्षसराव । यापरी खळें या एकहि ठाव । नुरविला लोकीं पीडितां ॥ ६२ ॥ ऐसा रावण परम प्रबळ । मेघनादहि तैसा निखळ । रणांत राघवा तूं तत्काळ । भूमीस मेळविलें त्यां ॥ ६३ ॥ तो तूं साक्षात नारायण । मूळ त्रिजगासी कारण । प्रभो, हें स्थावर-जंगम जाण । रूप तुझेंच निश्चयें ॥ ६४ ॥ त्रिलोक-निर्मिता कमलासन । त्वन्नाभीमाजी पावे जनन । वाग्देवी आणिक हुताशन । त्वन्मुखीं जन्म पावले ॥ ६५ ॥ तैसेच तव बाहूंपासून । लोकपाळ झाले रघुनंदन । रविचंद्र तेही जन्मले दोन । लोचनस्थानीं तुझा पैं ॥ ६६ ॥ दिशा उपदिशा त्याही होती । तुझिया कर्णीं सीतापती । प्राणापासून तैशा रीती । अश्विनीकुमार प्रगटले ॥ ६७ ॥ तैसाच प्राण जो लोकांतला । तोहि प्राणींच देवा, झाला । भुवरादि लोकां जन्म दिला । जंघा-जानूंहीं तुझिया ॥ ६८ ॥ तैसेच कुक्षींपासून चार । सागर प्रगटले श्रीरघुवीर । इंद्र वरुण हे दोघे सुर । जन्मले स्तनद्वयीं पै ॥ ६९ ॥ वालखिल्य ते तव रेतांत । जन्मले प्रभो, हे सीताकांत । आणि यमहि रूपा येत । जननेंद्रियीं तुझ्या पै ॥ ७० ॥ जनांत मृत्यु ह्मणती ज्याला । गुदापासून तो जन्मा आला । त्रिनेत्र

रुद्र प्रगट झाला । तुझिया कोपीं प्रभो जी ॥ ७१ ॥ गिरि ते सारे हाडांतून । मेघ ते केशांच्यापासून । औषधी देवा, पावल्या जनन । रोमांपासून तुझिया ॥ ७२ ॥ गर्द-भादिक जे जीव, तयां । तुझिया नखींच श्रीरघुराया । जन्म ये; एवंच सर्व जगा या । तूं मूळ होसी एकला ॥ ७३ ॥ ह्मणोनि विश्वात्मक तूं देव । अंगीं मायेस देऊन ठाव । नानारूपें दाविसी भाव । जनांस त्रिगुणेंकरोनी ॥ ७४ ॥ तुजचि यज्ञपुरुषाप्रती । यज्ञार्थ सुर हे आश्रयिती । आणि अमृत जें कां पिती । तेंहि त्वद्रूपें राघवा ॥ ७५ ॥ सर्व चराचर या विश्वातें । तुवांचि निर्मिलें सीतापते । आणि तें तुझ्याचि आश्रया-वरुतें । धरितसे जीव सर्वथा ॥ ७६ ॥ म्हणून व्यवहारकाळांतही । वस्तु त्वद्रूप साऱ्या कांहीं । घृत हें दुग्धांत जैसें पाहीं । सर्वां ठायीं राहतें ॥ ७७ ॥ देवा, तुझ्याचि तेजावर । प्रकाशती हे शशिभास्कर । ऐसा तूं नित्य परमेश्वर । सर्वज्ञ अद्वय राघवा ॥ ७८ ॥ ऐसिया तुजसी पाहूं शकती । ज्ञानदृष्टि जन जे होती । अज्ञ तुजलागीं न ओळखती । अंध ते रविला ज्यापरी ॥ ७९ ॥ योगिजन ते निजदेहांत । शोधिती तुजला सीताकांत । उपनिषदांहीं, जीं वेदांत- । शीर्षस्थानीं शोभतीं ॥ ८० ॥ परंतु त्वद्भक्तिलेश जरी । त्यांतें लाभेल तरी हे हरि । चिद्रूपें त्यांच्या दृष्टीवरी । येशी, अन्यथा न येशी ॥ ८१ ॥ देव मी तुज सर्वज्ञापुढें । बोलिलों जें वेडेंवाकुडें । कृपेनें पाहून त्याजकडे । पोटीं घालीं सर्व तें ॥ ८२ ॥ आतां चरणीं ठेवून माथा । भजेन मी या श्रीरघुनाथा । जेथ या संसार-

भयाची कथा । तिळहि राहूं शकेना ॥ ८३ ॥ देशकाळांहीं अथवा दिशांहीं । जयास सर्वथा सीमा नाहीं । एकीएक जो शाश्वत पाही । चिद्रूपत्वें आपुल्या ॥ ८४ ॥ जयास नाहीं आणें येणें । तैसेंच जन्मणें नाहीं मरणें । सर्वज्ञ ईश जो मायागुणें । आलिप्त नित्य श्रीराम ॥ ८५ ॥ जेथ मीनले अनंतगुण । तो हा श्रीराम सीतारमण । देव कीं भक्त, हे दोघेजण । एकाचि जेथ अभेदें ॥ ८६ ॥ ऐशिया प्रभूचें भजन करूं । आणि समस्त दुःखें हरूं । सर्वांचि भवसागर हा तरूं । श्रीरामभक्तिबळानें ॥ ८७ ॥ रामप्रेमी अगस्तिमुनी । यापरी श्रीरामाच्या स्तवनीं । रंगून नावेक स्तब्ध होउनी । वृत्त कथितांचि राहिले ॥ ८८ ॥ ऐशी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ८९ ॥ श्रीराम ॥ ६० ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥

## अध्याय ६१ वा, वालिसुग्रीवजन्म.

श्रीराम ॥ मग आणीक पुढती राम । विचारी मुनींसि कथाक्रम । वालिसुग्रीव यांचा जन्म- । वृत्तांत मातें ऐकवा ॥ १ ॥ चंद्र-सूर्य हे दोघेजण । वाली सुग्रीव झाले जाण । ऐसें वृत्त म्यां केलें श्रवण । तें साच काय मुनींद्रा ॥ २ ॥ तेधवां अगस्ति ह्मणती ऐक । वृत्त तें सांगूं तुज आणिक । परम देदीप्यमान एक । शृंग मेरूचें असे जें ॥ ३ ॥ त्या-

वरी विस्तृत शतयोजन। वर्ततें विधीचें सभास्थान। तेथ तो एकदां कमलासन। समाधिनिष्ठ जाहला ॥ ४ ॥ तेधवां आनंदें नयनांतरीं। आसवें येऊनि पडलीं करीं। मग तीं सांडितां भूमीवरी। तेणें कांहीं चिंतिलें ॥ ५ ॥ तंवचि त्यांपासून एक। उत्पन्न झाला कपिनायक। मग तो विधिआज्ञेनें देख। तत्संगतींच राहिला ॥ ६ ॥ मग तो कपींद्र एके दिवशीं। फिरत असतां गिरिकंदराशीं। फलमूळ शोधितां बहुसायासीं। एके वापीस पोंचला ॥ ७ ॥ मग पाणी प्यावयास्तव। जातां ते स्थळीं देखे जंव। छायात्मक एक वानर नव। तंव तो नीरीं प्रवेशे ॥ ८ ॥ मग अदृश्य छायाहरी। होतांच कपि हा येई वरी। देखे तंव तो जाहला नारी। जलस्नानें करोनी ॥ ९ ॥ तैं मग सुरराज तेणें पथें। चालला असतां तच्चित्तातें। तियेचें सौंदर्य चेतोहर तें। देखून कामें विंधिलें ॥ १० ॥ तंव तद्वीर्य तेणेंकरून। वालुप्रदेशीं पावलें पतन। मग तेथेंच झालें जनन। कपि वालीचें राघवा ॥ ११ ॥ मग त्यास एक सुवर्णमाला। देऊन इंद्र तो स्वर्गीं गेला। सवेंचि रविहि तेथें आला। कार्यप्रसंगें करूनी ॥ १२ ॥ तेधवां तोहि त्या रमणीप्रती। देखून गवसला कामा हातीं। मग तियेच्या ग्रीवेवरती। सांडलें वीर्य तयाचें ॥ १३ ॥ मग तेणेंचि योगें देव। जन्मास आला हा सुग्रीव। रवीनें त्यास मग मारुतिराव। स्नेही नेमून दिधला ॥ १४ ॥ मग ते घेवोन दोन्ही सुत। सुंदरी जाहली ती निद्रित। प्रभातीं देखतां पूर्ववत्। वानररूपा पावली ॥ १५॥ मग फळमूळें संपादून। सुतहि संगें घेऊन दोन। कपि तो विधि-

पाशीं जाऊन । ठाकला नम्रपणानें ॥ १६ ॥ तेधवां तयातें आश्वासून । विधीनें दूतास बोलावून । ह्मणितलें, यांसी संगें घेऊन । किष्किंधेसी जाय तूं ॥ १७ ॥ आणि तेथ या कपींद्राप्रत । करावें सिंहासनाधिष्ठित । सर्वही कपि याचे आज्ञेंत । राहावे भूमंडळींचे ॥ १८ ॥ जेधवां भूभार निवारण । कराया साक्षात् नारायण । भूवरी श्रीरामरूपें जाण । अवतीर्ण होईल लीलया ॥ १९ ॥ तेधवां तयाच्या काजीं बा रे । साह्य करितील कपि हे सारे । तंव ती आज्ञा ऐकतां त्वरें । दूत त्या कार्यीं लागला ॥ २० ॥ मग ती जैशी आज्ञा होती । तैसें तैसें सर्वहि, अती । अगत्यें साधून, ब्रह्मयाप्रती । दूत तें सारें निवेदी ॥ २१ ॥ तैंहून तें किष्किधापुर । कपींचें जाहलें, हे रघुवीर । देव, तूं साक्षात् परमेश्वर । लीलानृदेही निश्चयें ॥ २२ ॥ ब्रह्मदेवाच्या विनतीसाठीं । वारिला भूभार तूं जगजेठी । तूं या भूतमात्रांच्य पोटीं । राहसी नित्य चिदात्मा ॥ २३ ॥ अखंड आनंदरूपास तुज । पाहतां हें तों कैचें काज । परी हें त्वद्गुणेन रघुराज । जनांचें पाप हरूंये ॥ २४ ॥ ह्मणोनि हें वालिसुग्रीववृत्त । जे जन वर्णिती सत्संमत । ते त्वत्कृपेनें सीताकांत । जाळिती पापें समग्रें ॥ २५ ॥ असो, श्रीराघवा, तुज आणिक । कथा ती सांगतों एकें एक । रावणें सीतादेवी देख । हरिली जेणें निमित्तें ॥ २६ ॥ पूर्वीं सनत्कुमार मुनी । एकदां सुखस्थ अवलोकुनी । त्यांस आदरें अभिवंदूनी । रावणें पुसिलें तयातें ॥ २७ ॥ भगवन्! या सर्व देवाआंत । कोण तो बळानें अतिशयित । देव हे

समरीं जय घेतात । हे कोणाच्या बळानें ॥ २८ ॥ विप्रही कवणाला पूजिती । योगी कोणास धरिती चित्तीं । मुनींद्र, एवढें सांगा प्रीती । वरिष्ठ कोण जगीं या ॥ २९ ॥ तंव तें तयाचें मनोगत । जाणून मुनि बोलले त्वरित । अरे, जो परमात्मा ह्मणतात । तोचि वरिष्ठ जगीं या ॥ ३० ॥ जो या जगास संरक्षितो । जन्मादिकांचा न जो मळ घेतो । नारायण शाश्वत अव्यय तो । वरिष्ठ जाण जगीं या ॥ ३१ ॥ जेणें जग हें जड-चेतन । निर्मिलें निजसंकल्पेंकरून । नाभींत ज्याच्या कमलासन । जन्मास आला असे ॥ ३२ ॥ त्याचि भगवंताची कास । धरून सुर हे घेती यश । तेणेंचि योगें अरीचा नाश । साधिती समरीं सर्व हे ॥ ३३ ॥ त्यातेंचि योगी ध्याती सदा । द्विजहि पूजिती रे तत्पदा । यापरी दशाननानें तदा । ऐकिलें मुनिमुखानें ॥ ३४ ॥ मग आणीक जाणावया । रावणें प्रश्न केला तयां । कीं, या देवें वधिलें जयां । गति ये कोण तयातें ॥ ३५ ॥ तेधवां तयास सांगे मुनी । हरीनें वधिले समरांगणीं । ते मग त्या हरिच्याच ठिकाणीं । पावती जाऊन सुखातें ॥ ३६ ॥ परंतु आणिकीं देवीं समरीं । वधिले, ते मग स्वर्गावरीं । जाऊन किंचित् काळवरी । सुखभोगांतें सेविती ॥ ३७ ॥ मग भोगक्षय होतांच । भूलोकीं या येती साच । मग जन्ममृत्यु यांची कांच । त्यांचिया मागें लागती ॥ ३८ ॥ तेधवां तें त्या मुनींचें वचन । ऐकिलें रावणें मन देऊन । मग निश्चय कांहीं करून । चित्तीं संतोष पावला ॥ ३९ ॥ कीं मी हरीशीं युद्ध करीन । मग जोडीन चिरसुख धन । मग त्या-

त्याच सिद्धीलागुन । उपाय शोधूं लागला ॥ ४० ॥ तेधवां अंतर्ज्ञानी मुनी । आणिक म्हणती त्यालागुनी । गा, हें तूं जें वांछिसी मनीं । तें पावेल सिद्धीतें ॥ ४१ ॥ कांहीं काळ लोटे तंवरी । तूं तन्मार्गप्रतीक्षा करीं । आणिक एक तूं हृदयीं धरीं । जें मी तूतें सांगतों ॥ ४२ ॥ देव तो पाहतां रूपविहीन । परंतु तद्रूपाचीच खूण । सांगतों मी एक तुजलागून । ऐक ती असुरेश्वरा तूं ॥ ४३ ॥ सर्व स्थावर पदार्थजात । नद्या, समुद्र, या सर्वांत । तोचि हा ईश त्रिलोकतात । व्यापून आहे पहा कीं ॥ ४४ ॥ तोचि ओंकार ऐसें देख । सत्य जें बोलती तें तो एक । सावित्री, पृथिवी इत्यादिक । स्वरूप सारें तयाचें ॥ ४५ ॥ सकळ सृष्टीस जो आधार । शेष तोहि गा सर्वेश्वर । नाना दैवतें सप्त सागर । तेंहि सर्व हरी हा ॥ ४६ ॥ काल कीं भास्कर किंवा सोम । दिवस कीं रात्र किंवा यम । वायु, अग्नि कीं देवोत्तम । इंद्र तोहि हा एकला ॥ ४७ ॥ ब्रह्मादि रुद्रादिक जे देव । तैसेच जे कोणी दानव । पर्जन्य, विनाश कीं उद्भव । हें सर्व तोच जाणिजे ॥ ४८ ॥ हाचि प्रकाशतो, पेटतो । पाळितो, खातो अथवा पितो । विश्वात्मा हा क्रीडा करितो । अंगें अव्यय असूनी ॥ ४९ ॥ अंगीं नील कमलासमान । कांति परम शोभायमान । कांसेस पीतांबर तो छान । विद्युत्तेजें झळकतसे ॥ ५० ॥ आणि तप्त सुवर्णाऐसी अती । जियेच्या अंगीं सुंदर कांती । ती दिव्य सुंदरी सीतासती । वामांकातें बैसली ॥ ५१ ॥ ऐसा देव हा सीताकांत । पाहतां व्याप्त जो त्रैलोक्यांत ।

जयाच्या प्राप्तीकारणें कष्टत । श्रीशिव आणी हिमनगजा ॥ ५२ ॥ तो देव या आन देवादिकां । दृष्टीस येऊं न शके देखा । प्रसाद ज्यावरी त्याचा निका । तो त्या दृष्टी येतसे ॥ ५३ ॥ यज्ञें तपें वा दानादिकें । देव हा दृष्टी येऊं न शके । याचिया प्राप्तीस बा रे लटिके । उपाय होत सर्व हे ॥ ५४ ॥ परी जे तयाचे भक्तजन । त्याचिलागीं जे धरिती प्राण । त्याचिया ठायींच मन ठेवून । धुविलीं पापें जयांहीं ॥ ५५ ॥ ऐसे शुद्ध दृष्टीचे जन । त्यांसचि गूढ हा श्रीभगवान । देई अखंड निजदर्शन । वेदान्तज्ञान जयांसी ॥ ५६ ॥ अथवा या हरीच्या दर्शनीं । जरी तूं धरिसी आस मनीं । तरी तूं प्रेमें त्याच्या भजनीं । प्रवृत्त होईं त्वरेनें ॥ ५७ ॥ त्रेतायुगांत तो श्रीकांत । श्रीरामरूपें रघुवंशांत । अवतीर्ण होणार हें निश्चित । स्वर्भूलोकहितार्थ ॥ ५८ ॥ तो राम मग ताताज्ञेकरून । बंधूस भार्येस संगें घेउन । हें सर्व दंडक नामें वन । येईल पावन करावया ॥ ५९ ॥ मग तयाचें दर्शन तुज । सुलभ होईल राक्षसराज । ह्मणून भक्तिभावें तूं भज । श्रीराम सीतापतीतें ॥ ६० ॥ ऐसी विस्तरपूर्वक कथा । मुनीनें कथिली राक्षसनाथा । तंव ती घेऊन श्रवणपथा । विचार पाहे मनीं तो ॥ ६१ ॥ मग रघुवीरा, तुझियासवें । विरोधें युद्धचि हें साधावें । ऐसें योजून चित्तीं जवें । निमित्त शोधूं लागला ॥ ६२ ॥ याचिलागीं बा, तेणें वनीं । सीता नेली हरण करूनी । युद्धास निमित्त होऊन जनीं । वधावें तुवां म्हणूनी ॥ ६३ ॥ असो, कथा ही सुमनोहर । जे कां ऐकिती पठती नर । अथवा

घालिती कानांवर । श्रवणेच्छु भक्तजनांच्या ॥ ६४ ॥ ते मग आयुरारोग्य धन । पावती श्रीरामकृपें करून । अंतीं अनंत अक्षय घन । सौख्यही जाणा पावती ॥ ६५ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६६ श्रीराम ॥ ६१ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय ६२ वा, सीतात्याग.

श्रीराम ॥ एकदां ब्रह्मलोकाआंतून । नारद येतां अवलोकून । आदरें तयांस नमन करून ॥ ऐसें पुसिलें रावणें ॥ १ ॥ कीं देव, तुम्ही त्रिभुवनांत । फिरतां, जाणतां सारी मात । तरि मग बलाढ्य जे अत्यंत । वीर ते कोठें निवेदा ॥ २ ॥ यापरी प्रश्न ऐकतां मुनी । बोलले क्षणैक विचारुनी । श्वेतद्वीप नामें करूनी । स्थान जें एक जगीं या ॥ ३ ॥ तेथ ते प्रचंड वीराग्रणी । तुजसि दृष्टी येतील झणीं । अरे, जे रंगले हरिचरणीं । तेचि बलाढ्य जगीं या ॥ ४ ॥ अथवा हरिसी करितां समर । सांडिलें ज्यांहीं निज शरीर । तेही परम बलाढ्य वीर । आजिंक्य सुरासुरांतें ॥ ५ ॥ ते सर्व श्वेतद्वीपीं आज । जन्मले आहेत रावणराज । तेथ तूं जाऊन दावीं तेज । साच जें काय असे तें ॥ ६ ॥ यापरी नारदें बोलिल्यावर । तत्काळ त्या श्वेतद्वीपावर । युद्धार्थ निघाला असुरवर । पुष्पकीं

आरूढ होउनी ॥ ७ ॥ तंव तें संनिध येतां, यान । ठाकलें, न करीच पुढती गमन । मग तयातें तेथेंच त्यजून । स्वयेंचि तो पुढती चालिला ॥ ८ ॥ मग त्या द्वीपांत जैसा शिरे । तोंचि एके स्त्रीनेंच स्वकरें । तयास धरून पुसिलें, अरे । कोण तूं कोठें चालसी ! ॥ ९ ॥ मग आणीकही त्या नारी । तयास पुसती तैशा परी । हंसती, विनोद करिती भारी । वदनें देखून तयाचीं ॥ १० ॥ तेधवां तयांच्या हस्तांतून । परम सायासें मुक्त होऊन । अंतरीं आश्चर्यही पावून । विचार पाहूं लागला ॥ ११ ॥ अहो, मी जयीं विष्णुहस्तें मरें । तयीं मग वैकुंठांत शिरें । ह्मणोनि मज तो क्रोधभरें । येईल कैसा वधाया ॥ १२ ॥ मग निश्चय करून पूर्ण । सीतासतीचें केलें हरण । राम, तूं साक्षात् नारायण । हें जाणून तयानें ॥ १३ ॥ आणि याच कारणें जाण । तेणें मातृवत् परिपाळण । केलें, एक त्वद्धस्तें मरण । यावें ऐसें वांछुनी ॥ १४ ॥ राघवा, तूंचि परमेश्वर । जाणसी भूतभविष्यसार । सर्व विकल्पांपासून दूर । विज्ञानमूर्ति हरी तूं ॥ १५ ॥ भक्तजनांच्या बोधासाठीं । कर्म तूं करिसी हें जगजेठी । मजकरवीं या ऐकसी गोष्टी । मनुष्यभावानुसारें ॥ १६ ॥ यापरी रामस्तवन करून । मुनि तो घेऊन पूजा मान । सर्व मंडळीसह-वर्तमान । आश्रमीं जाय आपुल्या ॥ १७ ॥ यावरी सीतालक्ष्मणांसहित । श्रीराम पित्याचे प्रासादांत । राहिला सर्व आनंद करीत । सामान्य जीवासारिखा ॥ १८ ॥ अनासक्तहि असतां सुखें । नाना उपभोग भोगी निके । सेवेस हनुमंतादिक देखें । वानरमंडळी तिष्ठती

॥ १९ ॥ ऐसें चालतां एके दिवशीं । पुष्पकें येऊन रामापाशीं । कथिली वित्तेश्वराची जैसी । भाषा होती तया ते ॥ २० ॥ कीं तुज रावणें मजपासून । हारितलें आधीं, मग तेथून । राघवें तुजला स्वीकारून । अयोध्यापुरास आणिलें ॥ २१ ॥ तरी तूं येथून पुढती पहा । श्रीरघुवीरासीच वहा । मग वैकुंठीं जातां प्रभु हा । ये तूं मातें वहाया ॥ २२ ॥ तंव तें ऐकून श्रीरघुवीरें । ह्मणितलें, तरी हें आहे बरें । मग मी तुजला जेव्हां स्मरें । तैं तूं येई मजकडे ॥ २३ ॥ आणि तोंवरी अंतर्धान । पावून तूं इष्ट जें कां स्थान । तेथ राहिजे, कीजे गमन । माझिया आज्ञे कारणें ॥ २४ ॥ यापरी कथितां श्रीरघुनाथें । यान तें गेलें अपुल्या पथें । इकडे रामही पौरकार्यांतें । न्यायें साधीत राहिला ॥ २५ ॥ श्रीराम असतां राज्यावरी । भूमींत धान्य पिकावें भारी । वृक्षही फळपुष्पांच्या भारीं । नित्य लगटून असावे ॥ २६ ॥ लोक ते नित्य स्वधर्मपर । स्त्रियाही पतिकार्यीं तत्पर । दुःख पुत्रवियोगाचें थोर । तें न कोणेंहि देखिलें ॥ २७ ॥ पुष्पकीं बैसून श्रीरघुवीर । संचार करीत अवनीवर । संगें सीता, सुमित्राकुमर । कपि-वीरांहि घेउनी ॥ २८ ॥ एके ब्राह्मणाचा सुत । अकालींच जाहला मृत । तेणें विप्र तो शोकाक्रांत । होतां रामें देखिला ॥ २९ ॥ मग तपस्या करितां वनीं । शूद्र एक तो अवलोकुनी । राम वर्णाश्रमाभिमानी । वध करीत तयाचा ॥ ३० ॥ मग तयास स्वर्गीं नेला । विप्रसुतही जीवविला । ऐशी अद्भुत करोनि लीला । जन उद्धरिले राघवें ॥ ३१ ॥

जनांस दाखवायाला पथ । कोटि शिवलिंगें संस्थापीत । दिव्य भोगांहीं संतोषवीत । सुंदरी सीता सतीतें ॥ ३२ ॥ राजकार्यें तीं धर्मन्यायां । धरून साधी श्रीरघुराया । जनींचें पातक दूर कराया । चारित्र ठेवी करूनी ॥ ३३ ॥ मायया घेऊन मनुष्यपण । दहा हजार वर्षें जाण । राज्य करून सीतारमण । त्रिलोकवंद्य जाहला ॥ ३४ ॥ गृहस्थ-धर्माचे आचार । चालवी नित्य हा भूपवर । जनांस कित्ता दिधला सुंदर । एकपत्नीव्रताचा ॥ ३५ ॥ साध्वी सीताहि पतीचें मन । संतोषवीतसे रात्रंदिन । लज्जा मर्यादा गुण दावून । प्रेमें विनयें करूनी ॥ ३६ ॥ असो, मग सकळ सुखान्वित । ऐशिया क्रीडाकाननांत । बैसला असतां श्रीरघुनाथ । रम्य मंदिरीं सुखानें ॥ ३७ ॥ अंगीं श्यामता शोभे रुचिर । लेइला दिव्य वस्त्रालंकार । प्रसन्न वदन शांताकार । पीतांबर-धारी जो ॥ ३८ ॥ तेथ करांहीं पदकमल । चुरितां जानकी बोले बोल । देव, हे विश्वेश त्रिजगत्पाळ । परमात्म-रूप श्रीहरे ॥ ३९ ॥ देव, तूं वैकुंठीं परतून । यावया चित्तीं आस धरून । सुरांहीं कथिलें मजलागून । तें मी कानीं घालितें ॥ ४० ॥ मज ते एकदां वदले सुर । आ-म्हांस त्यजूनि श्रीरघुवीर । जाऊन राहिला भूलोकावर । तुज चिच्छक्तीसमेत ॥ ४१ ॥ परी एधवां कृपाळूपणें । या जी परतून दोघेजणें । देवी, प्रथम तूं येऊनि ह्मणें । आ-म्हांस तुष्ट करावें ॥ ४२ ॥ मागुती येऊन तो श्रीपती । सनाथ करील आम्हांप्रती । सुरीं जी केली मज विज्ञप्ती । ती ही ऐशी प्रभो जी ॥ ४३ ॥ तैं तें ऐकून श्रीरघुवीरें । नावेक

विचार पाहून स्वरें । म्हणितलें, देवी मी हें सारें । जाणूनि आहें राहिलों ॥ ४४ ॥ तरी त्याचिलागीं मीं प्रिये । गोष्ट ही योजिली आहे स्वयें । कीं तुज लोकापवादभयें । त्यजावें दूर वनीं पैं ॥ ४५ ॥ तेथ वाल्मीकि तुज भेटून । तूं ही गर्भवती देखून । आपुल्या आश्रमीं तुज नेऊन । रक्षण करितील आदरें ॥ ४६ ॥ तेथ तुज होतील दोघे सुत । पराक्रमी जे अतिविख्यात । मग तूं दाखविशील प्रचीत । शपथप्रकार करूनी ॥ ४७ ॥ तेधवां भूमीच्या उदरांत । प्रविष्ट होऊन वो तूं त्वरित । पावसी आपुल्या वैकुंठांत । मी मग मागें येतसें ॥ ४८ ॥ यापरी सांगून निजकांतेतें । निरोप दिधला सीताकांतें । मागुती प्रधान, सेनापती ते । पातले सभाप्रसंगें ॥ ४९ ॥ मग तेथ विनोद–हास्य–कथा । प्रसंगें चालल्या असतां, स्वतां । राघवें विजयनामक दूता । वार्ता पुसिली जनींची ॥ ५० ॥ रे, हे मजसंबंधीं पुरवासी । बोलणीं बोलतीं सांगें कैसीं । सीता-लक्ष्मण-कौसल्येविशीं । बोलती तेंही सांग बा ॥ ५१ ॥ येथ भयाचें नाहीं काज । शपथचि माझी जाण तुज । यापरी बोलतां श्रीरघुराज । दूत निवेदूं लागला ॥ ५२ ॥ देव, जन हे ह्मणती तुज । त्वां फार दुष्कर केलें काज । समरीं वधिला राक्षसराज । सीता सोडविली जे ॥ ५३ ॥ परंतु दोषीं न देतां मन । सदनीं घेतली स्त्रीलागून । ऐसिया स्त्रियेच्या संगें करून । सुख तें कैचें तुजला ॥ ५४ ॥ अहो, जी एकली अवलोकून । हरिली रावणें विपिनां-तून । ऐशाहि सीतेस, न विचारून । तेणें गृहांत घेतली ॥ ५५ ॥ तेधवां अमुच्याहि

गृहांतील । कामिनी दुष्कर्म आचरतील । तैं त्यांस आह्मीं न दीजे बोल । जैसा राजा तशी प्रजा ॥ ५६ ॥ यापरी वृत्त तें विजयें दूतें । श्रुत करितां मग सीताकांतें । पुसिलें तैसेंच निजजनांतें । तंव ते तैसेंच बोलती ॥ ५७ ॥ मग त्या सभेचें समापन । करूनि प्रभु तो रघुनंदन । लक्ष्मणालागीं बोलावून । आज्ञा करीत तयातें ॥ ५८ ॥ लक्ष्मणा, सीता राहे घरीं । येणें जनांचा माझ्यावरीं । अपवाद मोठाच आहे; तरी । तीतें त्यागणें एधवां ॥ ५९ ॥ ह्मणूनी प्रातःकाळीं रथीं । घालून, वेग करूनि अती । वाल्मीकि-आश्रमापाशीं सती । नेऊन सोडीं अवो तूं ॥ ६० ॥ यावरी करिसी जरि भाषण । तरी तें मरणचि माझें जाण । ऐसें वच तें परम कठिण । ऐकिलें सुमित्रासुतानें ॥ ६१ ॥ परी धाकें न बोले कांहीं । सीतेस घेऊन मग लवलाहीं । रथीं घालून, आश्रमीं पाहीं । वेगें जाऊन पोंचला ॥ ६२ ॥ मग त्या साध्वीस खालीं रथा । उतरवून, मग पायीं माथा । ठेवून, जोडून दोन्ही हातां । सद्गद कंठें बोलला ॥ ६३ ॥ केवल लोकापवाद-भयें । तुजला त्यागिलें श्रीरघुरायें । मज या सेवकालागीं माये । बोल तूं देऊं नको वो ॥ ६४ ॥ यापरी बोलून, वाल्मीकीचा । आश्रमपथही दावून साचा । सेवक तो श्री-रघुनाथाचा । परतून आला पुरीतें ॥ ६५ ॥ सीतेस गोष्ट ती होतां श्रुत । जाहला कठोर वज्राघात । मग ती विलाप सीमातीत । शोकावेगें करीतसे ॥ ६६ ॥ मग तो वृत्तांत शिष्यगणीं । घातला वाल्मीकीचे श्रवणीं । तंव तो धावूनि आला झणीं । सांत्वन

तीचें कराया ॥ ६७ ॥ मग सत्कार करून भला । आपुले आश्रमीं आणी तिला । आणि मुनिपत्नी ज्या सकलां । तयांचे हातीं देतसे ॥ ६८ ॥ मग त्या मुनिपत्नीहि अती । आदरें सीतेस संरक्षिती । दिवसेंदिवस तयांची प्रीती । सतीशीं वाढूं लागली ॥ ६९ ॥ ही श्रीरामपत्नी सीता । जाणिजे श्रीविष्णूची कांता । लक्ष्मीच, ऐसें मुनि तो स्वतां । बोधिता झाला तयांतें ॥ ७० ॥ तेंहून परमात्मयाची प्रिया । जाणून सर्व त्या मुनींच्या स्त्रिया । विशेष आदरें दाटोनियां । सेवेस झटूं लागल्या ॥ ७१ ॥ इकडे पुरींत रघुनायक । सीतेवांचून एकला एक । झांडून सकळही विषयसुख । मुनिसा राहूं लागला ॥ ७२ ॥ ऐशी अध्यात्मरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७३ ॥ श्रीराम ॥ ६२ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

## अध्याय ६३ वा, रामगीता.

श्रीराम ॥ यापरी त्रिजगाचें कल्याण । ऐसा देव तो सीतारमण । तेणें भूलोकीं या जाण । उदंड कीर्ति जोडिली ॥ १ ॥ पूर्वीं राजर्षि जे कां थोर । त्यांसम आचारिला आचार । आणि रामायण हें मधुर । गावया जनांस ठेविलें ॥ २ ॥ प्रसंगें लक्ष्मणें पुसिल्यासाठीं । कित्येक पुण्यपुरुषांच्या गोष्टी । पूर्वीं घडल्या ज्या भूपृष्ठीं । त्याही बोलला

प्रभु हा ॥ ३ ॥ परम उन्मत्त जो नृग नृप । तयास द्विजांचा झाला शाप । मग सरडाचें पावला रूप । तोहि वृत्तांत बोलला ॥ ४ ॥ यावरी एकदां एकांतांत । बैसले असतां सीताकांत । पदें तीं धरून करकमलांत । सेविते लक्ष्मी जयाचीं ॥ ५ ॥ तेथ येऊन सुमित्राकुमरें । साष्टांग नमून अत्यादरें । परम विशुद्ध भावांतरें । ऐसें पुसिलें तयातें ॥ ६ ॥ देव, तूं केवल ज्ञानघन । सर्व शरीरीं तुझें स्थान । पाहतां स्वयें तूं आकारहीन । सर्वसत्ताधीश्वरू ॥ ७ ॥ ज्ञानदृष्टीचे जन जे त्यांतें । तुझी नित्य प्रतीति येते । देव जे त्वत्पादांबुजातें । भृंग होऊन सेविती ॥ ८ ॥ त्या या त्वत्पदकमलाप्रती । देव मी शरण असें संप्रती । तोडितें जें भवबंधाप्रती । ध्याती योगी जयातें ॥ ९ ॥ आतां मजसि ऐशा रीती । ज्ञान तूं बोधी सीतापती । कीं मी सुखें या अब्धीप्रती । अज्ञानाच्या तरावें ॥ १० ॥ लक्ष्मणें पुसतां ऐशापरी । परम संतोषला तो हरी । शरणागतांचीं दुःखें सारीं । वारणें ब्रीद जयाचें ॥ ११ ॥ मग तो श्रुतिशास्त्रां संमत । ऐसें सांगता झाला मत । जेणें अज्ञानतमाचा अंत । सहजीं कीजे जनांच्या ॥ १२ ॥ आधीं स्ववर्णाश्रमानुसारें । कर्म तें केलें पाहिजे बा रे । मग त्यायोगें आपुलें सारें । चित्त विशुद्ध करावें ॥ १३ ॥ मग ती समाप्त करून क्रिया । साधकें आदरें सद्गुरुराया । आत्मस्वरूप जाणूं याया । भावें शरण रिघावें ॥ १४ ॥ जीवास शरीर जें लाभतें । तयास कर्मचि कारण होतें । शरीरीं सर्वेचि उदया येतें । प्रिय अप्रिय द्वंद्व हें ॥ १५ ॥

मग त्या द्वंद्वयोगें जन । साधिती पाप कीं पुण्यधन । मग तें कर्मचि मूळ होऊन । आणीक शरीर देतसे ॥ १६ ॥ यापरी देह हा कर्मांतून । कर्म तें पुनश्च देहांतून । उदया येऊन, तेणेंकरून । चक्र हें फिरतें भवाचें ॥ १७ ॥ आणि या सर्वांला कारण । अज्ञानाचि हें आहे जाण । म्हणूनि त्याचेंचि दूरीकरण । कीजे अवश्य जनांहीं ॥ १८ ॥ परी तन्निवारणास देखें । ज्ञानेंचि शक्यता; न कर्मादिकें । कर्म हें अज्ञानपंकीं पिके । ह्मणून ज्ञानविरोधी ॥ १९ ॥ जंव हें अज्ञान गेलें नाहीं । आणि न वारिली आसक्तीही । तंव हें हातें घडणार पाहीं । कर्म सदोष निश्चयें ॥ २० ॥ मग त्या कर्मांहीं संसार । मागें लागिजे वारंवार । ह्मणून आत्मज्ञानविचार । सुज्ञें कीजे त्वरेनें ॥ २१ ॥ आतां यावरी कोणी कोणी । आक्षेप घेऊं येती ह्मणीं । कीं ही वेदेंच कर्माचरणीं । प्रवृत्ति आहे लाविली ॥ २२ ॥ जंववरी देहीं वर्ते प्राण । तंव हें कीजेचि कर्माचरण । आत्मज्ञानास पुष्टीकरण । या कर्मयोगें होतसे ॥ २३ ॥ ह्मणोन मोक्षास जैसें ज्ञान । साधन कारितां प्रतिपादन । तैसेंच शास्त्रास अनुसरून । कर्महि तदर्थ पाहिजे ॥ २४ ॥ आणि जो सांडील कर्मक्रिया । वेदीं दोषचि दिधला तया । ह्मणून मुमुक्षूलागीं सया । कर्म हें अवश्य जाणिजे ॥ २५ ॥ परंतु मत हें नोहे खरें । ज्ञानचि मोक्षास पाववणारें । तें या कर्माश्रयास बा रे । लेशेंहि येऊं शकेना ॥ २६ ॥ यावरी यज्ञाचा दृष्टांत । जन ते आधारीं देतात । कीं तेथ जैशीं साधनें बहुत । लागतीं सिद्धी कारणें

॥ २७ ॥ तैसीच शास्त्रीय विहित क्रिया । ज्ञानास पाहिजे जोडावया । तैं मग तें मोक्षपदास न्याया । ज्ञान समर्थ होतसे ॥ २८ ॥ परी हे वितर्कवादी जन । बोलती सत्यास वोसंडून । पहा कीं कर्म हें आणि ज्ञान । साक्षात् विरोध तयांचा ॥ २९ ॥ देहाभिमान हा आहे जया । त्याचिया ठायींच प्रगटे क्रिया । परंतु ज्ञान तें उदित व्हाया । अहंता गेली पाहिजे ॥ ३० ॥ विशुद्ध विज्ञानाची प्रीति । अंतरीं प्रगटून, मग जी येती । तीच अंतिम आत्मवृत्ति । 'चरमा' नामें बोलिजे ॥ ३१ ॥ साधनें नाना संपादावीं । तरी क्रिया ही सिद्ध व्हावी । परी तीं या ज्ञानाच्या गांवीं । साधनें सारीं लोपतीं ॥ ३२ ॥ म्हणून ज्ञानासंगें क्रिया । न येचि; विरोधी आहे तया । याचिलागीं ती सोडावया । सुज्ञें सिद्धता करावी ॥ ३३ ॥ मग आत्मानुसंधानांत । तेणें प्रविष्ट व्हावें त्वरित । इंद्रियविषयांपासून चित्त । सर्वथा निवृत्त करूनी ॥ ३४ ॥ जंव या देहादिकांच्या वरी । अहंभाव वास्तव्य करी । तंवचि वाद हा जीव धरी । शास्त्रीय कर्मादिकांचा ॥ ३५ ॥ परंतु 'नेति' या वाक्यावरून । आत्मा हाही न, तोही वा न । ऐसें तत्त्व तें श्रुत करून । हें सर्व निरस्त करावें ॥ ३६ ॥ मग जाणून परमात्मया । त्यजाव्या सर्व या शास्त्रक्रिया । ऐसेंच ओघेंचि आलें राया । संशय कैचा ये विषयीं ॥ ३७ ॥ आत्मा परमात्मा हे दोन । ऐसा भेद हा नष्ट करून । ज्ञान तें होईल प्रकाशमान । अंतरामाजी जेधवां ॥ ३८ ॥ तैं ही माया सापरिवारेंसी । विलया

जाईल निश्चयेसीं । जी या जीवातें भवपाशीं । अंगें गोवी सर्वथा ॥ ३९ ॥ निर्मल विज्ञानयोगें करून । द्वैत हें सारें झिडकारून । माया केलिया ही निरसन । वेदवाक्यांच्या बळानें ॥ ४० ॥ मग ती पुनश्च व्हावी उदित । हे तों सर्वथा अघटित मात । हीच या समग्र कर्मांप्रत । आश्रय आहे एकली ॥ ४१ ॥ मग जी पावली विलयाप्रती । ती उदया न ये निश्चितीं । मग 'मी कर्ता' ऐशी मती । केउती व्हावी तयातें ॥ ४२ ॥ ह्मणून ज्ञानचि एकीएक । मोक्षास साधन नेमें देख । तयास साह्यास कर्मादिक । नलगे कोणी केधवां ॥ ४३ ॥ तैत्तिरीय या उपनिषदांत । ऐसेंचि कथिलें आहे मत । त्यागचि सर्व कर्मांचा एथ । प्रशस्त आहे सर्वथा ॥ ४४ ॥ ऐसेंच वाजसनेय श्रुती । सांगून ठेविते सर्वांप्रती । ज्ञानचि देतसे मोक्षगति । कर्म न शक्त ये विषयीं ॥ ४५ ॥ पूर्वीं यज्ञाचा दृष्टांत । प्रतिपक्ष्यांहीं दिधला येथ । परी तो ज्ञानाच्या तुलनेंत । साम्यता पावूं शकेना ॥ ४६ ॥ यज्ञास कामना आहे मूळ । ज्ञान तों निष्कामतेचें फळ । ह्मणूनि यज्ञास साधनें विपुळ । ज्ञान तों तैसेंच एकलें ॥ ४७ ॥ देहालागींच मी मानून । राहती अज्ञान जे कां जन । परी जो तत्वज्ञ त्याचे मन । ऐशा भावीं वळेना ॥ ४८ ॥ ह्मणोनि आत्मया अविक्रिया । जाणती बुध जे पूर्णतया । त्यांहीं शास्त्रीय विहित क्रिया । त्याज्य कीजेत सर्वही ॥ ४९ ॥ अंतरीं भाव धरून, मन । निर्मल करून, गुरु जोडून । तत्कृपें 'तत् त्वं असि' हें वचन । आदरें श्रवण करावें

॥ ५० ॥ मग परमात्मा आणि जीव । यांचा जाणून ऐक्यभाव । जोडिजे ऐसा निश्चल ठाव । मेरु पर्वतासारिखा ॥ ५१ ॥ परंतु वाक्यार्थाचें ज्ञान । व्हावया पदें तीं संशोधून । त्यांचिया अर्थीं आपुलें मन । प्रविष्ट केलें पाहिजे ॥ ५२ ॥ तरी या तत्त्वमसि वाक्यांत । तत् त्वं असि हीं एकत्रित । वर्तती तीन पदांचि नित । गीर्वाण भाषेंतील जीं ॥ ५३ ॥ त्यांत तत् शब्द परमेश्वरा । त्वं शब्द जीवास आहे खरा । असि या शब्दें अर्थ धरा । ऐक्याचा उभयांच्या पै ॥ ५४ ॥ पाहतां परमात्मा तो दूर । जीव हा हृदयींच निरंतर । ऐसा विरोध आढळे फार । या दोघांच्या स्वरूपीं ॥ ५५ ॥ परि हें त्यांचें विशेषपण । सांडून सामान्य जो कां गुण । चैतन्य, त्याचीच ओळखण । या वाक्यार्थीं धरावी ॥ ५६ ॥ मग अर्थाच्या सिद्धीप्रत । लक्षणा कोणती लागे येथ । ती नीट जाणून, द्वयरहित । पद पावावें आपुलें ॥ ५७ ॥ पाहतां या तत् त्वं पदा । जहती लक्षणा न लागे कदा । कां कीं दोघांत भेद सदा । दृष्टीस येऊं शकेना ॥ ५८ ॥ आणि अजहतीहि येथ । लागू न पडे हें निश्चित । कां कीं साक्षात या दोघांत । भेद प्रतीत होतसे ॥ ५९ ॥ ह्मणोनि ‘ तोच हा ’ या शब्दांत । ऐक्य जें तैसेंच सुनिश्चित । तत् त्वं पदांच्या अर्थीं येथ । घेणें उचित होतसे ॥ ६० ॥ येथें समत्व अंशीं एकीं । भेद तो अन्यांशीं आहे कीं । ह्मणून भागत्यागनामकी । लक्षणा येथें लागते ॥ ६१ ॥ पृथिव्यादि पंचभूतांच्या योगीं । जयास उत्पत्ति आहे जगीं । कीं जें सुख-

दुःखाच्या भोगीं । गृह जीवातें जाहलें ॥ ६२ ॥ तेचि या आत्म्याला मायिक । स्थूल उपाधि जाणिजे एक । जें पूर्वकर्मांस आलें पिक । जन्ममरणयुक्त जें ॥ ६३ ॥ आणि जें अपंचीकृत भूतांनीं । निर्मिजे, सूक्ष्म जें ह्मणती जनीं । दश इंद्रियेंहि ज्यालागुनी । मन-बुद्धि हीं जोडिलीं ॥ ६४ ॥ तीच दुजी या आत्म्याप्रती । उपाधि ऐसें जन बोलती । जेथ या उठती नाना वृत्ती । सुखादि भोग घ्यावया ॥ ६५ ॥ अनादि आणि अनिर्वचनीय । कारण-देह जो मायामय । ते हे तृतीयोपाधि होय । तत्त्वज्ञांच्या मतानें ॥ ६६ ॥ हें जें बोलिलें उपाधित्रय । तें येथ कोशाचिऐसें होय । आत्मा स्वयें जो निरवयव । तो या त्रयावेगळा ॥ ६७ ॥ तत्तदाकारें त्या त्या कोशीं । भासतो एक हा निजरूपेंशीं । स्फटिकास रंग ये जैसा, जैशी । संगती वस्तु तयाच्या ॥ ६८ ॥ ह्मणोनि उपाधिभेदाहून । आत्मा वेगळाचि आहे आन । ऐसा स्पष्टचि शोध घेऊन । अंगें निर्णय करावा ॥ ६९ ॥ सम्यक् विचार करितां येथ । प्रतीति ऐशीच नेमें येत । कीं हा असंग, अज, निश्चित । अद्वितीय एकला ॥ ७० ॥ याचि आत्मयाअंगीं देख । जागृति-स्वप्न सुषुप्त्यादिक । अवस्था तीन या त्रिगुणात्मक । भासती बुद्धिआश्रयें ॥ ७१ ॥ परी त्या आंत एके स्थिती- । माजी दुसरी न लागे हातीं । सर्वांचीहि ऐशी गति । नित्यता यांतें असेना ॥ ७२ ॥ ह्मणोनि नित्य जें परात्पर । ब्रह्म परमात्मपद साचार । त्याचिया असंग रूपावर । मिथ्या अवस्थात्रय हें ॥ ७३ ॥ शरीर इंद्रियें प्राण मन ।

यांच्या चैतन्यसंगें करून । वृत्तिप्रवाह चालला घन । बुद्धीपासून सर्वदा ॥ ७४ ॥ जंव या वृत्तीच्या मूळास । तम कीं अज्ञान आहे खास । तंव हा भव यावा जन्मास । वारंवार निश्चयें ॥ ७५ ॥ म्हणोनि नेति या वाक्यावरून । दृश्य हें सारें वोसंडून । चिद्घन ज्ञानामृत सेवून । हृदयीं तृप्ति वरावी ॥ ७६ ॥ मग ज्यापरी रस चोखून । साली त्यजिती सारे जन । तेविं हें साधून चिद्रसपान । जगदाकार त्यजावा ॥ ७७ ॥ आत्मा न केव्हां झाला क्षीण । जन्मला नाहीं, न पावे मरण । अथवा वाढूंहि न शके जाण । अव्ययरूपें आपुल्या ॥ ७८ ॥ तेथ नानात्मता निरसून । सुखचि वर्ततें एक घन । स्वप्रकाश तो द्वैतविहीन । सर्वां ठायीं व्यापला ॥ ७९ ॥ ऐशिया ज्ञानस्वरूपावर । कीं जें नित्यसुखाचें घर । तेथ हा दुःखात्मक संसार । प्रत्यया येतो केउता ॥ ८० ॥ तरी तो जाण अज्ञानभ्रमें । अध्यास होऊन साचा गमे । परी तो लयास पावे नेमें । स्वरूपज्ञानें एकल्या ॥ ८१ ॥ असावें एक, दिसावें आन । भ्रम हा जाणती सारे जन । त्यातेंचि अध्यास नामाभिधान । शास्त्रज्ञांहीं ठेविलें ॥ ८२ ॥ दोरीवरती जैसा अही । देखिजे अध्यासें लोकांहीं । तैसाच आत्मया अंगीं पाहीं । भव हा भासे जनांतें ॥ ८३ ॥ चैतन्यरूप या आत्म्यावरी । पाहतां मायेस कैंची उरी । विकल्पाचीही असतां चोरी । अहंता तेथ उद्भवे ॥ ८४ ॥ मग तोच सर्वां अगोदर । येथ अध्यास झाला थोर । सर्वकारण या निर्विकार । परब्रह्मस्वरूपीं ॥ ८५ ॥ इच्छा, आसक्ति अथवा सुख । भाव

जे ऐसे एकानेक । उभारणी ते करिती देख । आत्मया अंगीं भवाची ॥ ८६ ॥ परंतु जेधवां लागे झोप । तैं या भावना पावती लोप । मग केवळ सुखस्वरूप । आत्मप्रत्यय येतसे ॥ ८७ ॥ अनादि अविद्येच्यापासून । बुद्धि पावली जी कां जनन । तीतेंचि चित्प्रतिबिंबेंकरून । जीव नामानें बोलती ॥ ८८ ॥ आत्मा साक्षिरूपानें तेथ । अलिप्त असतो सदोदित । परी तो भासतो मर्यादित । बुद्धिसंयोगें करूनी ॥ ८९ ॥ मग ज्यापरी अग्निसंगांत । लोह जें ठेविलें काळ बहुत । त्यातेंचि अग्नि हें नांव येत । लोकीं प्रतप्तपणानें ॥ ९० ॥ तैसेंच अध्यासयोगें करून । बुद्धि-आत्मा हे जड-चेतन । एकत्र राहतां तेणें करून । बुद्धि चिद्रूप भासते ॥ ९१ ॥ परंतु सद्गुरुसहवासांत । उपनिषद्वाक्यें करूनि श्रुत । सूक्ष्म दृष्टीनें निजांतरांत । स्वरूपशोधन करावें ॥ ९२ ॥ मग तें सर्व उपाधिविहीन । पद तें जाणून, अनुभवून । या जड दृश्यास वोसंडून । एकलें एक रहावें ॥ ९३ ॥ आत्मा सर्वत्र हा मी एक । अद्वय पूर्ण प्रकाशात्मक । अज कीं अतीव निर्मल देख । नित्य प्रतीत असें मी ॥ ९४ ॥ शुद्ध चिद्रूप ज्ञानघन । परिपूर्ण आणि विकारहीन । आनंदरूपास मजलागून । नातळे कर्म लेशही ॥ ९५ ॥ मी शुद्ध मुक्तचि निरंतर । माझिया शक्तीस नाहीं पार । इंद्रियज्ञानास परम विदूर । अंगें अव्यय असें मी ॥ ९६ ॥ अनंत अपार मी सर्वेश । मजलागींच हे अहर्निश । भजती जन जे श्रद्धावश । मी सर्वरूप निश्चयें ॥ ९७ ॥ ऐसिया रीती स्वरूपविचार ।

हृदयीं धरितां वारंवार । उदयास येतसे मग साचार । विशुद्ध ज्ञानभाव पै ॥ ९८ ॥
तेणें मग परिवारेंसहित । अविद्या सर्वथा होई मृत । जैसें रसायन घेतां त्वरित । निवटी
रोगादिकांतें ॥ ९९ ॥ विजनस्थानीं आसनावर । बैसून, देह करून स्थिर । संकल्प
सर्व ते सारून दूर । निर्मळ कीजे मनातें ॥ १०० ॥ मग जें स्वरूप एकीएक ।
चिद्रूप केवल ज्ञानात्मक । त्याचाचि भाव धरावा देख । साधनेंवीण निजांगें ॥ १०१ ॥
मग विश्व जें बहु विस्तृत । आत्मया अंगीं झालें उदित । तयास त्याचि स्वस्वरूपांत ।
विलीन कीजे त्वरेनें ॥ १०२ ॥ मग केवळ आनंदघन । एकला एकचि राहे भरून ।
तेथ केउतें जगाचें भान । संकल्प तोंही केउता ॥ १०३ ॥ हें तों पूर्ण समाधिस्थान ।
येथें मी कीं कोणी जन । दृश्य द्रष्टा आदिकरून । भावना लेश असेना ॥ १०४ ॥
परी ही अवस्था लाभायास । पाहिजे नित्याचा अभ्यास । तत्पूर्वीं जो साधक त्यास ।
साधन केलें पाहिजे ॥ १०५ ॥ तेणें जग हें जड-चेतन । ओंकार मानून कीजे ध्यान ।
वाच्य-वाचक नामें करून । भेद जाणून मानसीं ॥ १०६ ॥ पाहतां ओंकाररूप जग ।
हाही अज्ञानाचाचि भाग । पूर्ण ज्ञान प्रगटतां मग । द्वैतप्रत्यय केउता ॥ १०७ ॥
ओंकारीं या अक्षरें तीन । अ उ म या भेदेंकरून । जगहि त्रिरूप तत्समान । विश्व,
तैजस, प्राज्ञ हें ॥ १०८ ॥ मग विश्व जें अकाररूप । त्याचा तैजसीं कीजे लोप ।
मग तें तैजस उकाररूप । विलीन कीजे मकारीं ॥ १०९ ॥ मग प्राज्ञ पुरुष मकार ।

त्यातें चिदात्मरूपावर । विलीन करून खरोखर । एकीएक उरावें ॥ ११० ॥ स्थूल, सूक्ष्म, कारण, तिन्ही । भेद जे असती देहालागुनी । तैसेच हेही जाणिजे मनीं । भेद असती जगाचे ॥ १११ ॥ स्थूल-सूक्ष्म-कारण-त्रया । विराट्, हिरण्यगर्भ, माया । ऐशीं क्रमेंचि नांवें सया । शास्त्रज्ञांहीं दिधलीं ॥ ११२ ॥ त्यांतेंचि विश्व, तैजस, प्राज्ञ । ऐशींहि नांवें देती सुज्ञ । कराया जगल्लयाचा यज्ञ । अर्थ हा चित्तीं पाहिजे ॥ ११३ ॥ असो, मग जग हें ओंकारांत । विलीन केलिया पाठीं त्वरित । प्रणवोंकारही आत्मरूपांत । विलीन केला पाहिजे ॥ ११४ ॥ मग मीच एकीएक पर- । ब्रह्म-स्वरूप निर्विकार । सर्व उपाधींपासून दूर । मुक्त, ज्ञानस्वरूप ॥ ११५ ॥ यापरी स्वरूपवैभव थोर । अंतरीं ध्यात जो निरंतर । त्यास मग नेणवे आपपर । परमानंदीं, स्वभावें ॥ ११६ ॥ मग तो सागराऐसा स्थिर । गंभीर, पूर्ण निर्मुक्त नर । तो नित्य स्वात्मसुख अपार । सेवीत निःशंक राहतो ॥ ११७ ॥ ऐसा समाधियोगाभ्यासी । जाहला जो कां बहुसायासीं । आणि जयानें विषयसुखासी । तिळांजळीच दिधली ॥ ११८ ॥ त्यातें लक्ष्मणा, सदोदित । मी राम सर्वत्र भेटी देत । जेणें भयदैन्यादि समस्त । अरि ते धुडकाविले पैं ॥ ११९ ॥ यापरी स्वरूपीं रात्रंदिन । लावून आपुलें सारें ध्यान । मुनि तो समस्त बंधांतून । मुक्त होऊन राहतो ॥ १२० ॥ मग तो प्रारब्धाचा क्षय । होतांचि माझ्या ठायीं लय । पावतो लक्ष्मणा, निःसंशय । अहंता सारी त्यजूनी ॥ १२१ ॥ आदि-

अंतीं कीं मध्यांतही । भव हा सुखास कारण नाहीं । भय आणि शोकचि कीजे पाहीं। जीवें संगें तयाच्या ॥ १२२ ॥ ह्मणोनि विधिवादाचें मत । संपूर्ण सांडून बा रे त्वरित। आत्माचि आपुला ध्यावा नित । वर्ततो सर्वांतरीं जो ॥ १२३ ॥ आत्म्यावांचूनि जग हें आन । नाहींच ऐसें जयाचें मन । तो मग माझ्याहि आत्म्याहून । आन राहूंच शकेना ॥ १२४ ॥ जैसें सागरीं मीनलें नीर । यद्वा वातावरणीं समीर । किंवा दुग्धांत ओतिलें क्षीर । गति तैशीच तयाची ॥ १२५ ॥ जन हा ऐसा वसतां लोकीं । जग हें नेत्रांहीं अवलोकी । परि तें मिथ्याच ऐशी निकी । बुद्धि जाण तयाची ॥ १२६ ॥ तेणें वेदान्तवाक्याधारें । युक्तिसिद्ध जे विचार खरे । त्यांहीं दृश्य हें मिथ्या सारें । जाणिलें पूर्ण निश्चयें ॥ १२७ ॥ चंद्र एकाचि असतां दोन । देखिती जैसे कोणी जन । परी ते जाणती नेमें करून । साचा चंद्र एकला ॥ १२८ ॥ असो, परंतु जंव ही जगती । मद्रूप न येचि दृष्टीप्रती । तंव मद्भजनीं धरावी प्रीती । साधकें अत्यादरानें ॥ १२९ ॥ मग ती भक्ति श्रद्धेसवें । वाढून बलाढ्य होतां जवें । तेणें हृदयींच अवलोकावें । स्वरूप माझें सर्वदा ॥ १३० ॥ लक्ष्मणा, रहस्य हें अत्यंत । अखिल-वेदान्त-सारभूत । काढून, करून सुनिश्चित । तुज मीं येथें बोधिलें ॥ १३१ ॥ तयाचें जन जो आलोचन । करील सूक्ष्म विवेकें करून । तो मग सर्वहि पापांतुन । निश्चयें जाण सुटला ॥ १३२ ॥ बंधो, जरि त्वदृष्टीपुढती । प्रत्यक्ष भासतसे ही जगती । तरी ती मायाच, भ्रमचि चित्तीं ।

जाणून तीतें त्यजी वो ॥ १३३ ॥ आणि निर्मळ अंतःकरणीं । मद्भाव दृढ तूं जोडी झणीं । मग तूं परम सुखाचा धणी । नेमें होऊन राहसी ॥ १३४ ॥ अथवा मज जो कोणी जन । सेवील, निष्ठा पूर्ण धरून । निर्गुण, अरूप मी जाणून । यद्वा सगुणहि म्हणूनी ॥ १३५ ॥ तरी तोहि मत्स्वरूपाप्रत । पावून आणिकां करील पूत । रविसा तो जाण प्रतापवंत । पाववी सर्व जगातें ॥ १३६ ॥ ऐसें स्वानुभवाचें ज्ञान । सर्व वेदान्त संशोधून । लक्ष्मणा, मीं तुज केलें कथन । साक्षात् देववरानें ॥ १३७ ॥ तें हें गुरुभक्तीनें युत । जन जो पठण करील नित । तो मद्वचनीं धरून प्रीत । मद्रूपातें पावतो ॥ १३८ ॥ ऐसें **श्रीरामगीता**-ज्ञान । साधकीं हृदयामाजी धरून । सर्व बंधांस वोसंडून । वरावें मोक्षश्रियेतें ॥ १३९ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणून लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ १४० ॥ श्रीराम ॥ ६३ ॥ ७ ॥ ७ ॥

---

## अध्याय ६४ वा, कुशलववृत्त.

श्रीराम ॥ एकदां यमुना तीरावर । माजला खळ तो लवणासुर । तेणें उच्छेद मांडिला थोर । मुनिसमुदायाकारणें ॥ १ ॥ मग ते संत्रस्त मुनीश्वर । रक्षणासाठीं श्रीरघुवीर- । भेटीस पातले, च्यवन थोर । ऋषीतें मुख्य करूनी ॥ २ ॥ तेधवां तयांचें

अत्यादरें । राघवें पूजन केलें त्वरें । मग परम विनयोद्गारें । तयांस ऐसें पूसिलें ॥ ३ ॥
मुनि हो, द्यावया मद्दर्शन । आलांत प्रेमें, तेणें करून । धन्य मी एक रघुनंदन । या
संसारीं जाहलों ॥ ४ ॥ आतां हेत जो अंतःकरणीं । तो मम निःशंक घाला श्रवणीं ।
दुष्कर ऐसेंहि कार्य झणीं । तें मी साधीन तुमचें ॥ ५ ॥ मजसि सुखेंचि आज्ञापावें ।
भृत्य मी तुमचा हें जाणावें । आह्मांस द्विजचि दैवत व्हावें । भूमिपाळांकारणें ॥ ६ ॥
तंव तें ऐकून आनंदित । होऊन बोलला च्यवन त्वरित । प्रभोजी, आह्मांस अतिशयित ।
पीडितो लवणासुर हा ॥ ७ ॥ मधुनामक जो स्वधर्मशील । राक्षस पूर्वीं कृतयुगांतील ।
ज्यास शंकरें दिधला शूल । प्रसन्न होऊन तपानें ॥ ८ ॥ लंकेशाची भागिनी तीच ।
कुंभीनसी तद्भार्या साच । लवणासुर हा पुत्र नीच । तिजशीं मधूला जाहला ॥ ९ ॥
शंकरें दिधलिया शूलाआंत । सामर्थ्य ठेविलें अतिशयित । कीं कोणीहि भस्मीभूत ।
होणार याच्या प्रहारें ॥ १० ॥ तेणें होय तो भारी प्रबळ । पीडितो आह्मांस वेळोवेळ ।
यापरी मुनींहीं आपुला छळ । श्रुत केला श्रीराघवा ॥ ११ ॥ तेधवां तत्काळ श्रीरघुवीर ।
बोलला, अहो हा चिंताज्वर । सांडिजे साराचि; आतांचि ठार । करितों मी त्या खळातें
॥ १२ ॥ सर्वेंचि बंधूस बोले वच । कोण हा वधील राक्षस नीच । मुनिवरांतें या
आतांच । निर्भय केलें पाहिजे ॥ १३ ॥ तेधवां भरतें जोडून हात । प्रार्थिलें ऐसें अग्र-
जाप्रत । देव, मज आज्ञापावें त्वारित । मी त्या वधितों खळातें ॥ १४ ॥ सर्वेंचि शत्रु-

घ्नानें त्वरें । म्हणितलें—देव, हें कैचें बरें । येणें कष्ट ते बहु वत्सरें । नंदिग्रामीं साहिले ॥ १५ ॥ आणि लक्ष्मणानेंही समरीं । साधिलें मोठेंच कार्य तरी । ह्मणोनि मींच या लवणावरी । जाणें उचित एधवां ॥ १६ ॥ मी त्वत्कृपेनें श्रीरघुवीर । खळ हा नेमें करीन ठार । यापरी बोल ते परिसल्यावर । श्रीराम संतुष्ट जाहला ॥ १७ ॥ मग त्यास घेऊन अंकावरती । ह्मणे मी आतांचि मथुरेप्रती । यास अभिषेक परम प्रीतीं । करीन राज्यीं जाणिजे ॥ १८ ॥ मग तत्काळ सामग्री ती । सिद्ध करून अतिनिगुती । लक्ष्मणाकरवीं सीतापती । अभिषेकीत तयातें ॥ १९ ॥ मग अभिषेक झाल्यावर । तयास एक तो दिव्य शर । देऊन बोलला श्रीरघुवीर । येणें खळ तो वधीं तूं ॥ २० ॥ तो मूढ शूळास पूजून घरीं । जातसे फिराया वनांतरीं । कीं जो येईल जीव करीं । वधून त्यातें खावया ॥ २१ ॥ जंव तो सदनीं न आला खळ । तंव तूं सिद्धता करून सकळ । द्वारीं ठाकून राहे बाळ । धनु हातातें घेउनी ॥ २२ ॥ मग तो क्रुद्ध होऊन जाण । तुजसवें मांडील जेव्हां रण । तैं तूं तयाचा हरून प्राण । त्यास पंचत्वीं मेळवीं ॥ २३ ॥ मग त्या मधुनाम वनांतरीं । वसवीं मथुरानामें पुरी । मग तूं तेथेंच वास करीं । माझिया आज्ञेकारणें ॥ २४ ॥ जाय तूं पुढती, तुजमागून । येतसे उदंड सेना घन । अश्व-रथ-गज यांहींकरून । तुजला साह्य कराया ॥ २५ ॥ ऐसें अनुजातें बोधून । जवळी त्यास घे रघुनंदन । मग मुनींचें आशीर्वचन । देऊन प्रेषी तयातें ॥ २६ ॥ मग शत्रुघ्नही

तैशा परी । खळास वधिता झाला शर्री । आणि मथुरा नामें पुरी । रम्य ती वसवी ते स्थळीं ॥ २७ ॥ इकडे वाल्मीकाश्रमीं सीता । प्रसूत होऊन पावली सुतां । कुश-लव ऐशीं नामें स्वतां । मुनीनें त्यांतें ठेविलीं ॥ २८ ॥ मग ते कालेंकरून सुत । जाहले उत्कृष्ट विद्यायुत । मुनीनें करून त्यां उपनीत । वेदाध्ययनीं लाविलें ॥ २९ ॥ मग गूढार्थ जो वेदांचा । तो त्यांस ज्ञात कराया साचा । रामायण या नवकाव्याचा । पाठ दे त्यांतें मुनी तो ॥ ३० ॥ मग ते सुंदर कुलनंदन । आपुल्या सुस्वर कंठें करून । काव्य तें गातां फिरती वन । अश्विनीकुमारांसारिखे ॥ ३१ ॥ देवतुल्य ते दोघे सुत । त्या मुनिजनांत फिरती गात । ठायीं ठायीं श्रवणीं येत । स्वर तो सुंदर तयांचा ॥ ३२ ॥ तेधवां मुनि ते ह्मणती मनीं । गान हें ऐसें सुंदर जनीं । आह्मीं कोणींही कोणे स्थानीं । ऐकिलें नाहीं केधवां ॥ ३३ ॥ देवांत गंधर्वकिन्नरांआंत । स्वर्ग-भूलोकांत पातालांत । कोठेंही आह्मीं न केलें श्रुत । मधुर गायन एतुलें ॥ ३४ ॥ आह्मीं चिरकाल राहतों येथ । स्वेच्छया फिरतों सर्व दिशांत । परी हें कौशल्य परमाद्भुत । गायनवादन कलेचें ॥ ३५ ॥ यापरी वारंवार जन । वर्णिती त्या कुमरांचें गान । कुमर ते आश्रमीं सौख्येंकरून । एकांत सेवीत राहती ॥ ३६ ॥ इकडे राघवें यज्ञ अनेक । केले जे आश्वमेधादिक । सुवर्णाचीच दुसरी एक । सीता निर्मून तीसवें ॥ ३७ ॥ मग त्या यज्ञसमारंभांत । राजे आणि ऋषिही बहुत । लोकहि तैसेच अतिशयित । पातले होते पहाया ॥ ३८ ॥

तेथ ते वाल्मीकिहि मुनी । संगें घेऊन सुत ते दोन्ही । पातले ऋषींच्या नियतस्थानीं । त्याच प्रसंगाकारणें ॥ ३९ ॥ तेथ एकदां एकांतांत । मुनि ते सुखेंचि असतां स्थित । ज्ञानशास्त्राचा प्रश्न करीत । कुश कुमार तयांसी ॥ ४० ॥ देव, ही एतुली गोष्ट मज । श्रुत करवावीच कीं मुनिराज । वांछा तृप्त करावी आज । या शिष्याची समर्थें ॥ ४१ ॥ कीं हे जीव या भवबंधांत । केउते अहो जी सांपडतात । आणि तयांतें मोक्ष होत । तोहि केउता अहो जी ॥ ४२ ॥ तंव ते वाल्मीकि मुनिराज । बोलले, ऐक तें कथितों गुज । बंधमोक्षांचें कारण-काज । सारतः सांगूं एधवां ॥ ४३ ॥ हें तूं ऐकून मजपासून । तैसें साधून निजवर्तन । राहतां मग तूं नेमेंकरून । जीवन्मुक्तत्वा पावसी ॥ ४४ ॥ अरे, हा अंगें अदेह देख । आत्मा केवळ ज्ञानात्मक । आणि हें तयाचें गृहचि एक । देहनामें जें जाणिजे ॥ ४५ ॥ तेथ व्यवस्थेसाठीं एक । मंत्री तयानें ठेविला देख । तोचि अहं या नामात्मक । पाळितो देह-गृहातें ॥ ४६ ॥ परी तो जें जें करितो स्वतां । तें सर्व या आत्म्याचे माथां । लादितो, पावून तादात्म्यता । कर्तेंपणही आपुलें ॥ ४७ ॥ स्वयें हा राहून त्याच्या घरीं । त्यासीच संकल्पाचे भरीं । गोवितो, मग तो त्या अंतरीं । देही बंधातें पावतो ॥ ४८ ॥ मग हे स्त्री-पुत्र-कन्या मम । माझिया सुखार्थ घेती श्रम । ऐसा अंतरीं जोडी भ्रम । नित्य संकल्पें करूनी ॥ ४९ ॥ शेवटीं तेंचि होऊन मूळ । तयास शोकाचें दे फळ । संकल्पाचाचि आहे खेळ । हा सर्व जाण एतुला ॥ ५० ॥

त्याचि संकल्पाचे देख । तामस, राजस कीं सात्त्विक । भेद ऐसे हे त्रिरूपात्मक । कारण होती जगा या ॥ ५१ ॥ त्यांत तमःसंकल्पें करूनी । जीव हा तामस कर्में जनीं । करुनी कृमिकीटांची योनी । पावतो अज्ञपणानें ॥ ५२ ॥ राजस संकल्पांहीं जन । पुत्रदारेंचेंच सुख गणून । संसाराचींच रात्रंदिन । कर्में साधीत राहतो ॥ ५३ ॥ सात्त्विक संकल्पाच्या बळें । जीव हा धर्मींच नेमें वळे । मग राज्य मोक्षाचें सगळें । करीं ये खास तयाच्या ॥ ५४ ॥ परी हे संकल्पाचे तीन । प्रकार दुरीच वोसंडून । केवलरूप संकल्पें करून । पाविजे परम पदातें ॥ ५५ ॥ म्हणून आणिकीं दृष्टी त्यजून । मन तें मनेंच आकळवून । संकल्पांचेंचि निर्मूलन । कुमरा, तुवां करावें ॥ ५६ ॥ अगा, तूं सहस्र वर्षांवर । आचरिलें जरि तपहि घोर । अथवा पाताळीं स्वर्गावर । जरि जाऊन राहसी ॥ ५७ ॥ तरी या संकल्पाचा क्षय । केल्याविणें न सुटका होय । परम सुखाचा प्राप्त्युपाय । आणीक नाहीं दुसरा ॥ ५८ ॥ म्हणूनि निर्बाध निर्विकारी । सुख तें यावयालागीं करीं । सर्व संकल्प तूं वेगें हरी । थोर प्रयत्नें कुमारा ॥ ५९ ॥ संकल्परूप या तंतूवरतीं । सर्व हें ओंविलें आहे जगतीं । तंतूच तुटालिया त्यांची गति । केउती होय सांग बा ॥ ६० ॥ म्हणून सुटाया हा भवपाश । निःसंकल्प तूं होईं कुश । मग प्राप्त तीं सावकाश । कर्में लोकीं करीं वो ॥ ६१ ॥ संकल्पाचें जाळें सारें । जेधवां तुटोनि जाई बा रे । तयीं तूं ब्रह्मचि साचोकारें । पूर्ण होऊन राहसी ॥ ६२ ॥ म्हणून

सुषुप्तीऐसा भाव । नित्य तूं जोडूनि ठेवी राव । मग त्या पूर्णसुखास पाव । अद्वितीय पदाच्या ॥ ६३ ॥ यापरी संकल्पाचा क्षय । करावयाचा मोक्षोपाय । सांगे वाल्मीकिमुनिराय । कुशनंदनाकारणें ॥ ६४ ॥ ऐसी अध्यामरामकथा । भाविकें घ्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ६५ ॥ श्रीराम ॥ ६४ ॥ ७ ॥

## अध्याय ६५ वा, सीतानिर्याण.

श्रीराम ॥ मुनिबोधें तो सीतासुत । निर्भय, मुक्त होवोनि आंत । बाह्यतः सर्वही कर्में करीत । लोकानुसार राहिला ॥ १ ॥ त्या गाननिपुण कुमारांप्रती । मुनि तो बोलला ऐशा रीती । बाळ हो, काव्य हें लोकांपुढतीं । नगरीं गाऊन दाखवा ॥ २ ॥ औत्सुक्य दावील रघुनंदन । तरी त्यातेंहि ऐकवा गान । परी तो देऊं लागतां धन । तें न स्वीकारा लेशहीं ॥ ३ ॥ ऐसें मुनीनें कथिल्यावरी । बाल ते फिरती नगरांतरीं । त्यांहीं सुस्वर कंठें सारीं । वेधिलीं हृदयें जनांचीं ॥ ४ ॥ तयीं तें आपुलें पूर्वाचरित । राघवें तेथून केलें श्रुत । गानपद्धतीहि अति अद्भुत । कुमरांची त्या देखिली ॥ ५ ॥ तेघवां रघुनाथाचें मन । परम कौतुकें ये दाटून । मग तो त्या कुमरांलागुन । सभास्थळातें बोलवी ॥ ६ ॥ सभेस नृपवर, थोर मुनी । पंडित, शास्त्रपुराणज्ञानी । ब्राह्मण विद्वान् आ-

दिकरूनी । जन ते सर्व पातले ॥ ७ ॥ मग त्या सभेच्या भव्यस्थानीं । कुमर ते आणिले बोलावुनी । येतांच लोक ते सर्व मनीं । उल्लासानें दाटले ॥ ८ ॥ मग सिंहासनीं श्रीरघुवीर । आणि पुढें ते दोघे कुमर । एकसमयेंचि देखून फार । जन विस्मित जाहले ॥ ९ ॥ मग ते बोलती परस्पर । कीं हे श्रीराघवाशीं फार । सदृश दिसती दोघे कुमर । रूपें आकारें पहा हो ॥ १० ॥ अंगीं वल्कलें जटा ज्या शिरीं । त्या एक केलिया दूर जरी । तरी या रामीं कुमारांतरीं । भेदाचि आम्हां दिसेना ॥ ११ ॥ ऐसें विस्मयें वदती जन । तंव ते दोघे मुनिनंदन । आदरें तें काव्याचें गान । कराया प्रवृत्त जाहले ॥ १२ ॥ मग तें श्रवणमनोहर गान । चालतां सर्व सभेचें स्थान । दाटलें, जनांहि हरले भान । मी माझें हें सर्वही ॥ १३ ॥ मग भरतातें श्रीरघुनाथ । धन त्यांस द्याया आज्ञापीत । परि तें आणितां भरतें त्वरित । कुमारीं नाहीं घेतलें ॥ १४ ॥ आम्हीं वन्याहारी जन । आम्हांस कशास व्हावें धन । ऐसें बोलून ते नंदन । मुनींद्रापाशीं पातले ॥ १५ ॥ तंव तें देखून श्रीरघुनाथ । नावेक विस्मय पावूनि त्वरित । सीतेचे ते जाणून सुत । निजजनांतें बोलला ॥ १६ ॥ भगवान् वाल्मीकि दिव्यज्ञानी । महात्मा तो या सभेच्या स्थानीं । सीतेसमवेत आदरें करूनी । जन हो येथें आणवा ॥ १७ ॥ येथ या सभाजनांच्या पुढती । शपथ करो द्या सीतासती । तियेची पूर्ण विशुद्ध स्थिति । प्रतीत होवो समस्तां ॥ १८ ॥ तंव तें ऐकतां सारेजण । धावले मुनींद्रापाशीं जाण । आणि तयास वाक्यश्रवण ।

करविती श्रीराघवाचें ॥ १९ ॥ तेधवां वच तें करून श्रुत । बोलला वाल्मीकि मुनि-
नाथ । सीता उदयीक येऊन तेथ । प्रत्यय दावील जनांते ॥ २० ॥ मग ती सारी मुनी-
ची वाणी । पावतां श्रीराघवाच्या श्रवणीं । प्रभु तो ऐसे बोलला झणीं । सर्वां सभाजनां-
तें ॥ २१ ॥ कीं येथ येऊन देवी सीता । उदयीक शपथ करील स्वतां । तेधवां तियेची
निर्दोषता । सर्वी साक्षात् पहावी ॥ २२ ॥ मग त्या सभेच्या वेळीं बा रे । लोक ते
लोटले तेथें त्वरें । ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य सारे । मुनिहि नृपहि सर्वतः ॥ २३ ॥
कपिहि पहाया उत्कंठित । होऊन कौतुकें पातले तेथ । तंवचि तो मुनींद्र सीते-
सहित । पावला सभास्थळातें ॥ २४ ॥ सती ती अंतरीं सद्गदित । होऊन, जोडून
दोन्ही हात । मुनींमागून पद क्रमीत । सभांगणातें पातली ॥ २५ ॥ तैं ती देवता
लक्ष्मीसमान । सभेस येतांच अवलोकून । निर्दोष निर्दोष ऐसें म्हणून । जनीं गौरविलें
तियेतें ॥ २६ ॥ मग सभेच्या मध्यस्थानीं । सतीचे ते साह्यकारी मुनी । वाल्मीकि येऊन
सद्वचनीं । बोलले ऐसें राघवा ॥ २७ ॥ गा तूं लोकापवादभयें । महारण्यीं जी त्यजिली
स्वयें । ती ही जानकी निःसंशयें । अपापा आहे जाण तूं ॥ २८ ॥ तदर्थ शपथ कराया
सिद्ध । असे ती एधवां देवी शुद्ध । तरी तूं आपुला अनुज्ञाशब्द । त्या साध्वीतें देइजे
॥ २९ ॥ हे तेजस्वी कुमार तिचे । दोघे तुझेचि असती साचे । मीं हें समस्त आपुल्या
वाचे । सत्य जें तेंचि सांगतों ॥ ३० ॥ प्रचेतसाचा दशम सुत । हा मी निश्चित सत्य-

घ्रत । कळतसे तैंहून मद्वाणींत । असत्य नाहीं निघालें ॥ ३१ ॥ सीता असेल जैं दूषित । तरी मीं तप जें केलें बहुत । कष्टून उदंड वर्षपर्यंत । तें सर्व निष्फल असों दे ॥ ३२ ॥ यापरी मुनीनें कथितां तेथ । तयांस बोलला श्रीरघुनाथ । मुनींद्र, सत्यचि हें निश्चित । सांगतां जें जें एधवां ॥ ३३ ॥ तुमच्या शब्दांवरून मला । तयाचा पूर्ण प्रत्यय आला । पूर्वींहि एकदां आहे झाला । प्रत्यय सर्व जनांतें ॥ ३४ ॥ लंकेंत देवांसमक्ष मला । सीता-शपथ-प्रसंग झाला । तैं म्यां निष्पाप जाणून इला । प्रविष्ट केलें गृहातें ॥ ३५ ॥ ती ही जननिंदेस मनीं । भिऊन, शुद्ध असतांही वनीं । त्यजिली, तयाची मजलागुनी । मुनींद्रें क्षमा करावी ॥ ३६ ॥ जन्मले माझेच ते हे सुत । हें मी जाणतों सुनिश्चित । माझी अखंड राहो प्रीत । या साध्वीचे ठिकाणीं ॥ ३७ ॥ तेधवां रघुनाथाचा भाव । जाणून ब्रह्मादिक ते देव । पातले सत्वर घेऊनि धाव । परमौत्सुक्यें करूनी ॥ ३८ ॥ मग मुख समोर, दृष्टि खालीं । करून ती सीता माउली । करद्वय जोडूनी बोलली । ऐशी सर्वां-कारणें ॥ ३९ ॥ राघवावांचून आणीक कोणी । जरि न मीं चिंतिला अंतःकरणीं । तरी ही उदरीं घेवो झणीं । मजसि देवी धरित्री ॥ ४० ॥ ऐसी बोलतां शपथवाणी । भूतळां-तून मग तेच क्षणीं । सुंदर सिंहासन त्या ठिकाणीं । एक प्रकट जाहलें ॥ ४१ ॥ मग भूदेवीनें स्वकरांहीं । जानकी उचलूनियां लवलाहीं । सिंहासनीं बैसविली पाहीं । मातृ-स्नेहें करोनी ॥ ४२ ॥ मग ती सिंहासनाधिष्ठिता । भूमींत प्रविष्ट होतां सीता । तिज-

वरी पुष्पें वर्षिलीं स्वतां । अंतरिक्षांतून सुरांहीं ॥ ४३ ॥ ते मग बोलती परस्परांत । सीतासतीच्या वार्ता बहुत । थोरपणा हा अति अद्भुत । त्या सर्वांतें जाहला ॥ ४४ ॥ भूवरी आणि अंतरिक्षांत । स्थावर जंगम जें का स्थित । सर्वहि जग तें भ्रांतिभूत । जाहलें सीतावियोगें ॥ ४५ ॥ शपथप्रकार तो देखून । वानर आणिक सारे जन । अत्यंत सचिंतसे होऊन । जणुं ध्यानस्थ बैसले ॥ ४६ ॥ कोणी रामास अवलोकिती । कोणी सीताच धरिती चित्तीं । मुहूर्तभर ती सारी जगती । निश्चेष्ट ऐसी जाहली ॥ ४७ ॥ रामहि पुढचीं कार्यें सारीं । जाणून असतांही निजांतरीं । अज्ञाऐसाच दुःख करी । सीतावियोगानिमित्तें ॥ ४८ ॥ मग ऋषींहीं ब्रह्मदेवेंही । तयास बोधलिया लवलाहीं । स्वप्नाआंतून जैसा कांहीं । श्रीराम जागृत जाहला ॥ ४९ ॥ मग पुढचें सारें काज । करूं प्रवर्तला तो रघुराज । सर्वेचि ऋषि आणिक ऋत्विज । दक्षिणा देई तयांतें ॥ ५० ॥ मग आदरें बोळवून त्यांस । संगें घेऊन कुशलवांस । पावला तो श्रीअयोध्याधीश । स्वस्थानातें आपुल्या ॥ ५१ ॥ मग तैंहून तो श्रीराम । सांडून सर्व भोगांचा काम । आत्मचिंतनीं धरून प्रेम । एकांत सेवूं लागला ॥ ५२ ॥ मग तो एकदां एकान्तांत । बैसला असतां सीताकांत । माता कौसल्या ये तेथ । भेटीकारणें प्रभूच्या ॥ ५३ ॥ मग तो साक्षात लक्ष्मीवर । जाणून घालून नमस्कार । चित्त प्रसन्न होऊन फार । तयास ऐसें बोलली ॥ ५४ ॥ देव, तूं विश्वाचा या जानिता । तूं न आतळसी आदिमध्यांता ।

पूर्ण पुरुष तूं परात्मा स्वतां । सच्चिदानंद स्वरूपें ॥ ५५ ॥ पुण्यसंपत्ति माझी मोठी । जो तूं आलास माझ्या पोटीं । परंतु एधवां श्रीजगजेठी । वृद्ध मी देख जाहलें ॥ ५६ ॥ ठाकले देहपाताचे दिन । परी प्रभो, हें भवबंधन । माझें अद्यापि नाहीं गळून । गेलें अज्ञानजन्य जें ॥ ५७ ॥ म्हणून मजलागीं तूं आतां । ज्ञानाचे बोधीं संक्षेपतां । जयें हा संसाराचा गोता । टळेल पूर्ण निश्चयें ॥ ५८ ॥ तयीं ते वृद्ध मातेचे बोल । ऐकून, विरक्ति देखून खोल । दयाळू देव तो त्रिजगत्पाळ । तीतें सांगूं लागला ॥ ५९ ॥ माते, मार्ग मीं पूर्वीं तीन । कथिले वराया मोक्षस्थान । कर्म, भक्ति आणि ज्ञान । ऐशा नाम विभेदें ॥ ६० ॥ त्यांत भक्तिही भेदिली, तीन । प्रकारें, त्रिगुणभेदें करून । जो जो ज्या स्वभावाचा जन । तैशी भक्ति तयाची ॥ ६१ ॥ जो मूढ दंभ-मत्सर युत । भेददृष्टीचा अतिशयित । भजतसे पराच्या पीडेनिमित्त । भक्त तो तामस जाणिजे ॥ ६२ ॥ दुजा जो भोगसुखाचा हेत । ठेवूनि पूजितो मातें नित । वांछितो कीर्ति, वांछितो वित्त । भक्त तो राजस जाणिजे ॥ ६३ ॥ परमात्मयास समर्पून । यद्वा कर्तव्य ऐसें गणून । कर्मनिरास व्हायालागून । जो मज भजत राहतो ॥ ६४ ॥ माते, भक्त तो बघ सात्त्विक । ऐशी त्रिविध भक्तीची देख । खूण सांगितली, आतां एक । उरलें लक्षण सांगतों ॥ ६५ ॥ जो मी अनंत-गुणमंडित । त्या मजवरती जडून प्रीत । वृत्तिप्रवाह चालला नित । गंगा जैसी सागरीं ॥ ६६ ॥ निर्गुण भक्तियोगाची खूण । हीच एकली

माते जाण । जेथ भक्तांचें अंतःकरण । मद्‌गुणीं पूर्ण वेधलें ॥ ६७ ॥ निष्काम ऐसे माझियावरी । अंतर जडून राहे तरी । भक्त तो माझा मुक्तिहि चारी । देतां नेघे निश्चयें ॥ ६८ ॥ तयास माझिया भजनाविण । आणीक कांहींच नावडे जाण । याचि भक्तियोगानें त्रिगुण । लंघून मातें पाविजे ॥ ६९ ॥ अखिल कामना वोसंडून । स्वधर्माचरणीं मन लावून । हिंसा सर्वथा परिवर्जून । कर्मानुष्ठान करावें ॥ ७० ॥ दर्शन-स्तवन करावें माझें । पूजन, स्मृति कीं वंदन कीजे । भूतजात ये नयनीं जें जें । तें तें मीच ह्मणावें ॥ ७१ ॥ थोर जे तयांचा कीजे मान । दुःखितां अनुकंपा दावून । आपुल्या सम जे असती जन । ते मित्र ऐसे गणावे ॥ ७२ ॥ असत्य सारें वर्ज्य करावें । यमनियमातें अभ्यासावें । वेदान्तविचार कानीं ध्यावे । नित्य नेमें करूनिया ॥ ७३ ॥ माते, मन्नामसंकीर्तन । तेंही करावें प्रेमें करून । सरळ स्वभाव संपादून । भावें सत्संग धरावा ॥ ७४ ॥ मग तो अहं नांवाचा चोर । सर्वथा करून हद्दपार । मद्धर्माचीच निष्ठा फार । धरावी जीवें आदरें ॥ ७५ ॥ मग ते अखिल मनाचे मळ । धुवून, त्यजून विकल्पजाळ । अनायासेंचि तो तत्काळ । भक्त ये माझ्या स्वरूपीं ॥ ७६ ॥ जैसें समीरमिश्रित वासें । घ्राणीं रिघावें वातासरिसें । तैसेंच चित्त हें योगाभ्यासें । आत्मरूपांत प्रवेशे ॥ ७७ ॥ आत्मा मी हा प्राणिजातांत । सर्वांतरांत आहे स्थित । परी मूढ ही नेणून मात । मातें शोधीत राहती ॥ ७८ ॥ मग नाना कर्में नाना क्रिया ।

यांहीं कष्टती मज पूजाया । परी या उपकरणांहीं तयां । मी न संतुष्ट होतसें ॥ ७९ ॥ भूतांस पीडितो, अवमानितो । आणि नित्य मत्पूजा करितो । त्याची न ती मी पूजा घेतों । माते नेणे ह्मणोनि ॥ ८० ॥ जोंवरी मी सर्वभूतस्थित । ऐशी अंतरीं न आली प्रतीत । तंव या कर्मादिकांहीं सतत । प्रतिमा माझी पूजिजे ॥ ८१ ॥ जंव हा मी, तो कोणी आन । ऐसें न उडालें भेदज्ञान । तंव तो मृत्यूपासून जन । भय पावेचि सर्वथा ॥ ८२ ॥ ह्मणूनि सर्व भूतांतःस्थित । जाणून मज पूजावें नित । सर्वांस करून संतोषित । प्रेमें गौरवें करूनी ॥ ८३ ॥ मी शुद्ध चेतनरूपें, जीव । जाहलों आहें सावयव । जाणून, सर्वांशीं विलीन-भाव । अंतरापासून धरावा ॥ ८४ ॥ येणेंचि योगें जीव-ईश्वर । वेगळे देखणें आहे गैर । माते, असे हे दोन्ही सुंदर । भक्ति-ज्ञानयोग पै ॥ ८५ ॥ यांतून कोणहि एक जरी । योग साधिला पुरुषें तरी । तो शांतिसुखाच्या घरीं । प्रविष्ट होईल निश्चयें ॥ ८६ ॥ माते, तूं भक्तियोगें मज । सर्वांतर्यामी जाणून भज । अथवा गणून सुतचि निज । भजून शांतीस वरी वो ॥ ८७ ॥ यापरी बोलतां श्रीरघुनाथ । कौसल्या संतोष पावली बहुत । मग रामास हृदयीं ध्यात । राहून वारीं भवातें ॥ ८८ ॥ मग ती सत्त्वरजस्तम- । गुणांचा लंघून सारा क्रम । पावली श्रीविष्णूची परम । गति श्रीरामकृपेनें ॥ ८९ ॥ कैकेयीनेंही ऐशा क्रमें । पूर्वीं कथिलें जें श्रीरामें । तेंचि हृदयीं धरून नेमें । जोडिलें ध्यान प्रभूचें ॥ ९० ॥ मग शरीर सांडून

यंथ । पुण्यें पावूनि स्वर्गाप्रत । दशरथाचिया संगतींत । राहिली परम सुखानें ॥ ९१ ॥ लक्ष्मणाचीही माता अंतीं । ऐशीच पावली दिव्य गति । यांहीं साक्षात लक्ष्मीपती । आत्मत्वानें जोडिला ॥ ९२ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें द्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ९३ ॥ श्रीराम ॥ ६५ ॥ ७ ॥

## अध्याय ६६ वा, लक्ष्मणनिर्याण.

श्रीराम ॥ यावरी एकदां निजमातुलें । भेटीस पुरीस बोलाविलें । ह्मणून भरतें गमन केलें । सेनेसमवेत ते स्थळीं ॥ १ ॥ मग तो रणांत तेत्तीस कोटी । गंधर्वा रामाज्ञेनें निवटी । आणि स्थापीतसे शेवटीं । पुरेंही दोन तेथवां ॥ २ ॥ मग पुष्कर नामक सुत । एकांत आदरें अभिषेकीत । सर्वांचि तयास नाम देत । पुष्करावती ह्मणोनि ॥ ३ ॥ दुजियास ह्मणून तक्षशिला । तेथ तक्ष तो सुत आपुला । तेणें विध्युक्त अभिषेकिला । राज्याभिषेक करूनी ॥ ४ ॥ ऐसीं दोघांस राज्यें दोन । देऊन, धन-धान्यही ओपून । भरत अयोध्येला येऊन । लागला सेवे प्रभूच्या ॥ ५ ॥ यावरी राघवें लक्ष्मणालागीं । ह्मणितलें—अवो, तूं पश्चिमभागीं । जाऊन भिल्ल ते जिंकी वेगीं । खळ जे लोकां पीडिती ॥ ६ ॥ मग ते स्थळीं दोन पुरें । बसवून, राज्यीं स्थापी त्वरें । अंगद-चित्रकेतूंतें बा रे ।

कुमरां दोघां आपुल्या ॥ ७ ॥ मग गजाश्वधनरत्नांहीं । तयांस पूरित करून पाहीं । परतून येईं तूं लवलाहीं । मज भेटाया कारणें ॥ ८ ॥ मग ती श्रीरामाची वाणी । ऐकतां लक्ष्मणानेंही झणीं । जाऊन तैसेच त्या त्या ठिकाणीं । कार्य सिद्धीस आणिलें ॥ ९ ॥ मग परतून अयोध्यापुरा । येऊन भेटला सीतावरा । यावरी सेवीत धर्माचारा । सर्व ते बंधु राहिले ॥ १० ॥ यापरी कित्येक वर्षें जातां । एकदां श्रीरामभेटीकरितां । पातला काळपुरुष स्वतां । मुनीच्या वेषें करूनी ॥ ११ ॥ मग तो लक्ष्मणाला बोलला । दूत मी अतिबलाचा भला । आलों निरोप सांगायाला । श्रीरामातें तयाचा ॥ १२ ॥ ह्मणून मी आलियाचें वृत्त । तयास कळवी बापा त्वरीत । तयीं तें लक्ष्मणें तत्काळ श्रुत । जाऊन केलें राघवा ॥ १३ ॥ तेधवां तयास सत्वर आंत । पाठवीं बोलला श्रीरघुनाथ । मग लक्ष्मणेंहि नेलें त्वरित । मुनीस पुढती प्रभूच्या ॥ १४ ॥ मग भीतरीं येतां मुनी । बोलला आपुल्या मधुर वचनीं । स्वस्ति असो कीं तुजलागुनी । अयोध्याधीशा राघवा ! ॥ १५ ॥ मग सर्वेचि श्रीरघुवीरें । तयास पूजिलें अत्यादरें । मग आसन देऊन त्वरें । पुसिलें क्षेम तयाचें ॥ १६ ॥ मग ऐकून त्याचें क्षेम । आपुलें तयास कळवी राम । मग ह्मणे चित्तीं असे जो काम । तो मज आतां निवेदा ॥ १७ ॥ तेधवां मुनि तो बोले वच । आपण दोघेच येथें साच । असावे, आणिक जन कोणीच । येथें श्रवणार्थ नसावा ॥ १८ ॥ आपुलें भाषण हें कोणाही । श्राव्य कीं कथनीय ऐसें नाहीं । ऐकतां वचचि

तयाचा पाहीं । तुजला केला पाहिजे ॥ १९ ॥ तंव ती मान्य करूनि वाणी । श्रीराम लक्ष्मणास बोले झणीं । लक्ष्मणा, दारींच रहा, तूं कोणी । भीतरीं येऊं न देईं ॥ २० ॥ कोणी येईल तरि तो मज । वध्यचि होणार नेमें समज । ऐसें सांगून मग रघुराज । पुसता झाला मुनीतें ॥ २१ ॥ मुने, वद तुज धाडिलें कोणीं । कामना कोण ती अंतः-करणीं । तेधवां मुनि तो बोलला वाणी । ऐसी सीतापतीतें ॥ २२ ॥ देव, मी नामें आहें काळ । तुझेंचि प्रारंभींचें बाळ । जैं तूं मायेस केलें जवळ । तैं मी तूतें जाहलों ॥ २३ ॥ एधवां ब्रह्मदेवानें मज । धाडिलें येथें श्रीरघुराज । तयाचा निरोप आहे तुज । स्वर्गास येण्या यापरी ॥ २४ ॥ कीं या सर्वां आधीं देव । तूंचि एक होतास स्वयमेव । या सर्व त्रैलोक्यातें ठाव । पोटीं देऊन प्रभो तूं ॥ २५ ॥ मग तूं मायासंग करून । उत्-पन्न केलेंस मजलागून । सर्वेचि एक अनंत म्हणून । नाग तूं जन्मा आणिला ॥ २६ ॥ मग त्याच मायासंगें करून । मधु कैटभ हे राक्षस दोन । उत्पन्न करून, तूंच त्यांला-गुन । मागुती निर्दाळिलें पै ॥ २७ ॥ मग तयांचीं हाडें मांस । यांची उदंड झाली रास । ते मग पृथ्वी या नांवास । पात्रली कालें करूनी ॥ २८ ॥ मग नाभिकमलांत मज । विधीस उत्पन्न करून सहज । मजासि प्रजापतीचें काज । लाविलें तुवां ईश्वरें ॥ २९ ॥ मग मज या तव कार्यांत । कोणी विघ्न करील भूत । तरी तूं तेधवां धावूनि त्वरित । रक्षण माझें करावें ॥ ३० ॥ म्हणून प्रार्थिलें जैं मी तुज । तैं तूं कश्यपाचा

आत्मज । होऊन साधिलें माझें काज । वामनरूपें करोनी ॥ ३१ ॥ पुढती रावणें हो-
वोनि बळी । गांजिली पृथ्वी देवां समग्रां । तैं तूं स्वयें या रघूच्या कुळीं । प्रगटलासी
श्रीरामा ॥ ३२ ॥ तेथ तूं रावणाचा घात । हावि धरून एक हेत । अकरा हजार वर्ष-
पर्यंत । भूतळीं वास योजिला ॥ ३३ ॥ तो त्वन्मनोरथ सिद्धी गेला । निवासकाळही
संपूं आला । म्हणून दूत हा म्यां प्रेषिला । तुज भेटाया कारणें ॥ ३४ ॥ आतां या-
हीवरी तूं येथ । राहूं वांछिसी राज्य करीत । तरी तूं देव त्रिलोकतात । इच्छेऐसें करीं
वो ॥ ३५ ॥ अथवा स्वर्गलोकातें याया । जरी तूं मनांत घेसी सया । तरी मग
आह्मी सुर हे भया । त्यजून पावूं सुखातें ॥ ३६ ॥ यापरी तुजलागीं नेमक । बोलला
तो देव चतुर्मुख । तें तुजला मी रघुनायक । श्रुत केलें एथवां ॥ ३७ ॥ ऐसी काळमु-
खींची मात । ऐकतां तो श्रीसीताकांत । परतून तयास बोले त्वरित । गा तूं साचें बो-
लसी ॥ ३८ ॥ या तव आगमनानें मज । संतोष झाला ऐसें समज । कराया लोकत्र-
याचें काज । अवतीर्ण झालों असें मी ॥ ३९ ॥ माझा या लोकींचा हेत । सर्वथा पा-
वला सिद्धीप्रत । आतां विचारा ऐसी मात । कांहींच नाहीं उरली ॥ ४० ॥ सुर हे
माझ्या सेवेसाठीं । झटती, तरी मी त्यांची पाठीं । करावी, हेचि अवश्य गोष्टी । वा-
क्यानुसार विधीच्या ॥ ४१ ॥ ऐसें भाषण चाललें आंत । तंवचि दुर्वास अकस्मात ।
द्वारीं येऊन ठेला त्वरित । श्रीरामभेटीकारणें ॥ ४२ ॥ आणि ह्मणाला लक्ष्मणाप्रत ।

मजसि भेटवी श्रीरघुनाथ। माझें मोठेंच कार्य तेथ। आहे साधावयाचें ॥ ४३ ॥ तेधवां तयास सुमित्रासुतें। म्हणितलें कार्य तें वद कोणतें। जें काय कीजे श्रीरघुनाथें। तें मी साधीन एधवां ॥ ४४ ॥ नातरी ठाकणें मुहूर्त एक। कार्यांत गुंतला रघुनायक। परी हें तयाचें बोलणें देख। मुनीच्या चित्ता न आलें ॥ ४५ ॥ तत्काळ तयानें संतापून। म्हणितलें—दाखवीं रघुनंदन। नातरी आतांचि भस्म करीन। शापून कुळा स्थळांतें ॥ ४६ ॥ तें तें दुर्धर वच ऐकोनी। लक्ष्मणें देखिलें ऐसें मनीं। कीं या समस्त-नाशाहुनी। माझाच नाश हिताचा ॥ ४७ ॥ मग निश्चय तोचि करून। दुर्वासाचें तें आगमन। लक्ष्मणें रामास केलें कथन। भीतरीं अंगें रिघुनी ॥ ४८ ॥ तंव तें ऐकतां त्या काळा-ला। राघवें तत्काळ निरोप दिला। मग बाहेर भेटूं आला। मुनिदुर्वासा कारणें ॥ ४९ ॥ मग अभिवादून तया। पुसिलें—आलांत कां मुनिराया। तंव तो बोलला, ऐक सया। कार्य हें माझें अवश्य ॥ ५० ॥ गा मी सहस्र वर्षांवर। उपवासी असें निरंतर। त्याचिया समासीचा थोर। दिन हा आज उदेला ॥ ५१ ॥ तरी सिद्ध जें सदनीं कांहीं। तें मज भोजन दे लवलाहीं। तंव तें ऐकून श्रीरामेंही। भोजन त्यातें दिधलें ॥ ५२ ॥ मग तें सेवून, तृप्त होऊन। मुनीनें स्वस्थळीं केलं गमन। सर्वांचि तें काळाचें वचन। रामें चित्तीं आणिलें ॥ ५३ ॥ मग दुःखशोकांहीं अती। व्याकुळ जाहली त्याची मती। म्लानता बहुत ती वदनाप्रती। खेददैन्यांहीं आणिली ॥ ५४ ॥ लक्ष्मण हृतचि ऐसें

गणून । तयाचें उद्वेग पावलें मन । शब्द एकही वदनांतून । काढाया तो धजेना ॥ ५५ ॥ मनीं ह्मणे, आमुचें कैचें प्रेम । खोटेंचि; व्यर्थ हा सारा श्रम । तंव तो साचिंत सीताराम । लक्ष्मणें नयनीं देखिला ॥ ५६ ॥ मग तो बोलला हे रघुराज । केउतें या चिंतेचें काज । सर्व हे संशय त्यजूनि मज । निःशंकपणें वधीं तूं ॥ ५७ ॥ जरी तुज असेल माझी प्रीति । तरी तूं कृपाळू होईं अती । मजसि वधींच तूं संप्रती । धर्मास सोडूं नको हो ॥ ५८ ॥ प्रतिज्ञा भंगिसी जरि तूं निज । तरि मग नरकींच जाणें मज । प्रभो, हीं ऐशीच नेमें समज । गति काळाची जगीं या ॥ ५९ ॥ यापरी बोलतां सुमित्रासुत । भानावरी ये श्रीरघुनाथ । मग वसिष्ठा, प्रधानांप्रत । पाचारीत सभेसी ॥ ६० ॥ मग तें कालादिकांचें वृत्त । तयांस समग्र करून श्रुत । केउतें करणें येथें उचित । ऐसें तयांतें विचारी ॥ ६१ ॥ तंव ते सारे बोलती तया । गोष्ट ही पूर्वींच ठरली सया । ठाउकी सर्वांही ज्ञानियां । लक्ष्मणवियोग तुजला ॥ ६२ ॥ म्हणोनि लक्ष्मणालागीं त्यज । प्रतिज्ञा न सोडी बा तूं निज । प्रतिज्ञा भंगतां स्पष्टचि समज । धर्म हा नष्ट जाहला ॥ ६३ ॥ मग धर्मचि बुडाल्यावरती । त्रिलोकीलागीं तीच गती । आणि प्रभो तूं रक्षणाप्रती । आलास सर्व जगाच्या ॥ ६४ ॥ म्हणूनि सांडुनि सुमित्रासुता । रक्षी त्रैलोक्य हें तूं आतां । यापरी जनांहीं निर्णय देतां । मानला शीघ्र राघवा ॥ ६५ ॥ मग ह्मणे, लक्ष्मणा, आतां तुवां । इच्छेनुसार पथ लक्षावा । वध कीं त्याग या दोन्ही भावां । मान्यता

सरिसी भल्यांची ॥ ६६ ॥ यापरी राघवें बोलून बोल । संशय निवटिला धर्मांतील । सुमित्रासुत तो मग तत्काळ । गृहास गेला आपुल्या ॥ ६७ ॥ मग जाऊन सरयूतीरीं । आसनीं शुद्धाचमन करी । मग प्राणायामें सारीं । नवही द्वारें निरोधी ॥ ६८ ॥ मग मस्तकीं नेला प्राण । आणि सर्वही अंतःकरण । वासुदेवाख्य जें ब्रह्म पूर्ण । चिंतनीं त्याच्या लाविलें ॥ ६९ ॥ तेधवां संतोष पावून सुरीं । सुमनें वर्षिलीं त्याचे शिरीं । मग त्यास सदेह स्वर्गावरी । नेऊनि पूजिलें सुरेशें ॥ ७० ॥ सुरेशासंगें मुनिसिद्धांहीं । तैसेंच आदरें पूजिलें पाहीं । विधिहि धावूनि ये लवलाही । शेषास भेटावयातें ॥ ७१ ॥ ऐसा शेषावतार हरी । पावला आपुल्या मूळ घरीं । भक्त जनांच्या पूर्णोद्धारीं । शिण घेऊन भूवरी ॥ ७२ ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । म्हणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ७३ ॥ श्रीराम ॥ ६६ ॥ ७ ॥ ७ ॥

---

## अध्याय ६७ वा, रामनिर्याण.

श्रीराम ॥ लक्ष्मण निघून गेलियावर । उदास झाला श्रीरघुवीर । मग एकदां सभेस थोर । मुनिमंडळातें बोलवी ॥ १ ॥ मग म्हणे हें राज्यसिंहासन । आतां भरताला अर्पून । लक्ष्मणाचाच मार्ग धरून । मी जाणार एधवां ॥ २ ॥ तंव तें ऐकतां लोक सकळ ।

दुःखें जाहले अति व्याकुळ । मग वृक्ष जैसा, तोडितां मूळ, । तैसे पडले भूवरी ॥ ३ ॥ भरतहि झाला संमूर्छित । मागुती सावध होवोनि त्वरित । राज्यपदातें धिक्कारीत । बोलला ऐसें श्रीरामा ॥ ४ ॥ प्रभो, मी त्वत्पादांची आण । वाहून सांगतों-तुझियाविण । स्वर्गीचें कीं महीचें जाण । राज्य मज नलगे सर्वथा ॥ ५ ॥ राज्यीं बैसवी कुशलवांस । आह्मी तुजसवें येऊं खास । वृत्त हें जाऊन शत्रुघ्नास । दूतीं कथिलें पाहिजे ॥ ६ ॥ यापरी भरताचें भाषण । सर्व तें वसिष्ठें केलें श्रवण । सर्वेचि पुढती सारेजण । दुःखित पडले देखिले ॥ ७ ॥ मग अंतरीं उपजून दया । बोलता झाला श्रीरघुराया । प्रभो, पहा हे लोक सया । पडिले कैसे भूवरी ॥ ८ ॥ तयांचे भावानुसार तुवां । प्रसन्न व्हावेंचि कीं एधवां । ऐसें वसिष्ठें सीताधवा । विनविलें जेव्हां आदरें ॥ ९ ॥ तैं त्या जनांस कृपाळूपणें । उठवून पुसिलें सीतारमणें । अहो, या प्रसंगीं कोण्या गुणें । संतोष होईल तुम्हांतें ॥ १० ॥ तेधवां बोलले सारे जन । तूं जेथ करीत असती गमन । तेथ आम्हीही तुजमागून । येऊं वांछितों दयाळा ॥ ११ ॥ याचीच आवडी आम्हां अती । धर्महीं आमुचा हा श्रीपती । हृदयीं हेचि कीं बापा, मती । दृढता आहे पावली ॥ १२ ॥ स्वर्गीं, पुरीं वा तपोवनांत । जाय तूं कोठेंही सीताकांत । तुजसवें दारापुत्रांसहित । आह्मी येऊं सर्वही ॥ १३ ॥ मग तयांची ती दृढ मती । कालाचीहि तैशीच उक्ती । जाणून राघवें सर्वांप्रती । ह्मणितलें ठीक ह्मणूनी ॥ १४ ॥ मग

कोसल देशीं कुश । स्थापून, लवास उत्तर देश । देतसे तो श्रीअयोध्याधीश । चतुरंग सेनेसवें पै ॥ १५ ॥ मग उदंड रत्नें, उदंड धन । तयास दिधलें संपादून । मग ते कुमार पद वंदून । चालिले कष्टें स्थळा त्या ॥ १६ ॥ मग आणाया शत्रुघ्नातें । दूत पाठविले श्रीरघुनाथें । त्याहीं तीं सर्व घडलीं वृत्तं । कानीं घातलीं तयाच्या ॥ १७ ॥ तयीं ती कुलनाशाची कथा । ऐकतां शत्रुघ्न थोर व्यथा । पावला; मग तो धैर्यपथा । विवेकयोगें धरीतसे ॥ १८ ॥ मग मथुरेस सुबाहु सुत । विदिशापुरीस यूपकेत । राज्यीं स्थापून अंगें त्वरित । अयोध्येलागीं पातला ॥ १९ ॥ तेथ तो रमेश श्रीभगवान । तेजें परम शोभायमान । पीतांबरधर रघुनंदन । ऋषिवेष्टित देखिला ॥ २० ॥ मग साष्टांग नमस्कार । घालून, जोडून दोन्ही कर । बोलला शत्रुघ्न शत्रुहर । सीतानाथाकारणें ॥ २१ ॥ प्रभो मी येणार तव संगतीं । नेमेंचि जाणिजे तूं संपती । मी आज आपुल्या तनयांप्रती । राज्यीं स्थापून पातलों ॥ २२ ॥ तेधवां त्याचाहि दृढ निश्चय । देखून बोलला श्रीरघुराय । नेमिला मध्यान्हींचा समय । सिद्ध तूं राही तेधवां ॥ २३ ॥ इतुक्यामाजी उड्डाण घेत । वानर धांवूनि आले तेथ । ऋक्ष, राक्षस ऐसे समस्त । भक्त श्रीराघवाचे ॥ २४ ॥ तैसेच मुनींचे सुरांचे सुत । तेहि, चालला श्रीरघुनाथ । ऐसें ऐकून पातले तेथ । रामप्रेमाकारणें ॥ २५ ॥ मग ते वानरराक्षसवीर । ह्मणती निश्चयें श्रीरघुवीर । आम्ही तुजसंगें येणार । जाशील जेथ ते स्थळीं ॥ २६ ॥ वीर सुग्रीवही पातला । वंदन करितसे

श्रीरामाला । ह्मणे प्रभो मी अंगदवाला । अभिषेकिलें एथवां ॥ २७ ॥ मग राज्यीं स्थापून तया । पातलों येथ मी वेगें सया । माझा तुझिया संगें याया । कृतनिश्चयचि जाणिजे ॥ २८ ॥ ऐसें सर्वांचेंचि वचन । ऐकून मग तो रघुनंदन । बिभीषणास संबोधून । आज्ञा सांगे तयातें ॥ २९ ॥ जंव या भूतमात्रातें धरा । अंगीं धरितसे राक्षसवीरा । तंव तूं राक्षस-राज्याधिकारा । मदर्थ हातीं वागवीं ॥ ३० ॥ आतां यावरी गोष्टी दुज्या । बोलूंचि नको तूं राक्षसराजा । आज्ञेनुसार राहें माझ्या । शपथ माझी तुला हे ॥ ३१ ॥ मग बोलला हनुमंतास । तुवां गा येथेंचि कीजे वास । चिरंजीव तूं अससी खास । मच्छंदद साच करी हा ॥ ३२ ॥ मग जांबवंतातें रघुवीर । बोलला, रहा तूं या भूवर । द्वापरीं तुजमजमाजीं थोर । युद्ध होणार निश्चयें ॥ ३३ ॥ यापरी तियांस ठेवून येथ । मग तो दयार्द्र श्रीरघुनाथ । बोलला रक्षःकपींद्रांप्रत । या जी सर्व मजसंगें ॥ ३४ ॥ मग प्रभातीं श्रीरघुनाथ । सांगतसे श्रीवसिष्ठांप्रत । गुरो, एथवां पुढती त्वरित । अग्निहोत्रें निघोंद्या ॥ ३५ ॥ तंव तें ऐकून वसिष्ठवर । प्रस्थानकर्म तें शास्त्रानुसार । करितसे, निश्चय करून थोर । त्या महाप्रयाणप्रसंगीं ॥ ३६ ॥ मग कोटिचंद्रासमान । परम तेजस्वी रघुनंदन । निघाला चंद्राचि अभ्रांमधून । तैसा स्वपुरींतून हो ॥ ३७ ॥ उजवे हाताप लक्ष्मी सती । चालली पद्म घेवोनी हातीं । डावे अंगीं भूदवी ती । चालली संगें प्रभूच्या ॥ ३८ ॥ शास्त्रें, अस्त्रें, धनुष्य, बाण । यांहीं जोडिलें मनुष्यपण । आणि या प्रसंगा पुढचें ठाण ।

धरून चालूं लागले ॥ ३९ ॥ वेदहि मानवरूप धरून । चालले तेधवां स्वारींतून । मुनि जे दिव्य-ज्ञान-धन । तेहि त्यासंगें चालिले ॥ ४० ॥ देवी गायत्री त्रिजगत्पूत । तीहि प्रणवाच्या समवेत । व्याहृतींतें धरून तेथ । चालली संगें प्रभूच्या ॥ ४१ ॥ मागुती जनहि अयोध्यावासी । चालले स्वपुत्रद्वारांगनांशीं । मोक्षाचींच द्वारें त्यांसी । उघडीं केलीं श्रीरामें ॥ ४२ ॥ भरतहि चालिला त्या आंतून । संगें भार्या, बंधु, जन । दासदासीही सर्व घेऊन । मागुती सीतापतीच्या ॥ ४३ ॥ अमात्य आणि प्रधानजन । वृद्ध, तरुण कीं कुमार सान । सर्वही अति औत्सुक्यें करून । रामापाठीं चालले ॥ ४४ ॥ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य तिन्ही । आणि शूद्र जे चतुर्थस्थानीं । सर्वही श्रीराममागुनी । आनंदानें चालले ॥ ४५ ॥ सुग्रीवादिक वानर तेही । स्नानें करोनियां लवलाहीं । चालले प्रभूच्या मार्गें पाहीं । वार्ता करीत सुखाच्या ॥ ४६ ॥ भोगीत संसाराचा शिण । तेथें नाहींच राहिला कोण । बाह्य सुखासक्तीनें जाण । दीनही कोणी नुरला ॥ ४७ ॥ आनंदरूप श्रीरघुनाथ । सर्वीं त्याचाचि धरिला पथ । त्यजूनि संसारसुख समस्त । पशुभृत्यांच्या समेतें ॥ ४८ ॥ भूतें दृश्य-अदृश्यादिक । स्थावर-जंगमही आणिक । सर्वही मागून निघाले एक । त्या श्रीपरमात्मयाच्या ॥ ४९ ॥ कोणीहि राहिला नाहीं घरीं । झाली शून्याचि अयोध्यापुरी । मन वेधून श्रीरघुवीरीं । सकळही मार्गें चालले ॥ ५० ॥ असो मग तो देवदेवेश्वर । नगरापासून गेलिया दूर । देखून सरयू नदीचें तीर । थोर संतोष

पावला ॥ ५१ ॥ मग तो सर्वहि निजांतरांत । निःशेष जाणिता झाला मात । जयाच्या स्मरणोंचि होती पूत । जीव, स्वमळ धुवोनी ॥ ५२ ॥ मग ते स्थळा कमलासन । देव, ऋषि आणि सिद्ध जन । पातले; दाटून गेलें गगन । विमानयोगें तयांच्या ॥ ५३ ॥ तयीं तीं स्वयंप्रकाशेंकरून । विमानें परम तेजोधन । तेणें तें आकाशवितान । तारामयाचि जाहलें ॥ ५४ ॥ मग सुगंधामिश्रित वारे । ते स्थळीं वाहूं लागले सारे । कुसुमांचा पर्जन्याचि बा रे । वर्षिला तेथ सुरांहीं ॥ ५५ ॥ मग ते विद्याधर किन्नर । गाऊं लागले अति सुंदर । देव-मृदंगांचाहि गजर । तोही चालूं जाइला ॥ ५६ ॥ तंव तेधवां श्रीरघुवीर । पायें स्पर्शी सरयूनीर । मग फिरून सभोंवार । प्रदक्षिणा केली तयानें ॥५७॥ ते समयीं मग विधीनें हात । जोडून प्रार्थिला तो श्रीनाथ । प्रभो तूं परमात्मा साक्षात । देवदेवेश श्रीविष्णु ॥ ५८ ॥ तूं चैतन्य आनंद घन । तुजासि त्रिकाळाचें या ज्ञान । तथापि तूं भक्त-करुणाघन । मत्कार्य केलें तुवां जें ॥ ५९ आतां देव तूं, बंधु तिघे । त्यांसवें विष्णुरूपीं या रिघे । नातरी दुजेंही नव रूप घे । आणि रक्षीं या सुरांतें ॥ ६० ॥ तूंचि सर्व देवाधिपती । निश्चयें जाणिलें हें मीं चित्तीं । परी हे मजवांचूनि मती । आणिकां कोणा नेणवे ॥ ६१ ॥ देवा, तुज ही माझी प्रणती । असों दे आणिक सहस्रावरती । मज तूं कृपाळू हो श्रीपती । नामितों तूतें आणखी ॥ ६२ ॥ यापरी प्रार्थितां कमलासन । नावेक दिपले सुरांचे नयन । सर्वांचि विष्णु श्रीभगवान- ।

रूपें प्रकट जाहले ॥ ६३ ॥ तेधवां तो शंखचक्रधर । शोभला अत्यंत कमलावर । लक्ष्मण
शेष हा धरणीधर । प्रभूची शय्या जाहला ॥ ६४ ॥ भरत शत्रुघ्न दोघे जण । शंख-
चक्र मग झाले जाण । राम श्रीविष्णु पुरुष पूर्ण । सीता लक्ष्मी जाहली ॥ ६५ ॥
ऐसा परम देदीप्यमान । चतुर्भुज विष्णु श्रीभगवान । देखून समस्त ते सुरजन । पर-
मानंदित । जाहले ॥ ६६ ॥ मग ते विधि, मुनि, सुरवर । समस्त मिळून तो श्रीवर ।
ध्याती, स्तवितीच वारंवार । पूजिती, स्मरती, चिंतिती ॥ ६७ ॥ साधले सर्वही मनो-
रथ । ऐसें समस्तां होऊन तेथ । आनंदसागरामाजी चित्त । पोहूं लागलें तयांचें ॥ ६८ ॥
मग तो श्रीविष्णु भगवान । विधीतें म्हणे हे तिर्यक् जन । प्रेमें आलेत मजमागून ।
शुद्ध निष्ठेनें आपुल्या ॥ ६९ ॥ नरदेहातेंही न पावले । परंतु हे सुकृतवंत भले ।
म्हणुनि वैकुंठीं आणिलें । पाहिजे यांतें अवश्य ॥ ७० ॥ तंव तें ऐकून कमलासन ।
म्हणे—जें माझियावरती स्थान । सांतानिक या नामेंकरून । वर्ततें नाना सुखाचें ॥ ७१
॥ तेथ हे सुपुण्यवंत जन । त्वन्निष्ठच्या योगें करून । जाऊन पावात सौख्य घन ।
दिव्य भोगांचें सर्वही ॥ ७२ ॥ आणिक प्रभो, जे कोणी जन । पवित्र त्वन्नाम उच्चा-
रून । त्यजितील हें देहाचें सदन । अज्ञानयोगें करूनी ॥ ७३ ॥ तरी तेहि या लोका-
आंत । पावतील हे लक्ष्मीकांत । जेथें योगमार्गाची मात । चालूं न शके लेशही ॥ ७४
॥ असो मग ते राक्षस-कपिनाथ । स्पर्शुनी त्या शुद्ध नीराप्रत । त्यजिती आंपुले

देह समस्त ॥ कार्यार्थ जे स्वीकारिले ॥ ७५ ॥ मग ते ज्या अंशाचे मूळ । त्या त्या रूपास पावले सकळ । सुग्रीव सूर्यवीर्याचें फळ । सूर्यस्वरूपा पावला ॥ ७६ ॥ मागुती जन जे उरले त्यांहीं । सरयूजळांत रिघून पाहीं । शरीरें त्यागूनियां लवलाहीं । जोडिलीं दिव्य स्वरूपें ॥ ७७ ॥ मग दिव्य वस्त्रीं आभरणीं । विमानीं आरूढ होवोनि क्षणीं । सांतानिक लोकाचे ठिकाणीं । गमन केलें समस्तीं ॥ ७८ ॥ तिर्यक् योनींचे जीव ते । देखिले प्रेमें सीताकांतें । मग ते पावले देवलोकातें । सरयूजळांत रिघूनी ॥ ७९ ॥ श्रीरामदर्शन घ्यायासाठीं । लोक जे आले होते पाठीं । तयांची आसक्तीची गांठी । प्रभुदर्शनेंचि तुटली ॥ ८० ॥ तेही स्पर्शून सरयूजळ । पावले स्वर्गलोकाचें फळ । श्रीरामाचें पदकमळ । चित्तीं धरूनि एकलें ॥ ८१ ॥ श्रीरामाची हे उत्तरकथा । शंकरें इतुकी कथिली स्वतां । भार्या पार्वती श्रवण करितां । पूर्ण आराम पावली ॥ ८२ ॥ यांतील एकचि ओळ कोणी । पठण करी कीं घेई श्रवणीं । तरी शतजन्मींच्याहि क्षणीं । पातकांतून मुक्त तो ॥ ८३ ॥ कोणी जन जो दिवसेंदिवस । सांठवितो पापाची रास । परी तो भाव धरून यास । ओळ वाचील एकली ॥ ८४ ॥ तरीहि तो तें सारें अघ । निरसून रामींच पावे बघ । सलोकतामुक्तीचें मग । दुर्लभ पद ये तयातें ॥ ८५ ॥ शंकरें हे श्रीरामकथा । आधींच आणून दृष्टिपथा । रामाज्ञेनेंच रचिली स्वतां । प्रिय ही फार राघवा ॥ ८६ ॥ परम पुण्यदायी हें चरित । शंकरें कथिलें गिरिजेप्रत । जयाचा

पाठ ऐकूनि त्वरित । श्रीराम संतोष पावतो ॥ ८७ ॥ श्रवण कीं कारितां मग लेखन । प्रभु तो विशेषें संतोषून । संनिध राहून वैभवदान । करितो नित्य जनातें ॥ ८८ ॥ आदिकाव्य हें रामायण । परम जनमनोहर जाण । ब्रह्मादिकांहीं याचे गुण । अनेक रीती गायिले ॥ ८९ ॥ ह्मणोनि भावें श्रवण करा । अथवा पठणीं नेम धरा । मग वि" शुद्ध होवोनि घरा । पाविजे लक्ष्मीपतीच्या ॥ ९० ॥ ऐसी अध्यात्मरामकथा । भाविकें ध्यावी श्रवणपथा । ह्मणोनि लिहिलीसे सर्वथा । रघुवीरदासें प्राकृतीं ॥ ९१ ॥ श्रीराम ॥ ६७ ॥ एकूण कांडें ७ ॥ ओवीसंख्या ५४७४ ॥ ॐ ॥ ॐ ॥ ॐ ॥ ॐ ॥

---

उत्तरकांड समाप्त.





